## हैती मध्ये लोकशाही राजवट



१५ ऑक्टोबर हा हैतीच्या इतिहासातील एक महत्त्वाचा दिवस होता. या दिवशी हैतीचे लोकप्रिय पुढारी जीन बेरट्रंड अरिस टॅड आपले प्रवासी जीवन संपवून अध्यक्ष-पदाची सूत्रे सांभाळण्यासाठी हैतीला परत आले होते. देशाला सेनेच्या हुकुमशाहीतून मुक्त करून तेथे लोकशाही प्रस्थापित करण्यासाठी सन १९९१ पासून चळवळ सुरू झाली होती. हुकुमशहा सेनापति लेफ्टेनंट जनरल रावोल सेड्रास यांच्यावर अमेरिकेने दडपण आणले.

अमेरिकेचे माजी अध्यक्ष जिमी कार्टर यांनी तीन वर्षापूर्वी पासून या बदलाच्या दिशेने प्रयत्न सुरू केले होते.

१९९० मध्ये पहिल्यांदा निवडणूक झाली. या निवडणुकीत अरिस टॅड हे अध्यक्ष-पदावर निवडून आले. पण अवघ्या सात महिन्यात त्यांना अध्यक्ष-पद सोडावे लागले.

क्रिस्तोफर कोलंबसने ५०० वर्षापूर्वी अमेरिका शोधून काढली. त्याच वर्षी म्हणजे सन १४९२ मध्ये हैती देश ही प्रकाशात आला. या द्वीपाचे नाव ठेवले गेले 'हिस्पनोला'. याचा अर्थ छोटा स्पेन. स्थानीय रेड इंडियन याला हैती म्हणत असत. या देशाच्या पश्चिमी भागाला अजून ही हैतीच म्हणतात. पूर्वेकडील भाग 'डोमिनिकन रिपब्लिक' बनला.

हे द्वीप फार सुंदर आहे. स्पेन मधून लोक आले आणि इथे वसले. स्थानिक रेड-इंडियन लोकांना त्यांनी आपल्या दबावाखाली ठेवले. सत्राव्या शतकात हे फ्रेंचांच्या ताब्यात आले. आणि हा एक समृद्ध देश बनला. अठराव्या शतकाच्या शेवटी फ्रान्स मधे राज्य-क्रान्ति झाली, नि फ्रान्सच्या ताब्यातील अनेक देश बंड करून उठले. अनेक देशांनी आपल्या स्वातंत्र्याची घोषणा केली. हैती या देशांपैकी एक होता. असे म्हणतात की आपले आधिपत्य टिकविण्यासाठी नेपोलियनने काही सैनिक हैतीला पाठविले होते, पण ते तेथून पळून आले. कारण त्या वेळी तेथे विषम-ज्वराची साथ पसरली होती. १ जानेवारी १८०४ रोजी हैतीने आपणास स्वतंत्र घोषित केले.

सन १९१५ पासून हैती अमेरिकेच्या अधीन राहिला. वीस वर्षानंतर इथे अनेक वेळा बंडाळी झाली. १९५७ मध्ये डा. फ्रांकोइस डुवालियरने सर्व अधिकार आपल्या हाती घेतले. त्याच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा जीन क्लॅड डुवालियरने राज्य-सत्ता सांभाळली. सन १९८६ मध्ये त्याला आपला देश सोडून जावे लागले. लोकशाही पद्धतीने मी राज्य करीन अशी सेनापति लेफ्टेनंट जनरल नांफीने ग्वाही दिली होती. पण प्रत्यक्षात तो तसे करू शकला नाही. १९८८ मध्ये त्याला ही पदच्युत व्हावे लागले. सहा महिन्यांनी बंडखोरांच्या मदतीने त्याने सत्ता हस्तगत केली, पण त्याला पुन्हा पदच्युत व्हावे लागले. यानंतर इथे लोकशाही राजवट सुरू झाली, पण सेनाधिकाऱ्यांचाच वरचष्मा राहिला.

जीन बेरट्रंड अरिस टॅड यांचा जन्म पोर्ट ऑफ सॅल्यूट येथील एका गरीब कुटुंबात झाला. लहानपणीच

आपल्या वडिलांच्या मृत्यूनंतर ते आपल्या आई बरोबर राजधानी पोर्ट ऑफ प्रिन्सला आले. येथील एका कॅथॉलिक शाळेत त्यांचे शिक्षण झाले. यामुळे गरीबांची सुख-दुःखे त्यांना चांगली समजली. सन १९७० मध्ये जरी त्यांनी धर्म-प्रचारचे कार्य सुरु केले, तरी ते गरीब लोकांच्या बरोबर त्यांच्या झोपड्यांतून रहात असत. यामुळे सामान्य जनतेला त्यांच्याबद्दल आदर व विश्वास वाटे. जनतेने मनःपूर्वक त्यांना साथ दिली आणि डुबालियरच्या कौटुंबिक हुकुमशाही विरुद्ध आवाज उठवला. त्यांनी अगदी उघड उघड बंड आरंभिले. हैतीचे पुढारी अरिस टॅड यांच्या नेतृत्वाखाली या महत् कार्याचा प्रारंभ झाला. सन १९८६ मध्ये डुबालियरची सत्ता झुगारून देण्यात आली. यानंतर ही अरिस टॅड लोकशाही राज्य-प्रणाली सुदृढ करण्याचे काम करीत राहिले. शासनाच्या विरुद्ध बंडखोरी करण्यामुळे धर्म-मार्तंड रागावले. कॅथॉलिक लोकांनी त्यांच्यावर बहिष्कार टाकला. ते जाति-भेदाला प्रोत्साहन देत आहेत असा त्यांच्यावर आरोप केला गेला. सन १९९० मध्ये जेव्हा निवडणुकांची घोषणा झाली, तेव्हा अरिस टॅडला शंका होती की निवडणूक स्वच्छ वातावरणात व न्यायपूर्ण रीतीने होणार नाही. म्हणून त्यांनी तिचा बहिष्कार केला. पण शेवटच्या क्षणी ते स्वतःच एक उमेदवार म्हणून निवडणुकीच्या रिंगणात उतरले व प्रचंड मते मिळवून निवडून आले.




अध्यक्ष अरिस टॅड यांचे विचार साम्यवादी आहेत असा समज होता. म्हणून देशाच्या गरीब जनतेसाठी त्यांनी ज्या योजना आखल्या, त्यांच्याशी अमेरिकन सरकार सहमत झाले नाही. लोकशाहीचा विरोध करणाऱ्या काही लोकांनी सेनेच्या मदतीने त्यांना अधिकार-पदावरून उतरविण्याचा प्रयत्न केला. आणि सन १९९१ मध्ये त्यांच्या या प्रयत्नांना यश ही आले. हैतीत पुन्हा सेनेची सत्ता सुरू झाली. अमेरिकेने या हुकुमशाही राजवटीचा विरोध केला आणि इथे लोकशाही स्थापित करण्याच्या दृष्टीने आपले प्रयत्न चालू ठेवले. कधी सेनाधिकाऱ्यांना धमकी दिली तर कधी त्यांना समजाऊन सांगितले.

१५ सप्टेंबरच्या सुमारास अमेरिकेचे अध्यक्ष बिल क्लिंटन यांनी हैतीचे सेनापति व वरिष्ठ सेनाधिकाऱ्यांना शेवटचे आव्हान दिले. त्यांनी घोषणा केली की जर देशात लोकशाही स्थापित न केली तर अमेरिका हैतीवर आक्रमण करील. अमेरिकेत प्रवासी म्हणून राहणाऱ्या अरिस टॅड यांनी बिल क्लिंटन यांच्या घोषणेला साथ दिली. त्यांनी जगातील सर्व नेत्यांना आपली भूमिका समजावली की हैतीत लोकशाही स्थापित करण्यासाठी केल्या जाणाऱ्या प्रत्येक प्रयत्नात ते सहकार्य करतील.

हैती मध्ये झालेल्या सर्व चर्चा विफल झाल्या. १९, सप्टेंबर रोजी अमेरिकेचे सैनिक हैतीत उतरले. युद्धाच्या भीतीने असंख्य नागरिक पळून जाऊ लागले. लेफ्टनंट जनरल सिड्रास यांनी या अटीवर अधिकार-सूत्रे खाली ठेवली की त्यांच्या शासन-काळात झालेल्या अत्याचारांत विरुद्ध कोठली ही कारवाई केली जाणार नाही. अमेरिकेने त्यांची ही अट मान्य केली.

अरिस टॅड जेव्हा विमानाने हैतीत उतरले तेव्हा २९ तोफांची सलामी देऊन त्यांचे स्वागत करण्यात आले. अरिस टॅड म्हणाले - ''शांतीचे संरक्षण करण्यासाठी अमेरिकेने जे साह्य केले, त्याबद्दल आम्ही कृतज्ञ आहोत.''



# दोन अहंकारी

सुमन्त देशाची राजकन्या भानुमती सुन्दर तर नक्कीच होती, पण त्याबरोबरच ती अतिशय गर्विष्ठही होती. तिने अनेक विद्या शिकून घेतल्या व अनेक कलांतही प्राविण्य मिळवले.

शेजारचा राजा पद्मसेन, याची भानुमतीशी विवाह करायची इच्छा होती. त्याने आपली ही इच्छा व्यक्त करून, मुहूर्ताची तारीख ही पक्की करण्याबद्दल सुमन्त-राजाला एक पत्र लिहिले. राजाने ही गोष्ट मुलीच्या कानावर घातली.

''माझ्या अनुमतीशिवाय असा काही निर्णय घेण्याचा पद्मसेनला काहीही अधिकार नाही. एकमेकांना समजून घेण्यासाठी विवाहापूर्वी दोघांनी भेटणं ही फार आवश्यक बाब आहे. परंतु पद्मसेनने आपल्या मर्यादेचं उल्लंघन केलं आहे. असल्या अहंकारी माणसाशी मी मुळीच लग्न करणार नाही.'' भानुमती ठामपणे म्हणाली.

पद्मसेन मोठा बलशाली असून त्याच्याजवळ विशाल सैन्य आहें. तो कोणत्याही क्षणी आपल्यावर आक्रमण करील - असे सुमन्त-राजाला वाटले.

राजाने ही कल्पनाही मुलीजवळ बोलून दाखवली, पण तिने पित्याला धमकी दिली की, ''जास्त जोर दिलात, तर मी आत्महत्या करीन!'' तिने पुढे असेही आश्वासन दिले की, ''यामुळे तोंड लागलेच, तर मी स्वतः लढायला समोर उभी राहीन!''

प्रदीप नावाचा एक महापंडित एकदा राजाला भेटायला आला. सुमन्त-राजाने आपली एकूण परिस्थिती त्याला स्पष्ट करून सांगितली.

भानुमतीला बोलावून घेऊन प्रदीप तिला म्हणाला, ''चार दिवसांपूर्वीच मी पद्मसेनला भेटलो होतो. त्याच्याइतका विनयशील राजा अन्य कोणीही नसेल. तुझं अभूतपूर्व सौन्दर्य आणि उच्च प्रकारचे शिक्षण यांच्यामुळे तो

रेवती रणनवरे



तुझ्यावर लुब्ध आहे. तुझ्याबद्दल आदरही आहे त्याच्या मनात. तुझ्याशी विवाह करायची त्याची इच्छा आहे. आपल्या वंशाच्या रिवाजा-प्रमाणे तुझ्या पित्याला त्याने पत्रही लिहिलं आहे. आता तू जर अुगीचच त्याला नकार दिलास, तर कदाचित त्याला तो आपला अपमान वाटेल, अन् त्याच्या मनात अहंकार, गर्व निर्माण होईल. अहंकार माणसाला अंध बनवतो, ही गोष्ट तू जाणतेसच.''

भानुमती तरीही तीव्र स्वरात म्हणाली, ''मला याबद्दल मुळीच भय वाटत नाही. मी आपला नकार त्याला कळवणारच आहे.''

यावर प्रदीप हसत म्हणाला, ''घाई नको करूस बेटा! इतका सुयोग्य वर तुला आणखी कुठेही मिळणार नाही. मी तुला एक अुपाय सुचवतो. आपली एक सखी बरोबर घेअून तू माझ्या आश्रमात ये. पद्मसेनही तिथे येईल, अशी व्यवस्था करीन मी. तिथे तुम्ही दोघं एकमेकांना समजून घेअू शकाल असं वाटतंय.''

प्रदीपची ही कल्पना भानुमतीला पटली. विनया नावाच्या आपल्या सखीला बरोबर घेअून ती प्रदीपच्या आश्रमात गेली, अन् दोन दिवस तिथे राहिली. प्रदीपचा निरोप मिळाल्यावर पद्मसेनही तिथे आला.

भानुमती आपल्या सखीसह आश्रमाच्या एका अुंचशा जागी बसलेली होती. पद्मसेन तिला भेटण्यासाठी तेथे आला. पंडित प्रदीपच्या सूचनेप्रमाणे भानुमतीने विनयाला राजकुमारी-सारखे अलंकार व वेष चढवला होता, अन् ती स्वत: सामान्य सखीप्रमाणे जवळ बसून होती. आता पुढे काय होणार, हे पहायला दोघीही फार अुत्सुक होत्या. त्यांना खूप हसायची संधी मिळणार होती.

पद्मसेन तेथे पोचला अन् विनयालाच भानुमती समजून बसला. तिच्या सौन्दर्यावर चकित होअून तो तिला म्हणाला, ''तुझ्याबद्दल खूपसं ऐकलं होतं, पण प्रत्यक्ष पहायचा योग आजच आला. इतकी सुन्दर पत्नी लाभली तर मी आपलं अहोभाग्य समजेन. संकोच न बाळगता एकदा माझ्याकडेही नीट पाहून घे. तुला मी आवडलो तर पुढचं पाअूल अुचलू या; नाहीतर तुझ्या पित्याला पाठवलेलं पत्र मी परत मागवून घेईन. कारण आत्ता तुला प्रत्यक्ष पाहिल्यावर, मी तुझ्या लायकीचा नाही, असं वाटायला लागलंय मला.''

पद्मसेन विनयाशीच बोलत राहिला होता. शेजारी बसलेल्या भानुमतीकडे त्याने दृष्टिक्षेपही टाकला नाही. भानुमतीला ही गोष्ट फार खटकली. अचानक अुठून ती तेथून निघून गेली. तरीही पद्मसेन विनयाशी बोलतच राहिला.

भानुमती परत आली, तेंव्हा आपल्या कुटीतून बाहेर येणाऱ्या प्रदीपने तिला पाहून विचारले, ''हे काय? एकटीच आलीस? पद्मसेन कुठाय?''

राजकुमारी अुत्तरली, ''विनयाला, पाहून पद्मसेन 'ती मीच आहे' असे समजला. मी तिच्या शेजारीच बसून होते, पण त्यानं ढुंकूनही माझ्याकडे एकदा पाहिलं नाही. तिच्या सौन्दर्याचीच तोंड फाटे पर्यन्त स्तुती करत राहिला तो.''

''असं? मी तुम्हा दोघींना प्रथम एकत्र पाह्यलं, तेंव्हा मला सुद्धा असं वाटलं होतं की, तुझी मैत्रीणच तुझ्याहून सुंदर आहे.''

यावर भानुमती चिडून म्हणाली, ''हो तर! हा सर्व अलंकारांचा प्रभाव आहे.''

''म्हणजे याचा अर्थ असा की, सौंदर्य अलंकारांवर अवलंबून असतं! मग काही बायका आपल्या सौन्दर्याबद्दल गर्व का बाळगतात कुणास ठाअूक!'' प्रदीप म्हणाला.

''सौन्दर्याला जास्त अुठाव देणं हे केवळ राजपरिवारालाच शक्य असतं. अन् राज-घराण्यात जन्म घ्यायला तर पूर्व-जन्मीचं पुण्य





असायला हवं असतं! अशी संधी प्रत्येकालाच मिळणं शक्य नसतं ना!'' भानुमती दर्पभरल्या स्वरात बोलली.

भानुमतीच्या या दर्पोक्तीवर हसून प्रदीप म्हणाला, ''पण आता पद्मसेननं विनयाशी विवाह केला, तर काय होईल? मग तिलाही 'राजभराण्यातली' असंच म्हणतील ना! अन् मग कायम तिला तुझ्यापेक्षा सुंदर असंच म्हटलं जाईल की नाही?''

आता मात्र भानुमती पेचात पडली. ती म्हणाली, ''बापरे, मोठीच चूक झाली की माझ्या हातून! आत्ता लागलीच जाऊन खरी गोष्ट सांगते मी पद्मसेनला!''

''आता खरं सांगयला गेलीस तर पद्मसेन नाराज होईल. तुझ्या या कपटनाटकाबद्दल रागावेल चांगला. आता बाकी सगळं माझ्यावर सोपवून मुकाट्यानं माझ्याबरोबर चल.'' प्रदीपने सुचवले.

दोघे पद्मसेनजवळ पोचले, तेंव्हा तो विनयाला म्हणत होता, ''राजकुमारी, इतका वेळ मीच बोलत राहिलोय; खूप बोललो की! पण तू मात्र एक शब्दही बोलली नाहीस अद्याप?''

इतक्यात पंडित प्रदीप म्हणाला, ''पद्मसेन, ती राजकुमारी नव्हे, राजकुमारीची सखी विनया आहे ती! अन् ही बघ राजकुमारी भानुमती माझ्याजवळ उभी आहे.''

आश्चर्यचकित होऊन पद्मसेनने एकदम भानुमतीकडे वळून पाहिले. ती अगदी सामान्य वेषात खाली मान घालून जमिनीकडे पहात होती.

नाराज होत पद्मसेन म्हणाला, ''हे कसलं नाटक?''

प्रदीप उत्तरला, ''नाटक बिटक काही नाही. सखीची इच्छा होती की आपण राजकुमारीसारखं सजावं. पण अंत:पुरात तसं केलं, तर सगळ्यांना कळेल. महाराजांनाही ते कळेल अन् तिची लगेच हकालपट्टी होईल, म्हणूनच भानुमती तिला घेऊन इथे आली आणि तिनं सखीची इच्छा पूर्ण केली. राजकुमारी इथे माझ्या आश्रमात असल्याची खबर मीच तुला पोचवली. तू इथे आलास, अन् अलंकार पाहून सखीवरच फिदा झालास. स्वत: राजकुमारीला ओळखलं नाहीस, आणि उलट हे सगळं नाटक म्हणतोयस?'' प्रदीपच्या आवाजात काहीसा धिक्कार होता.

''माझ्या चुकीबद्दल मला सावधान केलं गेलं असतं, तर माझं असं हसं झालं नसतं.'' पद्मसेन संकोचून म्हणाला.

''होय, तुझं म्हणणं बरोबर आहे. पण तू इथे येणार आहेस, हे भानुमतीला ठाऊक नव्हतं. तुझ्या अचानक येण्यानं भांबावून ती आश्रमाकडे निघून आली. अन् तू बोलत राहिल्याने आपली सुटका कशी करून घ्यावी हे विनयालाही कळेना! राजकुमारी सर्व विद्यांत पारंगत आहे. तिला न ओळखण्याची तुझी अयोग्यता तुझी असमर्थताच सिद्ध करते. सौन्दर्य पाहिल्याबरोबर त्यावर फिदा होण्याच्या तुझ्या घाईमुळेच तू चेष्टेचा विषय बनलास. यात या दोघींचा काहीच दोष नव्हे.''

महापंडिताच्या या सडेतोड बोलण्यानेही पद्मसेन आवेशात आला नाही. 'चूक आपलीच आहे' हे त्याच्या ध्यानी आले, म्हणून तो हळूच भानुमतीजवळ येऊन तिला म्हणाला, ''मी तर मोठाच अहंकारी आहे. मी कधी कोणाची पर्वा करत नाही, कोणाला स्वत:पेक्षा योग्य मानत नाही. तुझ्या इच्छे-अनिच्छेची पर्वा न करताच तुझ्या पित्यासमोर मी विवाहाचा प्रस्ताव मांडला. मी तुझ्या योग्य नव्हेच. क्षमा कर मला; मी ते पत्र परत मागवून घेतो.''

''होय, हे ठीकच होईल. कारण माझी ही सखी माझ्यापेक्षा सुन्दर आहे.'' भानुमती



म्हणाली.

"आपल्या सखीला तू तर राजकुमारीसारखं सजवलंस, अलंकार चढवलेस तिच्या अंगावर. आणि तिला तू स्वत:बरोबर बसवूनही घेतलंस. यापेक्षा विनय, निस्वार्थता अन् महोन्नत व्यक्तित्वाचं अुत्तम अुदाहरण दुसरं कोणतं असेल? तुझ्या या सद्गुणांपुढे अद्भुत सौन्दर्यही फिकंच पडेल. म्हणूनच मी स्वत:ला तुझ्या योग्य समजत नाहीय."

भानुमती यावर काही बोलणार, इतक्यात तिला थांबवत पंडित प्रदीप म्हणाला, "दोघंही स्वत:ला एकमेकासाठी अयोग्य समजत आहात तुम्ही. यावरून हेच स्पष्ट होतंय की पुन्हा दोघांच्यातला अहंभाव संपुष्टात आलाय. आता दोघंही आपापल्या राजवाड्यांकडे जाअून विवाहाची तयारी सुरू करा. विवाहाच्या दिवशी हजर राहून मी तुम्हाला आशिर्वाद देईन."

प्रदीपला प्रणाम करून पद्मसेन निघून गेल्यावर अजूनही असंतुष्ट असलेली भानुमती म्हणाली, "पद्मसेन तर विनयाच्या सौन्दर्यावर भाळला आहे. तिचं सौन्दर्य हे खरं आहे. माझ्या नम्रतेला त्यानं तिच्या सौन्दर्या पेक्षाही अधिक महत्त्व दिलंय खरं, पण माझा तो विनय, ती नम्रता खरी नव्हे! आपणच ते माझ्यावर मढवलंय. तेंव्हा त्याचा विवाह तर विनयाशीच व्हायला हवा, माझ्याशी नाही."

भानुमतीच्या डोक्यावर हात ठेवत प्रेमाने प्रदीप म्हणाला, "मुली, तुझ्या विनय-गुणावर पद्मसेन फार प्रसन्न आहे. यासाठीच तो तुझ्यावर प्रेमही करू लागलाय. तेव्हा प्रत्यक्षातच तो गुण तू आपलासा करणं अन् गुणी बनणं हे श्रेयस्कर नव्हे का? तुला हे सहज शक्य होईल. आपली सखी विनया हिची तू चिन्ता करू नकोस. तिच्याशी माझं बोलणं झालंय. नगरच्या सुरक्षा अधिकाऱ्याचा मुलगा पद्मनाग याच्याशी तिचा विवाह पक्का समज. तुम्हा दोघांना आपापला अहंकार सोडून आदर्श दंपती बनण्यासाठीच मी इथे बोलावलं. आता कळलं ना सगळं?"

भानुमतीने प्रदीपच्या पावलांना स्पर्श करून नमस्कार केला. विवाहा नंतर संपूर्ण परिवारात तीच नम्रतेचा आदर्श मानली जाअू लागली.






(ट्रॉय शहराचा राजा वर्धन याला मोहन नावाचा मुलगा झाला. परन्तु 'या मुलामुळे ट्रॉयचा विनाश होणार' असे भविष्य कळल्यामुळे त्याने मुलाला आपल्या प्रमुख गुराख्याच्या हाती सोपवून त्याला मारून टाकायची आज्ञा दिली. परन्तु त्या नवजात अर्भकाला मारून टाकायचे धाडस गुराख्याला झाले नाही. त्याने बाळाचे संगोपन करून त्याला मोठा केले. एकदा स्वर्गीच्या तीन अप्सरांनी मोहनकडे येअून 'तिघींपैकी सर्वात अधिक सुन्दर कोण' याविषयी निर्णय देण्याबाबत त्याला आग्रह केला. त्यातील कामिनी नावाच्या अप्सरेने त्याच्याशी वायदा केला की, "मी तुला भुवनसुन्दरी मिळवून देईन; अन् मोहनने तिलाच 'सुन्दर' म्हणून घोषित केले.)

**रा**जा वर्धनने आपल्या मुलाला मारून टाकण्यासाठी गुराख्याच्या स्वाधीन केल्यापासून तो मुलाच्या स्मृतिप्रीत्यर्थ त्याचा जन्मदिवस मात्र मोठ्या अुत्साहाने, धामधुमीने साजरा करी. पण आपला तो पुत्र जिवन्त आहे, हे त्याला ठाअूक नव्हते.

मोहनने कामिनीला जेव्हा सोन्याचे फळ दिले, त्याच सुमारास इकडे ट्रॉय शहरात त्याचा जन्मोत्सव साजरा करायची तयारी चालू होती. वर्धनच्या शिपायांनी इडा पर्वतावर येअून 'स्पर्धेत भाग घेण्यासाठी अुत्तम असे बैल पाठवण्याबद्दल' राजाज्ञा सुनावली.

मोहनने हा अुत्सव कधीच पाहिला नव्हता. स्पर्धा पहाण्याची त्याला फार अुत्सुकता वाटली. आपल्या गुराखी-पित्याबरोबर ट्रॉयला जाण्यासाठी त्याने हट्ट धरला. परन्तु 'आपले

रहस्य अुघडे पडेल' अशी गुराख्याला भीती वाटली. 'मुलाला मारून न टाकता, अुलट आपल्याच घरी त्याला गुराख्याने वाढवले आहे असे कळले, तर कोणास ठाअूक, राजा आपल्याला कसली भयंकर शिक्षा करील, अन् शिवाय पुत्रवत् पालन केलेल्या मोहनवर ही काय प्रसंग ओढवेल,' अशी काळजी त्याला सतावू लागली. परन्तु मोहनचा आग्रह मात्र कायम होता. त्याला एकटा पाठवायचे धाडसही न करवल्यामुळे गुराखी स्वतःही त्याच्याबरोबर ट्रॉयच्या अुत्सवासाठी गेला.

ट्रॉय मधे आखण्यात आलेल्या वार्षिक अुत्सवातअनेक प्रकारच्या स्पर्धा होत. त्यापैकी 'मल्लयुद्ध' ही ही एक स्पर्धा असे. वर्धनच्या सिंहासना समोरच कित्येक मल्ल कुस्ती करत असत. त्यात कोणालाही भाग घेण्याची मुभा असे. जो मल्लवीर सर्वांना हारवून येईल, त्याच्या डोक्यावर मुकुट घालण्याची प्रथा होती.

गुराख्याने कितीही अटकाव केला, तरी तो न मानता मोहनने मल्लयुद्धात भाग घेतलाच. त्याने सर्वांना चीत केले अन् त्याच्या डोक्यावर मुकुट ठेवला गेला. नंतर झालेल्या पळण्याच्या शर्यतीतही भाग घेअून त्यातही सर्वप्रथम येणाऱ्यासाठी ठेवलेला मुकुट त्यानेच पटकावला. मोहनने असे दोन मुकुट मिळवताच तो वर्धनच्या इतर पुत्रांच्या असूयेचा विषय बनला. कुठून तरी अचानक अुपटलेल्या या सामान्य, खेडवळ मोहनचा पराभव करण्यासाठी त्यांनी त्याला कुस्तीचे आव्हान दिले. पण या कुस्तीत मोहनने त्यांनाच लोळवले अन् तिसरा मुकुट मिळवला.



मोहनच्या शौर्यामुळे राजकुमारांना त्याचा क्रोध आला. त्यांनी त्याचा वध करायचा निश्चय केला. त्यांनी आपल्या सैनिकांना सावधानतेची सूचना दिली की, 'मोहनला क्रीडांगणातून सहीसलामत बाहेर जाअू द्यायचे नाही!' वीरसिंग आणि अतिभयंकर नावाचे दोन बलशाली योद्धे हातात तलवारी घेअून त्याच्यावर तुटून पडले. त्यातली विचित्र गोष्ट अशी की, अतिभयंकर आणि मोहन हे दोघेही एकाच आईबापांच्या पोटी जन्मलेले पुत्र असून त्यांना ही सत्य हकिकत माहीत नव्हती!

आता मात्र गोष्टी मर्यादेबाहेर जात आहेत, असे पाहून गुराखी धावत पळत वर्धनकडे गेला. त्याने राजाला निवेदन केले, ''महाराज, मोहनचे रक्षण करा; तो ही आपलाच पुत्र आहे.''

'आपल्या मुलाला मारून न टाकता जिवन्त ठेवले अन् राजाज्ञा पाळली नाही' असे असून राजा वर्धनला गुराख्याचा राग आला नाही. अुलट ज्या पुत्राच्या मरणानंतरही आपण ज्याचा जन्मोत्सव साजरा करत आहोत, तो जिवन्त असून इतका शूर झाला आहे असे पाहून त्याला आपल्या मुलाच्या योग्यतेबद्दल फार प्रसन्नता वाटली. त्याच्या आनन्दाला आता पारावार नव्हता. त्याने ताबडतोब हुकुमनामा जाहीर केला की - आपला पुत्र परत मिळाल्याबद्दल पुन्हा अुत्सव साजरा केला जावा. मिठाई वाटण्यात आली, मेजवान्या झडल्या अन् देवदेवतांना बळी अर्पण केले गेले. मोहन परत मिळाल्यामुळे 'स्वर्गच आपल्या हाती आल्याचा'





राजाला आनन्द झाला!

तरीही पुजाऱ्यांनी राजाला पुन्हा सावधानतेचा इशारा दिला. त्यांनी स्पष्ट सांगितले "महाराज, या मोहनचा ताबडतोब वध करा. तसं न झालं, तर ट्रॉय नगराचा विनाश नक्की ठरलेला आहे. जळून जाईल सर्व काही!"

"पुत्राला मुकण्यापेक्षा, मी ते पसन्त करीन." राजा मोठ्या गर्वाने उत्तरला.

आता मोहनही राजाच्या इतर राजकुमारांपैकीच एक बनला होता. त्याच्या इतर भावांचे विवाह पूर्वीच झालेले होते, ते गृहस्थ-जीवन मजेत घालवत होते.

त्या साऱ्यांनी मोहनला विचारले, "तू का आता विवाह करून घेत नाहीस?" मोहन तर रोज कामिनीदेवीची पूजा करत असे. त्याला खात्री वाटत होती की तिने दिलेला वर एक दिवस खरा होईल. त्यामुळे त्याने भावांना उत्तर दिले, "ही देवीच माझ्या योग्य बायको मला देईल. बायको शोधायची गरज नाही मला!"

आपल्याला ज्या भुवनसुन्दरीची अपेक्षा आहे, ती स्पार्टा शहरात आहे, ही गोष्ट मोहनला ठाऊक होती. त्यामुळे तो स्पार्टाला जाण्याच्या संधीच्या शोधात होता.

राजा वर्धनची सुलोचना नावाची एक बहीण होती. काही दिवसांपूर्वी ग्रीकांनी तिचे अपहरण केले. या घटनेनंतर राजा वर्धनने याबद्दल मन्त्र्यांचा सल्ला विचारला. असे ठरले की, युद्ध न करता शान्ततामय मार्गाने हा प्रश्न सोडवावा. सुलोचनेला आपल्या ताब्यात देण्याबद्दल ग्रीक राजाला विनंती केली; परंतु ती फेटाळली गेली.

फलत: ग्रीसवर आक्रमण करायचा निर्णय घेण्यात येऊन, युद्धासाठी आवश्यक ती जुळवाजुळव सुरू झाली.

"या हल्ल्याचं नेतृत्व माझ्यावर सोपवलं जावं. आवश्यक तितक्या नौका, सैन्य वगैरे माझ्या हवाली करावं, मी सुलोचनेला परत आणूनच श्वास घेईन. तिला आणण्यात मला यश न आलं, तर निदान तिच्या स्तराच्या एकाद्या ग्रीक राजकुमारीचं अपहरण करून मी तिला इथे नक्कीच घेऊन येईन." मोहनने या सभेत शपथ घेतली.



ज्या दिवशी ही शपथ घेतली गेली, त्याच दिवशी भुवनसुन्दरीचा पति प्रताप हा स्पार्टाहून ट्रॉयला आला. स्पार्टा नगरात अचानक महामारी पसरल्यामुळे ट्रॉयहून काही लोकांना फसवून स्पार्टाला नेऊन त्यांचा देवीला बळी द्यायचा - अशा प्रयत्नात तो ट्रॉयला आला होता.

मोहनने प्रतापचे स्वागत करून त्याची रहाण्याची उत्तम सोय केली, आणि त्याच्याशी मैत्री केली. तो प्रतापला म्हणाला, "माझी स्वत:ची स्पार्टाला येण्याची फार इच्छा आहे. तिथल्या देवतांची पूजा करून पुण्य संपादन करावं, असं मला फार वाटतं." मोहनच्या या बोलण्याने प्रताप खूशच झाला.

मोहनच्या मागणीनुसार नौका तयार केल्या गेल्या. मोहन व प्रताप स्पार्टा नगरात पोचले. भुवनसुंदरीसाठी मोहन खूपशा मौल्यवान भेटवस्तु घेऊन आला होता. त्या साऱ्या त्याने तिला दिल्या अन् त्यांच्याच घरात पाहुणा म्हणून राहू लागला.

भुवनसुन्दरीला पहाताच मोहनची खात्री पटली की, अख्ख्या जगात तिच्यासारखी लावण्यवती दुसरी कोणी असणे शक्यच नाही. त्याच्या डोक्यात सारखे असेच विचार घोळू लागले की, "कामिनीदेवीच्या कृपेनं मी भुवनसुंदरीला घेऊन ट्रॉयला केंव्हा परत जाऊ शकेन?"

कामिनी देवीच्या अप्रत्यक्ष प्रभावाने भुवनसुन्दरीही मोहनवर मोहित झाली. तिने



जेंव्हा त्याला पाहिले, तेंव्हा प्रथम नजरेतच तिला त्याचे आकर्षण वाटू लागले.

प्रतापचा पाहुणा म्हणून मोहन स्पार्टा नगरात नऊ दिवस राहिला. त्यातच एक दिवस प्रतापला क्रीट बेटात जावे लागले. तेथे त्याच्या आजोबांचा मृत्यु झाल्यामुळे त्याला जाणे भाग होते.

मोहनने ताडले की ही संधी म्हणजे कामिनीदेवीच्या आशिर्वादाचेच फळ होय! ही संधी पाहून त्याने भुवनसुंदरीसह ट्रॉयला जाण्याची योजना बनवली, अन् तिनेही ती नि:संकोचपणे मान्य केली.

त्याच रात्री दोघेही गुप्तपणे मोहनच्या नौकेवर पोचले. साऱ्या नौका झरझर ट्रॉयच्या

दिशेने निघाल्या. मधल्या अनेक बेटांवर मुक्काम करत, मौज लुटत बऱ्याच दिवसांनी तो ट्रॉयला पोचला.

परंतु त्यापूर्वीच इकडे प्रताप आजोबांच्या क्रियाकर्मानंतर स्पार्टाला परतला अन् अतिथि बनून आलेल्या मोहनने आपल्याला कसे फसवले, हे त्याला कळून चुकले. तो ताबडतोब आपल्या मोठ्या भावाकडे - राजाकडे - गेला अन् त्याने त्याला सारी हकिकत सांगितली. तो म्हणाला, ''ट्रॉयवर हल्ला करण्याचा ताबडतोब आदेश द्या.'' मोठा भाऊ त्याला समजावत म्हणाला, ''फार गडबड करायची जरूर नाही. मी अगोदर काही दूत ट्रॉयला पाठवीन अन् तुझ्या बायकोला परत आणीन. त्यांनी तुझ्या बायकोला परत पाठवलं नाही, तर मात्र युद्ध अटळ आहे.''

राजाने पाठवलेले दूत ट्रॉयला पोचले. परन्तु तोवर मोहन भुवनसुन्दरीसह ट्रॉयला पोचला नव्हता. त्यामुळे दूतांनी केलेल्या आरोपावर वर्धनने विश्वासच ठेवला नाही.

दूतांना राजा वर्धन म्हणाला, ''तुम्ही म्हणता त्याबाबत मी अनभिज्ञ आहे. अन् तुमच्या राजकुमारीचं अपहरण जर माझ्या मोहनने केलं असलंच, तरीही मी त्याचं परिमार्जन करायला हवं असं मला मुळीच वाटत नाही. कारण ग्रीकांनी माझ्या बहिणीचं अपहरण केलेलं आहे.'' राजाच्या या बोलण्यात चांगलाच कडवटपणा होता!

दूतांना रिकाम्या हातांनी परत पाठवल्या-बद्दल वर्धनला जराही वाईट वाटले नाही. कारण नंतर मोहनबरोबर आलेल्या भुवनसुंदरीचे अलौकिक सौन्दर्य बघून तो चकितच झाला! मोहन व वर्धनच नव्हे, पण इतर सर्वांनी ही या कामगिरीसाठी मोहनचे अभिनन्दनच केले.

मोहन व भुवनसुंदरी यांचा विवाह थाटा-माटाने साजरा झाला. वर्धनने अुघडपणे शपथ घेतली की, ''भुवनसुंदरीला परत नेण्याचे ग्रीकांचे सारे प्रयत्न मी मोडून काढीन. कोण-त्याशी परिस्थितीत तिला मी त्यांच्या हाती सोपवणार नाही; माझे प्राण पणाला लावीन, पण ग्रीकांची डाळ शिजू देणार नाही.''

- क्रमशः



## चान्दोवाच्या बातम्या

### प्रथम शिक्षा आणि नंतर मानमरातब

जगातला सर्वात लहान देश म्हणजे व्हॅटिकन सिटी. शहराचा प्रथम नागरिक असतो पोप. इटलीचा सत्राव्या शतकातला सुप्रसिद्ध खगोलशास्त्रज्ञ गॅलिलिओ याच्या सन्मानार्थ नुकतीच दोन डाकतिकिटे प्रसृत केली गेली. केवळ डाकतिकिटे जमा करणारांनाच नव्हे, तर इतिहासाचा अभ्यास करणाऱ्यांनाही या घटनेचे कुतूहल वाटत आहे, कारण गॅलिलिओला आजन्म कारावासाची शिक्षा या चर्चनेच सुनावली होती. कॅथॉलिक चर्चचा असा विश्वास होता की सौरमंडळाचा केन्द्रबिंदू म्हणजे पृथ्वी होय. आपल्या या विधानाचा भरपूर प्रचारही त्यांनी केला होता. परन्तु गॅलिलिओने आपल्या संशोधनाने असे सिद्ध केले की, 'सौरमंडळाचा केन्द्रबिंदू पृथ्वी नसून सूर्य आहे, आणि त्याबद्दलचे चर्चचे विधान आधारहीन आहे.' आपल्या शोधाद्वारे त्याने सिद्ध केले की, 'पृथ्वी ही सूर्याभोवती फिरत असते'. चर्चने त्याच्या विधानाचे खंडन करून त्याला जोरदार विरोध केला. 'आपली चूक कबूल करावी' असा दबावही चर्चने त्याच्यावर आणायचा प्रयत्न केला. परन्तु गॅलिलिओ ने आपलेच म्हणणे सत्य असल्याचा दावा मांडला. त्यामुळे १६३३ मधे त्याला आजीवन करावासाची शिक्षा सुनावली गेली. नंतर काही दिवसांनी ती शिक्षा मागे घेऊन त्याला स्थानबद्धतेची शिक्षा देण्यात आली. गॅलिलिओ १६४९ मधे मृत्यु पावला. पण ही शेवटची आठ वर्षे त्याला बंदीवासातच काढावी लागली. पुढेपुढे विज्ञानाने गॅलिलिओचा सिद्धान्त खरा असल्याचे घोषित केले. त्याच्या मृत्युनंतर तीन शतकांनी व्हॅटिकन शहराने त्याचा डाकतिकिटे काढून असा सन्मान केला.




### मानवाचा निकटचा बांधव

प्रस्तरीय अवशेषाच्या रूपात नुकताच एक दात सापडला आहे. विज्ञानवेत्त्यांचे असे म्हणणे आहे की, हा दात चिंपांझीचा असू शकेल. हा नर वानर जवळजवळ ४,४००,००० वर्षांपूर्वी पूर्व आफ्रिकेतील इथिओपियाच्या जंगलात भटकत राहिलेला असेल. कॅलिफोर्निया विश्वविद्यालयातील टीम पॅट याचे असे म्हणणे आहे की ''अशा प्रकारच्या जंगली वातावरणात चिंपांझीच्या अस्तित्वाचा पुरावा नुकताच प्रथमतः हाती आला आहे.'' त्यांच्या म्हणण्याप्रमाणे हा प्राणी मानव चिंपांझीचा निकटचा बांधव असावा. त्यांचे म्हणणे असे- गोरिल्लापेक्षाही चिंपांझी हा मानवाच्या जास्त निकटचा प्राणी होय.



# मायावी सिद्ध

दृढनिश्चयी विक्रमादित्य पुन्हा झाडाजवळ आला. त्याने झाडावरून प्रेत खाली उतरवले आणि ते आपल्या खांद्यावर उचलले. नेहमी-प्रमाणे तो स्मशानाची वाट चालू लागला. तेव्हा प्रेतातील वेताळ त्याच्याशी बोलू लागला. ''हे राजा, तू म्हणजे श्रम नि सहनशक्तिची खाण आहेस. तुझी शक्ति व सामर्थ्य अमर्याद आहे. तुझी चिकाटी प्रशंसनीय आहे. पण एकाद्या मांत्रिकाच्या प्रेरणेने असलं क्षुल्लक कार्य करण्याची प्रेरणा तुला मिळाली असावी अशी मला शंका येतेय! जर माझी शंका बरोबर असेल तर याचा परिणाम तुला दु:खीच बनवील. तुझे हे सर्व परिश्रम निरर्थक ठरतील आणि शेवटी निराशा तुझ्या पदरात पडेल. उद्देश्य-पूर्ती न होता तुला पराभूत व्हावे लागेल. अंगीकृत कार्यात यश न मिळाल्यामुळे तुला दु:ख होईल. आणि या निराशेने तू शेवटी काही तरी अनुचित कार्य करून बसशील. एका मायावी माणसाच्या

वेताळ कथा



बोलण्यावर डोळे झाकून विश्वास ठेवल्यामुळे ज्याची बुद्धि नष्ट झाली अशा एका राजकुमाराची गोष्ट मी तुला सांगतो. परिणामस्वरूप त्याचे जीवन नरकवासासारखे झाले.'' एवढे सांगून वेताळाने ती कथा ऐकवायला सुरुवात केली.

प्रभातनगरचा राजा होता अग्निमित्र. त्याचा एकुलता एक मुलगा होता अनंगवर्मा. शेजारचा देश उदयगिरीच्या राजकुमारीशी आपल्या मुलाचे लग्न करून तिला आपली सून बनविण्याचा राजाने निश्चय केला. नंतर अनंगवर्माचा राज्याभिषेक करण्याचा त्याने विचार केला.

एक दिवशी अनंगवर्मा काही शिपायांसह शिकार करण्यासाठी जंगलात गेला. शिकार करीत करीत राजकुमार दुपार पर्यंत खूप थकून गेला. जवळच्या सरोवराच्या पाण्याने त्याने आपली तहान भागविली आणि थकवा दूर करण्यासाठी एका झाडाखाली पडला. एकाएकी जवळच्या डोंगरातील गुहेतून कोणाचे तरी कण्हणे त्याच्या कानी पडले. अनंगवर्माने ताबडतोब म्यानातून तलवार उपसली आणि गुहेत प्रवेश केला.

गुहेत सर्वत्र अंधार दाटला होता. एका कोपऱ्यात एक लहानसा दिवा मिणमिणत होता. तिथेच जवळ एक वृद्ध सिद्ध हरिणाजिनावर पद्मासन घालून बसला होता. अनंगवर्माला वाटलं - याचा मृत्यु अगदी जवळ येऊन ठेपला आहे.

अनंगवर्माला पाहताच सिद्ध म्हणाला - ''बेटा अनंग, तू अगदी वेळेवर इथं येऊन पोंचला आहेस. माझी घटका भरत आली आहे. दुसऱ्यांच्या शरीरात प्रवेश करण्याची कला मला अवगत आहे. एकाद्या सुयोग्य व्यक्तीला ही कला शिकवून मग प्राण सोडावा असे मला वाटते. मी तुला तो मंत्र शिकवतो. नीट लक्षपूर्वक ऐक. तीनदा मंत्राचा उच्चार करून सिद्ध अनंगवर्माला म्हणाला - ''बेटा, आता हा मंत्र तीन वेळेला तू म्हण. उच्चारणात एक ही चूक होता कामा नये. एक अक्षर सुद्धा इकडे-तिकडे न झाले पाहिजे. आता मंत्र तुला चांगला पाठ झाला असेल. तू मंत्राचे उच्चारण कर. आपल्या शरीराचा त्याग करून माझ्या शरीरात प्रवेश कर. मी पुन्हा मन्त्रोच्चार करून प्राणत्याग करीन आणि तू माझ्या शरीरात प्रवेश करू शकशील अशी योजना करून ठेवीन.

अनंगवर्माने हे स्वीकार केले आणि सिद्धाने दिलेल्या मंत्राचा तीनदा स्पष्ट उच्चार केला. त्याबरोबर त्याचा आत्मा शरीरापासून वेगळा झाला. याच वेळी सिद्धाने ही मंत्रोच्चार केला, आणि त्यामुळे त्याचा आत्मा ही शरीरातून बाहेर पडला. अशा रीतीने दोन्ही आत्म्यांनी दुसऱ्या शरीरात प्रवेश केला. आता अनंगवर्माच्या शरीरात सिद्धाचा आत्मा आला आणि सिद्धाच्या शरीरात अनंगवर्माचा !

अनंगवर्माला वृद्ध सिद्धाचे शरीर फार जड वाटू लागले. युवराजाच्या शरीरात प्रविष्ट सिद्ध मात्र आनंदात हेलकावे खाऊ लागला.

थोड्या वेळाने अनंगवर्माने हात जोडून सिद्धाला विनंती केली - ''महात्मन्, आपण ही विद्या मला शिकवून माझ्यावर मोठे उपकार केलेत. मी आपल्या या ऋणातून कसा मुक्त होऊ? आता आपण पुन्हा आपल्या शरीरात प्रवेश करा आणि मी आपल्या शरीरात जाईन. गुहे बाहेर माझे शिपाई माझी वाट पहात बसले असतील.''

अनंगवर्माच्या रूपात बदललेला सिद्ध खदखदून हसत म्हणाला - ''आता तर तू माझ्या जाळ्यात चांगलाच अडकलास, तुला यातून कोणी ही मुक्त करू शकणार नाही. प्रभात-



नगरचा राजा बनण्याची माझी फार दिवस इच्छा आहे. आता मीच अनंगवर्मा आहे. प्रभातनगरच्या सिंहासनाचा वारस मीच! उदयगिरीची राजकुमारी मालविका आता माझी पट्ट राणी बनेल. ठीक आहे, हा मी चाललो.'' असे म्हणत तो गुहेतून बाहेर पडला.

अनंगवर्माला सिद्धाच्या माया-जालात अडकल्याचा फार पश्चात्ताप झाला. मनातल्या मनात तो फार कष्टी झाला. तो हळूच उठला नि गुहे बाहेर आला. सिद्ध शिपायांसह घोड्यांवर बसून राजधानीकडे जात आहे असे त्याने पाहिले.

अनंगवर्माने ही राजधानीकडे जाण्याचा निर्णय घेतला. चालताना त्याचे पाय फार दुखत



होते. तरी पण तो चालत राहिला. थोडे अंतर चालून गेल्यावर तो खूपच दमला आणि एका झाडाखाली विश्रांति घेण्यासाठी बसला. झाडाच्या जवळच एका मेलेल्या मोराचे शरीर त्याला दिसले. त्याने विचार केला की आपण मोराच्या शरीरात प्रवेश करून राजधानीत जावे. पण अमळ विचार करून त्याने असा काही प्रयत्न न करण्याचा निर्णय घेतला.

एवढ्यात घोड्यावर बसून त्याच्याच दिशेने येणारा एक परदेशी माणूस त्याला दिसला. सिद्धाच्या रूपातील अनंगवमनि त्याला विनवले की आपल्याला राजधानीत पोचवावे. तो परदेशी पण प्रभातनगर कडेच निघाला होता. म्हाताऱ्याकडे पाहून त्याला दया आली आणि त्याने त्याला आपल्या घोड्यावर बसवले व निघाला. थोड्याच वेळात ते नगराच्या सरहद्दीवर पोचले. अनंगवमनि परदेशी मित्राचे आभार मानले नि तिथेच खाली उतरला.

अनंगवर्मा विचार करू लागला की आता काय करावं? इतक्यात काही लोक एक प्रेत आणीत आहेत असे त्याने पाहिले. त्यांनी प्रेतखाली ठेवले व ते रडू लागले. ते एका तरुणाचे प्रेत आहे हे अनंगवर्माच्या लक्षात आले.

विचार करण्यात अधिक वेळ न घालवता अनंगवमनि तो मंत्र तीन वेळेला उच्चारला आणि सिद्धाचे शरीर टाकून त्याने त्या युवकाच्या शरीरात प्रवेश केला. जेव्हा प्रेत जिवंत होऊन उठून बसले तेव्हा ते लोक भय-कंपित झाले. ते म्हणाले - "अरे बापरे, हा मुका पिशाच्च झालेला दिसतोय!" आणि ते सर्व जण तेथून पळून गेले.

तो तरुण मुका आहे हे जेव्हा अनंगवर्माला समजले, तेव्हा त्याला फार वाईट वाटले. त्याला वाटलं - आपला सर्व प्रयत्न व्यर्थ ठरला. त्याच्या बोटात एक सोन्याची अंगठी होती. ती पाहून त्याला वाटलं - निदान एवढी तरी भाग्याची गोष्ट आहे.

अनंगवमनि बाजारात जाऊन ती सोन्याची अंगठी विकली आणि आलेल्या पैशांतून एक घोडा खरेदी केला. तो घोड्यावर स्वार होऊन उदयगिरीला पोचला. या राज्याची राजकुमारी मालविका हिच्याशी त्याचे लग्न घाटत होते.

संकेताच्या भाषेत त्याने पहारेकऱ्यांना सांगितले की त्याला काही महत्त्वाच्या कामासाठी महाराजांना भेटायचे आहे. पहारेकरी त्याला राजा रणवर्माकडे घेऊन गेले.

त्या वेळी रणवर्मा आस्थानचे दैवज्ञ चैतन्य शर्मा यांच्याशी बोलत होता. अनंगवमनि खुणा करून आपली कहाणी महाराजांना सांगितली. एका सिद्ध पुरुषाने त्याला कसे बनवले हे त्याने रणवर्माला सांगण्याचा प्रयत्न केला. परंतु रणवर्मा सर्व काही नीट समजू शकला नाही. तेव्हा दैवज्ञ चैतन्यशमनि राजाला सर्व स्पष्ट समजाऊन सांगितलं.

आपला होणारा जावई अनंगवर्मा याचा छळ होत असल्याची कथा ऐकून रणवर्मा रागाने लाल-बुंद झाला. त्याने एका पत्रात ही पूर्ण घटना लिहिली आणि आपल्या एका दूता करवी ते पत्र अनंगवर्माच्या पित्याकडे पाठविले.

राजा अग्निमित्रने पत्र वाचले आणि त्याच्या लक्षात आले की आपल्या खऱ्या मुलाऐवजी त्या रूपात दुसरा कोणी तरी माणूस आपल्या महालात वावरतो आहे. तेव्हा त्याचा राग अनावर झाला. त्याने आपल्या शिपायांना आज्ञा दिली - "अनंगवर्माच्या रूपात जो माणूस महालात आहे, तो खरा राजकुमार नाही. तो एक वृद्ध मायावी सिद्ध आहे. त्याला तावडतोब कैद करण्यात यावे."

अनंगवर्माच्या रूपातील वृद्ध सिद्धाला समजलं की आपल्या गौप्याचा स्फोट झालेला आहे. तो शिपायांना म्हणाला - "मला वाटतं





- पिताजींना बुद्धिभ्रम झालेला आहे. आपल्याला ताबडतोब काही इलाज केला पाहिजे. त्यांना साखळदंडांनी बांधून एका कोठडीत टाका. पुढे काय करायचं ते राजवैद्यांच्या सल्ल्याने आपण ठरवूं.''

रणवर्माच्या दूताने हे सर्व आपल्या डोळ्यांनी पाहिलं. तो उदयगिरीला परत आला आणि राजा रणवर्माला सर्व वृत्तांत सांगितला. सिद्धाने कैद केलेल्या अग्निमित्राला बंधन-मुक्त करायचे असेल तर एकच उपाय आहे - युद्ध, असे रणवर्माला वाटले. त्याने ताबडतोब युद्धाची तयारी सुरू केली.

परंतु एक आठवड्यातच अनंगवर्माचे रूप घेतलेला सिद्ध साप चावून मेल्याची वार्ता कानी आली. त्यावेळी रणवर्मा आपल्या अंतःपुरात झोपलेला होता.

आता राजाला कैदेतून मुक्त करण्यात आले. एका दुष्ट सिद्धाने अनंगवर्माची परिस्थिति कशी दयनीय करून टाकली आहे याबाबत राजाने सर्व नागरिकांना माहिती दिली. मुका अनंगवर्मा आपल्या देशात परत आला. जनतेने मोठ्या आनंदाने त्याचे स्वागत केले.

अंतःपुरात पडलेले आपले निर्जीव शरीर पाहून अनंगवर्माला रडू कोसळले. त्याने खुणाकरून आई-वडिलांना सुचविले की त्या शवाची अंत्य-क्रिया करण्यात यावी.

एवढी गोष्ट विक्रमादित्याला ऐकवून वेताळ म्हणाला - ''हे राजा, अनंगवर्माचा सारा व्यवहार निरर्थक आणि असंगत आहे. सिद्धाकडून फसवल्या गेलेल्या अनंगवर्माला मेलेल्या मोराच्या शरीरात प्रवेश करता आला असता आणि प्रभातनगरला जाऊन आपल्या पित्याला जे घडले ते सर्व सांगता आले असते. असं न करता त्याने एका मुक्या माणसाच्या शरीरात प्रवेश केला, हा त्याचा अविवेकच नाही तर काय? अंतःपुरात पडलेल्या आपल्या मृत शरीराची अंत्यक्रिया करायला त्याने आपल्या आई-वडिलांना सांगितले, हा ही एक मूर्खपणाच नाही का? माझा तर असा दावा आहे की ही मूर्खपणाची पराकाष्ठा आहे. आपल्या मंत्र-बळाच्या साह्याने अनंगवर्मा एकदा सिद्धाच्या शरीरात आणि दुसऱ्या वेळी मुक्या तरुणाच्या शरीरात प्रवेश करू शकला होता. मग आपल्याच पूर्व-शरीरात प्रवेश करायला त्याला काय हरकत होती? पण त्याने तसं केलं नाही, याचं कारण काय बरे असावं? तो मंत्र विसरून गेला होता काय? याबाबत विचार ही त्याच्या मनात आला नाही! त्याला बुद्धि-भ्रंश झाला होता का?''

वेताळाच्या शंकांचे निरसन करीत राजा विक्रमादित्याने स्पष्टीकरण केले - ''अनंग-वर्माची बुद्धि फार तल्लख आहे. म्हणूनच असल्या अत्यंत विषम परिस्थितीत ही त्याने कोणते ही अनुचित काम केले नाही. मन्त्रोच्चार करून जर त्याने मोराच्या शरीरात प्रवेश केला असता तर पुन्हा मन्त्राचा उच्चार करण्याची शक्यताच राहिली नसती. आपल्या स्वतःच्या शरीरात प्रवेश करणे असंभवच झाले असते. मोर मंत्राचा उच्चारच करू शकणार नाही. त्या परदेशी माणसा बरोबर राज्याच्या सरहद्दीजवळ आल्यावर तो तिथेच थांबला. याचं ही एक विशेष कारण होतं. मायावी सिद्धाला प्रभातनगरीत सर्व जण अनंगवर्मा म्हणूनच ओळखत होते. राजकुमार असल्यामुळे तो वाटेल ते करू शकत होता. सिद्धाच्या रूपातील अनंगवर्मा नगरीत आलेला आहे हे जर त्याला समजले असते तर त्याचा काटा काढण्यासाठी त्याने काही ही केले असते. कदाचित् त्याला मारून टाकलं असतं. मूक माणसाच्या शरीरात प्रवेश केल्यानंतरच त्याला समजले की तो मुका आहे. मुका माणूस स्पष्ट मंत्रोच्चार करूच शकणार नाही. तसा प्रयत्न केला तर ते अविवेकाचे होईल. म्हणून ते शरीर आपले आहे हे जाणत असून ही त्याने आई-वडिलांना शवाची दाह-क्रिया करायला सांगितली. म्हणून याबाबत जरा ही शंका नको की अनंगवर्माचा सर्व व्यवहार योग्य व सुसंगत आहे. तो मूर्ख व अविवेकी मुळिच नाही.''

राजाचा मौन-भंग करण्यात वेताळ यशस्वी झाला. आता तो प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडावर जाऊन बसला.

**आधार - विमलादेवी सिन्हा**
**यांची एक कथा**



# दोन कवि

चन्द्रपुरीच्या दरबारात विष्णुशर्मा नावाचा एक कवि होता. इतर कवींची कविता ऐकून तो जेंव्हा संतुष्ट होई तेंव्हा तो लगेच त्यांची प्रशंसा करीत असे. त्याच दरबारात नारायणशास्त्री नावाचा आणखी एक कवीही होता. पण तो मात्र इतर कवींचे श्रेष्ठत्व कधीच मान्य करत नसे.

विष्णुशर्माला कोणी त्याचे नारायणशास्त्रीबद्दलचे मत विचारले, तर तो म्हणे, ''नारायणशास्त्री अेक चांगले कवि आहेत, त्यांच्या कविता अुत्तम असतात याबद्दल काही शंकाच नाही.''

पण अुलट नारायणशास्त्रीला कोणी विष्णुशर्माबद्दल विचारले तर तो बेधडक म्हणे, ''अरे त्याबद्दल सांगण्यासारखं आहेच काय? अगदी सरळपणे म्हणता येईल की, त्यांच्या रचनांमधे काव्यगुण फारच कमी आहे. अजून खूप मेहनत करायला हवी त्यांना.''

ही गोष्ट राजाच्या कानी पडली. एकदा कवि सम्मेलन चालू असताना त्याने विष्णुशर्माला म्हटले, ''शर्माजी, तुम्ही तर नारायणशास्त्रीच्या कवितांची स्तुती करत असता; पण नारायणशास्त्री मात्र तुमच्या काव्यात नेहमी दोषच दाखवत असतात! तुमचं काय मत आहे याबाबत?''

यावर विष्णुशर्मा हसून म्हणाला, ''काव्याच्या बाबतीत आमच्या स्तरात कमी-जास्त असू शकेल; पण हां, एका विषयात आमची दोघांचीही चूक झालेली आहे. असं वाटतंय की, त्यांच्या काव्याबद्दल माझं मत, अन् माझ्या काव्याबद्दलचं त्यांचं मत, ही दोन्हीही अगदी चुकीची मतं आहेत.''

विष्णुशर्माच्या बोलण्यातला गूढार्थ समजून नारायणशास्त्रीने शरमेने मान खाली घातली.





## जांभूळ



त्रिचनापल्ली जवळच जम्बूकेश्वर नामक एक सुप्रसिद्ध शिवमन्दिर आहे. या मन्दिराच्या प्रांगणातच जांभळाचा एक मोठा वृक्ष आहे. चारी दिशांना पसरलेल्या त्याच्या फान्द्या पाहून असे वाटते की मन्दिरासाठी निसर्गानेच एक मोठा मांडव बनवलेला आहे; हे केवळ या स्थानाचेच वैशिष्ट्य होय. जांभळाचा वृक्ष केवळ शिवाचाच नव्हे, तर गणेश व कृष्ण यांचाही प्रिय वृक्ष आहे, असे हिन्दू लोक मानतात. मेघांचा अधिपती जांभूळ-वृक्षाच्या रूपात जन्माला आलेला असल्याने त्याची फळेही मेघवर्णी म्हणजे काळीअसतात, अशी समजूत आहे. भगवान श्रीकृष्णाचे वर्णन करताना असे म्हणतात की, नीलमेघ शामही जांभळाच्याच रंगाचे आहेत. बौद्ध लोकही जांभूळ वृक्षाला पवित्र मानतात.

वृक्ष शास्त्रात जांभळाला सिझिकिय (लिन) असे म्हणतात. हा प्रथम इकेनिया जांबोलाना लांक या जातीचा वृक्ष मानला जाई.

नेहमीच हिरवा दिसणारा हा जांभूळ-वृक्ष चांगला अुंच असतो. वृक्षाचे प्रमुख खोड सरळसोट नसून फांद्यांबरोबरच कुठेकुठे वाकलेले असते. जांभूळवृक्ष आपल्या देशात सर्वत्र आढळतो. याला जेंव्हा मोहोर येतो, किंवा छोटी छोटी फळे लगतात, तेव्हा वातावरण कोरडे असणे आवश्यक असते. साधारणत: मार्च - मे या काळात झाडाला मोहोर येतो. हिरवट पांढऱ्या रंगाच्या लहान लहान फुलांचे गुच्छ दिसून येतात. फळे सुरुवातीला हिरवी दिसली, तरी पिकू लागली की त्यांना चमकदार काळा रंग प्राप्त होतो. जांभळे शरीराला थंडावा देतात आणि पचनशक्ती वाढवतात. ही फळे, झाडाची पाने, साल वगैरे सर्व भाग औषधे बनवण्यासाठी वापरली जातात. याचे लाकूड चांगले टणक असल्याने होड्या बनवण्यासाठीही त्याचा अुपयोग केला जातो.




# आदिकवि वाल्मिकी

हजारो वर्षांपूर्वी आपल्या देशात जंगलेच जंगले होती. कोणत्या ही एकाद्या स्थानाहून दुसऱ्या स्थानी जायचे असेल, तर जंगलातून जावे लागे. त्या काळात चोर लुटारूंचेही बरेच प्राबल्य असे.

एकदा एक मुनि रामनाम जपत अेकटाच जंगलातून जात असताना, 'थांब' अशी आज्ञा कानी येअून तो तेथेच थबकला. वळून पाहिले असता हातात कुऱ्हाड घेतलेला एक दृढकाय पुरुष त्याच्यासमोर येअून रस्ता अडवून अुभा राहिला.

मुनीने विचारले, ''कोण आहेस तू?''

''दिसत नाही मी कोण आहे ते? एक लुटारू आहे मी! तुझ्या जवळ काय असेल, ते मुकाट्याने माझ्या हवाली करून चालू लाग पाहू!'' तो गर्जून बोलला.

मुनीने तरीही शान्त स्वरात त्याला विचारले, ''केव्हापासून असा येणाऱ्याजाणाऱ्या प्रवाशांना लुटायचा अुद्योग करतोयस तू?''

''बऱ्याच काळापासून. पण तुला काय करायचंय त्याच्याशी? मी सांगितल्याप्रमाणे कर अगोदर!'' डोळे लाल करत दरोडेखोर गुरकावला.

''तुझ्या म्हणण्याप्रमाणेच करीन मी. पण अगोदर सांग तर खरं, की हे सारं तू कुणासाठी करत असतोस?'' मुनीने विचारले.

''काहीतरी काय विचारतो आहेस? आपल्या कुटुम्बासाठीच तर करतोय की मी हे. त्यांच्या पालन-पोषणाची जबाबदारी आहे माझी.'' डाकू अुत्तरला.

''बायकामुलांसाठी इतका अधर्म करतो आहेस तू? दुसऱ्यांवर अत्याचार करतोस, अघोरी कृत्य करतोस! तुला कळत नाही का, कि तू यासाठी केवढं पाप गाठी बांधतो आहेस? या पापात तुझी बायकोमुलं भागीदार होतील का?'' मुनीने निर्भयतेने विचारले.

''का नाही होणार भागीदार? हे सारं तर त्यांच्यासाठीच करतोय ना मी? त्यांचा भाग नक्कीच असायला हवा.'' हातची कुऱ्हाड खाली ठेवत दरोडेखोर अुत्तरला.

''नाही. आपल्या पापाचा भार तुला स्वतःलाल वहावा लागेल. हे पहा बेटा, तुझ्या पापात कोणीही भागीदार होणार नाही, शंका असेल तर घरी जाअून विचार तुझ्या माणसांना.'' मुनी म्हणाला.

दरोडेखोर ताबडतोब घरी गेला, बायको-मुलांना मुनींचे बोलणे सांगून विचारले, ''माझं पाप तुम्हीही सर्वजण घ्याल ना वाटून?'' त्याची खात्री होती, की सर्वजण 'हो' म्हणतील.

''हे कसं शक्य आहे? आम्ही का म्हणून भागीदार व्हायचं? कुटुंब संभाळणं हे तुमचं कर्तव्यच आहे. आमचं पालन-पोषण करणं हा धर्म आहे तुमचा, तुमची जबाबदारीच आहे ती. ती पार पाडण्यासाठी तुम्ही काय करता, याच्याशी आमचा काही संबंध नाही. तुमच्या पापांशीही आमचा संबंध नाही. मुनीचं बोलणं शंभर टक्के बरोबर आहे.'' बायको अुत्तरली.

मुलांनीही आईचंच अनुकरण केलं.

त्यांच्या या अुत्तराने दरोडेखोर गपगारझाला. धावत धावत जाअून त्याने मुनीच्या पायांवर लोळण घेत म्हटले, ''या पापाच्या गर्तेतून माझा अुद्धार करा मुनिवर!'' आता त्याच्या आवाजातली गुर्मी नाहीशी होअून तो अगदी हीन-दीन झाला होता.

त्या करुणामय मुनींनी त्याला रामनामाचा अुपदेश दिला आणि म्हटले, ''भक्ती आणि श्रद्धेने हे नाव जपत रहा; तुझी पापे धुवून जातील.''

दरोडेखोर ताबडतोब एका झाडाखाली आसन घेअून ध्यानस्थ बसला. तोंडातून फक्त रामनाम येअू लागले. दिवस, महिने, वर्षे अशीच निघून गेली.

मुनि पुन्हा एकदा त्याच रस्त्याने जात असताना एका वारुळातून त्याला 'रामनाम' ऐकू आले. त्याने तावडतोब वारूळ खोदले तेंव्हा त्यातून जटाजुटा वाढलेला एक मुनि बाहेर पडला. हा मुनि म्हणजेच तो एके काळचा दरोडेखोर होता, त्याचे पहिले नाव होते रत्नाकर. पण आता वारुळातून तो बाहेर पडला, अन् संस्कृतमधे वारुळाला 'वल्मिक' असे म्हणतात, म्हणून त्याचे नाव पडले वाल्मीकि.

तमसा नदीच्या किनारी तो आपले तपोजीवन व्यतीत करू लागला. एके दिवशी नदीत स्नान करून आपल्या आश्रमाकडे परत निघत असता त्याला क्रौंच पक्षांचे एक सुंदर जोडपे दिसले. इतक्यात एका भिल्लाने त्यातील एक पक्षी आपल्या बाणाने मारून खाली पाडला. या दृश्याने वाल्मीकींचे मन करुणेने द्रवले. त्यांचा शोक एका श्लोकाच्या रूपाने तोंडातून बाहेर पडला - 'मा निषाद ...... काममोहितम् ।' हेच या भूमीवरचे आदिकाव्य ठरले. अशा तऱ्हेने वाल्मीकि हे आदिकवि ठरले.

या नंतर त्यांनी रचलेले रामायण हा 'वाल्मीकि - रामायण' या नावाने जगप्रसिद्ध संस्कृत ग्रन्थ ठरला. याचे भाषांतर जगातल्या अनेक भाषांतून झाले. ते वाचून अनेक लोक तन्मय होअून गेले. त्यांना जीवनाचा एक महान् आदर्श गवसला.

भक्ति, श्रद्धा, दृढनिश्चय आणि आत्मविश्वासाने जो कोणी आपल्या आयुष्यात कर्म करील, जो आपले आयुष्य एक आदर्श समोर ठेवून सार्थक बनवू इच्छील, अशांचा स्फूर्ति स्रोत म्हणजेच वाल्मीकि. या सद्गुणांनी युक्त मानव हा अुत्तम पुरुष बनू शकतो हे त्यांनी स्वतःच्या अुदाहरणाने सिद्ध करून दाखवले आहे.



# तुम्हाला माहीत आहे काय?

१. मेट्रिक पद्धति सर्वात अगोदर कोणत्या देशात अमलात आली?
२. 'देवदेवतांची दरी' आपल्या देशात कोठे आहे?
३. सम्राट अलेक्झांडर किशोरावस्थेत असताना त्याला जो घोडा दिला गेला होता, त्याचे नाव काय?
४. आपल्या देशात 'गुलाबी शहर' नावाने प्रसिद्ध शहर कोणते?
५. 'जूडो' ही एक आत्मसंरक्षणाची कला आहे. तिला विशेष रूप कोणी दिले?
६. नाट्यकलेसंबंधी विवरण प्रस्तुत करणाऱ्या संस्कृत ग्रन्थाचे नाव काय? त्याचा रचयिता कोण?
७. एक सण 'गुलामांचा सण' म्हणून प्रसिद्ध आहे. या सणाच्या दिवशी मालक आपल्या गुलामांना भोजन वाढतात. या रोमन सणाचे नाव काय?
८. शून्य या संकल्पनेचा शोध कोणत्या भारतीय शास्त्रज्ञाने लावला?
९. 'हेल्थ स्टॅम्पस' कोणता देश प्रकाशित करतो? त्याचे वैशिष्ट्य काय?
१०. पृथ्वीला सूर्यप्रदक्षिणेसाठी किती अवधि लागतो?
११. जपानचा अतिप्राचीन ग्रन्थ कोणता?
१२. भारताला भेट देणारे अमेरिकेचे पहिले अध्यक्ष कोण?
१३. जगातले सर्वात मोठे ग्रन्थालय कोणते?
१४. टोकियो शहराचे जुने नाव कोणते?
१५. गॅलीलिओचा पहिला शोध कोणता?
१६. आपल्याच देशाचा नकाशा अंकित असणारा ध्वज कोणत्या देशाचा?

## अुत्तरे

१. फ्रान्स.
२. हिमालय प्रदेशातील कुलू.
३. बुसीलियस.
४. राजस्तानची राजधानी जयपुर.
५. डॉ. जिगोरो कानो, १८८२ साली.
६. 'नाट्यशास्त्र', भरतमुनि.
७. शॅटर्नालिया.
८. आर्यभट्ट.
९. न्यूझीलंड. यापासून मिळणारे अुत्पन्न स्वास्थ्य संस्थांना दिले जाते.
१०. ३६५ दिवस, ५ तास, ४८ मिनिटे व ४६ सेकंद.
११. कोजिकिक - प्राचीन जपानचा इतिहास यात लिपिबद्ध आहे.
१२. ड्युएट आयसेन होवर, १९५६ मधे.
१३. मॉस्कोतील 'लेनिन स्टेट लायब्ररी'.
१४. ईडो.
१५. लंबक.
१६. सायप्रस.



# निद्रा

शंखवर गावच्या चारही बाजूंना दगडांच्या टेकड्या आहेत. अुन्हाळ्याचे दिवस अन् कडक अून पडलेले आहे. सोळंकीने एक एकर जमिनीवर एक सुंदरसे मोठे घर बांधले आहे. परन्तु अुकाड्यामुळे त्याला झोप येत नाहीय. खूप प्रयत्न केले. पण झोप मात्र नाही.

नोकरांनी पंखे चालू केले. तरी त्यातून गरम हवाच खेळत राहिली. वाळ्याचे पडदे लावून त्यावर मधून मधून पाणीही मारले, तरीही हवा गरमच होती. सोळंकी अगदी बेचैन झाला.

झोप न आल्याने सोळंकीला अशांत, अस्वस्थ वाटू लागले. तो अुगीच बारीक - सारीक गोष्टीवरून चिडू लागला.

"माझ्याकडून पगार घेअून, मी दिलेल्या पैशांवरच जगता, मी इथे झोपेवाचून तळ-मळतोय, अन् तुम्ही मात्र डाराडूर झोपा काढताय?" रागावलेला सोळंकी आता नोकरांवर घसरला.

नंतर आपली बायको आणि मुलांवर नाराज होअून म्हणाला, "माझ्यामुळेच मजेत रहाता तुम्ही; पण हा सगळा ऐषाराम माझ्याच कमाईचा आहे. घराची वीट अन् वीट म्हणजे माझ्या मेहनतीचं फळ आहे. माझ्याचमुळे सर्वजण तुम्हालाही मान देतात. तुम्ही सारेजण आरामात झोपताय, अन् मी?"

सोळंकीची स्थिति त्याच्या कुटुंबियांना पहावेना. एक जण वैद्याला घेअून आला. त्याने त्याची नाडी पाहिली अन् म्हणाला, "तुमची तब्येत एकदम छानच आहे. फक्त मानसिक स्थितीच बरी नाहीय तुमची." नंतर एका मान्त्रिकाला बोलावून त्याच्याकरवी ताईत बांधून झाला; पूजा वगैरे केल्या गेल्या. पण काहीही अुपयोग झाला नाही. अशातच एक साधु तेथे आला. सोळंकीची सर्व हकिकत जाणून घेअून तो म्हणाला, "हे पहा सोळंकी, पैसे कमावण्यासाठी रात्रंदिवस मेहनत करतोस.

महेश करमरकर



पण मुख्य गोष्टच विसरून गेलायस! हे जीवन म्हणजे एक पाण्याचा बुडबुडा आहे; कोणत्याही क्षणी फुटू शकतो तो!''

''स्वामीजी, जीवन अशाश्वत आहे, ही गोष्ट मी ही जाणतो. पण जाणूनही आपण काय करू शकतो?'' सोळंकीने विचारले.

''देवानं मनुष्याचं जीवन दिवसांत विभाजित केलंय. या प्रत्येक दिवसाची एक रात्र अन् एक दिवस असतो. दिवस प्रकाशाने युक्त असतो. माणसाची बुद्धी आणि शक्ती यांच्या अुपयोगाचा तो वेळ असतो. रात्र अंधाराने भरलेली असते. त्यावेळी माणसाने निद्रादेवीच्या मांडीवर सुखानं झोपायला हवं. मानवाच्या दृष्टीने निद्रा ही मृत्युसमान असते.'' साधूने सोळंकीला सर्व स्पष्ट करून सांगितले.

पण त्याच्या या बोलण्याकडे गंभीरपणे लक्ष न देता तो म्हणाला, ''हे तर सर्वांनाच माहीत असतं की!''

''होय; पण ज्या माणसांना हे माहीत आहे, त्यातलं सत्य ज्यांनी ओळखलंय त्यांना सुखाची झोपही मिळते. यासाठी काही वेळ सारं काही विसरून जाणं आवश्यक असतं. ते जर विसरता आलं नाही, तर झोपही तुझ्यापासून दूर पळेल.'' साधु बोलला.

''पण माझ्यामुळे हे जे इतके लोक आरामानं रहातात, त्यांची जबाबदारी आहे माझ्यावर. ती क्षणभरही विसरून कसा झोपू मी? येईलच कशी झोप?'' सोळंकीने प्रश्न अुपस्थित केला.

''चल माझ्याबरोबर, मी तुला एक माणूस दाखवतो, चल.'' साधु म्हणाला.

आपण साधुचा शिष्य शोभू, असा वेष धारण करून सोळंकी त्याच्याबरोबर निघाला. दोघेही अचंचल नावाच्या माणसाच्या घरी गेले. त्याने दोघांचेही स्वागत करून भोजनही दिले.

त्याला आशिर्वाद देत साधूने विचारले, ''सुखात आहेस ना?''

हसून अचंचल अुत्तरला, ''माझी आई आजारी आहे, अंथरुणाल खिळून आहे ती. तिच्या अुपचारांसाठी खूप खर्च होतो आहे. माझी बायको रात्रंदिवस तिची सेवा करतेय. तरीही काही ना काही निमित्त करून ती सुनेला



शिव्या देत असते. मग सासवा-सुनांची भांडणं चालतात. माझा मोठा मुलगा कुठलीही जबाबदारी अुचलत नाही. दुसरा मुलगा चांगला आहे माझा, पण त्याच्या भाग्यात विद्या नाहीय. घर गहाण टाकून कसाबसा घरखर्च भागवतोय हल्ली!''

साधूने त्याला विचारले, ''तुझ्या अडचणी तर भयानकच आहेत. या दलदलीतून कसा बाहेर पडणार तू? कोणता अुपाय योजला आहेस?''

''मी आपल्याकडून खूप प्रयत्न करतोय, कष्ट उपसतोय. पुढे भगवंताची इच्छा!'' निर्लिप्तपणे अचंचल बोलला.

दुपारी अचंचल साधूला म्हणाला, ''स्वामीजी, मला जरा जरूरी कामासाठी बाहेर जायचं आहे. अंधार पडण्यापूर्वी परत येईन मी. तुम्हाला सोडून जातोय म्हणून गैरसमज नका करून घेअू! माझी वाट पहा इथेच.'' आणि तो बाहेर गेला.

साधु आणि सोळंकीही लपून छपून त्याच्या मागे जात राहिले.

गावच्या कोपऱ्यावर असलेल्या पेरूच्या बागेत जाअून, तिथे आपले अुपरणे पसरून अचंचल क्षणभरात त्यावर गाढ झोपून गेला.

''पाहिलंस सोळंकी? निद्रा हा भगवंताने माणसाला दिलेला वर आहे. थोड्या वेळासाठी का होईना, पण माणूस आपले कष्ट विसरून जातो तेवढ्या काळात. अचंचल तसा तर



अडचणींनी घेरून गेलेला आहे. तरीही या वरदानाचा अुपयोग तो किती छान करून घेतोय!'' साधु म्हणाला.

पण सोळंकी आपल्याला ते आवडल्याचे दर्शवीत म्हणाला, ''याला इतक्या अडचणींना तोंड द्यायचंय, पण पहा कसा मस्त झोपलाय! आपला अमूल्य वेळ कसा वाया घालवू शकतो हा? आपली जबाबदारी नीट न ओळखल्यामुळे गरिबीत सडतोय. आत्ता त्याला अुठवून मी सांगतो की वेळेचा अुपयोग कसा करायचा असतो. पैसा कसा मिळवायचा असतो, हे ही शिकवीन मी त्याला. पण तसं करण्यापूर्वी चांगला फैलावर घेणार आहे मी याला!''

''ठीक आहे; तुला वाटेल तसं कर.'' साधु



म्हणाला. सोळंकी त्याला हलवणार, इतक्यात मागून एका माणसाने त्याचा हात धरला आणि म्हटले, "अरे, तुझी बुद्धि काय कुठे चरायला गेलीय का? झोपल्या माणसाला अुठवू नये, एवढंही कळत नाही तुला?"

"तू कोण मला रोखणारा? त्याला अुठवलं, तर तुझं काय बिघडणार आहे?" सोळंकीने रागवूनच त्याला विचारले.

"मी कोण ते सांगतो नंतर, प्रथम सांग तर खरं की तू कोण आहेस?" त्या माणसाने विचारले.

सोळंकी म्हणाला, "पैसा मिळवायचे अनेक मार्ग मला माहीत आहेत. अचंचलला धनाची गरज आहे. तेंव्हा आत्ता यावेळी तरी त्यानं झोपू नये. म्हणून त्याला अुठवून, पैसा कसा मिळवावा हे सांगायची माझी इच्छा आहे."

"पण रात्री झोपायला याला वेळ मिळत नाही. दोन दुकानदारांकडे जाअून त्यांचा हिशोब लिहावा लागतो त्याला. त्या दोघांच्या म्हणण्याप्रमाणे ते काम रात्रीच व्हायला हवं असतं. याशिवाय याची आई रात्रभर खोकत असते, दमाही आहे तिला. तिच्याजवळ कोणीतरी असणं आवश्यक असतं. अधून मधून ती सुनेला शिव्या देत असते. मग सूनही गप्प बसत नाही, अन् घर दणदणत रहातं. म्हणूनच दिवसा तो इथे येअून झोपतो, अन् तेही शेतात काम नसेल तरच! अशा माणसाला झोपेतनं अुठवणं बरं आहे का?" त्या माणसाने विचारले.

सोळंकीने त्याला विचारले, "पण तू कोण आहेस?"

"मी या बागेचा मालक आहे. मला घरात कोणी काम करू देत नाही. मला खूपच मोकळा वेळ असतो. जीवनात काहीतरी साधावं असं मला वाटतं, पण काय करावं ते कळत नाहीय! या विचारात मला झोपही येत नाही, पण अचंचल इथे येअून झोपत असतो, हे पाहिल्यापासून मी ही इथे झोपायचा प्रयत्न करतो."

सोळंकी ने अुत्सुकते ने त्याला विचारले, "मग काय तुला इथे खूप झोप येते?"

"नाही! झोपेसाठी आसपासचं वातावरण महत्वाचं नसतं. त्यासाठी मन शांत असावं लागतं. इथे येणाराला चांगली झोप लागावी, असं माझ्या या बगीच्यात विशेष काहीही नाहीय." तो माणूस अुत्तरला.

"मग अजून किती दिवस अचंचल असा झोपून वेळ वाया घालवत असलेला बघायची इच्छा आहे तुझी?" सोळंकीने चिडून विचारले.

"चांगली झोप लागणं ही माणसाला सहजप्राप्त गोष्ट नव्हे. ते अहोभाग्य म्हणायला हवं. अशा भाग्यवान माणसाला पहाण्यातही आनंद वाटतो. अचंचलची झोप कोणी मोडू नये, म्हणूनच मी इथे येत असतो; रखवालीच करतो म्हण ना त्याची. तसं करताना मला आत्म-तृप्ती होते. आपण एक सत्कृत्य करतोय असं वाटतं. आणि यामुळेच हल्ली मला रात्री खूप छान झोप लागते." तो बगीच्याचा मालक म्हणाला.

त्या माणसाचे बोलणे ऐकून सोळंकीचे डोळे अुघडले! होय, आपण कमवतो तर दुसऱ्यांसाठीच, पण त्यांचं सुख मात्र आपल्याला पाहवत नाही. ते आरामात झोपतात आणि आपल्याला झोप लागत नाही याचं आपल्याला दुःख वाटतं. त्यामुळे नाराज होअून आपण त्यांचा हेवाही करतो. म्हणजेच याचा अर्थ असा की, आपलं मन स्वच्छ नाहीय; अन् म्हणूनच आपल्याला झोप येत नाही. ज्याचं आपलं काही नातं नाही, अशा अचंचलचीही झोप मोडायला निघालो आपण! बगीच्याच्या मालकाप्रमाणे त्याची झोप पाहून आपल्याला आनन्द नाही वाटला! आपण तर आतापर्यन्त हेवाच करत राहिलो झोप येणाऱ्यांचा!"

सोळंकीने आता त्या माणसाची खूप प्रशंसा केली. साधूनेही सोळंकीला आशिर्वाद दिला अन् सोळंकी घरी परतला.

तेंव्हा पासून सोळंकी मनापासून इतरांना मदत करू लागला. दुसऱ्यांचा आनन्द पाहून, आता त्याला वाईट वाटेनासे झाले. आपल्याजवळ नसलेली वस्तु दुसऱ्याजवळ आहे, असे पाहून आता त्याला हेवा वाटेनासा झाला. त्याच्या जीवनाचा जणू नवा अध्यायच सुरु झाला. आता त्याची निद्रानाशाची समस्याही दूर झाली.





# अविश्वास

सुंदर हा एक गरीब युवक होता. त्याला ना आईबाप होते, ना कोणी नातेवाईक. अुदर-निर्वाहासाठी आवश्यक अशा एकाद्या अुद्योगधंद्याचीही त्याला माहिती नव्हती.

एके दिवशी गावचे सारे लोक रात्रीच्या जेवणानन्तर गप्पागोष्टी करण्यासाठी एका वडाखाली बसले होते.

बोलता बोलता सुन्दरच्या बाबतीत बोलणे निघाले. गावच्या काही प्रमुखांनी आपसात ठरवले की, त्याला एकाद्या अुद्योगाला लावून द्यावे, अन् जमले तर त्याचे लग्नही करून द्यावे.

दुसऱ्या दिवशी गाव पाटलाने त्याला सांगितले की, त्याने जवळच्या तलावातून गावच्या प्रत्येक घरी एक एक घडा पाणी आणून द्यावे. त्या बदल्यात त्याला रोज एका घरून जेवण मिळेल अन् गावचे सर्वजण मिळून रहाण्यासाठी त्याला एक छोटेसे घर बांधून देतील.

त्याच दिवसापासून सुंदर सकाळपासून संध्याकाळपर्यन्त पाणी वहाण्याचे काम करू लागला.

काही दिवसांनंतर पुन्हा एकदा असेच रात्री वडाखाली लोक गप्पागोष्टी करत होते. सुंदरही त्यांच्यापासून जरा निराळा बसून त्यांचे बोलणे लक्षपूर्वक ऐकत होता.

ते लोक गावातल्या शिवाच्या देवळाबद्दल बोलत होते. एक वृद्ध म्हणाला की या देवळा-बद्दल एक विचित्र गोष्ट आहे अन् तो मजकूर एका खांबावर खोदलेला आहे. त्यात असे लिहिले आहे की, 'जो कोणी दीडशे घडे पाण्याने पिंडीला अभिषेक करेल, तो सम्राट बनेल.'

एकाने त्या खोदलेल्या मजकुराची टर अुडवली अन् म्हटले की, ''हा शुद्ध बकवास आहे. असा दीडशे घड्यांचा अभिषेक करून कोणी सम्राट बनू शकत असेल, तर सर्वच जण हे काम करून सम्राट बनू शकतील की!''

बाकी सर्वजणही त्याच्याशी सहमत झाले अन् म्हणाले की, ''म्हाताऱ्याच्या सांगण्यात काही तथ्य नाहीय.'' सुंदरने हे सारे बोलणे नीट ऐकले अन् रात्रभर त्याबद्दल विचार करत राहिला. त्याला झोपच आली नाही. त्याच्या मनात आले की, 'हा पुरातन विषय खोटा कसा असेल? हां, दीडशे घडे पाणी आणायचं सामर्थ्यच या कोणाच्यात नसल्यामुळे ते हा बकवास अन् असत्य गोष्ट मानत आहेत.''

तो विचार करत राहिला, 'पाणी आणणं हे तर माझं कामच बनलंय. दीडशे घडे शिव-लिंगावर ओतून अभिषेक करीन मी! म्हाताऱ्याचं म्हणणं खरं निघालं, तर सम्राट बनेन. गोष्ट खरी न निघाली, तरी काय बिघडेल? अभिषेकाचं पुण्य तर पदरी पडेल ना?'

दुसऱ्या दिवशी गावच्या लोकांचे पाणी भरून झाल्यावर त्याने शिवाला अभिषेक सुरू केला. एक एक घडा मोजत तो पाणी पिंडीवर रिता करत राहिला.

एकशे चाळीस घडे ओतल्यावर सुंदरला थकल्यासारखे वाटू लागले. त्याचे पाय काहीसे लटपटू लागले. त्याला अुभे रहाणे अवघड वाटू लागले. पण स्वतःला कसेबसे संभाळून अुरलेले दहा घडेही आणून ओतायचा त्याने निश्चय केला व कामाला लागला.

परन्तु आणखी आठ घडे आणल्यावर त्याची शक्ती अगदीच संपुष्टात आली. त्याच्या शरीरात अगदीच प्राण राहिले नाहीत. तो शिवलिंगाकडे



(पंचवीस वर्षांपूर्वी चांदोबात प्रकाशित झालेली गोष्ट.)

व स्वतःकडे निरखून पाहू लागला.

''आँ? एकशे अठ्ठेचाळीस घडे पाण्याने अभिषेक करून ही अजून सम्राट बनण्याची कोणतीच लक्षणं माझ्यात दिसत नाहीयेत! म्हणजे गावच्या लोकांचं म्हणणंच खरं असलं पाहिजे. अनुभवसंपन्न लोक खोटं कसं बोलू शकतील? मीच खरोखर मूर्ख! मी त्यांच्यावर विश्वास ठेवला नाही ही माझीच चूक नव्हे कां? तो खोदलेला मजकूर नक्कीच निरर्थक अन् असत्य असला पाहिजे. मीच मूर्ख आहे, म्हणून असला अुपद्व्याप केला! पण आता काहीही असो. अुरलेलं दोन घडे पाणीही मी आता आणून टाकतो अन् नन्तर मला अुगीच कष्ट देणाऱ्या या शिवलिंगाचेही फोडून दोन तुकडे करून टाकतो. फुटलेलं शिवलिंग पाहून गावचे लोक मला कदाचित शिव्या देतील, शिक्षाही करतील. पण मला पर्वा नाही त्याची! त्यांच्यावर विश्वास न ठेवण्याचं पाप मी केलं. त्याची शिक्षा मला मिळालीच पाहिजे.'' अशी बडबड करत तलावावर जाअून त्याने आणखी दोन घडे पाणी आणले.

आपल्या निश्चयानुसार रागाने त्याने शेवटचा घडा पाण्यासकट आपल्या पूर्ण शक्तीनिशी पिंडीवर मारला. शिवलिंगाचे तावडतोब दोन तुकडे होअून त्यातून प्रत्यक्ष त्रिशूळधारी शिव प्रकट झाला. ते पाहून सुन्दर भयाने थरथरू लागला.

''सुन्दर, मूर्ख आहेस तू अगदी! बुद्धीच नाही तुला बघ! जे काम करायचं, ते भक्ती अन् श्रद्धेनं पूर्ण करून नंतर फळाची इच्छा करणं हे बुद्धिवन्ताचं लक्षण. तू मात्र अज्ञान आणि निर्बुद्धपणानं स्वतःच आपल्या पायावर कुऱ्हाड मारून घेतली आहेस. आलेली सुसंधी आपल्याच हातानं दवडलीस. शेवटचे दोन्ही घडे श्रद्धेनं ओतले असतेस तर नक्कीच सम्राट-पद मिळालं असतं तुला! आता क्षणभरही इथे राहू नकोस. जा, लवकर निघून जा इथून!'' शिवशंकराने त्याची निर्भर्त्सना करत म्हटले.

लज्जेने मान खाली घालून सुंदर तेथून बाहेर पडणार, इतक्यात ते मोडके शिवलिंग व प्रत्यक्षातले शिवशंकर दोन्हीही अदृश्य झाले!





# महाभारत - ६

दिग्विजय करून राजा पांडु परत आला. दिग्विजयाच्या काळात त्याने अनेक देश जिंकले, तर अनेक देशांचे राजे त्याचा पराक्रम व श्रेष्ठत्व जाणून, आपण होअून त्याला शरण आले. या सगळ्यांकडून मिळालेली अगणित संपत्ती त्याने भीष्म, विदुर, सत्यवती, धृतराष्ट्र इत्यादि वडिलधाऱ्यांना देअून टाकली. त्याला आता विश्रान्तीची व मनोविनोदाची आवश्यकता आहे असे जाणून भीष्म-विदुरांनी त्याला आपल्या राण्यांसह वनविहाराला जाण्यासाठी सुचवले. सूचना शिरोधार्य मानून तो अरण्यात गेला.

राजा पांडु आपल्या पत्नी कुंती व माद्रीसह वनात विहार करत होता, जनावरांची शिकार करत आनन्द लुटत होता. एक दिवस एक हरणाची जोडी सुखोपभोगात दंग असताना पांडूने त्यांच्यावर बाण सोडला, अन् त्यांच्या प्रेममिलाफाचा अन्त केला. परंतु ते खरोखरीचे हरीण-युगुल नसून ऋषी किन्दम व त्यांची पत्नी यांचे जोडपे होते! हरीण जोडीचे रूप धारण करून ते अुपभोगाचा आनन्द लुटत होते. मरता मरता मुनीने पांडूला शाप दिला, ''संभोगासाठी तू आपल्या पत्नीला कवेत घेतलेस की माझ्या-प्रमाणेच तुलाही मृत्यु येईल!''

मुनीच्या मृत्यूचे पांडूला फार दुःख झाले. त्याला स्वतःला अजून अपत्यप्राप्तीही झाली नव्हती. त्यामुळे तो आपल्या पत्नींना म्हणाला, ''तुम्हा दोघींबरोबर राजप्रासादात राहून



व्रतस्थ रहाणं, ब्रह्मचर्य पालन करणं मला सर्वस्वी अशक्य आहे. त्यापेक्षा इथल्या ऋषिमुनींच्या सान्निध्यात राहून मला ते जमेल असे वाटते. तत्त्वचिंतनातही माझा काळ आनंदात जाअू शकेल. तेव्हां मला आता संन्यास घेणं हाच एक मार्ग आहे. मी माझं अुरलेलं आयुष्य या जंगलातच व्यतीत करीन. तुम्ही दोघी हस्तिनापुरला परत जा अन् ही बातमी भीष्म, विदुर, धृतराष्ट्र इत्यादींना सांगा.''

''आम्ही तुमच्या धर्मपत्नी आहोत. तुम्हाला सोडून कशा जाअू आम्ही? जाअून जाणार कुठे अन् कशा रहाणार? त्यापेक्षा आपण सर्व मिळूनच तपस्या करू अन् त्या पुण्याच्या बळावर स्वर्गलोक मिळवू.'' कुन्ती व माद्री दोघीही म्हणाल्या.

त्यांचा हा संकल्प कबूल न केल्यास तेथेच देहत्याग करायचा निर्धारही त्यांनी जाहीर केला.

पांडूला त्यांचे म्हणणे मान्य करावेच लागले. त्याने या दार्घीसह वानप्रस्थ जीवन कंठायचे ठरवले. तिघांनीही आपली मूल्यवान वस्त्रा-भूषणे अुतरवून वल्कले धारण केली अन् बरोबर आलेल्या परिचारिका व अन्य नोकरवर्गाला हस्तिनापुरला परत पाठवले. कोठेही एका स्थानी न रहाता पांडु कुन्ती व माद्रीसह वने, अुपवने फिरत राहिला. अशा तऱ्हेने नागशत पर्वत, चैत्ररथ, कालकूट, हिमवन्त, गन्धमादन, इन्द्रद्युम्नपद, हंसकूट इत्यादि स्थानी काही दिवस रहात पुढे शतशृंगपर्वतावर पोचले. तेथे अनेक ऋषिमुनींचा निवास होता. राजा पांडूही त्यांच्याबरोबर कठोर तपस्येत मग्न झाला.

शतशृंग पर्वतावरील वातावरण पांडूला फार आवडले. पहाटेच अुठून तो स्नानादि कृत्ये आटोपून ऋषिमुनीं बरोबर ध्यानधारणा करी. कुंती, माद्री या दोघी तेथे सापडणारी कंदमुळे, फळे वगैरे आणून पाकसिद्धी करीत. त्यांनी आपला आश्रम छान सजवला होता. आपल्या कुटीसमोर काही फुलझाडे ही त्यांनी लावली होती. तेथे येणारे पक्षी ,हरणे, खारी, ससे इत्यादि प्राण्यांना त्या प्रेमाने खाअू घालत. त्यांचे प्रेम पाहून ते प्राणीही निर्भय होअून त्यांच्या भोवताली वावरत, त्यांच्या हातातील खाणे जवळ जाअून खात.

परन्तु आता त्याच्या मनात शंका अुपस्थित झाली की, निपुत्रिकांनी कितीही घोर तपस्या केली, तरी त्यांना पुण्यलोक प्राप्त होत नाही. पण त्याच्या तर संतान प्राप्ती नशीबात नव्हती! त्याने असा विचार केला की, 'आपल्याच सारख्या किंवा आपल्याहूनही अुत्तम अशा एकाद्या पुरुषाने आपल्या पत्नींना अपत्यप्राप्ती करून द्यावी. ते पुत्र 'क्षेत्रज पुत्र' होतील. आपण स्वत:ही क्षेत्रज तर आहोत!' त्याने आपले हे विचार कुन्तीसमोर व्यक्त केले.

अन्य कोणापासून अपत्यप्राप्ती करून घ्यायला कुन्तीने प्रथम नकारच दिला, पण त्याची आवश्यकता पांडूने तिला पटवून दिली.

मग कुन्ती त्याला म्हणाली, ''माझ्या लहानपणी महामुनी दुर्वासांनी मला एक मन्त्रोपदेश दिलेला आहे. कोणाही देवाचं स्मरण करून मन्त्र जपला की तो देव प्रत्यक्ष येअून पुत्रप्रसाद देअून जाईल. आता मी कोणत्या देवाचं स्मरण करू हे तुम्हीच सांगा.''

''हे तर फारच छान! कुरुवंशाचा होणारा राजा धर्मज्ञ असणं अत्यन्त आवश्यक आहे. धर्मबद्ध होअून शासन चालवणं हे त्याला अनिवार्य असेल. तेंव्हा तू धर्मदेवाचंच स्मरण कर.'' पांडूने आनन्दाने सुचवले.

यमधर्माचे स्मरण करून कुंतीने मन्त्र जपल्यावर यमराज प्रत्यक्ष होअून कुंतीला प्रसाद देअून गेला, अन् ती गर्भवती झाली.

तिकडे हस्तिनापुरात एक वर्षापूर्वीपासूनच





गान्धारी गर्भवती होती. परन्तु कुन्ती माता बनली, तिला पुत्र झाला, तरीही गान्धारी अजून माता बनली नाही. कुन्तीच्या पुत्राचे नाव 'युधिष्ठिर' असे ठेवण्यात आले.

यानन्तर पांडूला वाटले की आपल्याला एक बलशाली पुत्रही असावा. वायुदेवाच्या स्मरणाने कुंतीला दुसरा पुत्र झाला. कुन्ती हे तान्हे बालक मांडीवर घेऊन बसलेली असताना एक विचित्र घटना घडली. अचानक एक वाघ कुठूनसा तिच्यासमोर आला. बाळ मांडीवर आहे, याचे अवधान न राहून कुन्ती एकदम घाबरून उभी राहिली अन् ते तान्हे बाळ शिळेवर पडले. पण बाळाला काहीही इजा न होता, ती शिळाच फुटून तिचे चार तुकडे झाले. बाळाला काहीही इजा न होता, ती शिळाच फुटून तिचे चार टुकडे झालेले पाहून सर्वांना मोठे आश्चर्य वाटले. या घटनेनंतर त्यांनी या भीम पराक्रमी बाळाचे 'भीमसेन' असे नामकरण केले.

आता एका असामान्य अशा पुत्राची अपेक्षा पांडूने व्यक्त केल्यावर कुन्तीने इन्द्रापासून अर्जुनाची प्राप्ति करून घेतली.

हस्तिनापुरात गान्धारीलाही शंभर पुत्र झाले अन् इकडे कुन्तीलाही हे पुत्र झाले. आणखीही काही पुत्रांना कुन्तीने जन्म द्यावा अशी पांडूची इच्छा होती, पण कुन्तीने आता नकार दिला.

माद्री पांडूला म्हणाली, "कुन्तीला मन्त्रप्रभावाने तीन पुत्र प्राप्त झाले. माझाही समान अधिकार आहेच ना, मग मलाही का पुत्र नसावेत? तिने मला मन्त्र दिला तर मीही माता बनेन."

पांडूने कुन्तीला माद्रीची इच्छा सांगितल्यावर तिने माद्रीला मन्त्र दिला.

माद्रीने अश्विनीकुमारांची आराधना केली अन् त्यांच्यापासून नकुल व सहदेव दोन पुत्र मिळवले. मन्त्रप्रभावाने आणखीही पुत्रांची अपेक्षा माद्रीने व्यक्त केली. परन्तु तिने प्रथमच एकदम दोन देवतांपासून पुत्रप्राप्ति करून घेतल्यामुळे रागावून कुन्तीने नकार दिला.

एकेका वर्षाच्या अन्तराने झालेले आपले पुत्र पाहून आता पांडूराजा फार प्रसन्न होता. त्यांच्या संगोपनात तो आता आपला वेळ व्यतीत करू लागला. अन्य आश्रमवासीयांनीही या बालकांच्या संगोपनात खूप उत्सुकता दाखवली. वसुदेवाने कश्यप ऋषींच्या हाती आपल्या नातवांना आभूषणे, वस्त्रे व खेळणी पाठवली.

पांडूराजाने तेथील पंडिताकडून मुलांना वेदाध्ययन करवले. अशा तऱ्हेने दिवस जात राहिले. पुढे वसंतऋतूत एकदा कुन्ती ब्राह्मणांच्या पूजेत मग्न असताना पांडू माद्री जवळ गेला. तिला एकटी पाहून, तिचा विरोध न जुमानता त्याने तिला आलिंगनात वेढले, अन् किन्दम ऋषींच्या शापामुळे त्याचे प्राणोत्क्रमण झाले.

आपल्या पतीच्या प्रेतावर पडून माद्री विलाप करू लागली. तो ऐकून कुन्ती व अन्य मुनिगण तेथे धावत आले. घडलेली घटना पाहून सर्वांना दुःख झाले अन् आश्चर्यही वाटले. कुन्तीला जवळ बोलावून माद्रीने पांडूच्या मृत्यूचे कारण सांगितले.

"माद्री, अग काय केलंस हे! किन्दम-मुनींच्या शापाचं कायम स्मरण असल्यानं मी आजपर्यन्त यांना मोठ्या सजगतेनं संभाळलं, सावधगिरी बाळगली, तू असं का घडू दिलंस? झालं ते होऊन गेलं. मी मोठी असल्यानं आता यांच्याबरोबर सती जाईन. मुलांचा संभाळ आता तूच सावधगिरीनं करत रहा." कुन्ती माद्रीला म्हणाली.

परन्तु माद्री रडतच म्हणाली, "मी त्यांना सावध रहायचा इशारा दिला, रोखण्याचा प्रयत्नही केला, पण अयशस्वी ठरले! पतीच्या प्राणांचं रक्षण करू न शकणारी अभागिनी,





पापिणी आहे मी! मुलं संभाळण्याचं सामर्थ्य माझ्यात नाही. नवऱ्याला वाचवू शकली नाही, ती मुलांना काय संभाळणार! इहलोकात पतीला सुख देऊ शकले नाही, ते कदाचित् परलोकात देऊ शकेन. तेंव्हा सती मीच जाईन.'' कुन्तीची विनवणी करून अन् तिची अनुमती घेऊन माद्री पतीबरोबर सती गेली.

शतशृंगवरचे मुनिगण कुन्ती व पांडवांना बरोबर घेऊन हस्तिनापुरला गेले. त्यांनी भीष्म, धृतराष्ट्र आदि कौरव यांना सगळी हकिकत निवेदन केली. पांडूराजाच्या मृत्यूबद्दल भीष्म, धृतराष्ट्र, विदुर यांनी दुःखप्रकट केले. विदुराने विधिवत् क्रियाकर्मे पार पाडली.

माद्री व पांडूचे चिताभस्म एका पालखीत ठेवून सन्मानपूर्वक ते गंगेत सोडण्यात आले. असंख्य लोकांनी यात भाग घेतला. बारा दिवसपर्यन्त या अन्त्यक्रिया चालू राहिल्या अन् मगच सर्वजण हस्तिनापुरी परत आले.

या सुमारास मुनि व्यासही हस्तिनापुरला आलेले होते. त्यांच्या सल्ल्यानुसार सत्यवती आपल्या स्नुषा अंबिका व अंबालिका यांना बरोबर घेऊन अरण्यात तपस्येसाठी निघून गेली. अरण्यातच तपस्या करता करता तिघीही स्वर्गाला गेल्या.

तेंव्हा पासून पांडव व कौरव धृतराष्ट्राकडेच वाढत राहिले. सर्वजण एकत्र खेळत, आपसात स्पर्धाही करत. सर्व स्पर्धा नेहमी भीमच जिंके. आपले बलप्रदर्शन करताना तो दहादहाजणांना वाहून नेत वेगाने धावे. पण रागावला की दुसऱ्यांचे केस धरून ठेवून काही केल्या सोडत नसे. पोहताना दहाजणांना एकाच वेळी पाण्याखाली दाबून धरी. मुले फळे तोडण्यासाठी झाडावर चढली की ते झाड तो गदागदा हलवी अन् कधी कधी एखादे झाड मुळासकट उपटूनही काढी. बिचारी मुले त्याच्यापुढे थरथर कापत. पण असे करण्यात भीमाचा कोणताही दुष्ट हेतु नसे. त्याचा खेळ म्हणजे इतरांना प्राणसंकट होऊन बसे. भीमाची ही अपार शक्ती पाहून दुर्योधन द्वेषाने तडफडे. त्याला असे वाटत असे की, 'भीम मरून गेला, तर बाकी सारेजण आपलं सांगणं मानतील, आपल्यालाच मान देतील.' त्यामुळे तो तशा एखाद्या संधीच्या

शोधात होता. गंगा नदीच्या तीरावर प्रमाणकोटी तीर्थ नावाचे एक स्थळ होते. तेथे चारही बाजूंना पायऱ्यांनी वेढलेले एक सरोवर होते. त्याचा जलक्रीडेसाठी अुपयोग केला जात असे. जवळच एक अुद्यानवन आणि सुंदरसे भवनही होते. दुर्योधनाने ते सारे आपल्या सोयीसाठी, क्रीडेसाठी बनवून घेतलेले होते. एके दिवशी असे ठरले की सर्व राजकुमारांनी विहारासाठी तेथे जायचे. तऱ्हेतऱ्हेचे रुचकर खाद्यपदार्थ बनवले गेले अन सेवकांनी ते सारे प्रमाणकोटी स्थळाकडे नेले.

कौरवांबरोबर पांडवही तेथे गेले. आणलेले पदार्थ पांडवांनीही वाटून खाल्ले. पण दुर्योधन मात्र भीमाजवळच बसून होता. तो भीमाशी मोठ्या प्रेमाने बोलत होता अन् बोलता बोलता त्याने भीमाला विषमिश्रित पदार्थही खाअू घातले. भीमाच्या मनात दुर्योधनाबद्दल कसली ही शंका नसल्यामुळे त्याने ते पदार्थ पोटभर खाल्ले, अन् इतरांबरोबर जलक्रीडाही केली. पण आता वीष आपले काम करू लागले होते. त्याच्या पोटात गडबड होअू लागली. गंगातटावर वारा खात तो पडून राहिला अन् बेशुद्ध झाला.

दुर्योधनाला हे पाहून फार आनन्द झाला, कारण त्याची युक्ती सफल झालेली होती. त्याने भीमाचे हातपाय बांधले आणि गंगेच्या खोल पाण्यात त्याला टाकून दिले. भीमाला काहीही कळले नाही. तो सरळ पाताळलोकात पोचला.

तिथे विषारी साप त्याला चावले. त्या विषामुळे दुर्योधनाने त्याला चारलेले वीष अुतरून गेले आणि तो शुद्धीवर आला. आपले हातपाय बांधले गेलेलेही त्याच्या लक्षात आले. शरीराला एक झटका देअून ती बंधने त्याने तोडून टाकली. आपल्याला चावलेले साप तो आता मारून टाकू लागला.

ही गोष्ट वासुकीला कळली, अन् भीमाला पाहून तो आपला बांधवच आहे हेही त्याच्या लक्षात आले. कारण कुन्तीचा पिता शूर हा वासुकीच्या बहिणीचा मुलगा होता. वासुकीने भीमाला बरोबर घेअून जाअून एक असा रस पाजला, की ज्यामुळे हजार हत्तींचे बळ तो पिणाराला प्राप्त होते. या रसाचे आठ मटके फस्त करून भीम आरामात झोपून गेला.





# मिथ्याभिमान

लोकनाथ हा एका संपन्न शेतकऱ्याचा मुलगा होता. लहानपणापासूनच त्याला फार लाडा-कोडात वाढवले गेल्यामुळे तो मोठा गर्विष्ठ अन् भांडखोर झाला होता. आपल्या बुद्धिमानीबद्दल त्याला फार गर्व वाटत असल्यामुळे तो नेहमी दुसऱ्यांची चेष्टामस्करी करून स्वतःची करमणूक करून घेई. शहरात अुच्च शिक्षण पूर्ण करून तो गावात परत आला.

इतके अुच्च शिक्षण घेअूनही आपल्याला एका खेड्यात रहावे लागत आहे याबद्दल लोकनाथला मनोमन नेहमी दुःख वाटे. त्याचा दावा असे की, तर्कशास्त्र अन् भाषाज्ञान या विषयात आपली बरोबरी करणारा कोणी या गावातच नव्हे, तर अन्यत्र कोठे असणे शक्य नाही.

लोकनाथ एकदा गावापासून जरा दूर असणाऱ्या तलावाच्या किनारी बसून आपल्या मित्रांशी निरर्थक गप्पा मारत बसलेला होता. त्यात वेळी गुरुनाथ नावाचा एक शेतकरी तेथून जात होता. त्याची गंमत करावी, असे वाटून लोकनाथने त्याला जवळ बोलावून विचारले, “गुरुनाथ, असं समज की, आपण या तलावात एक मोठासा दगड टाकला, तर तो बुडेलच ना! पण याचं कारण काय असावं याबद्दल तुला काही सांगता येईल का?”

त्याच्या या प्रश्नाला हसून गुरुनाथ अुत्तरला, “मोठासा कशाला? एकादा छोटासा दगड टाकला, तरी बुडेलच की तोही! त्याला पोहता येत नाही ना! दगड बुडायचं कारण हेच!”

गुरुनाथचे हे अुत्तर ऐकून केवळ लोकनाथच नव्हे, तर त्याचे सारे मित्रही खदखदा हसू लागले! लोकनाथ गुरुनाथला म्हणाला, “तू जे सांगितलंस, ते अगदी चुकीचं आहे. कारण भूमीत गुरुत्वाकर्षण शक्ती असते. त्यामुळे दगड आपल्या वजनाने बुडून जातो.”

गुरुनाथ यावर काहीशा नाराजीने म्हणाला, “पण मी दिलेल्या अुत्तरावर तुम्ही सगळे एवढे

वसंत मांडके

सात मजली हसलात याचं कारण काय? माझं म्हणणं कसं बरोबर आहे, ते मी तुम्हाला स्पष्ट करून सांगू का?''

त्याचे आव्हान स्वीकारत लोकनाथ म्हणाला, ''इतका लांब मासा पाण्यात सोडला, तर तो का नाही बुडत?''

''वा, वा! तो तर मासा आहे, तो सजीव असतो.'' लोकनाथ बेपर्वाईने म्हणाला.

''सजीव असला म्हणून काय झालं? त्याला सुद्धा वजन असतंच ना?'' गुरुनाथने विचारले.

''वजनानं काय होणार? त्याला पोहोता येतं, म्हणून बुडत नाही तो.'' लोकनाथ बोलला; पण लगेच त्याने आपली जीभ चावली! आपण चुकीचे बोललो, हे त्याच्या लक्षात आले.

पण गुरुनाथ लगेच खुशीने म्हणाला, ''मला तर मी दिलेलं अुत्तर अगदी बरोबर होतं, असंच म्हणावं लागेल! मी म्हटलं होतं ना, की दगडाला पोहोता येत नसल्यानंच तो बुडतो? आता बोल, बरोबर होतं ना माझं अुत्तर?''

आपली चूक लपवण्याच्या अुद्देशाने आता लोकनाथ म्हणाला, ''असेलही! पण, का व कसं घडतं, हे समजण्याचं एक शास्त्र आहे. खरं म्हणजे प्रत्येक क्रियेमागे एक कारण असतं, एक शास्त्र असतं. त्याबाबतचं पांडित्य जवळ असणं आवश्यक असतं.''

लोकनाथच्या या मोठमोठ्या गोष्टींचा गुरुनाथवर काहीच परिणाम झाला नाही. तो हसत म्हणाला, ''तू फिरवून फिरवून काहीतरी बोलतोस. तुझ्यासारख्यांना पांडित्याची आवश्यकता भासत असेल. पण माझ्यासारख्या एका सामान्य शेतकऱ्याला असल्या पांडित्याची काही गरज नाही. सकाळपासून संध्याकाळपर्यन्त अंगमेहनत करणाऱ्याला थोडंसं व्यावहारिक ज्ञान पुरेसं असतं.'' इतके बोलून तो आपल्या वाटेने निघून गेला.

शेतकऱ्याच्या या बोलण्याने मात्र लोकनाथचा चेहरा पांढरा पडला. आपल्या या पराभवानन्तर त्याचा गर्व अजिबात नाहीसा झाला. यानन्तर तो लोकांशी विनयाने वागू लागला अन् खुशीने गावातच राहून शेतीच्या कामात आपल्या पित्याला मदत करू लागला.






तरुण राघव फार चांगल्या स्वभावाचा होता, भोळा-भाबडा होता तो. लहानपणीच त्याची आई वारली अन् त्याच्या पित्याने पुन्हा लग्न न करता राघवला खूप लाडा-कोडाने वाढवले.

राघव लहानपणापासून इतरांना मदत करी; कोणी काही म्हटले, की तो त्यावर विश्वास ठेवी. पण काही माणसं लबाडही असतात हे त्याला कळतच नसे.

एक दिवस एक बैरागी राघवच्या घरी आला. राघवला पहाताच त्याने त्याची खूप स्तुति केली. परन्तु मुलाची स्तुति ऐकून त्याच्या पित्याचा चेहरा पडलेला बैराग्याला दिसला. ते पाहून बैराग्याला फार आश्चर्य वाटले. त्याने राघवला बाहेर पाठवले अन् त्याच्या पित्याला विचारले, ''तुझा मुलगा चांगला गुणी आहे. त्याचा चेहरा पाहूनच मी ओळखलं की, तो एक गुणी अन् अुत्तम युवक आहे. तुला तर याबद्दल अभिमान वाटायला हवा होता. पण तू तर अुदास दिसतोयस! काय कारण याचं?''

''स्वामीजी, तो सद्गुणी आहेच. पण सगळे त्याला फसवतात. मी जिवन्त आहे तोवर, काळजीचं कारण नाही. मी त्याला रोज समजावत असतो की या नुकसानकारक सवयी सोडून दे. मलाही आशा होती की, तो स्वतःत काही सुधारणा करील. पण तुमचं म्हणणं ऐकल्यावर माझी तीही आशा विफल होतेय असं वाटतं. तुमच्यासारख्या सज्जन माणसानं त्याची प्रशंसा करुन त्याच्या सद्गुणांचं कौतुक केलं, तर तो जास्तच जागरूक होईल अन् आपण करत असलेल्या कृत्यांबद्दल त्याचा विश्वास आणखीच दृढ होईल. यासाठीच तुम्ही केलेल्या त्याच्या स्तुतीमुळे मला आनन्द वाटला नाही.''

बैराग्याने राघवच्या दुःखी पित्याचे सान्त्वन केले अन् म्हटले, ''तुझ्या मुलासारखे सुपुत्र या जगात फार कमी असतात. अशा मुलांच्यात

**वत्सला कुलकर्णी**



परिवर्तन घडवून आणण्याचा प्रयत्न करणे चूक आहे. परन्तु एका गोष्टीची मात्र त्यांना गरज आहे - व्यावहारिक ज्ञानाची. मी राघवला आपल्या बरोबर घेऊन जाऊन दोन वर्ष आवश्यक ते शिक्षण देईन.''

वैराग्याच्या बोलण्याने पित्याला संतोष तर वाटलाच, परन्तु मुलाच्या विरहाच्या विचाराने आता तो काळजीत पडला. आपण आता म्हातारे झालोत, आयुष्याच्या शेवटच्या क्षणी मुलाचा चेहराही पहाता न येणं किती कठीण होईल?

थोडा विचार करून बैरागी म्हणाला, ''सध्या मी तीर्थयात्रा करत फिरतो आहे. माझं देशभ्रमण संपवून मी कुसुमा नदीतीरावरच्या कुसुमपुरात येऊन राहीन; माझा आश्रम आहे तिथे! तेंव्हा तू राघवला तिथे पाठव.''

नंतर राघवला जवळ बोलावून बैरागी त्याला म्हणाला, ''भलेपणा हा पांढऱ्या रंगासारखा पवित्र असतो, उलट बुरेपणा काळ्या रंगासारखा. पांढरा अन् काळा रंग एकत्रआला तर पांढरा रंग काळपट होऊ शकेल, पण काळा रंग पांढरा नाही होऊ शकणार. तू भला माणूस आहेस, पण वाईटपणाला साथ दिलीस, तर तुझ्या सद्गुणांचं दुर्गुणात परिवर्तन होईल.''

''हो, वाईट गोष्टींपासून नक्की दूर राहीन मी. पण स्वामीजी, वाईट गोष्ट ओळखायची कशी?'' राघवने भोळेपणाने विचारले.

त्याला प्रेमाने आशिर्वाद देत बैरागी म्हणाला, ''आजपासून वाईट गोष्टी तुझ्यापासून आपोआपच दूर राहतील बेटे! माझ्या या आशिर्वादाचा प्रभाव दोन वर्ष कायम राहील. त्यानन्तर तूच माझ्याकडे ये. वाईट गोष्टी कशा ओळखायच्या, ते शिकवीन मी तुला तेंव्हा!''

यानंतर चमत्कार घडला. कोणीही मित्र राघवकडे येत नाहीसे झाले. राघवला याबद्दल वाईट वाटले; पण पित्याने त्याला समजावले, ''हा सगळा स्वामीजींचा प्रभाव आहे.''

दोन वर्षे निघून गेली. राघवचा पिता मरणासन्न होता. तो राघवला म्हणाला, ''बाळा, आता मी जगणार नाही. आपलं घर अन् शेत विकलंस, तर तुला तीस हजार अशर्फ्या नक्की मिळतील. त्या घेऊन कुसुमपुरला निघून जा. तिथे स्वामीजी तुला पुढे काय करायचं ते सांगतील. त्यांनी सांगितलेली दोन वर्षांची मुदत पुरी होत आली आहे. पण या काळात कुणावरही विश्वास न ठेवायची आठवण ठेव.''

यानंतर एका आठवड्याने राघवच्या पित्याचे देहावसान झाले. सान्त्वना देण्यासाठी आलेल्या लोकांना राघवने पित्याने दिलेल्या सूचनांबद्दल सांगितले. त्यापैकी एका संपन्न शेतकऱ्याने तीस हजार अशर्फ्या देऊन त्याचे घर आणि शेत खरेदी केले.

ही हकिकत कळल्यावर गणपती नावाचा राघवचा एक मित्र त्याला भेटायला आला अन् म्हणाला, ''अरे राघव, इतकी मोठी रक्कम बरोबर घेऊन जाणं बरं नव्हे. वाटेत चोर तुला फसवून संगळीच रक्कम पळवून नेतील. म्हणून मी एक सुचवतो तुला. आमच्या गावात सावकारा जवळ तीस हजार अशर्फ्या किमतीचा एक हिरा आहे. तू तो हिरा ही रक्कम देऊन खरेदी कर. कोणाला नकळत तो तुझ्या कपड्यात लपवून बरोबर घेऊन जा.''

शरभ सावकाराकडे इतका मौल्यवान हिरा होता ही गोष्ट खरीच. त्यानेच राघवची रक्कम हडपण्यासाठी गणपतीला त्याच्याकडे पाठवले होते. पण सावकार जेंव्हा गणपतीला आपले कारस्थान सांगत होता, तेंव्हा त्याची मुलगी सुशीला हिने ते सारे ऐकले. तिचे राघववर प्रेम



होते, त्याच्याशी विवाह करायची तिची इच्छा होती.

राघवने गणपतीचे सांगणे मान्य केले अन् रक्कम घेऊन तो शरभकडे गेला. रक्कम घेऊन ती आपल्या मुलीच्या हाती देऊन ती कपाटात ठेवायला त्याने तिला सांगितले.

सुशीलाने त्या अशर्फ्या घेऊन कपाटात ठेवल्या अन् कपाटातली तीस नाणी घेतली. एक एक नाणे एक एक हजार अशर्फ्यांच्या किंमतीचे होते. ती सारी नाणी एका थैलीत टाकून त्यातच राघवच्या नावे लिहिलेले एक पत्रही ठेवले.

पत्रात तिने लिहिले होते - 'माझं तुझ्यावर प्रेम आहे, वैराग्याकडून परत आल्यावर तू

माझ्याशी लग्न कर. माझे बाबा फसवून तुला नकली हिरा देत आहेत. म्हणून तुझी रक्कम मी तुला परत देत आहे.''

मधल्या अवधीत सावकाराने आपल्या बायकोला बोलावून म्हटले, ''मी या राघवला हिरा विकत आहे. दहा हजार कमी करून देतोय मी त्याला. तो कोणी परका थोडाच आहे, पेटीतला हिरा आणून दे याला.''

तिला आपल्या नवऱ्याचा स्वभाव चांगला माहीत असल्याने, तिने नकली हिऱ्याऐवजी खरा हिराच आणून राघवला दिला.

सुशीलाही नाणी ठेवलेली थैली सोपवत राघवला म्हणाली, ''वाटेत भूक लागली की ही थैली अुघड. यात खायचे पदार्थ आहेत. ते खाअून आपली भूक भागव.''

घरी येअून सुशीलेने थैलीत काय ठेवले आहे ते पाहण्याच्या अुद्देशाने राघवने ती अुघडली. सुशीलाचे पत्र आणि नाणी पाहिल्यावर सावकाराने आपल्याला किती फसवले आहे, हे त्याच्या लक्षात आले.

एका लहानशा पेटीत आवश्यक सामान ठेवून राघव कुसुमपुरकडे जायला निघाला. वाटेत त्याला एक प्रवासी भेटला. एक सहप्रवासी मिळाल्यामुळे राघवला बरे वाटले. हा सहप्रवासी धोकेबाज आहे, हे न कळल्याने बोलता बोलता राघवने आपली सगळी हकिकत त्याला सांगून टाकली.

थोडे दूर गेल्यावर दोघे एका झाडाखाली विश्रान्तीसाठी बसले. तेंव्हा तो दुसरा प्रवासी राघवला म्हणाला, ''मला झोप येतेय. माझ्या या थैलीत मोठी रक्कम आहे. दोन लाख अशर्फ्या आहेत यात. ही थैली नीट जवळ ठेव अन् राखण कर तिची. मी जागा झालो, की तुझी पेटी मी संभाळीन अन् तूही झोप काढ थोडी.''

राघने 'हो' म्हटले अन् प्रवाशाने थोडी झोप काढली. तो जागा झाल्यावर राघव झोपला. पण अुठल्यावर मात्र त्याला दिसले की तो प्रवासी निघून गेलाय, अन् आपली पेटीही नाहीशी झालीय! प्रवाशाने आपल्याला ठकवल्याचे अन् आपले सर्वस्व नाहीसे झाल्याचे त्याच्या लक्षात आले!

राघवला या घटनेने दुःख तर वाटलेच, पण त्याने धीर सोडला नाही. तो तसाच कुसुमपुरकडे चालू लागला.

तो प्रवासी राघवची पेटी घेअून जरा दूर गेला आणि त्याने ती मोठ्या अुत्सुकतेने अुघडली. त्यात नाण्यांऐवजी एक साप वेटोळं घालून बसलेला पाहून तो दचकलाच! सापाच्या मस्तकावर एक लखलखता मणी होता. सापाचे फुसकारणे ऐकून प्रवाशाने पेटीचे झाकण एकदम बंद केले.

सापाला पाहून प्रवासी भयाने कापू लागला. पण पेटी तेथेच सोडून जाणेही त्याला इष्ट वाटले नाही, कारण तो नागमणी अत्यन्त मूल्यवान होता. प्रवासी पेटी अुचलून एका गारुड्याकडे गेला. त्याचे बोलणे ऐकून गारुडी भलताच खूश झाला. त्या देशाचा राजपुत्र आजारी होता अन् नागमण्याच्या स्पर्शाने तो बरा हेअील, असे वैद्याने सांगितलेले होते. नागमणी घेअून येणाऱ्याला राजाने अर्धे राज्य देअू करण्याची घोषणा दिलेली







होती.

गारुडी प्रवाशाला म्हणाला, ''दोन दिवस तर निरनिराळ्या पूजा वगैरे कराव्या लागतील. तेंव्हा तू इथल्याच एकाद्या घरी दोन तीन दिवस रहा. मी पूजा वगैरे अुरकून घेतो.''

या अवधीत गारुड्याने हुबेहूब तसलीच दुसरी पेटी पैदा केली अन् त्यात एक मेलेला साप व काचेचा मणी ठेवला. ती पेटी प्रवाशाला देत गारुडी म्हणाला, ''पूजेच्या प्रभावानं यातला साप मरून जाईल आणि मणी तुझाच होईल. नागदेवतेची मला पेटी स्वत: न अुघडायची आज्ञा झालीय. तू मला फक्त दहा अशर्फ्या दे, अन् पेटी घेऊन जा. आता तू लाखो अशर्फ्यांच्या किंमतीच्या मण्याचा मालक आहेस.''

प्रवाशाने पेटी थोडीशी अुघडून त्यातला साप अन् मणी पाहून घेतला अन् मोठ्या आनन्दाने गारुड्याला दहा अशर्फ्या दिल्या. त्याला काय माहीत की गारुड्याने आपल्याला चांगलाच चकमा दिलाय!

प्रवासी निघून गेल्यावर एक एकान्त ठिकाण पाहून गारुड्याने पेटी अुघडली. पण त्यात तर सापही नव्हता व मणीही गायब होता! त्याऐवजी पेटीत काही ताडपत्रे त्याला मिळाली. बिचारा 'हाय हाय' करत राहिला! त्याला कळून चुकले की आपणही ठकवले गेलोय! तरीही त्या ताडपत्रात काही महत्त्वाचे लिहिलेले असावे असे त्याला वाटले. तो स्वत: निरक्षर असल्याने एका पंडिताकडे गेला.

ताडपत्रे वाचून पंडिताला कळले की, ते एक अद्भुत काव्य आहे. आजपर्यन्त या काव्याबद्दल कोणाला काही माहीत नसल्याचे ही त्याच्या ध्यानी आले. त्यामुळे ताडपत्रे राजाकडे नेअून दिल्यास तो आपल्याला हजारो अशर्फ्या देईल हे जाणून प्रत्यक्षात तो म्हणाला, ''कोणी मूर्खानं यात काही निरर्थक गोष्टी लिहून ठेवल्या आहेत. पण ही पेटी मात्र आवडलीय मला. ती ठेवून घेअून मी तुला पन्नास अशर्फ्या देतो. चालेल?''

गारुड्याने ते आनन्दाने मान्य केले. ताड-पत्रांसह पेटी पंडिताच्या हवाली करून तो निघून गेला. पंडित ताबडतोब राजाकडे जायला निघाला. राजधानीत जाअून प्रथम तो एका धर्मशाळेत अुतरला.

त्या रात्री एक चोर पंडिताच्या खोलीत घुसला. पंडित आरामात घोरत पडलेला पाहून चोराने हळूच पेटी अुघडून पाहिली, तो ती अशर्फ्यांनी खचाखच भरलेली! पेटी घेअून तो तिथून पळून जाअू लागला, तेंव्हा शिपायांनी त्याला पकडले, त्यांनी पेटी अुघडून पाहिली. त्यांना एक माणसाचे कापलेले मस्तक त्यात आढळले. अजूनही त्यातून रक्त टपकत होते. ते शिर हुबेहूब राजकुमाराच्या चेहऱ्यासारखे होते! शिपाई पेटी व चोराला बरोबर घेअून राजाकडे गेले.



मधल्या काळात राघव कुसुमपुरला पोचला. बैराग्याचे शरीर अगदी काटकुळे झालेले पाहून त्याला फार आश्चर्य वाटले.

बैरागी राघवला म्हणाला, ''बरा वेळेवर येअून पोचलास बघ! राजपुत्राला बरा करणारा नागमणी माझ्याजवळ आहे. अन् त्यासाठी आवश्यक ते मंत्र पढण्यासाठी आवश्यक ती ताडपत्रं ही आहेत माझ्याजवळ. त्यांचा अुपयोग करून अर्धे राज्य मिळवून घे. मीही येतो तुझ्या-बरोबर राजधानीला!''

बैरागी आणि राघव राजाला भेटले. राजा सादर त्यांना घेअून राजकुमारा जवळ गेला.

बैराग्याने राजकुमाराच्या शरीराला नागमण्याचा स्पर्श केला अन् मंत्रपठनही केले. पण अकस्मात राजपुत्राचे शीर अदृश्य झाले. बिछान्यावर केवळ धडच काय ते अुरले; अन् त्यातून रक्त वाहू लागले.

आपल्या पुत्राची अवस्था पाहून राजा एकदम भडकला. बैराग्याने राजाचा क्रोध शान्त केला अन् म्हटले, ''चिन्ता नका करू महा-राज! मण्याचा प्रभाव फार तीव्र असतो. मेंदूला ती तीव्रता सहन होत नाही, म्हणून मी मन्त्रप्रभावाने शीर धडापासून निराळं केलंय. आता धडावर अुपाय केला जाईल.''

इतक्यात शिपाई त्या चोराला तेथे घेअून आले अन् त्यांनी राजाला सारा वृत्तान्त कथन केला. राजा पेटी अुघडणार, इतक्यात राघव ओरडला, ''ती पेटी तर माझी आहे!'' झटकन पुढे होअून त्याने ती अुघडली. त्याच्या सर्व वस्तु

व्यवस्थित त्यात होत्या! राघव वस्तूंकडे मोठ्या प्रेमाने पहात असतानाच राजकुमार सजीव होऊन उठून बसला.

आपल्या पित्याकडे पहात राजपुत्राने विचारले. "मला काय झालंय बाबा? माझ्या शरीरात अचानक इतकी खूप शक्ती कशी आली?"

राजाच्या आनन्दाला सीमा उरली नाही. वचनाप्रमाणे त्याने तावडतोब बैराग्याला अर्धे राज्य देऊ केले. बैराग्याने राघवला अर्पण केले.

परन्तु राजाला विनयपूर्वक प्रणाम करत राघव म्हणाला, "महाराज, माझ्यात राजा बनायची योग्यता नाही. मी जसा आहे, तसाच राहू द्या मला! राज्यभार आपला आपणच सांभाळावा!"

राजाने बैराग्याकडे पाहिले; तेंव्हा बैरागी त्याला म्हणाला, "महाराज, आपण पेटी अशर्फ्यांनी भरून द्या अन् आवश्यक संरक्षण देऊन याला त्याच्या गावी पाठवून द्या म्हणजे पुरे."

बैराग्याचे हे बोलणे ऐकून राघव घाबरून म्हणाला, "स्वामीजी, पण आपणाकडून आवश्यक ते व्यवहारज्ञान मिळवल्याशिवाय कसा जाऊ मी?"

बैरागी यावर हसत म्हणाला, "अरे व्यवहारज्ञान काही शिकून नसतं मिळत. भलेपणा मर्यादिबाहेर जात असेल, तर व्यवहारज्ञान मिळत नाही. म्हणजे याचा अर्थ असा की, तुझ्यात व्यवहारज्ञान येणारच नाही कधी! आता तुला खूप धन अन् अभय राजाकडून प्राप्त झालंय. ज्या सुशीलेचं तुझ्यावर प्रेम आहे, तिला भरपूर व्यवहारज्ञान आहे. तू फक्त आता तिच्याशी विवाह करून घे अन् ती म्हणेल त्याप्रमाणे वागत जा. तुझं रक्षण करत करतच मी असा काटकुळा आणि अशक्त झालोय. भविष्यात सावध रहा. पण पुन्हा माझी गरज पडणार नाही यासाठी जागरूक रहा."

राघवला आता कळून चुकले की विवेकहीन भलेपणामुळे आपण स्वामीजींना त्रास दिला आहे. यानंतर मात्र त्याने बैराग्याने सांगितल्या-प्रमाणेच जीवनयापन केले.



# बहुरूपा वसुन्धरा



## आदि वानर

१७८० मधे मादागास्कर मधे एक विशेष प्रकारचा लंगूर आढळला. हा आकाराला छोटा असून, याची शेपटी झुबकेदार होती. याचे डोळेही गोलगोल व मोठे असल्याने प्रथमतः लोक याला एक प्रकारची खार समजले. पण तो एक आदि वानर आहे. याच्या हातांना अंगठा असतो. त्यामुळे झाडाच्या सालाखाली दडलेले किडे पकडून तो खाऊ शकतो. पण या किड्यांशिवाय अन्य काहीच तो खात नसल्याने ही जात नामशेष होण्याची भीती आहे.



## गिधाडांची सहनशक्ती

अमेरिकेत आढळणाऱ्या 'एव्हरलाईड केरस' नावाच्या गिधाडांचे खाद्य आहे गोगलगाय. शंखासारख्या आपल्या कवचातून बाहेर पडलेली गोगलगायच फक्त ती खाऊ शकतात. बाकदार असलेली त्यांची चोच तशी चांगली बळकट असते. पण वाकडेतिकडे असलेले कवच फोडायला मात्र या चोचीचा काहीही उपयोग होऊ शकत नाही. त्यामुळे गिधाडांना मोठ्या धीराने वाट पहात रहावे लागते. गोगलगाय बाहेर पडल्याबरोबर झडप घालून, गिधाड ती उचलून खाऊन टाकते.



## झुरळासारखी वाळवी

कागद व लाकूड पोखरून खाणारी पांढरी वाळवी तुम्ही पाहिलीच असेल. निरखून पाहिले तर ही वाळवी मुंग्यांसारखी दिसत नसून झुरळासारखी दिसते हे तुमच्या ध्यानात येईल. मोठमोठी वारुळे बनवणारी ही वाळवी जमिनीखाली रहाते. पुरेसे मोठे झाल्यावर हे किडे पंख पसरून उडून जातात. त्यांची जोडी जमली की ते जोडपे आपली निराळी वसाहत बनवते. ही पांढरी वाळवी जगात सर्वत्र आढळते.

# श्रीलंकेत स्थापन झालेले नवे रेकॉर्ड

ता. १९ ऑगस्ट रोजी श्रीमती चंद्रिका कुमारतुंगा या श्रीलंकेच्या प्रधान मंत्री बनल्या. त्या दोन माजी प्रधान मंत्र्यांच्या सुकन्या आहेत. तसं त्यांनी इतिहासात एक नदीन रेकॉर्ड प्रस्थापित केले आहे. त्यांचे वय आहे ४९ वर्षे.

त्यांचे वडील एस्.डब्ल्यू.आर्.डी. बंडारनायके सन १९५६ पासून १९५९ पर्यंत श्रीलंकेचे प्रधान मंत्री होते. सन १९५९ मध्ये त्यांची हत्या झाली. त्यांच्या मरणानंतर त्यांची पत्नी श्रीमती बंडारनायके देशाच्या प्रधान मंत्री झाल्या. त्या जगातील सर्वप्रथम महिला प्रधान मंत्री होत. त्या सन१९६० ने १९६५ व नंतर पुन्हा सन् १९७० ते १९७७ पर्यंत दोनदा श्रीलंकेच्या प्रधान मंत्री बनल्या.

श्रीमती चंद्रिका कुमारतुंगा प्रधान मंत्री झाल्यावर लगेच तीन महिन्यात ता. ९ नोव्हेंबर रोजीं अध्यक्ष-पदाची निवडणूक झाली. या निवडणुकींत श्रीमती कुमारतुंगा पीपल्स अलायन्स दलातर्फे अध्यक्ष-पदासाठी उमेदवार होत्या. या निवडणुकीत ६२ टक्क्याहून अधिक मते मिळवून त्या विजयी झाल्या. ता १२ नोव्हेंबर रोजी त्यांनी अध्यक्ष-पदाची शपथ घेतली. त्या श्रीलंकेच्या पहिल्या महिला अध्यक्ष होत.



श्रीमती कुमारतुंगा यांनी प्रधान मंत्री बनल्यावर आपली आई श्रीमती सिरिमाओ बंडारनायके यांना आपल्या मंत्री-मंडळात मंत्री बनविले. त्यांच्याकडे कोणते ही खाते सोपविण्यात आले नव्हते. श्रीमती कुमारतुंगा जेंव्हा अध्यक्ष-पदी निवडून आल्या, तेंव्हा त्यांची आई प्रधान-मंत्री झाली. अशा रीतीने श्रीमती सिरिमाओ बंडारनायके तिसऱ्यांदा श्रीलंकेच्या प्रधान मंत्री बनल्या. १४ नोव्हेंबर रोजी थोडा-फार बदल करून त्यांनी आपले मंत्री-मंडळ बनविले. यात २१ मंत्री आहेत.

श्री. बंडारनायके श्रीलंकेच्या फ्रीडम पार्टीचे संस्थापक होते. सन् १९५९ मधे जेव्हा त्यांची हत्या झाली, तेव्हा त्यांची पत्नी श्रीमती बंडारनायके यांनी शासनाची सूत्रे आपल्या हाती घेतली. ३५ वर्षे चालत आलेल्या त्यांच्या राजनैतिक जीवनाचा हा प्रारंभ होता. १९६० मधे जी सार्वत्रिक निवडणूक झाली, त्यात त्यांच्या पक्षाने प्रचंड विजय मिळवला. त्या देशाच्या प्रधान मंत्री झाल्या. सन् १९७० मधे त्यांनी साम्यवादी पक्षाच्या साह्याने आपले सरकार बनवले व सन १९७७ पर्यंत ते टिकवले. १९७७ मधे झालेल्या निवडणुकीत त्यांच्या विरोधी पक्षाला-युनायटेड नॅशनल पार्टीला यश मिळाले. त्या पक्षाचे नेते श्री. जयवर्धने घटनेनुसार देशाचे अध्यक्ष बनले.



सन् १९८९ मधे ही पुन्हा युनायटेड नॅशनल पार्टीचाच जय झाला. तोपर्यंत प्रधान मंत्री असलेले प्रेमदास अध्यक्ष बनले. त्यांची हत्या झाल्यानंतर तत्कालीन प्रधान मंत्री विजयतुंगा श्रीलंकेचे अध्यक्ष झाले.

सन् १९९३ मधे एस्.एल्.एफ्.सी. ने काही पक्षाच्या मदतीने पीपल्स अलायन्सची स्थापना केली. या पार्टीने श्रीमती कुमारतुंगा यांना आपल्या नेतृत्वपदी निवडले. त्या वर्षी ज्या प्रांतीय निवडणुका झाल्या त्यात अधिक लोकसंख्या असलेल्या पश्चिमी प्रांताने त्यांना निवडले व त्या देशाच्या प्रधान मंत्री झाल्या.

श्रीमती चंद्रिका कुमारतुंगा यांनी अध्यक्ष-पदाचा स्वीकार करताच घोषित केले की त्या अध्यक्ष-प्रणाली संपुष्टात आणतील व संसदीय प्रणालीचा अंगीकार करतील. हा माझ्या पक्षाचा निर्णय आहे असे त्या म्हणाल्या. हे नवे धोरण कदाचित् जुलै पर्यंत अंमलात येईल. त्यावेळी श्रीमती कुमारतुंगा संपूर्ण अधिकारीसह प्रधान मंत्री पद ग्रहण करतील आणि त्यांच्या मातोश्री श्रीमती बंडारनायके या अध्यक्ष बनतील. राजनैतिक चिंतकांना वाटते की आई व मुलगी यांच्या अधिकार-पदात बदल होईल. जर असे घडून आले तर लंकेत स्थापित झालेले हे एक नवे रेकॉर्ड होईल.



# बुटकी राक्षसी

शकुन्तलाची सावत्र आई तिला रागावत अन् मारत असे. पाहून एकाद्याचे डोळे दिपावेत, इतकी शकुन्तला सुरेख होती रूपाने. पण तिच्या दोघी सावत्र बहिणी अत्यंत कुरूप होत्या.

''या डाकिणीमुळेच माझ्या मुलींची कुठं लग्नं जमत नाहीयेत.'' असे आई म्हणे.

सावत्र आईने गावातल्या एका पैसेवाल्या म्हाताऱ्याशी शकुन्तलेचे लग्न करून द्यायचे ठरवले. अंधार झाल्याबरोबर ती घरातून निघून गावा बाहेरच्या चिंचेच्या बनात पोचली.

या बनात एक म्हातारी रहात असे. म्हातारीचे डोळे मांजरी सारखे घारे होते. तिच्या कपाळी कुंकवाचा मळवट भरलेला असे. तिचे लालपिंगट केसही नेहमी मोकळे अन् पसरलेले असल्याने म्हातारी भीतिदायक दिसे.

रात्रीच्या वेळी शकुन्तलेला पाहून म्हातारीने तिला विचारले, ''लाकडं वेचायला आलेली असताना मी तुला खूपदा पाह्यलंय; पण आत्ता रात्री कशी काय आलीस इथं?''

शकुन्तलेने आपली करुणकथा म्हातारीला ऐकवली. म्हातारी म्हणाली, ''तुझ्या सावत्र आईला तुझ्यावर असा हक्क गाजवायचा काही ही अधिकार नाहीय. मी एकटीच असते इथे. माझ्याबरोबर इथेच रहा तू.''

म्हातारी तिच्याशी फार प्रेमाने वागे. शकुन्तलाही घरचे सारे कामकाज पाहून म्हातारीला खूप खूप विश्रान्ती देई. म्हातारीला आता आरामच आराम असे.

म्हातारीची स्वत:ची एक बैलगाडी होती. दर महिन्याला दोन पोती जंगलातली चिंच घेऊन ती बैलगाडीतून शहरात नेऊन विकून येई. त्या पैशातून लगेच ती स्वत:साठी काही आवश्यक सामानही खरेदी करी. या वेळी म्हातारीने हे काम शकुन्तलेवर सोपवले. गाडीत चिंचेची पोती घालून शकुन्तला शहराकडे निघाली.

शकुन्तला गाडीत बसून जंगलातून जात असताना, अचानक एक बुटकी राक्षसी एकदम

**अशोक सावंत**



कुठूनशी येऊन अुडी मारून बैलगाडी समोरच अुभी राहिली, अन् टाळ्या वाजवत ती आनन्दाने म्हणाली, "वा, वा ! काय सुंदर, एकाद्या बाहुलीसारखी मनमोहक आहेस तू!"

राक्षसी दिसायला जरी अगदी भयानक दिसत असली, तरी ती शरीराने अगदीच बुटकी असल्याने कसाबसा धीर एकवटून शकुन्तला तिला म्हणाली, "राजधानीत मी चिंच विकायला निघाले आहे. दूर हो पाहू वाटेतून!"

तिच्या रागवून बोलण्यामुळे राक्षसीचा चेहरा एकदम पांढरा पडला. मोठ्या दीनपणे ती म्हणाली, "अग माझ्या गोडगोड बाहुले, रागवू नको ग माझ्यावर. मलाही आपल्या बरोबर गाडीतून ने ना! मी अगदीच बुटकी आहे ना, म्हणून इतर कोणीही राक्षस मला जवळही येऊ देत नाहीत. माझ्यावर बहिष्कारच घातला आहे त्यांनी. म्हणून या झाडावर बसून एकटीच जगत असते मी. पण या जीवनाला मी फार कंटाळून गेलेय ग!"

शकुन्तलेला तिची फार दया आली. ती म्हणाली, "मग हे पहा, मी तुला एका पोत्यात घालून पोत्याचं तोंड दोरीनं बांधून टाकते. तुला हवा मिळावी म्हणून मधून मधून मी गोणपाटाला भोकं पाडून ठेवते. चालेल ना तुला? आता खूश आहेस न राक्षसी?"

"अं ? 'राक्षसी' म्हणून का हाका मारतेस मला ? माझं नाव आहे 'युवराणी'. पोत्याला भोकं पाडशील ना, ती माझ्या डोळ्यांसमोर येतील अशी पाड; म्हणजे मला त्यातनं माणसं दिसतील. त्यांना पाहून आनन्द लुटायचा आहे मला." बुटकी राक्षसी म्हणाली.

बाजारात पोचल्यावर पोती गाडीतून काढून, त्यांच्याजवळ अुभी राहून शकुन्तला ओरडू लागली, "चिंच घ्या चिंच! एका पोत्याचे पन्नास रुपये!" लांबून एका मिठाईवाल्याचा असाच ओरडण्याचा आवाज ऐकू येत होता, "मिठाई घ्या मिठाई!" आवाज ऐकून राक्षसीने विचारले, "मिठाई म्हणजे काय असतं? माझ्यासाठी थोडीशी घेऊन ये ना! पाहू दे कशी चव असते ती!"

जवळच गुळाच्या ढेपा विकत असलेल्या मुलाला आपल्या पोत्यांवर नजर ठेवायला सांगून शकुन्तला मिठाई आणायला गेली.

मधल्या वेळात मिठाईवाला मिठाई विकत विकत बराच दूर गेला. शेवटी त्याला गाठून मिठाई घेऊन येईपर्यन्त शकुन्तलेला अर्धा तास तरी लागलाच. परत येऊन पहाते, तर गाडीपाशी पोती नाहीत!

शकुन्तला घाबरली. इकडे तिकडे पहात असतानाच गूळवाला मुलगा तिच्याजवळ येऊन एकशे पन्नास रुपये तिच्या हातावर ठेवत म्हणाला, "अगदी सहजपणे तुझी सगळी चिंच एकदम विकली गेली. राजाचे काही सैनिक बाजारला आले होते, ते तुझी चिंच विकत घेऊन गेले. राजकन्येचा विवाह आहे ना !"



त्याचे बोलणे ऐकून शकुन्तला घामाघूम झाली. 'बिचाऱ्या बुटक्या राक्षसीने आपल्यावर विश्वास ठेवला अन् आपल्याबरोबर आली ती ! सैनिक आता तिचे कसे अन् किती हाल करतील कुणास ठाअूक! हातच्या भाले-बरच्यांनी तिला भोसकतील किंवा कदाचित तिला जिवन्त जाळून ही टाकतील!' असा विचार मनात येताच ती भयाने कापू लागली.

शकुन्तला आता तावडतोब राजवाड्याकडे चालू लागली. जवळ पोचताच तिला दिसले की काही बायका-पुरुष भाज्या व अन्य काही सामानाची पोती डोक्यावर अन् पाठीवर लादून जात आहेत. सर्वजण ती पोती राजवाड्या-मागील बागेजवळच्या मोकळ्या जागेत अुतरवत होते. शकुन्तलाही एक पोते डोक्यावर घेऊन तिथे पोचली. आपली चिंचेची पोती तिला तेथेच एका कोपऱ्यात दिसली.

डोक्यावरचे पोते मुद्दाम तेथेच अुतरवायच्या मिषाने ती आपल्या पोत्यांजवळ पोचली, अन् तिने हळूच 'युवराणी, युवराणी' अशा हाका मारल्या.

त्यातल्याच एका पोत्यातल्या राक्षसीने तिला विचारले, "आणलीस मिठाई?" राक्षसी सुरक्षित असल्याचे जाणून शकुन्तलेने सुटकेचा दीर्घ श्वास सोडत म्हटले, "युवराणी, अग आत्ता आपण अचानक एका संकटात सापडलो आहोत. या घटकेला आपण राजप्रासादाच्या आवारात आहोत. अंधार झाला की मी इथून पळायची वाट शोधीन. मी तुझ्या नावानं हाका



मारेपर्यन्त बिलकुल हालचाल न करता पडून रहा. या संकटातनं सहीसलामत वाचलो, तर मग खा हं मिठाई.'' अन् त्या पोत्याची दोरी सोडून टाकून ती तेथून बाजूला झाली.

सूर्यास्त होऊन आता हळूहळू अंधार पसरू लागला. शकुन्तला सुटकेची वाट शोधत बगीचात पोचली, तेंव्हा तिला तेथे एक तरुणी अुदास बसलेली आढळली. तिची वस्त्रेप्रावरणे पाहून, 'हीच राजकुमारी असावी' असे शकुन्तलेने ताडले. तिच्या जवळ जाअून तिने विचारले, ''राजकुमारी, अुद्या सकाळी तुमचा विवाह आहे, अन् तुम्ही अशा अुदास बसल्या आहात! तुम्हाला हा विवाह पसन्त नाही असं दिसतंय. बरोबर ना ?''

दचकून राजकुमारी म्हणाली, ''कोण आहेस तू ? मला हे लग्न पसन्त नसल्याचं कसं ओळखलंस तू?''

शकुन्तला हसतहसत म्हणाली, ''एक महिन्यापूर्वी मीही या परिस्थितीतून गेलेय. न आवडणाऱ्या लग्नापासून स्वतःला वाचवण्या साठीच तर मी घरून पळून गेले.''

हे ऐकताच राजकन्येच्या डोळ्यात पाणी आले. देवीच्या मंदिरात पाषाणशिल्पे बनवणाऱ्या एका तरुण शिल्पकारावर तिचे प्रेम होते. पण ही गोष्ट आपल्या आईबापांना सांगण्याइतके धाडस तिच्यात नव्हते. त्यामुळे आता त्यांनी ठरवलेल्या एका देशच्या युवराजाशी तिला विवाह करावा लागणार होता.

''पण असलं लग्न करून काय अुपयोग? आईबापांना या लग्नाबद्दलची अनिच्छा सांगायचा धीर होत नसेल, तर सरळ त्या राजपुत्रालाच सारं सांगून टाका राजकुमारी!'' शकुन्तलेने राजकुमारीला मार्ग सुचवला.

शकुन्तलेचा सल्ला राजकुमारीला आवडला. आपली अंगठी काढून शकुन्तलेच्या हाती देत ती म्हणाली, ''ही तुझ्या बोटात असली म्हणजे राजमहालात तुला कुठेही संचार करता येईल. कसंही करून तू सिंहपुरीच्या त्या राजकुमाराला इथे घेअून ये.''

थोडा विचार करून शकुन्तला म्हणाली, ''इथे आणलं तर कदाचित कोणी पाहीलही.



बाहेर प्रांगणात विवाहाची सामग्री पडलेली आहे. तिथे जाअून एकाद्या कोपऱ्यात तुम्ही लपून रहा. मी युवराजांना तिथे पाठवीन.'' अन् ती तेथून निघाली. दारावरच्या पहारेकऱ्यांना अंगठी दाखवून, कोणताही अडथळा न येता ती युवराजाच्या अतिथि-गृहात पोचली.

इतरांना न कळू देता शकुन्तलेने राजकुमारीची अंगठी दाखवून युवराजाला म्हटले, ''राजकुमारी आत्ता ताबडतोब आपल्याशी काही मुख्य विषयावर बोलू इच्छितेय. आपण माझ्याबरोबर चलावे.'' त्याला बरोबर घेअून तिने राजकुमारीची लपण्याची जागा दाखवली, अन् स्वतः ती एका झाडाखाली अुभी राहिली.

युवराज जरा वेळाने परत आला, तेंव्हा त्याचे डोळे रागाने लाल झालेले होते. शकुन्तलेजवळ परत पोचल्यावर त्याने तिला तिचे नाव विचारले. घाबरतच तिने आपले नाव 'शकुन्तला' असल्याचे सांगितले.

''हे पहा शकुन्तला, तू मला खूप आवडली आहेस. राजकुमारी मला कशी वाटली, हे तू मला विचारू नकोस. माझ्या ठरलेल्या लग्नाच्या मुहूर्तावर तू माझ्याशी लग्न करशील? तू तर एकाद्या गंधर्वकन्येसारखी सुन्दर दिसते आहेस.'' युवराज शकुन्तलेला म्हणाला.

युवराजाची मागणी ऐकून शकुन्तला अवाकच झाली. आपला परिचय देअून ती



म्हणाली, ''कोणत्याही दृष्टीने मी आपणायोग्य नाहीय.''

''तुझ्या या नकारामुळेच तू किती सद्गुणी अन् सुशील आहेत हे कळून येतंय मला! आता तर मी पक्का निश्चय केलाय की, विवाह करीन, तर तुझ्याशीच!'' राजकुमार दृढनिश्चयाने म्हणाला.

ही गोष्ट काही क्षणातच अंतःपुरापर्यन्त पोचली. आपल्या मुलीने आपल्या प्रेमाबाबत आपणाजवळ काहीही न सांगितल्याचे राज-दम्पतीला फार दुःख वाटले. आपले कर्तव्य जाणून त्यांनी त्याच मुहूर्तावर तिचा विवाह शिल्पकाराशी अन् युवराजाचा विवाह शकुन्तलेशी लावून दिला.

राजाने शकुन्तलेवर खूश होऊन तिला म्हटले, "तू माझ्या मुलीला वाचवलंस. नाहीतर कुणास ठाऊक, ती काय करून बसली असती! बोल, काय देऊ मी तुला?"

"महाराज, लग्नाचं सामान ज्या प्रांगणात पडलेलं आहे, त्यात माझी तीन पोती आहेत. त्यातलं फक्त एकच मला घेऊ द्यावं. दुसरं काहीही नको मला." शकुन्तलेने आपली इच्छा व्यक्त केली.

तिची इच्छा ऐकून सर्वांना मोठे आश्चर्य वाटले. राजाने तिला हवं ते पोतं घ्यायची परवानगी दिली.

बुटकी राक्षसी असलेलं शकुन्तलेने मागितलेले पोते रथात ठेवले गेले. जाताना वाटेत तिचा निवास असलेले झाड दिसताच शकुन्तलेने रथ थांबवायला सांगितले. ती पोत्याकडे पहात म्हणाली, "युवराणी, तुझं निवासस्थळ आलेलं आहे. बाहेर ये पोत्यातून. आता आपल्याला कसलाच धोका नाहीय."

पोत्यातून बाहेर आलेली बुटकी राक्षसी पाहून राजकुमार आश्चर्यचकित झाला! त्याने विचारले, "तुझं नाव 'युवराणी' आहे?"

"हो." असे म्हणत राक्षसीने मान हलवली, अन् एकाच उडीत ती झाडाच्या फांदीवर जाऊन बसली.

घटना खरी तर अशी घडली होती. - रात्रीच्या अंधारात राजकुमाराने जेंव्हा दोनदा 'युवराणी, युवराणी' अशी हाक मारली होती, तेंव्हा ही राक्षसी त्याच्यासमोर प्रकट झाली होती.

तिला पाहून 'आपण फसवले गेलोय' असे राजकुमाराला वाटले. त्याला वाटले की इथली राजकन्या दिवसा मनुष्यरूपात, अन् रात्री राक्षसरूपात वावरत असावी. या कल्पनेने तो अतिशय रागवला, अन् म्हणूनच त्याने शकुन्तलेशी विवाह करायचा निश्चय केला.

जे घडले, ते सारे त्याने शकुन्तलेला सांगितले. तो पुढे म्हणाला, "या बुटक्या राक्षसीच्या कृपेनंच आपण विवाह-बंधनात बांधले गेलो. या पुण्यकृत्यामुळे तिला पुढला जन्म नक्कीच राजकुमारीचा मिळेल." अन् तो मोठ्या खुशीने हसू लागला.






(ट्रॉय शहरात घेण्यात येणाऱ्या विविध स्पर्धांमध्ये भाग घेऊन मोहन विजयी झाला. नंतर राजाला कळले की हा मोहन दुसरातिसरा कोणी नसून ज्याच्या स्मरणासाठी, त्याच्या वाढदिवशी आपण या स्पर्धा आयोजित करतो, तो खुद्द आपलाच मुलगा आहे. भुवनसुंदरी मिळवण्यासाठी मोहन रोज कामिनीची पूजा करत असे. नंतर त्याला स्पार्टाला जावे लागेल, अशी एक संधी मिळाली. भुवनसुंदरी तेथेच रहात असे. प्रत्यक्षात तो भुवनसुंदरीच्या पतीबरोबर त्याच नावेतून स्पार्टाला गेला, अन् त्याचाच अतिथि बनून त्याच्या घरात राहिला. तेथून भुवनसुंदरीचा पती - प्रताप - काही महत्वाच्या कामासाठी दुसऱ्या राज्यात गेला असता, भुवनसुंदरीशी संगनमत करून तिला घेऊन तो ट्रॉयला निघून गेला, अन् त्याने तिच्याशी विवाहही करून घेतला. अर्थात तिचेही त्याच्यावर प्रेम होते. नंतर ग्रीक दूतांनी 'भुवनसुंदरीला परत पाठवण्याबद्दल' प्रस्ताव मांडला परन्तु ट्रॉय राजाने नकार दिला.) - यानन्तर -

भुवनसुंदरीला परत आणायचा प्रयत्न झाल्यावर प्रतापने सर्व ग्रीक राजांना ही बातमी कळवून निरोप दिला की, "भुवनसुंदरीने स्वयंवरात मला पति म्हणून निवडले, तेंव्हा तुम्ही सर्वांनी शपथ घेतली होती की, आमच्यावर कोणतेही संकट कोसळले, तर तुम्ही मदत कराल. आता ती वेळ आली आहे. तुम्ही सर्वजण आपापली सैन्ये आणि इतर मदत घेऊन हजर व्हा. जेवढे अधिक सैन्य आणता येईल तेवढे आणा. आपल्या संग्रहात असलेली सर्व शस्त्रास्त्रे घेऊन या. जितक्या लवकर येता येईल तितक्या लवकर या." तो इतकेच करून थांबला नाही, तर स्वतःच संपूर्ण ग्रीस देश हिंडून व्यक्तिशः तो सर्वांना भेटला. त्याने सर्वांना पाचारण केले - "यावेळी मला आपल्या मदतीची अत्यंत आवश्यकता आहे. आपण ताबडतोब आपल्या सर्व लवाजम्यासह मला मदत करण्यासाठी चलावे."



प्रताप व त्याचा सार्वभौम वर्धन हे दोघेही इथाकाचा राजा रूपधर याच्याकडे जाऊन त्याला भेटले. या युद्धात भाग न घेण्याचे रूपधरने अगोदरच ठरवून ठेवले होते. त्या निर्णयामागे एक प्रबळ कारणही होते. ते म्हणजे - आकाशवाणीद्वारा अशी घोषणा झालेली होती की, 'तो युद्धाला गेला, तर परत येताना त्याला अनेक संकटे झेलावी लागतील, अन् वीस वर्षे तो मायभूमीत परत येऊ शकणार नाही.'

तेंव्हा या युद्धापासून स्वतःला वाचवण्यासाठी रूपधरने एक कारस्थान रचले. त्याने शेतकऱ्याचा वेष धारण केला, अन् आपण वेडे आहोत असे भासावे म्हणून नांगराच्या एका बाजूला बैल अन् दुसऱ्या बाजूला गाढव जोडून तो शेत नांगरू लागला. अन् नांगर चालू असताना बियाण्याऐवजी शेतात मिठाचे खडे पेरू लागला. आपले छोटे अर्भक हातात घेऊन शेतकरणीच्या वेषात पद्ममुखीही तेथे उभी राहिली. पण या नाटकाचा प्रताप व वर्धन यांच्यावर काहीही उपयोग झाला नाही. त्यांनी रूपधरला ओळखले अन् बळजबरीने पद्ममुखीच्या हातातले बाळ हिसकावून घेऊन त्यांनी ते नांगरापुढे टाकले. रूपधरने ताबडतोब नांगर थांबवला. यावरून असे शाबित झाले की, तो शेतकरीही नव्हे अन् वेडाही नव्हे. त्याला शेवटी युद्धात भाग घ्यावाच लागला.

असे युद्धात भाग घेण्यासाठी अनेक राजे आले. पण खरे म्हणजे अनिच्छेने आलेले ही काहीजण त्यात होते. एका राजपुत्राने तर पन्नास युद्धनौका मदतीसाठी द्यायचे कबूल केले होते. पण प्रत्यक्षात मात्र तो फक्त एकच जहाज घेऊन आला. बाकीच्या एकुणपन्नास खेळण्यातल्यासारख्या मातीच्या नावा बनवून त्याने त्याच मोठ्या जहाजात ठेवल्या होत्या!

ज्योतिषशास्त्रांच्या मदतीने ग्रीकांना समजले होते की, वज्रकाय नावाच्या एका युवकाच्या साह्याशिवाय ट्रॉय नगर जिंकणे आपल्याला शक्य होणार नाही. हा वज्रकाय तटनी नावाच्या स्त्रीचा सातवा पुत्र होता. तटनीची इच्छा होती की आपला हा पुत्र जगातला सर्वश्रेष्ठ योद्धा म्हणून गणला जावा. यासाठी अर्भकावस्थेतच तिने त्याच्या टाचा स्टिक्स नदीच्या पाण्यात बुडवल्या होत्या. यामुळेच मुलाचे शरीर वज्रासारखे मज़बूत बनले होते. तटनीने आपल्या या मुलाला लहानपणापासूनच निरनिराळ्या युद्ध-विद्यात प्रवीण केले. त्याला शूर व धाडशी बनविण्यासाठी ती विश्वातील नामवंत योद्ध्यांच्या कथा ऐकवी.

वज्रकाय बालपणापासूनच शिकार करू लागला. तो खूप वेगाने धावे. धैर्य, साहस या गुणात तो अतुलनीय होता. तो एक अव्वल दर्जाचा संगीतज्ञही होता. अशा या विलक्षण मुलाची लोक तोंड फाटेपर्यन्त स्तुती करत. सहा वर्षांचा असतानाच त्याने एका रानडुकराची शिकार केली होती. हरीण व सांबर यांची शिकार करताना तो त्यांच्याइतक्याच वेगाने धावून सहजपणे त्यांना पकडत असे.

या वज्रकायला युद्धात सामिल करून घेण्यासाठी रूपधर, भूधव व नवोद्युत भेटायला गेले. 'आपला मुलगा युद्धाला गेल्यावर सजीव परत येणार नाही' ही गोष्ट वज्रकायच्या आईला-तटिनीला - माहीत होती. त्यामुळे तिने आपल्या मुलाला नारीवेषात सजवले अन् राजाच्या अंतःपुरात दडवले.

वज्रकायला घेऊन जाण्यासाठी आलेल्यांनी तेथील सर्व पुरुष नजरेखालून घातले, पण वज्रकाय सापडला नाही. तेंव्हा रूपधरला



शंका आली, की तो बहुधा स्त्रीवेषात कुठेतरी लपून बसलेला आहे. त्याला बाहेर काढण्यासाठी त्याने एक कारस्थान रचले. त्याने अंतःपुरातील स्त्रियांना मूल्यवान वस्तु भेटीदाखल देण्याचे ठरवले. त्या वस्तूं मधे स्त्रियांचे पोशाख, दागिने अन् साजशृंगाराचे साहित्य होतेच; पण शिवाय त्यात एक ढाल व तलवारही ठेवली. या सर्व वस्तु एका जागी ठेवून अंतःपुरातील स्त्रियांना त्याने निरोप कळवला की प्रत्येकीने आपल्या आवडीची वस्तु त्यातून निवडावी. स्त्रिया जेंव्हा वस्तु पाहू लागल्या, तेंव्हाच रूपधरच्या आज्ञेने बाहेर रणभेरी वाजवण्यात आल्या. तो आवाज ऐकताच वज्रकायने आपला स्त्रीवेष टाकून

पटकन तिथली ढाल-तलवार अुचलली, त्याबरोबर त्याला ओळखून रूपधरने त्याला पकडले. वज्रकायने मग युद्धात भाग घ्यायचे कबूल केले.

ग्रीसच्या नौका ऑलिसजवळ तयारीत अुभ्या होत्या. क्रीटहून आलेले दूत आपला राजा प्रभु याचा संदेश घेअून आले की, 'सम्राट वर्धनबरोबर आपणालाही सेनाध्यक्ष बनवले, तर आपण आपली शंभर जहाजे घेअून युद्धात मदत करायला तयार आहोत.' राजा प्रभु हाही भुवनसुंदरीच्या स्वयंवरासाठी गेलेल्या राजुकमारांपैकी एक असून दिसायला तो अत्यन्त रुबाबदार होता. त्याची अट मान्य केली गेली अन् तो शंभर जहाजे घेअून निघाला. ही शंभर जहाजे सैनिक व अस्त्र-शस्त्रांनी भरलेली होती. निधड्या छातीचे सैनिक आपल्या पराक्रमाची शर्थ करण्यासाठी आसुसलेले होते.

युद्धासाठी तयार असणाऱ्या ग्रीक पक्षाच्या लोकांची एकूण परिस्थिती अशा प्रकारची होती.

सैनिक-दलाचा सर्वसेनानी होता सम्राट वर्धन. त्याच्या हाताखालील अुपनायक होते रूपधर, प्रबोध व देवमय. जहाजांवर वज्रकायचे अधिपत्य असून त्याच्या हाताखाली अुपनायक म्हणून भूधव, रक्तवर्ण व पीलूसचा राजा नवोद्युत हे होते. हा नवोद्युत वृद्ध असूनही त्याचे युद्धकौशल्य अजोड असे होते. तो विवेकी असून त्याने तीन पिढ्यांपर्यन्त आपले शासन सुचारूपणे चालवले होते. हा पितामह वृद्धावस्थेतही रणरंगात प्रचंड होता. सम्राट त्याचा सल्ला घेतल्यावाचून एकही पाअूल पुढे टाकत नसे. युद्धासंबंधीच्या अडचणींबाबत रूपधर व नवद्युत यांचा सल्ला अगदी एकसारखा असे, कारण समस्या सोडवण्याबाबत त्यांच्या विचारात तंतोतंत साम्य असे.

भूधव अथिरथींमधे गणला जाई. साहस व बळ यांबाबत वज्रकायनंतर याचेच नाव घेतले जाई. तो देवदेवतांचीही पर्वा करत नसे. आपल्या शक्तीवर त्याचा पूर्ण विश्वास होता. तो जेव्हा युद्धाला निघाला, तेव्हा वडीलधाऱ्यांनी त्याला आशिर्वाद दिला, ''पुत्र! रणांगणात आपला पराक्रम दाखव अन् देवदेवतांच्या आशिर्वादाने विजय प्राप्त कर.'' तेव्हा त्यांचे खंडन करत तो म्हणाला, ''देवांच्या साह्याने तर भित्रे अन् कमजोर लोक विजय मिळवतील. मी तर त्यांच्या साह्यावाचूनच विजय मिळवीन. शत्रूला पूर्णतः नेस्तनाबूत करीन.''

अुपभूधव हा भूधवचा कोणी नातेवाईक नव्हता. तो तलवार चालवण्यात अद्वितीय होता. ग्रीक सैन्यात त्याच्याइतका वेगाने तलवार चालवणारा आणि निशाणबाज दुसरा कोणीही नव्हता. वेगाने धावण्यात त्याच्याबरोबरीचा कोणी असेल, तर तो केवळ वज्रकायच.

देवमयला भुवनसुंदरी फारच आवडली होती. परन्तु तिला मोहनने पळवून नेल्यामुळे त्याच्या मनात मोहनबद्दल फारच राग व सूडभावना होती. तो सूड अुगवण्यासाठीच तो








युद्धात भाग घेत होता.

डिलोसचा राजा मुष्कर याने ग्रीक सेनेसाठी आवश्यक ती खाद्यसामग्री पुरवली. जहाजे निघण्यापूर्वी सम्राट राजाने देवदेवतांना संतुष्ट करण्यासाठी आवश्यक त्या पूजा करून बळीही दिले. जहाजांना योग्य दिशा व मार्ग सांगण्यासाठी कौशक नावाच्या एका ज्योतिषाची नेमणुक झाली. पण खरे तर कौशक समुद्रमार्गाबद्दल अनभिज्ञ होता. त्यामुळे ग्रीक जहाजे प्रत्यक्षात योग्य मार्गदर्शनाशिवायच चालू लागली. त्यामुळे ती ट्रॉय समुद्रकिनाऱ्याऐवजी दक्षिणेकडील मिसियाच्या तटावर पोचली. आपण ट्रॉयलाच पोचलो, असे समजून ग्रीक सेना मिसियावर तुटून पडली व लुटालूट करू लागली. मिसिया राजाला हे कळल्यावर त्याने ग्रीकांवर हल्ला चढवला. फलस्वरूप जे युद्ध झाले, त्यात बरेचसे ग्रीक सैनिक जखमी झाले. वज्रकायने वेळेवर मदत केली नसती, तर ग्रीकांचा पराभव होऊन त्यांचे अत्यन्त नुकसान झाले असते.

यानन्तर एका वर्षाच्या आतच ग्रीक सैन्य ट्रॉयवर हल्ला करण्यासाठी पुन्हा तयार झाले. पण बरेच दिवस हवा अनुकूल नसल्याने ते तसेच अडकून राहिले. शेवटी पुन्हा त्यांनी देवांना बळी वगैरे चढवल्यावर वातावरण अनुकूल बनले. जहाजे निघाली. दीर्घ अंतराच्या प्रवासानन्तर जहाजे प्रथम लेस्पॉस द्वीपाच्या किनारी पोचली. तेथील शासकाने ग्रीक वीरांचे स्वागत केले. हा राजा स्वतः मल्लयुद्धात प्रवीण असल्याने त्याने अतिथींना मल्लयुद्धाचे आव्हान दिले. रूपधरने ग्रीकांचा प्रतिनिधी बनून त्याच्याशी युद्ध केले अन् त्याला अगदी सहजपणे हरवले. या जयामुळे ग्रीक लोक फारच खूश झाले. लेस्पॉस शहर सोडून ते काही दिवसांनी टेनिटॉस किनाऱ्यावर पोचले.

टेनिटॉस व ट्रॉय यांच्यात वीस मैलांचे अन्तर होते. ट्रॉयच्या किल्ल्याच्या तटावर अुभे राहून ते द्वीप दिसू शकत असे. बाकी सर्वांना तिथेच सोडून रूपधर, भुवनसुंदरीचा पती प्रताप व प्रबोध चर्चा करण्यासाठी ट्रॉयला पोचले. तेथे जाऊन ट्रॉय राजाशी चर्चा करण्याचा अुद्देश इतकाच होता की, युद्ध न करता त्यांनी भुवनसुंदरीला आपल्या ताब्यात दिले, तर युद्ध प्रसंग टळेल. परन्तु कोणत्याही परिस्थितीत भुवसुंदरीला परत न करण्याचा ट्रॉयवासीयांचा निश्चय होता. त्यामुळे ग्रीकांची शिष्टाई वाया गेली अन् या राजदूतांना मारून टाकायचे प्रयत्नही केले गेले. ते ज्या घरी पाहुणे म्हणून राहिले होते, त्या घरच्या यजमानाने या हत्याकांडाला विरोध करून स्पष्ट सांगितले की, ''दूतांना मारणे हे नीचकृत्य होय. मी ते घडू देणार नाही.''

शिष्टाई असफल झाल्याने ग्रीक नौका टेनिटॉसहून निघून ट्रॉयच्या किनारी पोचल्या. तेथून ट्रॉयच्या किल्ल्याचा तट दिसत होता. नौका पोचल्याची खबर मिळाल्यावर ट्रॉयचे नागरिक समुद्रकिनारी आले. त्यांनी जहाजांवर मोठमोठे दगड वगैरे फेकून त्यांना परत फिरवायचा प्रयत्न केला; परन्तु काहीही अुपयोग झाला नाही.

पण आता पुन्हा ग्रीकांच्या सम्मिलित सेनेपुढे एक प्रश्न अुभा राहिला. तो असा की – ट्रॉयच्या भूमीवर प्रथम कोणी पाय ठेवायचा ? या प्रश्नाचे मुख्य कारण असे होते की – ज्योतिषाने असे भाकित केले होते की, 'जो कोणी ट्रॉयच्या भूमीवर प्रथम पाऊल ठेवील, त्याचा मृत्यु निश्चित आहे, अन् कोणत्याही परिस्थितीत हा मृत्यु टाळता येणार नाही.' या गोष्टीवर ग्रीकांचा पूर्ण विश्वासही होता. त्यामुळे वज्रकायसारखा योद्धाही खाली अुतरायला भीत होता.

चन्द्रप्रभुने हे साहस केले. नौकेतून अुतरून त्याने जमिनीवर पाय ठेवताच युद्ध सुरू केले. त्याने अनेक शत्रुसैनिकांना मारूनही टाकले. परन्तु वीरसिंहने त्याला ठार केले.

चन्द्रप्रभुनन्तर वज्रकायने जहाजातून अुडी मारली अन् त्याच्याबरोबर त्याची सेनाही खाली अुतरली. वज्रकायने काही ट्रॉय वीरांना यमसदनाला पाठवले. त्यामुळे ट्रॉयचे लोक सैरावैरा धावत नगराकडे गेले.

या अवधीत ग्रीक सैनिक अुत्साहाने आरडाओरडा करत जहाजावरून अुड्या मारून किनाऱ्यावर अुतरले.

क्रमशः



## चान्दोबाच्या बातम्या

### अफलातून व्यक्ति

साधारणत: नारळ झाडावरून अुतरवल्यानंतर त्याच्यावरची शेंडी काढण्यासाठी कोयत्याची किंवा एकाद्या अणकुचीदार हत्याराची गरज असते. या हत्याराने वरील भागावर चारीकडे जरा खोलवर अशा रेषा काढल्या जातात, अन् नंतरच सगळी शेंडी काढली जाते. यासाठी दीर्घ प्रयत्न अन् वेळ यांची अन् थोड्याशा कौशल्याची गरज असते. परन्तु केरळमधील कालिकत येथील जोस नावाचा एक तरुण हे काम आपल्या दातांनी केवळ वीस सेकन्दात करू शकतो. नारळ जास्त वाळलेला असेल तर तीस सेकन्द लागतात. ३२ वयाचा हा जोस 'अॅडव्हर्टायझिंग' फिल्मस्‌चा निर्माता आहे. आपले नाव 'गिनीज बुक ऑफ वर्ल्ड रेकॉर्ड' मधे यावे, यासाठी त्याचे प्रयत्न चालू आहेत.



### आजची कामधेनु

हरिद्वारच्या एका आश्रमात 'श्यामा' नावाची एक गाय आहे. तेथील लोक तिला 'कामधेनु' म्हणतात. कारण गेली बरीच वर्षे ती सतत दूध देत आली आहे. १९८० साली ती जेंव्हा प्रथम व्यायली, तेंव्हा ती ३५ - ४० लिटर दूध देत असे. १९८२ आणि १९८४ मधे तिने आणखी दोन वासरांना जन्म दिला. त्यानंतर तिला पुन्हा कधीही वासरू झाले नाही. पण ती दूध मात्र सतत देत आहे. आता ती सतरा वर्षे वयाची आहे, परन्तु म्हातारी झाल्याचे कोणतेही लक्षण तिच्यात आढळत नाही. अजूनही ती ६ ते १४ लिटर दूध रोज देते. तिचे पहिले वासरू आता १३ वर्षांचे आहे; अन् त्याचे तर दातही पडू लागले आहेत. आता ते म्हातारे दिसू लागले आहे.



### खूप लांबच लांब मोटरकार

जगातली सर्वात अधिक लांबीची मोटरकार लंडनच्या 'रॉफ म्युझियम' मधे आहे. '१९८२ कॅडलॉक' नावाच्या या कारची लांबी २२ मीटर आहे. तिची अुंची पाच मजल्यांइतकी आहे, अन् वजन आहे सात टन! सर्वसामान्य रस्त्यांवरून ती जाअू लागली, तर रहदारीत अडथळा निर्माण होईल, म्हणून हल्ली तिचा अुपयोग केला जात नाही. जागेच्या अभावी म्युझियमचे अधिकारी ही कार विकू इच्छित आहेत. म्युझियममधेच ती ठेवायची म्हटली, तर ते जागाही वाढवू शकत नाहीत. कोण जाणे कोण खरेदी करील ती!



## शत्रु आणि शत्रुत्व

दृढनिश्चयी विक्रमादित्य पुन्हा झाडाजवळ गेला. प्रेत खांद्यावर टाकून तो नेहमी प्रमाणे स्मशानाची वाट चालू लागला. तेंव्हा प्रेतातील वेताळ बोलू लागला- "राजा, प्रत्येक माणूस आपले ध्येय गाठण्यासाठी खूप परिश्रम करतो. सर्व अडचणींवर मात करून हाती घेतलेले कार्य तडीस नेतो. पण प्रत्यक्ष यश प्राप्त केल्यावर मात्र तो ढिला पडतो, परिश्रमाचं फळ पदरात पडल्यावर त्याचा सदुपयोग करण्यासाठी सुद्धा चिकाटीने मेहनत करावी लागते. असे झाले नाही तर त्याचे यशस्वी होणे व्यर्थ आहे, केलेले सर्व परिश्रम मातीमोल आहेत. उदाहरणादाखल मी तुला विवेक नावाच्या तरुणाची गोष्ट सांगतो." वेताळाने सुरुवात केली.

विवेक आपले वडील मोचन यांचा एकुलता एक मुलगा होता. त्याचे आपल्या पित्यावर अतिशय प्रेम होते.

मोचन पन्नास वर्षांचा असेल. एकाएकी त्याला हृद्रोगाने पछाडले. वैद्याने बारकाईने

## वेताळ कथा



निरीक्षण करून सल्ला दिला - ''आता तुम्हाला विश्रांतीची आवश्यकता आहे. सांसारिक बंधनातून आता मुक्त झालेले बरे!''

वैद्याच्या सल्ल्यानुसार विवेकने सर्व जबाबदाऱ्या आपल्या शिरावर घेतल्या. एक आठवड्या भरात शेजारच्या गावातून जगन आला व त्याला भेटला. तो विवेकला म्हणाला - ''मी तुझ्या चुलत्यांचा मुलगा आहे. तुझ्या वडिलांनी माझ्या वडिलांची संपत्ति हडप केली आहे. म्हणून मला मदत करणं हे तुझं कर्तव्य आहे.''

विवेकला या बोलण्याचं मोठं आश्चर्य वाटलं. तो म्हणाला - ''माझे वडील तर मोठे परोपकारी आहेत. चांगली कामं करण्यात त्यांनी आपलं आयुष्य वेचलं. तुला मी अवश्य मदत करीन. पण माझ्या वडिलांनी तुझ्या वडिलांना फसवलं हे मात्र शंभर टक्के खोटं! आणि ते तू कबूल कर.''

जगन रागवून तावातावाने म्हणाला - ''खरं काय नि खोटं काय याचा निर्णय आपण तुझ्या वडिलांसमोरच करू. चल आपण दोघे ही त्यांच्याशी बोलू.''

''माझे वडील हृदय-रोगाने आजारी आहेत. अशा वेळी त्यांच्याशी या गोष्टी बोलण्याने त्यांची मानसिक शांति नष्ट होईल. मी वडिलांच्या सर्व भावांना जाऊन भेटतो आणि तुझ्या आरोपाची शहानिशा करतो. मग सत्य काय आहे ते सर्वांना कळेलच. तोपर्यंत तू त्यांना भेटू नकोस.'' असे म्हणून विवेक आपल्या काकांकडे जायला निघाला.

जगन मोठा दुष्ट माणूस होता. विवेक जेंव्हा जगनच्या वडिलांकडे जाऊन सर्व सांगू लागला, तेंव्हा त्यांना फार वाईट वाटलं. जगनचा आरोप खोटा आहे आणि आपला भाऊ फार चांगला माणूस आहे असे त्यांनी विवेकला लिहून दिले.

दुसऱ्या दोन चुलत्यांनी ही असेच लिहून दिले. सर्व लेखी पुरावे घेऊन विवेक मोठ्या उत्साहाने प्रतापपुरला परत आला. पोचल्यावर त्याला समजले की मधल्या काळात एक दुःखपूर्ण घटना घडलेली आहे. त्याला आपला शोकावेग आवरेना.

विवेक चुलत्यांकडे रवाना झाल्यावर जगन त्याचे वडील मोचन यांना भेटला. त्याने त्यांच्यावर अनेक खोटेनाटे आरोप केले. मोचनला हे सर्व असह्य झाले आणि तत्काळ त्यांचे प्राणोत्क्रमण झाले.

असं काही होईल असं जगनला स्वप्नात ही वाटलं नव्हतं. विवेकची क्षमा मागण्याचा त्याने निश्चय केला. परंतु जगनला पाहताच विवेक रागाने लाल बुंद होऊन म्हणाला - ''चालता हो, तुझं तोंड मला पुन्हा दाखवू नकोस.'' त्याने जगनला घराबाहेर हाकलून दिले.

वडिलांच्या मृत्यूच्या आघातामुळे विवेक फार दुःखी-कष्टी झाला. वर्ष भर वडिलांच्या आठवणीने तो खंगत राहिला. शेवटी आपल्या आईच्या आग्रहाखातर तो लग्न करायला तयार झाला. मुलगी त्याला आवडली. मुलीचे वडील त्याला म्हणाले - ''बेटा, तुझा चुलत भाऊ जगन याने तुझ्या उत्तम वंशाबाबत मला सगळं सांगितलं आहे. मी आपली मुलगी त्यालाच देऊ इच्छित होतो. पण तो म्हणाला - ''मी तुमच्या मुलीसाठी योग्य वर नाही, आपण विवेकला आपला जावई बनवा. त्यात तुमच्या मुलीच्या जीवनाचे सार्थक होईल.''

जगन मध्ये आता बदल झालेला आहे आणि त्याने आपला दुष्ट स्वभाव सोडला आहे हे पाहून विवेकच्या आईला आनंद झाला, पण विवेक कडव्या स्वरात म्हणाला - ''तो आपला शत्रु आहे. मुलीच्या वडिलांशी तो आपल्याबाबत इतकं चांगलं काही बोलला, यात जरूर काही तरी रहस्य आहे. आई, मी या मुलीशी मुळिच लग्न करणार नाही.''

काही दिवसांनंतर जगनचा ज्या परिवाराशी



अजिबात संबंध नाही अशा कुटुंबातील एक मुलगी विवेकने पसंत केली. लग्नाच्या वेळी जगनला बोलविण्यात आले नाही. आणखी काही दिवसांनी जगनचे ही लग्न ठरले. जगन स्वतः आला आणि त्याने विवेकला निमंत्रण दिले. तरी पण विवेक या लग्नाला गेला नाही.

विवेकचे लग्न होऊन एक वर्ष झाले असेल. त्याच्या शेताच्या जवळची दहा एकर जमीन विकायला निघाली. जवळची जमीन आणि किंमत बेताची असल्यामुळे विवेकला हा सौदा करावासा वाटला. पण एक हजार अशर्फ्या कमी पडू लागल्या. तो कर्ज काढण्याचा विचार करू लागला, तितक्यात शहरातून रंगनाथ नावाचा एक व्यापारी आला. विवेकजवळ जे



धान्य होते, ते दुप्पट दाम देऊन खरीदायला तो तयार झाला. तो म्हणाला - ''तुझे हे धान्य खास प्रकारचे आहे. याची किंमत एकाएकी वाढली आहे. बाजारात या धान्याला खूपच मागणी आहे.''

आता कर्ज काढण्याची आवश्यकता नाही म्हणून विवेक खुश झाला. तो रंगनाथला म्हणाला - ''मला आश्चर्य वाटतंय की माझ्या कडील खास धान्याची खबर तुमच्यापर्यंत कशी पोचली?''

''आपला चुलत भाऊ जगनने मला ही माहिती पुरवली. आपण फार सत्यप्रेमी आहात असे ही तो सांगत होता. धान्याच्या गुण-वत्तेबाबत मुळिच शंका नको. वजन करताना ही काही लबाडी होणार नाही.'' रंगनाथ उत्तरला.

बस, जगनचं नाव घेताच विवेकचं डोकं फिरलं. बायकोने खूप समजावले, तरी विवेकने रंगनाथला आपले धान्य विकले नाही. त्याच्या बायकोने समजावण्याचा प्रयत्न केला - ''भावोजींनी जे केलं त्याबद्दल त्यांना आता पश्चात्ताप होतोय. झालेली चूक सुधारायचा ते प्रयत्न करीत आहेत. आपली विवेक बुद्धि काम करीनाशी झाली आहे. यामुळे आपलेच नुकसान होत आहे.''

जगन माझा शत्रु आहे. एकदाच मी त्याच्यावर विश्वास ठेवला आणि त्यामुळे मला आपल्या पित्याला मुकावे लागले. त्याच्यावर विश्वास ठेवला की आपलं नुकसान निश्चित. अविश्वासाने जे नुकसान होईल ते फार थोडे होईल. म्हणून त्याच्यावर विश्वास न ठेवलेलाच बरा.'' विवेकने आपली बाजू मांडली.

तसा विवेक प्रतापपुरात चांगलं नाव कमाऊन होता, पण जगनमुळे त्याची बदनामी होत होती. शत्रुत्वामुळे जगन करीत असलेली चांगली मदत ही विवेक स्वीकारीत नाही असे सर्व लोक म्हणू लागले.

विवेकला सावधान करण्यासाठी काही मित्रांनी उपदेश केला - ''तुझं नुकसान व्हावं या उद्देशानेच जगन आपल्या योजना बनवीत आहे. तुझा जिथे फायदा होईल, तिथे तिथे जाऊन तो आपलं नाव घुसवतो. आणि त्याचं नाव ऐकताच तू भडकतोस, तेव्हा तू आपली



शत्रुता विसरून जाऊन विवेकाने काम घ्यावस हे बरं नाही का?''

यावर विवेक हसून गप्प बसला. काही चतुर माणसे जगनच्या नावाचा उल्लेख करून आपला स्वार्थ साधू लागले.

एकदा सावंत आणि माधव नारळ खरीदण्यासाठी आपापसात स्पर्धा करू लागले. माधव प्रथम विवेकला भेटला आणि त्याला म्हणाला - ''जगनने मला एक उपाय सुचवलाय. तो म्हणतोय की येथील सर्व नारळ तोच खरेदी करील, मला खरेदी करू देणार नाही.''

त्या दिवशी विवेकने सर्व नारळ सावंतला न विकता माधवलाच विकले. कुठं तरी पाणी मुरतंय हे विवेकच्या बायकोने ताडले. ती नवऱ्याला म्हणाली - ''मला वाटतंय की जगनचं नाव घेऊन काही लोक आपल्याला धोका देत आहेत. आपल्या शत्रुत्वाचा ते फायदा घेत आहेत. असल्या फसवणाऱ्या लोकांवर विश्वासून आपलं नुकसान होतंय. आपण जगनवर विश्वास ठेवला तर आपलं नुसकान कमी होईल आणि चांगलं नाव ही मिळेल. आपल्या मित्रांपेक्षा जगन अधिक चांगला आहे असं मला तरी वाटतंय!''

विवेकला बायकोचं म्हणणं पटलं नाही. नाराज होऊन तो म्हणाला - ''कोण आपल्याला धोका देतंय आणि कोण नाही हे मला चांगलं समजतं. आपलं नुकसान होतंय की नाही हे पाहूनच मी आपला निर्णय घेतो. दिवसें दिवस



आपलं उत्पन्न वाढतच आहे, ते कमी तर होत नाहीय. हेच माझी बुद्धिमत्ता सिद्ध करीत नाही का? तू का उगाच घाबरतेस? आता राहिली जगनची गोष्ट. ज्याच्यामुळे माझ्या पित्याचा देहान्त झाला, त्याच्यावर मी या जन्मात विश्वास ठेवणार नाही, समजलीस? ज्याने जाणून-बुजून माझ्या वडिलांचा अंत केला, त्याच्याशी मैत्री करणं केवळ अशक्य. मग माझी बदनामी झाली तरी बेहत्तर. जिवात जीव असेपर्यंत मी त्याला शत्रूच मानणार आणि त्यातच मला संतोष वाटतो. इथून पुढं त्याचं कधी नाव नको घेऊस माझ्या पुढं!'' यानंतर विवेकच्या बायकोने चुकून कधी जगनचे नाव आपल्या तोंडावाटे उच्चारले नाही.



काही दिवसांनी एक मोठी विचित्र घटना घडली.

काही कामासाठी जगन प्रतापपुरला आला होता. अंधार पडल्यावर तो जेव्हा एका गल्लीतून जात होता, तेव्हा एक विषारी साप त्याला चावला. आसपासचे लोक जमा झाले. काही धावत-पळत मांत्रिकाकडे गेले, तर काही वैद्याकडे. घाबरून गेल्यामुळे काय करावं हे सुचेनासे झालेले काही जण तिथेच उभे राहिले.

त्याच वेळी विवेक तिकडून चालला होता. सर्पदंशाची वार्ता समजताच तो ओरडला - ''अरे नुसते बघत काय उभे राहिला आहात? वैद्य येण्यापूर्वी विष तर बाहेर काढले पाहिजे.'' तो तत्काल जगनपाशी जाऊन बसला. ज्या पायाला साप चावला होता, तो पाय त्याने वर उचलला. आपल्या तोंडाने विष शोषून त्याने ते थुंकून टाकले. असं चार वेळा केल्यावर जगन शुद्धीवर आला. इतक्यात मांत्रिक व वैद्य ही आले. दोघांना ते आपल्या घरी घेऊन आले, आणि त्यांच्यावर औषधोपचार केला.

या विचित्र घटनेबाबत गावात जो तो बोलू लागला. काही लोक म्हणाले - '' विवेकला आपली चूक कळलीय असं वाटतं. आपली चूक सुधारण्याच्या संधीची तो जणू काही वाटच पहात होता.''

दुसरे काही लोक म्हणाले - ''संरक्षणाचा उपाय माहीत असून त्याचा उपयोग न करणं हे हत्या करण्यासारखंच होच. जगन मेल्यावर त्याच्या हत्येचं पाप आपणास लागू नये, अशा भीतीने विवेकने त्याला जिवंत केले.''

काही वेळाने विवेक आणि जगन दोघे ही शुद्धीवर आले. वैद्याने आश्वासन दिले - ''आता तुम्ही दोघे ही सुरक्षित आहात. काळजी करण्याचे कारण नाही.''

जगनला जेव्हा सर्व घटना समजली, तेव्हा तो विवेकला म्हणाला - ''तू सामान्य माणूस नाहीस, महात्मा आहेस! कट्टर शत्रूचे प्राण वाचविण्यासाठी तू आपले प्राण धोक्यात घातलेस. सामान्य माणूस असले काम करणार नाही.'' हात जोडून जगनने विवेकला नमस्कार केला.

''तू माझा कट्टर शत्रु आहेस. तुझी प्रशंसा आणि नमस्कार यावर माझा मुळिच विश्वास नाही.'' असे म्हणत विवेक तेथून निघून गेला.

वेताळाने विक्रमादित्याला एवढी गोष्ट ऐकवली आणि मग म्हणाला - ''राजा, विवेकच्या पित्याचा मृत्यु जगनमुळेच झाला. यामुळे विवेकला फार दुःख झाले. त्याची मानसिक स्थिति विचित्र झाली. तो फार अशांत झाला. यामुळे त्याने जगनला आपला शत्रु मानले असेल तर त्यात आश्चर्य करण्या-सारखे काही नाही. परंतु अशा कट्टर शत्रूला विषारी साप चावला, तेव्हा ते विष विवेकने आपल्या तोंडाने शोषून घेतले हे योग्य नव्हे. हे विवेकपूर्ण काम नव्हे. असे करणे म्हणजे अविवेकच, नाही तर काय? त्याला जे करता आलं नाही, त्याला जो सूड घेता आला नाही, ते काम विषारी सापाने केले. यावेळी विवेकला आनन्द व्हायला पाहिजे होता. परमेश्वराने सर्प बनून जगनला शिक्षा दिली असं त्याला वाटायला हवं होतं. या माझ्या शंकेचं समाधान कर. माहीत असून ही तू गप्प बसलास तर तुझं डोकं धडावर राहणार नाही हे तू जाणतोसच.''

शंकेचे निरसन करीत राजा विक्रमादित्य म्हणाला - ''विवेक स्वभावाचा दयाळु आहे. मानवमात्राचे कल्याण व्हावे अशी त्याची इच्छा आहे. याच बरोबर तो व्यवहारकुशल व लोकज्ञानी आहे. म्हणूनच त्याने आपल्या शत्रूवर विश्वास ठेवला नाही. नीट विचार केला तर आपल्या लक्षात येईल की शत्रु आणि शत्रुत्व या दोन निरनिराळ्या मानसिक प्रवृत्ति आहेत. एकदा जगनमुळे त्याचे नुकसान झाले. तेव्हांपासून त्याने स्वार्थाची ही पर्वा न करता जगनला आपला शत्रूच मानले. तो त्याच्यापासून दूरच राहिला. शत्रूचं नुकसान होण्याची संधी साधारणपणे लोक शोधत असतात. विवेकचा शत्रुत्वावर विश्वास नाही, म्हणून जगनबद्दल त्याच्या मनात द्वेष मुळिच नाही. म्हणूनच जेव्हा जगनचा जीव धोक्यात होता तेव्हा आपल्या प्राणाची पर्वा न करता त्याला वाचविण्याचा विवेकने प्रयत्न केला.''

अशा रीतीने राजाचा मौन-भंग करण्यात वेताळ यशस्वी झाला. आणि लगेचच तो प्रेतासह झाडावर जाऊन बसला.

**आधार - किरण साथींची एक कथा**



# दगडांच्या ढिगावरचा कंदील

**ज**मीनदार केतनवर्मा काही जरूरी कामासाठी हेलापुरीहून विशालनगरकडे जात होता. मध्यरात्रीची वेळ असली, तरी आपले समाजातले शुच्च स्थान तो विसरू शकत नव्हता. म्हणून तो आपल्या बग्गीतूनच निघाला होता. बग्गी जंगलातल्या मार्गाने चालू लागली. चहूकडे अंधारच अंधार होता. सईस मोठ्या सावधपणे बग्गी हाकत होता.

अचानक रस्त्यात मधेच असलेल्या दगडांच्या मोठ्या ढिगाला धडक देता देता थांबला. अगदी शेवटच्या क्षणी ढिगाच्या अगदी वर ठेवलेल्या कंदिलाच्या शुजेडात सईसाला तो ढीग दिसला अन् त्याने लगाम खेचला. तसे घडले नसते तर ढिगाशी टक्कर होऊन बग्गी अुलटली असती.

जमीनदार बग्गीतून अुतरला. जवळच झाडाखाली अंगाचे मुटकुळे करून झोपलेला एक म्हातारा त्या आवाजाने जागा होअून, अुठून जमीनदाराजवळ आला. जमीनदाराला त्याने नमस्कार केला.

जमीनदाराने त्याला विचारले, "तूच त्या ढिगावर कंदील ठेवला आहेस का ?"

"होय महाराज, मीच ठेवलाय. गडद अंधार आहे ना, म्हणून ठेवलाय." म्हातारा अुत्तरला.

"तुझ्यामुळेच वाचलो बघ आज आम्ही अपघातातून! हे घे बक्षिस." असे म्हणत जमीनदाराने काही रुपये म्हाताऱ्याच्या हातावर ठेवले.

रुपये मिळाल्याने म्हातारा फारच खूश झाला. तो तेथून जाअू लागला, तेंव्हा मनात काही शंका येअून जमीनदाराने त्याला विचारले, "पण रस्त्याच्या मधेच हा दगडांचा ढीग कसा काय आला?"

"महाराज, हे ही काम मीच तर केलं. कंदील खाली ठेवला, तर नीट दिसणार नाही ना! मी अगोदर हा ढीग बनवला अन येणाऱ्या जाणाऱ्यांना दिसावा, म्हणून वर कंदील ठेवला." म्हातारा आत्मविश्वासाने म्हणाला.



## चान्दोबा पुरवणी - ७४

## भारताची वृक्षसंपदा

### सुपारीचे झाड

**वि**डा बनवताना पानात सुपारी अन् चुना वापरतात हे तर सर्वांना ठाअुकच आहे. सामान्यतः सुपारीवाचून विडा बनतच नाही.

सुपारीची झाडे खूप अुंच असतात. व्यापाराच्या दृष्टीने ही झाडे मूल्यवान असतात. यातून मिळणाऱ्या 'टॅनिन' नावाच्या रासायनिक पदार्थापासून लाल व काळी शाईही बनवली जाते. झाडाच्या बिया तळून चूर्ण केले जाते अन् ते दात घासण्यासाठी अुपयोगात आणले जाते.

जाडीला अगदी कमी असणारे खोड असलेले हे झाड १८ ते २० फूटाइतके अुंच वाढते. दिसायला झाड मोठे सुन्दर दिसते. याला फान्द्या नसतात. सुपारीचे गुच्छ तोडण्यासाठी झाडावर चढणारा माणूस नंतर खाली अुतरताना झाडाला जरासा झोका देअून दुसऱ्या शेजारच्या झाडावरून सुपारी अुतरवतात. सगळ्या झाडांची सुपारी अुतरवल्यावर मगच शेवटच्या झाडावरून खाली अुतरतात. अशा तऱ्हेने या झाडावरून त्या झाडावर जाताना ते 'टार्झन' सारखे वाटतात. हे दृश्य पहात रहावासे वाटते. अर्थात सुपारीची झाडे सहजपणे वाकवता येतात, म्हणूनच हे शक्य होते.

साधारणतः झाड पाच वर्षांचे झाल्यावरच त्यावर सुपारी धरू लागते. एका वर्षात हे झाड जवळ जवळ तीनशे फळे देते. सुपारीचे फळ कच्चे असताना त्याचा रंग हिरवा असतो व ते पक्के होअू लागले की त्याचा रंग नारिंगी होअू लागतो अन् पूर्ण पिकले की ते लाल होते. साधारणतः कोंबडीच्या अंड्याएवढ्या या फळात रेषा असतात. अन् त्याच्या आत सुपारी हे मोठेसे बीज असते. सुपारीच्या झाडांना भरपूर पावसाची आवश्यकता असते. केरळ, प. बंगाल व आसाममधे ही झाडे अधिक प्रमाणात आढळतात, कारण तेथे खूप पाअूस पडतो.



झाडाच्या पानांच्या खाली फुलांचे गुच्छ येतात. त्यामुळे त्यांचे आपोआपच रक्षण होते. पाने शेवटाकडे दुभागल्यासारखी असतात. या झावळ्या झोपड्यांचे छप्पर बनवायला अुपयोगात आणल्या जातात, आणि झाडाचे खोड बांबासारखे अुपयोगी पडते.

वृक्षशास्त्रात सुपारीच्या झाडाचे नाव 'एरिका कॅटेचुलिन' असे आहे. सुपारीच्या झाडाला हिन्दी, मराठी, गुजरातीत 'सुपारी' असे म्हणतात. बंगालीत 'गुवा', तमिळमधे 'कुमुगु', मल्याळम् मधे 'कवंगु' व तेलगूत 'पोक' म्हणतात.



# वेदव्यास

ऋग्वेद, यजुर्वेद, अथर्ववेद व सामवेद हे जगातले अतिप्राचीन असे वेदग्रन्थ होत. निश्चित आधार अुपलब्ध नसल्यामुळे हे केंव्हा व कोणी रचले याबद्दल निश्चितपणे काही सांगता येत नाही. परन्तु पंडितांच्या मताप्रमाणे ते सहा हजार वर्षांपूर्वी रचले गेले असावेत. असे मानले जाते की, ऋषिगण ध्यानमग्न झाले की त्या अवस्थेत परमेश्वराद्वारे हे वेदमन्त्र त्यांच्या अंतःकरणात प्रस्फुटित होत. म्हणजेच याचा अर्थ असा की वेदमन्त्र हे मानवी बुद्धीची अुपज नसून भगवन्ताच्या प्रेरणेने आविर्भूत झाले आहेत, ते अपौरुषेय आहेत.

सर्वचे सर्व वेदमन्त्र प्रथम एकत्रित होते. नंतर ते चार भागात विभाजित करायचे काम वेदव्यासांनी केले, अन् त्यांना चार निरनिराळी नावेही प्रदान केली. तरी यानंतरही ते लिपिबद्ध केले गेले नाहीत. वेदमन्त्रांचे पठन गुरुच्या मुखातून अगदी लक्षपूर्वक ऐकून शिष्य ते मुखोद्गत करीत. अन् अशीच परंपरा पुढे चालू राही. पुढे बऱ्याच काळाने वेद लिपिबद्ध झाले. महाभारताच्या रचनेद्वारा वेदव्यासांनी भारतीय संस्कृति सुसंपन्न केली. आपल्या देशातल्या रामायणाप्रमाणेच महाभारत हाही सुप्रसिद्ध इतिहास ग्रन्थ आहे. जगातल्या कोणत्याही अन्य भाषेत इतका बृहत् ग्रन्थ नाही. होमरचे इलियड व ओडिसी हे दोन्ही ग्रन्थ एकत्र केले, तरी महाभारत त्यापेक्षा आठपट मोठे ठरेल.

पात्रांचे सजीव चित्रण, अद्भुत् अशा घटनांचे मनोहारी शैलीत वर्णन, मानवी जीवनाच्या अुतार-चढावांचे दर्शन, सद्गुण व दुर्गुणांचे विपुलीकरण व शास्त्रीय संप्रदायांचे सुरुचिपूर्ण विशदीकरण या सर्व बाबतीत महाभारत हा महोत्तम ग्रन्थ आहे. व्यासांनी केवळ हा ग्रन्थ रचला इतकेच नव्हे, तर ते स्वतःही त्यातलेच एक महत्त्वचे पात्र बनून राहिले.

व्यासांनी महाभारत लिहिण्याचा संकल्प केला अन् ते त्यासाठी एका लेखनिकाच्या शोधाला लागले. तेंव्हा ब्रह्मदेवांनी प्रकट होअून व्यासांना या कामासाठी विघ्नेश्वर गणपतीचे नाव सुचवले. लेखनिक म्हणून आलेल्या गणेशाने व्यासांना अट घातली की, 'व्यासांनी मधे न थांबता सतत मजकूर सांगत रहायला हवा.' व्यासांनी ती अट कबूल करून आपलाही नियम त्याला सांगितला की, 'कोठल्याही श्लोकाचा अर्थ स्पष्ट न समजता त्यानेही तो लिहायचा नाही.' विघ्नेश्वरानेही ही अट कबूल केली आणि ते दोघेही बदरीआश्रमाजवळील व्यास - गुंफेत जाअून बसले. यानन्तर महाभारत रचनेचा हा कार्यक्रम सतत चालू राहिला अन् अडीच वर्षांत त्यांनी ही रचना पूर्ण केली.

'व्यास' या शब्दाचा अर्थ आहे 'संकलनकर्ता' किंवा 'विवरण प्रस्तुत करणारा'. व्यासांनी पवित्र वेदमंत्रांचे वर्गीकरण करून त्यांचे विभाजन केले. या कार्यात त्यांचे अुत्कृष्ट मेधावीपण सिद्ध होते. व्यासांचे 'कृष्णद्वैपायन' असे दुसरेही एक नाव आहे.

असे मानले जाते की, व्यासांनी केवळ महाभारतच रचले असे नव्हे, तर अठरा पुराणेही त्यांनीच रचली. काहीजण असेही मानतात की, त्यांच्या काही शिष्यांनी यातील काही पुराणे रचली आणि गुरुदक्षिणेच्या रूपात त्यांनी रचनाकार म्हणून आपल्या गुरुचे नाव त्याबरोबर जोडले.

व्यासांच्या कालखंडाबाबत निश्चितपणे काहीच सांगता येत नाही; परन्तु काही पंडितांचे असे म्हणणे आहे की ते साडेपाच हजार वर्षांपूर्वीचे असावेत.



# तुम्हाला माहीत आहे काय?

१. एलिफंटा लेणी कोठे आहेत ?
२. पंधराव्या शतकातल्या एका महात्म्याला हिन्दू व मुसलमान दोन्हीही आपला मानत असत. हा महात्मा कोण ?
३. आपल्या देशातली पहिली महिला डॉक्टर कोण ?
४. आपल्या देशात हवाई-दल केंव्हा स्थापन झाले ?
५. आपल्या देशात पोस्टाचे तिकीट केंव्हा सुरू झाले ?
६. आपल्या देशातली जहाजे बांधणारी पहिली संस्था कोणती ? तिची स्थापना कोणी व केंव्हा केली ?
७. 'कॉमनवेल्थ दिवस' केंव्हा साजरा केला जातो ?
८. येशूला सुळावर चढवण्यात आले, तेंव्हा त्याने आपल्या मातेची देखरेख कोणत्या शिष्यावर सोपवली ?
९. प्राचीन निबंधनात (ओल्ड टेस्टामेंट) नोव्हाने कोणाला 'आजोबा' म्हटले आहे ?
१०. क्रिकेट हा कोणत्या देशाचा राष्ट्रीय खेळ आहे ?
११. विमानाचा शोध लावणारे राईट बंधू व्यवसायाने कोण होते ?
१२. 'उडत्या तबकड्या' प्रथम केंव्हा दिसल्या ?
१३. 'दि लेडी विथ लॅम्प' या नावाने प्रसिद्ध असणारी स्त्री कोण ?
१४. संयुक्त राष्ट्रसंघाचे पहिले मुख्य सचीव कोण होते ?
१५. 'अटलांटिस' चे वर्णन आपल्या रचनेत करणाऱ्या लेखकाचे नाव काय ?

## उत्तरे

१. मुंबई.
२. सन्त कबीर.
३. डॉक्टर आनन्दीबाई जोशी (१८८६).
४. ८ ऑक्टोबर १९३२.
५. १८५२ मधे.
६. विशाखापट्टणम येथील हिन्दू शिपयार्ड.
७. मे २४ रोजी.
८. जॉन.
९. मॅथ्यूसला.
१०. ऑस्ट्रेलिया.
११. सायकलींचे दुकान चालवत असत.
१२. २४ जून, १९४७ रोजी.
१३. फ्लारिन्स नाइटिंगेल.
१४. ड्याग हॉमर्सक वोल्ट.
१५. प्लूटो.



# मागासलेला विद्यार्थी

परब्रह्मस्वामी सकलशास्त्रात पारंगत होते. दर वर्षी काही विद्यार्थ्यांना ते शिकवत असत, पण कोणत्याही शिष्याला एक वर्षापेक्षा अधिक ते आपल्याजवळ ठेवत नसत.

शिष्य गणनाथने स्वामींजवळ राहून शिक्षण घेतले. पण त्याला असे आश्चर्य वाटत होते की, आपल्याला अजूनही ज्ञात नसलेले अनेक विषय या जगात आहेत! त्याला परब्रह्मस्वामींनी समजावून सांगितले की "बेटा, मला जितकं काही माहीत आहे, त्यातलं फारच थोडं मी तुला शिकवलं आहे. राहता राहिली माझ्या स्वतःच्या ज्ञानाची गोष्ट. पण ते तर ज्ञान-समुद्रातल्या एका थेंबाइतकंच आहे."

त्यावर्षी या गणनाथसह एकून दहा शिष्य परब्रह्मस्वामींजवळ शिकत होते. स्वामींनी सर्वांना एकत्रच शिकवले. परंतु कुश नावाच्या शिष्याला मात्र त्यांनी सर्वांपासून निराळे ठेवले. नऊ शिष्यांना ते दिवसातून चार तास शिकवत, तर एकट्या कुशला मात्र ते आठ तास देत. गुरूचा हा 'सवता सुभा' इतरांना आवडला नाही. एके दिवशी सर्वांनी मिळून त्यांना याचे कारण विचारले.

"शिष्याला किती शिकवायचं, ते मी त्याच्या सामर्थ्यावरून ठरवतो." गुरूंच्या या अुत्तरापुढे सर्वजण निरुत्तर झाले. काही काळाने त्यांचा आश्रम सोडायचा दिवसही जवळ आला.

परब्रह्मस्वामींनी आपल्या शिष्यांसमोर दहा बीजे ठेवली. ते गणनाथला म्हणाले, "ही बीजं आपल्या हातात एकत्र खुळखुळव. सगळी नीट मिसळून नंतर एक-एक करून सर्वांना वाटून टाक." तसे केल्यावर ते पुन्हा म्हणाले, "गणनाथने तुम्हाला एक एक बी दिली आहे. मी त्यांना हातही लावलेला नाही. घरी गेलात की आपापल्या परसात आपल्याला मिळालेलं बी पेरा, पाणी देत रहा. एक महिन्याने तुम्हाला अंकुर फुटलेला आढळेल, आणि तीन महिन्यांनी

मीरा गायतोंडे



त्याचे रोप होईल. सहा महिन्यात त्यावर फुलं येऊ लागतील. पण या दहांपैकी एकच बीज असं आहे, की त्याच्या रोपावर निळ्या रंगाचं फूल असेलेल, ज्याच्या घरी हे निळं फूल फुलेल, त्यानं ते 'गुरुदक्षिणा' म्हणून मला आणून द्यावं. जो मला ते फूल देईल, त्याचं शिक्षण, ज्ञान चिरस्थायी होईल. मी शिकवलेल्या साऱ्या विद्या शाश्वत रूपात त्याच्या स्मरणात रहातील. अशी सुसंधी तुम्हापैकी एकालाच मिळेल. बाकी सर्वांना नेहमी वाचन, मनन, चिंतन करत मिळवलेलं ज्ञान स्मरणात ठेवत रहावं लागेल.''

गणनाथ नाराज होत म्हणाला, ''गुरुजी, यापेक्षाही मूल्यवान दक्षिणा देण्याची आमची ऐपत आहे. फक्त हे एक फूल देऊन आम्ही संतुष्ट का व्हावं?''

''वेडा कुठला! अरे ते फूल चावून खाल्लं की, पाऊस केंव्हा येईल, याबद्दल महिनाभर अगोदरच समजेल, अशी शक्ती त्यात आहे. ती शक्ती आज माझ्यात नाही. ते फूल इतरांना एक साधं फूल असेल, पण माझ्या लेखी ते 'अमोघ फूल' आहे. माझ्या गुरूंचा मला आदेश होता की - माझ्या शिष्याकडून मला मिळणारं फूल माझ्या उपयोगी पडेल. म्हणूनच मी तुम्हा शिष्यांची मदत घेत आहे.'' स्वामीजींनी त्यांना पुरे स्पष्टीकरण दिले.

सर्व शिष्य आपापल्या गावी पोचले. शिवपुरला पोचल्यावर गुरुनाथने आपल्या घराच्या परसात बी पेरले. परमानन्दस्वामी सारख्या श्रेष्ठ गुरूकडून विद्या संपादून आल्यामुळे त्याच्या शिक्षणाबाबत चौकशी करायला अन् त्याला भेटायला गावचे लोक त्याच्या घरी आले.

गुरुनाथच्या विद्येबाबत जाणून घेतल्यावर त्यांच्यातल्या एका खेडुताने विचारले, ''हे शिक्षण अन् ज्ञान वगैरे बाबत मला काहीच माहिती नाही. पण मला इतकं मात्र कळतंय की गावात पाऊस केंव्हा होईल हे आम्हाला कळत नाही, त्यामुळे पिकंही नीट घेता येत नाहीत. तेंव्हा तुझ्या ज्ञानाच्या मदतीनं एवढी गोष्ट तू आम्हाला सांगू शकलास तर सारा गांव तुझा आभारी होईल, तुला सर्वजण मान देतील.



इतकंच काय, पण सर्वजण तुझी पूजा बांधू लागतील.''

त्याचे बोलणे ऐकून गणनाथच्या मनात नाना तऱ्हेचे विचार थैमान घालू लागले. तोपर्यन्त गुरूंनी दिलेली फूल त्याला संतोषजनक वाटत नव्हती. आता त्याला वाटू लागले की, ''आपल्या झाडाला निळं फूल लागलं, तर ते घेऊन लागलीच त्यांच्याकडे जावे लागेल. त्यापेक्षा गुरुजींना ती गुरुदक्षिणा न देता फूल आपणच खाऊन टाकलं तर साऱ्या विद्या शाश्वत रूपात आपल्या स्मरणात रहातीलच. पण गुरूच्या ज्ञानाहूनही श्रेष्ठ असणार आहे हे फूल! पाऊस केंव्हा पडेल, ते या फुलाच्या साह्याने मी अगोदर जाणून घेईन. या ज्ञानामुळे मला प्रसिद्धि, गौरव आणि धनही प्राप्त होईल.

त्या दिवसापासून गणनाथ रोज देवळात जाऊन भक्ति व श्रद्धापूर्वक देवपूजा करू लागला. त्याची एकच इच्छा अन् प्रार्थना असे की ते निळ्या रंगाचे फूल आपल्याच रोपावर फुलावे.

दिवस जात राहिले. बीतून अंकुर फुटला, रोप वाढले, यथाकाल त्यावर कळीही धरली; अन् एक दिवस तिचे फूल झाले! आश्चर्य म्हणजे त्यावर पांढरा किंवा अन्य कसला एवढासाचा ठिपकाही नसून, ते केवळ निळ्याशार रंगाचे टवटवीत फूल होते!

गणनाथच्या आनन्दाला पारावार उरला नाही. त्याने फूल तोडले. पण ते तोंडात



घालताघालता तो एकदम थांबला! 'आपली काही चूक तर होत नाही ना? हे फूल खरं तर गुरुदक्षिणा म्हणून नेऊन द्यायला हवं' असा विचार त्याच्या मनात आला, अन् सदसद्विवेक बुद्धीशी झगडा सुरू झाला.

''गुरुजींनी तरी कुशलाच विशेष रूपानं शिक्षण देऊन पक्षपात दाखवलाच की! आता देवाचीच माझ्यावर खास कृपा असल्यानं निळ्या रंगाचं फूल त्याच्या बीजातून नव्हे, तर माझ्या बीजातून फुललंय. तेंव्हा त्या फुलाचा खरा हक्कदार तर मीच आहे. तेंव्हा ते खाऊन अद्भुत शक्ति मिळवणं चूक होणार नाही.'' अशी स्वतःची समजूत घालून, त्याने ते फूल खाऊन टाकले.



बास! ते खाल्ल्या खाल्ल्या त्याच्या मनात पावसाबाबतचे विचार रुंजी घालू लागले. त्याला असे कळले की दोन दिवसात आपल्या गावात पाऊस पडणार आहे. धावत धावत गावपाटलाकडे जाऊन त्याने सांगितले, ''पाटीलमहाशय! आपल्या गाववाल्यांसाठी साऱ्या ज्ञानाचा मी उपयोग केलाय. ज्ञानाद्वारे मला एक शक्ति प्राप्त झालीय. शक्तीच्या आधारे आता केंव्हा पाऊस पडेल हे मी सांगू शकतो. येत्या दोन दिवसात आपल्या गावात पाऊस पडणार आहे!''

ते उन्हाळ्याचे दिवस होते. अशा वेळी तर आतापर्यन्त गावात कधीच पाऊस पडला नव्हता. त्यामुळे पाटलाने गणनाथच्या सांगण्यावर विश्वास ठेवला नाही. तरीही त्याने ही बातमी गावकऱ्यांना सांगितली. थोड्या लोकांनी त्यावर विश्वास ठेवला, तर काही लोकांनी गणनाथची चेष्टा केली.

परन्तु गणनाथच्या सांगण्याप्रमाणे बरोबर दोन दिवसांनी खरोखर शिवपुरमधे पाऊस पडला. त्या दिवसापासून त्याच्या परिस्थितीत आमूलाग्र फरक पडला. दोन-तीन वर्षात तो गावातला सर्वात धनवान माणूस बनला. आपापल्या गावात केंव्हा पाऊस पडेल, हे विचारण्यासाठी त्या पंचक्रोशीतल्या साऱ्या खेडोपाड्यातली माणसे त्याच्याकडे येऊ लागली.

अशातच एका वर्षी त्या साऱ्या मुलुखात दुष्काळ पडला. लागोपाठ दोन वर्षे पावसाने आपले तोंड लपवले. गणनाथने सर्वांना सांगितले की, अजूनही एक महिना कुठेच पाऊस पडणार नाही.

इतक्यात शेजारच्या गावचा एक माणूस येऊन पाटलाला भेटला. त्यावेळी गणनाथही तेथे हजर होता.

शेजारगावच्या माणसाला पाहून गणनाथला वाटले, की तो आपल्यालाच भेटायला आला आहे. जराही विचार न करता तो त्या गावकऱ्याला म्हणाला, ''अरे, माझ्याकडे येऊन काय फायदा? दुष्काळ तर सर्वत्रच पडला आहे. जो पाऊस इथे पडला नाही, तो तुमच्या गावात थोडाच पडेल ?''

पण मोठ्या विनयपूर्वक तो गावकरी म्हणाला, ''महाशय, पाऊस केंव्हा पडेल, याबद्दल प्रथम आपण सांगत होता. पण यावेळी तुमचा अंदाज चुकलाय. आमच्या गावात एक महाशय आले आहेत. त्यानी 'दोन दिवसांनी पाऊस येईल' असं सांगितलं अन् बरोबर पाऊस पडलाही. तुम्ही त्यांना आपल्या गावीही बोलावून घ्या.''

हे ऐकताच गणनाथचा चेहरा पांढरा पडला! तो विरोध करत राहिला; पण त्याचे काहीही न ऐकता गाववाल्यांनी त्या माणसाला आपल्या गावी बोलावलेच.

लोकांनी बोलावून आणलेल्या व्यक्तीला - कुशला - पहाताच गणनाथ आश्चर्यचकित झाला! त्याने कुशला सर्वकाही सांगून म्हटले, ''आजपर्यन्त माझं एकही भविष्य खोटं ठरलं नाही. मला तर असं वाटतंय की आत्ता तुझ्या इथे येण्यात गुरुजींचाच हात असला पाहिजे.''

यावर हसून कुश म्हणाला, ''यात गुरुजींचा हातही नाही अन् त्यांचा काही महिमा वगैरेही नाही. त्यांनी तर आपणा सर्वांना निळ्या रंगाच्या फुलांचेच बी दिले होते. आपल्या गुरुभक्तीची परीक्षा त्यांना पहायची होती. ते फूल घेऊन कोणीच त्यांच्याकडे जाऊन गुरुदक्षिणा म्हणून अर्पण केलं नाही. मीच फक्त एकटा त्यांच्याकडे गेलो. ते माझ्यावर फार प्रसन्न झाले अन् अचानक पाऊस पाडण्याची अजब शक्ती त्यांनी मला दिली. या शिवाय त्यांनी मलाच ते फूल चांगले चावून खायला लावले. या विद्येचा दुरुपयोग न करण्याचा सल्ला त्यांनी मला दिला. त्यामुळेच 'आपल्यात पाऊस पाडण्याची शक्ती आहे' असं मी कोणालाही सांगत नाही. जनतेची जमेल तितकी सेवा करून मदत करत असतो मी त्यांना.''

हे ऐकून गणनाथ विचारात पडला. आता त्याला कळून चुकले की ज्याला त्याला त्याच्या योग्यतेप्रमाणेच ज्ञान प्राप्ती होत असते. तसे तर सर्वांनाच समान शिक्षण मिळाले होते; पण एकट्या कुशमधेच एकाग्रता होती. इतरांच्यात तिचा अभाव होता. यामुळेच इतर शिष्य ज्ञानार्जनात मागे राहिले. हे सत्य जाणून आता गणनाथला पश्चात्ताप वाटू लागला.





# लायकीची परीक्षा

कलिंगदेशच्या वृद्ध मंत्र्याच्या आकस्मिक मृत्यूमुळे राजा कीर्तिवर्धन समोर कठीण समस्या अुभी राहिली. कलिंग हा केवळ विशाल देश होता एवढेच नव्हे, तर ते एक सुसंपन्न राज्यही होते. त्याच्या अनेक वैशिष्ट्यांमुळे आसपासच्या राजांवर त्याचा एक दबदबा निर्माण झाला असून, प्रत्येकाला या देशाबद्दल आकर्षणही वाटे. कसेही करून हे राज्य आपल्या ताब्यात यावे यासाठी प्रत्येक जण आतुर होता. अन् यासाठी ते सर्व योग्य संधीच्या शोधात होते. असे राज्य सुस्थिर ठेवण्यासाठी अन् सुचारु पद्धतीने चालवण्यासाठी सुयोग्य व दक्ष अशा महामन्त्र्याची आवश्यकता असते, अन् त्याला चतुर व राजतन्त्राबाबत पूर्णतया माहीतगार असणे जरुरीचे असते.

मृत महामन्त्री हा केवळ प्रतिभावानच नव्हे, तर खूपच अनुभवीही होता. त्याच्या-सारखा कोणी सुयोग्य माणूस राजाला राजधानीत आढळला नाही.

खूप विचार केल्यानन्तर कीतिवर्धनने राज्यात एक दवंडी पिटवली. दवंडीत असे जाहीर करण्यात आले की, ''कलिंगदेशचा मन्त्री बनण्यासाठी एका योग्य व समर्थ व्यक्तीची आवश्यकता आहे. त्याने बुद्धिमान, प्रतिभावान व ज्ञानी असणे जरूरीचे आहे. ज्यांच्या चेहऱ्यावर तेज असेल व ज्याला पहाताच 'महामन्त्री' म्हणून रूबाबदार वाटतील अशाच व्यक्तींनी आवेदन पाठवावे. त्याच्या योग्यतेची परीक्षा पाहून निवड केली जाईल.''

महामन्त्री बनण्यासाठी चतुर, बुद्धिमान, प्रतिभावान वगैरे असणे जरूर ही गोष्ट ठीक, परंतु चेहऱ्यावर तेज व कांति असावी ही अट नागरिकांना फारशी रुचली नाही. पण याकडे राजाचे लक्ष वेधायचे धाडस मात्र कोणातही नव्हते.

खरे तर कलिंगदेशात प्रतिभावन्तांचा दुष्काळ अजिबातच नव्हता. परन्तु तेज व चमक यांचा जो अुल्लेख दवंडीत होता, ते गुण नसल्यामुळे अनेक बुद्धिमान व प्रतिभासंपन्न माणसे मन्त्रीपदासाठी पुढे येईनात. जे स्वत:ला पूर्ण योग्य समजत होते, असे काही अुमेदवार राजाला भेटलेही; परन्तु त्याला ते आवडले नसल्याने सर्वजण निराश होअून परतले.

त्याच राजधानीत श्रीधर नावाचा एक बुद्धिमान, चलाख व प्रतिभासंपन्न माणूस होता. त्याने शास्त्रांचे सखोल अध्ययन केले होते. राजनीति-शास्त्रातही तो पारंगत होता. राज्य-शासनाची पद्धत त्याला अुत्तम प्रकारे अवगत होती. त्याच्या योग्यतेच्या परीक्षेत आपली निवड होईल याबद्दलही त्याला खात्री होती. परन्तु मुख्य अडचण होती, ती त्याच्या चेहऱ्याची ! तो कुरूप होता. रंगाने एकदम काळा असून त्याच्या चेहऱ्यावर देवीचे व्रणही होते. तरीही श्रीधरने मन्त्रीपदासाठी प्रयत्न करायचे ठरवले. त्यासाठी त्याने एक योजना बनवली. भल्या सकाळी राजा आपल्या खास उद्यानात फिरत असताना, तो त्याला भेटायला गेला.

त्यावेळी अुद्यानाचा पहारेकरी कोणाशी तरी बोलण्यात गुंतला आहे, असे पाहून त्याने सरळ आत प्रवेश केला. राजाच्या डोक्यावर त्यावेळी मुकुटही नव्हता, अन् अंगावरचे कपडेही भरजरी वगैरे नव्हते. अगदी साध्या वेषात तो तेथे शतपाअुली करत होता.

श्रीधर सरळ राजाकडे न जाता तेथे झाडांना पाणी घालणाऱ्या माळ्याकडे जाअून त्याला



रमेश पवार

काकुळतीने विनवू लागला, ''महाराज, आईबापांच्या मृत्यूनंतर मी अनाथ झालोय. भुकेनं प्राण व्याकूळ झालेत माझे. कृपा करून एकादी बारकीशी नोकरी द्या ना मला!'' राजा काहीसा रागावून श्रीधरजवळ गेला व त्याने विचारले, ''कोणत्या देशचा आहेस तू ?''

श्रीधर अुत्तरला, ''मी कलिंग देशचाच आहे महाराज!''

''या देशचा नागरिक आहेस, अन् देशचा राजा कोण आहे, हे नाही माहीत तुला ? मी आहे राजा. अन् ज्याच्या समोर गयावया करत आहेस ना, तो आहे इथला माळी. समजलं ?'' राजा म्हणाला.

श्रीधरने ताबडतोब राजाला लवून नमस्कार करत म्हटले, ''क्षमा असावी महाराज! मी आजपर्यन्त आपणाला पाहिलं नव्हतं ना, म्हणून अशी चूक झाली. आपल्या डोक्यावर आत्ता मुकुट नाही अन् अंगावरची वस्त्रंही भरजरी नाहीत, म्हणून ओळखलं नाही मी आपल्याला. हा माळी कसा अुंचबिंच अन् तगडा आहे. याचं शरीरही चांगलं मजबूत दिसतंय, मिश्याही कशा भरपूर अन् पिळदार आहेत; डोळेही याचे छान चमकदार आहेत. त्यामुळे यालाच राजा समजलो मी. आपला अपमान करायचा अुद्देश नव्हता माझा!''

श्रीधरचे हे स्पष्टीकरण ऐकून राजाला आपल्या दवंडीचा मजकूर लक्षात आला. त्याला कळून चुकले की, 'मन्त्रीपदासाठी बुद्धी आणि प्रतिभा असणं पुरेसं आहे. त्या पदासाठी त्याची रूपरेषाही आकर्षक असायची काही गरज नाही.' अन् हसतच राजा म्हणाला, ''मन्त्रीपदासाठी दिलेल्या दवंडीच्या मजकुरातला दोष तू मला चातुर्याने दाखवून दिला आहेस. तुझ्यासारख्या बुद्धिमन्ताला साधारण नोकरीच का ? तू मन्त्रीपदासाठी अर्ज कर. आता मी मन्त्र्याच्या रूपाबाबतची अट मागे घेत आहे. तेंव्हा अुद्या होण्याऱ्या योग्यतेच्या परीक्षेत आपलं भाग्य आजमावून पहा.''

दुसऱ्या दिवशीच्या परीक्षेत श्रीधरचीच निवड झाली अन् तो महामन्त्री बनला. राजाला अुत्तमोत्तम अुपयुक्त सल्ला देत राहून एक 'समर्थ मन्त्री' म्हणून तो नावारूपास आला.





## महाभारत - ७

**भी**माला गंगेच्या डोहात टोकले गेले आणि तो थेट पाताळात पोचला. धर्मराजाला त्याबद्दल काहीच माहीत नव्हते. त्याने भीमाला खूप शोधले; पण त्याचा काहीच पत्ता लागेना. दुर्योधनाला विचारले, तेंव्हा तो अुत्तरला, ''भीम केंव्हाच नगरात परत गेला.'' धर्मराज लगेच हस्तिनापुरात गेला अन् त्याने माता कुन्तीकडे विचारणा केली. पण तिच्याकडूनही त्याला नकारात्मक अुत्तर मिळाले.

''गंगेच्या तटावर विश्रान्ती घेत पडलेला तर मी त्याला पाहिला, पण नन्तर तो कुठेच दिसला नाही. त्याला शोधायचे माझे सारे प्रयत्न विफल झालेत. कळत नाही, कुठे गेला असावा तो.'' चिन्तित स्वरात धर्मराजाने कुन्तीला सांगितले.

ते ऐकून कुन्ती फार दुःखी झाली. ती धर्मराजाला म्हणाली, ''तू अन् तुझे बाकी भाअू मिळून चारी दिशांना त्याचा शोध घ्या.'' नन्तर तिने विदुराला बोलावून घेअून म्हटले, ''भीम आपल्या भावांबरोबर प्रमाणकोटी तीर्थावर गेला होता. पण अजून तो परत आलेला नाहीय. दुर्योधन त्याचा फार द्वेष करत असतो. मला भीती वाटतेय की, त्यानं तर त्याला मारून नसेल ना टाकलं ? देव करो अन् माझी ही भीती खरी न ठरो.''

''बरं झालं, ही गोष्ट तुम्ही प्रथम माझ्या-जवळच बोललात. पुन्हा कधी अन्य कोणाशी

द्रोणाचार्यांची कथा



याबद्दल चकार शब्द बोलू नका. दुर्योधन अत्यन्त नीच अन् दुष्ट आहे. ही गोष्ट त्याच्या कानांवर गेली, तर तो इतर भावांनाही मारून टाकेल. तेंव्हा अशी चूक पुन्हा करू नका. तुम्हाला दुःख करायची गरज नाही, कारण भीमावर असं काही संकट येणं शक्य नाही. तो नक्कीच कुठेतरी सुरक्षित असला पाहिजे. मुलांना दीर्घ आयुष्य आहे तुमच्या! त्यांच्या केसालाही कोणी धक्का लावू शकणार नाही." या शब्दात कुन्तीचे सांत्वन करून विदुर निघून गेला.

तिकडे भीम नागलोकात आठ दिवस मजेत झोपून राहिला. तो जेंव्हा जागा झाला, तेंव्हा त्याच्या लक्षात आले, की आपण नागांच्या सहवासात आहोत. नाग त्याला म्हणाले, "प्यायलेला दिव्यरस तू अुत्तम प्रकारे पचवला आहेस. आता तुला हजार हत्तींचं बळ प्राप्त झालेलं आहे. आता अुठून गंगास्नान कर आणि जाऊन आपली माता व बंधूना भेट."

भीमाने गंगेत स्नान केले. नागांनी त्याला नवीन वस्त्रे घालायला दिली, त्याला अुत्तम भोजन दिले, आणि अनेक आभूषणांनी त्याला सजवले. नन्तर एका नागाने त्याला आपल्या खांद्यावर बसवून प्रमाणकोटी स्थळाच्या एका अुपवनात एकटाच सोडून दिला. भीमाने मोठ्या प्रेमाने त्या नागाचा निरोप घेतला आणि तो हस्तिनापुरी पोचला. माता कुन्ती व वडील बन्धु धर्मराज यांना त्याने प्रणाम केला अन् बाकी भावांना मिठीत घेतले.

तो परत आल्याने सर्वजण निश्चिन्त झाले. भीमाने कुन्तीला दुर्योधनाने आपल्या खाण्यात वीष कसे मिसळले, अन् बेशुद्धावस्थेत लतावेलींनी हातपाय बांधून गंगेच्या डोहात कसे बुडवले वगैरे आपल्यावर गुदरलेला प्रसंग सविस्तर वर्णन करून सांगितला. नागलोकात आपल्याला आलेला अनुभव व नागांची प्रेमळ वागणूक याबद्दलही सांगितले. दुर्योधनाच्या दुष्टपणाबद्दल कुन्तीला फार वाईट वाटले अन् त्याची भीतीही वाटली. पण आपला मुलगा सकुशल परत आल्याचा आनन्दही वाटला.

कौरव-पांडव राजपुत्रांना धनुर्विद्या शिकण्यासाठी कृपाचार्यांकडे पाठवण्यात आले. भीष्मानेच याबद्दलची सारी व्यवस्था केली. काही दिवस राजपुत्र कृपाचार्यांजवळ शिकले. नन्तर हस्तिनापुरी आलेल्या द्रोणाचार्यांना भीष्माने त्यांचा गुरु बनवले.

द्रोण हे भरद्वाज नावाच्या ऋषींचा पुत्र होते. त्यांनी प्रथम सर्व वेदविद्या शिकून घेतल्या न नन्तर त्यांनी अग्निवेश नामक गुरुजवळ राहून धनुर्विद्या शिकून घेतली, व आग्नेय आदि विविध अस्त्रे प्राप्त करून घेतली.

अग्निवेशजवळ त्याचवेळी दुसराही एक शिष्य शिकत होता. तो होता पांचालराजा वृषतचा पुत्र द्रुपद. द्रोणाचार्य व द्रुपद एकाच गुरूजवळ शिकत असल्याने दोघांच्यात दाट मैत्रीसंबंध निर्माण झाले होते.

काही दिवसांनी पांचाल राजा वृषतचे देहावसान झाले व द्रुपद पांचालच्या सिंहासनावर बसला. या अवधीत द्रोणांचे पिता भरद्वाज ऋषींही मृत्यु पावले होते. त्यांच्या मृत्यूनन्तर द्रोणांनी कृपाचार्यांची बहीण कृपी हिच्याशी विवाह केला. त्यांना झालेल्या पुत्राचे नाव होते अश्वत्थामा.

आपल्या कुटुंबाच्या अुदरनिर्वाहासाठी द्रोणांना काही अर्थार्जनाची आवश्यकता निर्माण झाली. परशुराम ब्राह्मणांना अुदारहस्ते दान देत असल्याची बातमी त्यांनी ऐकली व मोठ्या आशेने ते परशुरामांकडे गेले.

परन्तु परशुराम द्रोणांना म्हणाले, "पुत्र, माझ्याजवळ जे काही होतं ते सर्व मी ब्राह्मणांना दान दिलं. सारी भूमीही मी कश्यपाला दिली.





माझ्याजवळ आता शस्त्रांशिवाय काहीही शिल्लक नाही."

द्रोण म्हणाले, "ती शस्त्रंच मला दान करावी."

आपल्याजवळची सर्व शस्त्रे परशुरामांनी द्रोणांना दिली व ती चालवण्याचे शास्त्रोक्त शिक्षणही दिले. त्याच बरोबर त्यांचा अुपयोग कसा करायचा हे ही दाखवले.

यानन्तर द्रोण आपला सहपाठी द्रुपद याच्याकडे मदत मागण्यासाठी गेले. परंतु राजा बनल्यावर द्रुपद घमेंडखोर बनला होता. द्रोणांना पाहून त्यांची चेष्टा मस्करी करत तो म्हणाला, "तू कोण आहेस, हे माहीत नाही मला. चल, चालू लाग इथून!"

अपमानित द्रोण तेथून हस्तिनापुरला परत आले अन् मेहुण्याकडे राहून अज्ञात जीवन जगू लागले. कौरवकुमार एक दिवस नगराबाहेर चेंडू खेळत असताना चेंडू एका विहिरीत पडला. तो बाहेर काढणे त्यांना जमेना. त्याच वेळी द्रोण तेथून जात होते. कौरवांनी त्यांना आपला चेंडू काढून देण्यासाठी विनवले.

"मुलांनो, तुम्ही तर भरतवंशज आहात, कृपाचार्यांचे शिष्य आहात. एक साधा चेंडू विहीरीतनं काढणं तुम्हाला असाध्य झालंय? हे पहा, मी आता आपली अंगठी विहिरीत टाकतोय. नीट पहा हं, आता अंगठी अन् चेंडू दोन्हीही बाहेर काढून दाखवतो." असे म्हणत द्रोणांनी एक वार विहिरीत डोकावून पाहिले अन् हंसत हंसत अंगठी विहिरीत टाकली.

धर्मराज पटकन द्रोणांना म्हणाला, "ब्राह्मणोत्तम, आपण जर हे काम करून दाखवलंत, तर कृपाचार्य आजीवन आपल्या भोजनाची सोय करतील."

"पहाच मी ते किती लीलया करून दाखवतो." असे म्हणून द्रोणांनी धनुष्य व बाण हातात घेतले. एक बाण मारून त्यांनी तो चेंडूत घुसवला, अन् नंतर बाणाच्या शेपटीत दुसरा बाण अशा प्रकारे बाण मारत चेंडूपासून विहिरीच्या काठापर्यन्त बाणांची एक मालिका तयार झाली, अन् तिच्या साह्याने त्यांनी चेंडू वर खेचून घेतला. ते पाहून मुले



आनन्दाने ओरडली अन् टाळ्या वाजवत म्हणू लागली, "आता अंगठीही दाखवा ना काढून."

एक मन्त्र म्हणून अंगठीवर नेम धरून त्यांनी बाण सोडला व चेंडूप्रमाणेच अंगठीही काढून दाखवली.

द्रोणांची ही अद्‌भुत धनुर्विद्या पाहून मुले अवाक् होऊन गेली? सर्वांनी एकदम त्यांना नमस्कार करून म्हटले, "स्वामीजी, आजवर आम्ही अशी अद्‌भुत शक्ति कुठे पाहिलीच नाही. आपण कोण आहात? आम्ही आपली काय सेवा करू?"

"तुम्ही अजून लहान मुलंच आहात. माझी काय सेवा करणार तुम्ही? माझा विषय विसरून जा अन् आपला खेळ पुन्हा चालू करा. पण हां, ही गोष्ट आपले आजोबा भीष्म यांच्या कानी मात्र नक्की घाला हं!" द्रोण म्हणाले.

बालकांकडून भीष्मांना ही गोष्ट समजली. द्रोणांचे सादर स्वागत करून त्यांनी विचारले, "आपण हस्तिनापुरी का आला आहात हे जाणू शकतो काय मी?"

आपला पूर्व वृत्तान्त सांगून द्रोण म्हणाले, "माझ्या पित्याचा आदेश होता की, मी कृपाचार्यांच्या बहिणीशी विवाह करावा. अन् आदेश देऊन त्यांनी परलोक गाठला. मी पित्याची आज्ञा पाळली. अन् अश्वत्थामाचा पिता बनलो. माझ्या मुलाने हट्ट धरला की इतर मुलांप्रमाणे मलाही गायीचं दूध हवं प्यायला. मी काहीच कमवू शकत नव्हतो, म्हणून मुलाच्या दुधात पीठ मिसळून तेच दूध म्हणून त्याला प्यायला देत राहिलो. माझं दारिद्र्य पाहून अन्य आश्रम वासीयांनी माझा धिक्कार केला. तेंव्हा मला माझा सहाध्यायी द्रुपद याची आठवण झाली. लहानपणी तो मला म्हणत असे की, "मी राजा झालो, की राज्य तुझ्या स्वाधीन करीन. मी त्याच्याकडून काही मदत मिळवण्यासाठी पांचाल देशी गेलो. मी आपली मैत्री अन् लहानपणच्या दिवसांची द्रुपदाला आठवण दिली. पण 'हं, एका दरिद्री माणसाची अन् राजाची कसली आलीय मैत्री!' असं म्हणून माझी टर उडवली. त्याने तर मला ओळख दाखवायचीही अनिच्छा व्यक्त केली अन् म्हणाला, 'उपाशी असलास, तर एक वेळचं जेवण जेऊन जा.' माझा अभिमान यामुळे दुखावला गेला आणि आपली पत्नी अन् मुलाला बरोबर घेऊन कुरुदेशी आलो आहे. आपण बोलावलंत म्हणून भेटायला आलोय. मला काय आज्ञा आहे, ती सांगावी."

"आपण कुरुदेशात आल्यामुळे माझ्या नातवंडांचं कल्याण झालं आहे. मी तर म्हणेन की हे त्यांचंच अहोभाग्य आहे! आपणासाठी मी सर्व सोयींची व्यवस्था करून देतो. आपणालाच सम्राट मानून आम्ही आपलं आज्ञापालन करू." भीष्म विनयाने म्हणाले. काही दिवसात कौरव-पांडव राजकुमारांना द्रोणांच्या सुपूर्त करण्यात आले.

सर्व मुलांना समोर बसवून द्रोण म्हणाले, "धनुर्विद्या शिकून झाल्यावर तुम्हाला माझं एक काम करावं लागेल." यावर कोणी काहीच बोलले नाही, पण पटकन उठून अर्जुन म्हणाला, "गुरुदेव, आपण म्हणाल ते मी करीन."

फार प्रसन्न होऊन द्रोणांनी अर्जुनाला आलिंगन देत त्याच्या मस्तकाचे अनेकदा अवघ्राण केले.

द्रोणांजवळ केवळ कौरव-पांडवच नव्हे, तर हस्तिनापुरातले अन्य यादवही धनुर्विद्या शिकायला येत.

सूतकडे वाढलेला कर्णही द्रोणांचा शिष्य होता. त्यावेळेपासूनच दुर्योधनाला कर्ण फार आवडू लागला होता. जेंव्हा जेंव्हा संधी सापडेल, तेंव्हा-तेंव्हा तो पांडवांची चेष्टामस्करी करी,



त्यांचा अपमान करी.

शस्त्रविद्येत अर्जुनच सर्वात श्रेष्ठ असल्याने द्रोणांची खात्री होती, की तोच धनुर्विद्येतही सर्वश्रेष्ठ बनेल.

द्रोण कधीकधी एक काम करीत. सर्व शिष्यांना घट देऊन ते पाणी आणायला सांगत. आपला पुत्र अश्वत्थामा याला मोठ्या तोंडाचा घट देऊन इतरांना मात्र लहान तोंडाचे घट देत. अश्वत्थामाचा घट लवकर भरे व तो सर्वांच्या अगोदर परत येई. तेवढ्या अवधीत ते त्याला धनुर्विद्येचे काही खास पाठ देत.

अर्जुनाने ही गोष्ट ओळखली आणि वरुणास्त्राच्या मदतीने आपला घटही लवकर भरून तो अश्वत्थामा बरोबरच द्रोणांकडे हजेरी लावू लागला. त्यामुळे खास शिकवण्यात येणारी सारी धनुर्विद्या अर्जुनालाही शिकायला मिळाली. यामुळे अश्वत्थामा मनोमन अर्जुनाचा द्वेष करू लागला.

एके दिवशी सर्वजण द्रोणांच्या घरी बसून रात्री भोजन करत होते. जोरदार वाऱ्याच्या झोताने दिवा विझला. परन्तु भोजन करण्यात काही अडचण आली नाही. अर्जुनाच्या मनात यावरून विचार घोळू लागले. "सवयीमुळेच तर आपण अंधारातही नीट जेवू शकत आहोत. मग अंधारात धनुर्विद्या अभ्यास का होऊ शकणार नाही?"

एके दिवशी रात्री धनुष्याच्या टणत्काराने द्रोणाचार्यांची झोपमोड झाली. उठून पाहिले, अर्जुन धनुर्विद्येचा अभ्यास करत होता. आनन्दाने अर्जुनाला मिठीत घेत ते त्याला म्हणाले, "बेटा, मी तुला धनुर्विद्येत अग्रगण्य बनवीन. त्यात तुझ्याइतका प्रवीण कोणी होऊच शकणार नाही."

द्रोणांनी आपले वचन पाळले. अर्जुनाला त्यांनी रथ, हत्ती, घोडे वगैरेंच्या घेऱ्यात उभे राहूनही बाण कसे चालवावे हे शिकवले. गदायुद्ध अन् छद्मयुद्धही त्याला शिकवले. अशाप्रकारे युद्धाबद्दलची सारी रहस्ये त्यांनी अर्जुनाला शिकवली व तो त्या सर्व कलात पारंगत झाला.





# सुंदर युक्ती

गौरीपुरची गौरी फार भांडखोर बाई होती. पैशाची हावही तिच्यात जरा अधिकच होती. काही कमावण्याचे चातुर्य तर तिच्यात नव्हतेच, पण काटकसरीने रहाण्याचेही तिला जमत नसे. पदरी दोन मुले होती. मुले लहान असतानाच तिचा नवरा मरून गेला होता. उरली-सुरली जमीन विकून तिने मुलांना वाढवले. नुकतेच तिने आपली मुलगी लक्ष्मी हिचे लग्नही उरकून घेतले होते. आता काही अडचण असली, तर ती फक्त मुलगा गोपाळ याच्या लग्नाचीच.

गोपाळ चांगला शिकलासवरलेला असून एका सरकारी कचेरीत कामालाही लागला होता. त्याच्या या नोकरीचे निमित्त पुढे करून वधूपक्षाकडून जास्तीत जास्त हुंडा उकळायचा तिचा बेत होता. तिची इच्छा होती की हुंडा म्हणून मोठीशी रक्कम हाती आली, की पुन्हा पायावर पाय टाकून आरामात उरले-सुरले आयुष्य कंठावे, म्हणून जे स्थळ येईल त्याला ती पैशांच्या कसोटीवर जोखून पाही. तिने मागितलेली रक्कम देणं वधूपक्षाला शक्य होत नसल्याने अजून विवाहाचे जमत नव्हते.

असा होता आईचा स्वभाव अन् विचार करायची पद्धत. पण स्वतः गोपाळच्या आशाआकांक्षा मात्र अगदीच निराळ्या होत्या. ज्या गल्लीत त्यांचे घर होते, त्याच गल्लीत थोड्या अंतरावर निर्मला नावाची मुलगी रहात असे. त्याची तिच्याशी विवाह करायची इच्छा होती. निर्मला बुद्धिमान व चुणचुणीत असून मोठी सहनशीलही होती. परन्तु तिच्या घरची आर्थिक स्थिती बेतास बात असल्याने तिच्याशी आपले लग्न होणे कठीण आहे, हे गोपाळ ओळखून होता. या शिवाय निर्मलाच्या वडिलांशी गोपाळच्या आईचे-गौरीचे बितुष्ट होते. दोघांच्यात नेहमी भांडण होत असे. दोघे एकमेकांचे कट्टर दुश्मन होते. त्यांचे शत्रुत्व

जानकी खेडकर



राखेतल्या निखाऱ्यासारखे होते; कधी भडकेल काय नेम? या दोन्ही कारणांमुळे हे लग्न गोपाळला केवळ स्वप्नासारखेच वाटे.

बराच काळ गोपाळ या अडचणीवर अुपाय शोधत राहिला. एक दिवस निर्मलेला एकान्तात भेटून तो तिला म्हणाला, ''माझ्या आईचा स्वभाव कित्ती वाईट अन् खोटा का असेना; पण शेवटी ती आईच आहे ना माझी? तिच्यात बदल व्हावा इतकी फक्त देवाजवळ प्रार्थना करू शकतो मी. माझ्या असहाय्य परिस्थितीत तू मदत केलीस तरच आपला विवाह होअू शकेल. मी तुझ्याशी विवाह करून सुखी व्हावं, अशी तुझी इच्छा असेल, तर मला तुझं सहकार्य हवं. तुझं माझ्यावर खरंच प्रेम असेल अन् माझ्याशी लग्न करायची इच्छा असेल, तर तूच एकादा अुपाय शोधून काढ.''

गोपाळ आपल्या आईसारखा खवचट स्वभावाचा नाहीय. त्याचा शान्त स्वभाव तिला आकर्षक वाटला. लग्नाला आपली संमती देत तिने आपले मस्तक झुकवले अन् हळूच म्हणाली, ''अुपाय कसाही शोधून काढता येईल, पण तो अंमलात आणताना सासूबाईंना थोडा तरी त्रास होईलच; त्यांचं मन दुखवावं लागेल.''

गोपाळ हसत म्हणाला, ''मला एवढं कळतंय की आजार अडेलतट्टू असेल तर गोड औषध देअूनच ठीक केला पाहिजे, असा हट्ट अुपयोगी नाही. कडू औषधांचा अुपयोग करायचा तुला अधिकार आहे.''

त्याच्या बोलण्यावरून तो आपल्यावर किती प्रेम करतोय हे पाहून निर्मला सुखावली. मनोमन तिने त्याला धन्यवाद दिले. त्याच्याकडे कृतज्ञतेने पहात ती म्हणाली, ''जमेल तितक्या लवकर काही युक्ती शोधून काढीन अन् तसं कळवीन.''

यानन्तर दोन तीन दिवसातच निर्मलाने आपल्या वडिलांशी सल्लामसलत करून एक योजना बनवली. गोपाळनेही तिला आपली संमती दर्शवली.

यानन्तर एका आठवड्यातच एक विचित्र घटना घडली. एके दिवशी सकाळी निर्मला अंगणात सडा घालायला गेली असतांना एक वृद्ध साधु समोर बेशुद्ध पडलेला तिला दिसला. ताबडतोब आपल्या बाबांना बोलावून त्या दोघांनी मिळून साधूला घरात नेले, त्याची सेवा-शुश्रूषा केली.

दोन दिवसात साधु बरा झाला अन् हळूहळू त्याची माहितीही मिळत गेली.

साधूचे नाव होते करुणाकर. त्याचे वयही होते चांगले एकशे पंचवीस वर्षांचे! गेली एकशे दहा वर्षे तर तो हिमालयात एकान्त जीवन जगत होता, त्याला खूप शक्तीही अवगत होत्या. दोन वर्षात तो निर्वाण प्राप्त करणारा असून, आपल्या गुरूच्या आदेशानुसार या अवधीत तो आपल्या शक्ति पुण्यवान व दयाळु लोकांना समर्पित करणार आहे. या कामासाठीच तो पायी निघालेला आहे. दमणुक अन् म्हातारपणामुळेच तो निर्मलाच्या घराच्या अंगणात बेशुद्ध पडला.



गावभरात वृद्धाबद्दलचे हे वर्णन सर्वांना थोड्याच वेळात समजले. काही गावकरी फळे-फुले घेअून त्याच्या दर्शनाला आले. एक दोन चांगल्या लोकांना त्याच्याशी बोलायचीही संधी मिळाली. त्यांच्यातलाच एक होता गौरीच्या घरासमोरचा माणूस गंगाधर. त्याच्यावर साधूची कृपादृष्टी झाली अन् त्याने गंगाधरला वचन दिले की, ''तुला मी एकाद्या शक्तीचं रहस्य सांगीन.''

ही गोष्ट गौरीच्या कानी पडली. प्रथम तिला निर्मलाचे वडील राम यांच्या घरी जायचा संकोच वाटला. परंतु साधूचे दर्शन घ्यायची तीव्र इच्छा असल्याने तिने त्यांच्या घरी जायचा निश्चय केला. तिला साधूला विनन्ती करायची होती की, त्याने आपल्या घरीही यावे. साधु घरी आला तर त्याची सेवा करून त्याच्याकडून एकादी शक्ती प्राप्त करून घ्यायचा तिचा बेत होता.

ज्यावेळी गौरी रामच्या घरी पोचली, तेंव्हा तिला साधूचे दर्शन होणार नाही असे कळले. कारण त्यावेळी तो निर्मलेला कोणतासा मन्त्रोपदेश देत होता. तिचा पिता राम याच्याकडून गौरीला कळले की, साधु तिला महालक्ष्मी-मंत्राचा अुपदेश देत आहे. या वर्षी एकदाच येणाऱ्या पौर्णिमायुक्त मूल नक्षत्रावर अन् तेही शुक्रवारी त्या मन्त्राचा अुच्चार आठ



वेळा केला, तर घरातल्या प्रत्येक कोपऱ्यात एकशे आठ सोन्याची नाणी अुपलब्ध होतील, असे त्याचे सामर्थ्य आहे.

हे ऐकल्याबरोबर 'निर्मलेलाच आपली सून करून घ्यावी' असा विचार गौरीच्या मनात आला. इतक्यात घरातला कार्यक्रम संपल्याचे कळल्याने गौरी आत गेली अन् तिने साधूला वाकून नमस्कार केला. नंतर तिने विनंती केली की, साधूने आपल्या घरी यावे.

पण साधु हसत म्हणाला, "आता ते शक्य होणार नाही. माझ्या गुरूची आज्ञा आहे की, मी एका जागी आठ दिवसांहून अधिक राहू नये. आता सहा महिन्यांनी, म्हणजेच येत्या श्रावणात निर्मला महालक्ष्मी मंत्र जपणार आहे. तिची मला आग्रहाची विनंती आहे, की मी तिचा गुरु असल्याने त्यावेळी नक्की हजर असावे, अन् माझ्या अध्यक्षतेखाली पूजेचा कार्यक्रम संपन्न व्हावा. त्यावेळी मी नक्की तुमच्या घरी येईन." पुन्हा एकदा साधूला विनयपूर्वक नमस्कार करत गौरी म्हणाली, "आपली कृपा स्वामी! माझी एक लहानशी इच्छा आहे."

"बोल, काय इच्छा आहे तुझी?" साधूने विचारले.

"आपली प्रिय शिष्या निर्मला, हिच्यावर लहानपणापासून फार प्रेम आहे माझं. तिला आपली सून करून घेण्याची फार इच्छा आहे माझी. पण तिचा बाप मला मान देत नाही." गौरी म्हणाली.

गौरीचे बोलणे ऐकून साधु थोडा वेळ डोळे मिटून गप्प राहिला. नन्तर तो म्हणाला, "गोपाळ हा तुझा एकुलता एक मुलगा असून हल्ली सरकारी कचेरीत काम करतोय. बरोबर ना?"

"होय स्वामी." गौरी आनन्दाने अुत्तरली.

बाहेर कसल्याशा कामात असलेल्या रामला साधूने आपल्याजवळ बोलावून म्हटले, "राम, या गौरीचा मुलगा फार चांगला अन् सद्गुणी आहे. तुझ्या निर्मलासाठी अगदी योग्य आहे तो."

राम हात जोडून म्हणाला, "आपली आज्ञा मला शिरोधार्य आहे स्वामी!"



एक महिन्याच्या आतच गोपाळ व निर्मला यांचा विवाह साजरा झाला. निर्मला आता आपल्या पतीकडे रहायला आली. आल्याबरोबर तिने मजूर लावून घराचे परसू साफ करून घेतले आणि तेथे विविध प्रकारचे भाजीपाल्याचे बी पेरले. परसाच्या एका कोपऱ्यात तिने एक गोठाही बनवून घेतला अन् दोन म्हशी खरेदी करून तेथे बांधल्या आणि ती दुधाचा व्यापारही करू लागली.

अशा प्रकारे चार महिन्यात दूध व भाजीपाल्याच्या विक्रीतून तिला भरपूर पैसे मिळाले. गौरीने त्यातून आपण पूर्वी इकडून - तिकडून घेतलेली कर्जे चुकवली. अन् आता तिच्याजवळ थोडेबहुत धनही जमले.



कसलाही मन्त्रतन्त्र न जपताच आपल्या सुनेने पैसे जमवलेले पाहून गौरी खुश झाली. परन्तु अजून तिला श्रावण महिन्याची वाट पहायची होती; कारण तेंव्हाच निर्मला महालक्ष्मी-मन्त्र जपून सारे घर सोन्याने भरून देणार होती.

श्रावण महिन्यात एके दिवशी भल्या पहाटेच करुणाकर साधु राम व गंगाधर यांना बरोबर घेऊन गौरीच्या घरी आला. त्याला नमस्कार करून ती त्याच्या रहाण्याची व्यवस्था करण्याच्या कामाला लागली. तेंव्हा साधु गौरीला म्हणाला, "गौरी, तुझं घर तर भाग्यानं प्रकाशित झालेलं दिसतंय! तुझ्या सुनेनं मन्त्र न जपताच महालक्ष्मीचं आगमन तुझ्या घरी झाल्यासारखं वाटतंय!" अन् असे बोलता बोलताच त्याने आपल्या चेहऱ्यावरच्या नकली दाढी-मिशा काढून टाकल्या.

ते पहाताच गौरी तर चक्रावूनच गेली! ती जोराने किंचाळली, "फसले मी!" अन् पुढे ती काही बोलणार तोच करुणाकरने तिला मधेच अडवत म्हटले, "मला शिव्या देण्यापूर्वी माझ्याकडे जरा निरखून बघ, अन् जमलं तर मला ओळखायचा प्रयत्न कर."

त्याच्याकडे निरखून पाहून अडखळतच 'आपण?' म्हणत तिने आपली मान खाली घातली.

तेंव्हा शांतिपूर्वक तो म्हातारा म्हणाला, "ओळखलंस ना मला?" अन् तिथे अुभ्या

असलेल्या गोपाळकडे वळून तो म्हणाला, ''काका आहे मी तुझ्या वडलांचा. त्या काळात गोवोगाव फिरून मी नाटकात अभिनय करत असे. माझ्या भावाला, म्हणजेच तुझ्या वडिलांना ते अजिबात पसंत नव्हतं; पण मीही आपली आवड सोडायला तयार नव्हतो. म्हणून घर सोडून मी दुसऱ्या गावी निघून गेलो. आपल्या म्हाताऱ्या सासू-सासऱ्यांना छळून छळून तुझ्या आईनं घराबाहेर काढलं. त्यावेळी त्यांच्याजवळ फुटकी कवडीसुद्धा नव्हती. ते माझ्याकडे आले अन् मी त्यांना मरेपर्यंत आश्रय दिला. मोठ्या सुखात राहिले ते माझ्याजवळ. पण शेवटच्या घटकेपर्यन्त पुत्रविरहाच्या दुःखात राहिले ते.'' बोलताना मधेच थांबून तो गौरीला विचारू लागला, ''माझ्या सांगण्यात कुठे काही चूक तर नाही ना?''

गौरीचा चेहरा आता पांढराफटक पडला! तिने लज्जेने डोके खाली घातले. नंतर तो पुन्हा गोपाळला म्हणाला, ''गंगाधर अन् या रामला सारी हकीकत माहीत आहे. तू निर्मलाशी लग्न करायचा निर्णय घेतल्यावर हे दोघं मला येऊन भेटले अन् त्यांनी मला ही साधूची भूमिका पार पाडायची विनन्ती केली. पुढे काय झालं, हे तुला माहीतच आहे. आता मला काही बोलयचं असेल तर तुझ्या आईशीच.'' तो गौरीला म्हणाला, ''तू आपल्या सासू सासऱ्यांना अतिशय छळलं होतंस. पण निर्मलेसारखी सून मिळून तू धन्य झाली आहेस. हे तुझं भाग्यच म्हणायला हवं. तिचे सद्गुण तुला कळावेत म्हणूनच मी हा सहा महिन्यांचा काळ ठरवला होता. आता तरी स्वतःला सुधार. सुधारली नाहीस, तर उद्या कदाचित निर्मला तुझ्याशी एके काळच्या गौरीसारखी वागेल.''

गौरीला आता आपल्या कृत्याचा पश्चात्ताप झाला. अश्रू ढाळत ती म्हणाली, ''मी किती मोठी चूक केली, हे आता मला उमगतंय. आपण म्हणालात त्याप्रमाणेच निर्मलासारखी सून मिळणं भाग्याचं आहे. या सहा महिन्यातच माझ्या घरात तिनं आमूलाग्र परिवर्तन घडवलंय. निर्मला खरोखरी महालक्ष्मीच आहे.''

गौरीचे हृदय-परिवर्तन पाहून सर्वांना आनन्द वाटला.





# अहंकार

खूप प्राचीन काळची गोष्ट आहे. शेखर नावाचा एक महर्षी विष्णूकडून वरप्राप्तीसाठी घोर तपस्या करत होता. त्याच्या तपस्येने प्रसन्न होऊन विष्णुभगवान लक्ष्मीसह प्रकट झाले. शेखरने दोघांनाही साष्टांग नमस्कार केला. विष्णु त्याला म्हणाले, ''बोल, कसला वर हवा तुला? तुला जे पाहिजे, ते आता आम्ही द्यालया तयार आहोत?''

परन्तु तपस्येची सुरुवात करताना शेखरने वराबद्दल काही ठरवले नव्हते. त्यामुळे विष्णु जेंव्हा तो द्यायला तयार झाले, तेंव्हा काय मागावे हे त्याला एकदम निश्चित करता येईना. त्याने अमळ विचार केला, पण काय मागावे हे त्याला कळेना.

त्याची गोंधळलेली अवस्था लक्षात घेऊन देवी लक्ष्मी म्हणाली, ''वत्सा, तुझ्या भक्तीने आम्ही प्रसन्न आहोत. तू आत्ताच ताबडतोब वर मागितला पाहिजेस, असं काही नाही. आम्ही एक महिन्याने पुन्हा इथे येऊ. या अवधीत नीट विचार करून ठेव अन् 'तुला काय पाहिजे' ते तेंव्हा सांग.''

लक्ष्मीच्या या बोलण्याने शेखरने स्वतःला सावरले. दुसऱ्याच क्षणी विष्णुलक्ष्मी अदृश्य झाले.

आपली तपस्या सफल झाल्याचा शेखरला असीम आनन्द वाटला. आश्रमात परत येऊन त्याने आपल्या शिष्यांना हा शुभ समाचार सांगितला.

गुरूच्या अमोघ तपोशक्तीचे शिष्यांना मोठे आश्चर्य वाटले. साक्षात् महाविष्णु प्रकट होऊनही त्यांनी वर मागितला नाही. या त्यागाची ते खूप प्रशंसा करू लागले. ते म्हणू लागले की, 'या चौदा भुवनांत आपल्या गुरुसारखा त्यागी अन् महाभक्त शोधूनही सापडणार नाही. आपण धन्य आहात गुरुजी!' या साऱ्या प्रशंसेमुळे शेखरच्या मनात अहंकार

**चान्दोबात पंचवीस वर्षांपूर्वी प्रकाशित झालेली गोष्ट.**











जागृत झाला. तो विचार करू लागला की, 'आजपासून आपल्याइतका श्रेष्ठ तपस्वी या पृथ्वीतलावर दुसरा कोणी नाहीच.'

नन्तर एकदा आपल्या शिष्यांसह गंगास्नानाला जाअून परत येत असता रैवत नावाच्या राजर्षींशी त्याची भेट झाली. त्याच्याबरोबर त्याची पत्नी आणि दहा अपत्ये होती. शेखरच्या शिष्यांच्या मनात आले, 'परिवाराच्या बंधनात बंदिस्त असणारा हा कसला राजर्षि ?' आपली ही शंका त्यांनी गुरूला विचारली. तेंव्हा अुत्तरादाखल शेखर म्हणाला, ''मलाही कळत नाहीय, की या रैवतला 'राजर्षी' कसं संबोधलं जातं? तो कसा या पदाला योग्य ठरतो? सर्व काही त्यागून अन् जंगलात फिरून कंदमुळं खात रहाण्यानं काय भगवंताचं दर्शन होईल? हे तर अशक्य आहे.'' त्याच्या या बोलण्यात एक प्रकारची चीड होती.

शेखर असे बोलला खरा; पण आपल्या अुत्तराने त्याचे स्वत:चेच समाधान झाले नाही. त्याने विचार केला की, आता पुन्हा महाविष्णुंचे दर्शन होईल, तेंव्हा त्यांनाच विचारून शंका निवारण करून घ्यावी. एक महिन्याचा अवधी संपताच महाविष्णु पुन्हा लक्ष्मीसह प्रकट झाले. शेखरने त्यांना रैवतबद्दल आपली शंका विचारली.

यावर हसून विष्णुभगवान म्हणाले, ''शेखर, माझ्याबद्दलची भक्ती हीच मुख्य गोष्ट आहे. मन निर्मळ नसेल, तर नुसता संन्यास ग्रहण करून काय अुपयोग? आपला संशय



पूर्णत: फेडून घ्यायचा असेल, तर एक काम कर. श्रीशैलगिरीच्या जवळ एक स्वर्ण-अग्रहार आहे; तेथे सुधर्म नामक एक माणूस आहे. त्याला जाअून भेट.'' अन् विष्णु अदृश्य झाले.

शेखर आपल्या शिष्यांसह श्रीशैलकडे निघाला. काही दिवसांच्या प्रवासानन्तर ते तेथे पोचले, व तेथील पाताळगंगेत स्नानासाठी गेले. स्नान करत असताना एका मगरीने शेखरचा पाय पकडला.

गुरुजींची स्थिती पाहून सारे शिष्य भयाने जोरजोरात ओरडू लागले. परन्तु शेखर मात्र न भिता त्या मगरीकडे तीव्र दृष्टीने एकटक पाहू लागला. त्याच्या तपोशक्तीमुळे मगर तडफडून मरून गेली. या घटनेने शेखरच्या अहंभावाचे प्रमाण जास्तच वाढले.

दोन दिवसांनंतर शेखर स्वर्णाग्रहारात पोचला. त्यावेळी सुधर्म घरी नव्हता. त्यावेळी सुधर्मची बायको दरवाजापाशी बसून एक जुनी-पुराणी फाटकी साडी शिवत होती. शेखरला पाहून तिने आपला पति येईपर्यंत त्याला बाहेरच्या कट्ट्यावर बसायला सांगितले.

त्या स्त्रीच्या या वागणुकीने शेखर फार क्रोधित झाला. त्याला असे वाटले की इथे एका महर्षीचा अपमान झालेला आहे. दरवाजाजवळ बसलेल्या सुधर्मच्या पत्नीकडे त्याने तीव्र नजर फेकली. पण ती मगरीप्रमाणे तडफडून मेली नाही, किंवा जमिनीवर पडलीही नाही!

यामुळे शेखरला आपल्या तपोशक्तीबद्दल काहीशी शंका आली. इतक्यात सुधर्म तेथे आला. अतिथींचे स्वागत करून तो त्यांना



घरात घेऊन गेला. थोड्याच वेळात त्याच्या बायकोने स्वयंपाक करून सर्वांना भोजन वाढले.

भोजन करण्यासाठी शेखर आसन लावून बसला. काही कारणाने जेवणाचे पदार्थ थंड होते. त्यामुळे तो नाराज झाला अन् व्यंगभरल्या सुरात म्हणाला, ''सुधर्म, पदार्थ गरम नाहीत.''

सुधर्मने शेखरच्या शब्दातले व्यंग ओळखले. तो म्हणाला, ''स्वामी, मी हातानं हे तालवृत्त चालवतो.'' अन् तो ते चालवू लागला.

काही मिनिटातच पानांवर वाढलेले सारे पदार्थ गरम झाले! शेखरला याचे मोठे आश्चर्य वाटले.

जेवण झाल्यावर तो जेंव्हा शिष्यांसह हात धुवायला विहिरीजवळ गेला, तेंव्हा आणखी एका घटनेने त्याच्या मनात खळबळ माजली. विहिरीच्या चक्रावर लटकलेली अर्धी दोरी अन् विहिरीत अर्ध्यावर लोंबत असलेली पाण्याने भरलेली बादली त्याला दिसली!

''पाणी काढत होते ना, तेंव्हा मधेच पतीनं मला बोलावलं, म्हणून भरलेली बादली अर्धवटच लटकती सोडून मी घरात गेले.'' तेथे आलेल्या सुधर्मच्या बायकोने हसत स्पष्टीकरण केले.

शेखरला तर अहंकार होता की, आपणापेक्षा मोठा तपस्वी कोणी नाहीच. त्याची तर अशी समजूत होती की कौटुंबिक गर्तेत पडलेल्या लोकांचे काही अस्तित्वच नाही. ते तर अगदी नसल्यातच जमा आहेत. पण या घटनेने त्याचा गर्व भंग झाला.

हात जोडून तो सुधर्मला म्हणाला- ''निर्मळ मनाने कुठेही राहून देवाची पूजा करता येते. अशा पवित्र लोकांना नक्कीच मोक्ष मिळतो. जंगलात राहून, कंदमुळं खाऊनच मोक्ष नाही मिळत. मोक्षप्राप्तीसाठी मन निर्मल अन् पवित्र असायला हवं. त्याशिवाय सारी तपस्या व्यर्थ आहे. असल्या तपस्व्यांसाठी मोक्षाचे दरवाजे उघडले जात नाहीत.''

अशा प्रकारे शेखरच्या मनातली शंका दूर झाली अन् त्याचा अहंकारही नष्ट झाला. त्या दिवसापासून तो निर्मळ मनाने देवाचे ध्यान करू लागला व त्याला मोक्षही मिळाला.



# बहुरूपा वसुन्धरा

## ग्रहणशक्ती

'रटल स्नेक' नावाचा साप सामान्यतः रात्रीच्या वेळी आपले भक्ष शोधायला जातो. त्या सापाचे डोळे आणि नाक यांच्यामधे भुयार असते. त्यामुळे त्याला उष्णतेचे ज्ञान होते. उष्णता स्पष्टपणे कळल्यामुळे तो आपले भक्ष्य सहजपणे पकडू शकतो.





## खूप मोठी जंगली मांजरे

दक्षिण अमेरिकेच्या जंगलात सापडणारी जामुनार ही मांजरे अमेरिकेतील सर्व जंगली मांजरांपेक्षा मोठी असतात. त्यांचे वजन जवळजवळ ३०० पौंड असते. चित्त्यापेक्षाही यांचे वजन अधिक असते. यांच्या शरीरावर पिवळे व वरील कातडीवर गोलाकार काळे डाग असतात.

## प्रथम उडू लागलेले कीटक

अशी समजूत आहे की जगात पतंग जवळ जवळ ३००,०००,००० वर्षांपूर्वी जन्मले. असेही मानले जाते की, या पहिल्या पहिल्या पतंगांनीच उडायला सुरुवात केली. काही पतंगांच्या पंखांची लांबी ७० सें.मीटर असते.





# चांदोबा

मार्च १९९५




| | | | |
|---|---|---|---|
| संपादकीय | ...७ | चांदोबा पुरवणी-७५ | ...३३ |
| हेल्मेट खोल यांचा विजय | ...९ | निरर्थक स्वार्थ | ...३७ |
| वसुली | ...१० | चान्दोबाच्या बातम्या | ...४४ |
| ''मी आणि आम्ही!'' | ...११ | महाभारत - ८ | ...४५ |
| भुवनसुंदरी - ४ | ...१७ | उदार रामचन्द्र | ...५३ |
| सोनारामची चूक | ...२४ | अति लोभाचा परिणाम | ...५८ |
| वेषांतर | ...२५ | बहुरूपा वसुन्धरा | ...६३ |
| ताजी मिठाई | ...३१ | फोटो जोडनावे चढाओढ | ...६५ |



**एक प्रत : ५.००**

**वार्षिक वर्गणी : ६०.००**


विश्व - समाचार

## हेल्मेट खोल यांचा विजय

**गे**ल्या १६ नोव्हेंबर रोजी जर्मनीत सार्वत्रिक निवडणूक झाली. चान्सलर हेल्मेट खोल चौथ्यांदा निवडणुकीत विजयी झाले. त्या वेळच्या पश्चिम जर्मनीत सन १९८२ मध्ये जी निवडणूक झाली, तीत पहिल्यांदा ते निवडून आले होते. १९९२ मध्ये पूर्व व पश्चिम जर्मनी यांच्या एकत्रीकरणानंतर पहिल्यांदा जी निवडणूक झाली तीत खोल यांचा तिसऱ्या वेळी जय झाला.

सन् १९९० मधे झालेल्या निवडणुकीत खोलच्या सत्तारूढ पक्षांना ५५ टक्के मते मिळाली होती. परंतु यावेळी भागीदार पक्षांच्या अपयशामुळे फार थोड्या मताधिक्याने त्यांनी निवडणूक जिंकली. त्यांना फक्त ४८.३ टक्के मतेच मिळाली. विरोधी पक्षांना मिळालेली मते होती ४८.१ टक्के. या परिस्थितीत खोल यांची सत्ता चार वर्षापर्यंत टिकेल की नाही याबाबत राजनैतिक अभ्यासकांना शंका वाटते. जर चार वर्षे त्यांची सत्ता टिकली तर माजी चान्सलर कोनार्ड अडिन्यूरचा उच्चांक ते मोडतील. त्यांनी सतत १४वर्षे शासन-सूत्रे सांभाळली होती.

जर्मनीतील लोकांची शासन-व्यवस्थेत बदल व्हावा अशी इच्छा नाही. म्हणून त्यांनी हेल्मेट खोलचा 'ख्रिश्चन डेमोक्रेटिक पक्ष' व त्याचे भागीदार 'बेवेरियन ख्रिश्चन पक्ष' व 'लिबरल डेमोक्रेटिक पक्ष' यांनाच पुन्हा निवडले. राजनैतिक अभ्यासकांना वाटतंय की याच उद्देशाने जनतेने यांना पुन्हा एकदा निवडले आहे. त्यांचं असं ही म्हणणं आहे की जनतेने शासकांना राज्य कारभाराची आणखी एकदा संधि दिली, पण अत्यंत अल्प मताधिक्याने! ही ही लक्षात घेण्यासारखी गोष्ट आहे.



प्रमुख विरोधी पक्ष 'सोशल डेमोक्रेट्स'ने आपल्या निवडणुकीच्या जाहिरनाम्यात घोषित केले होते की, जर त्यांना शासन-भार चालविण्याची संधि देण्यात आली तर ते जगातील विकसनशील देशांना देण्यात येणारे आर्थिक साह्य तावडतोब बंद करतील. 'मिनिस्ट्री ऑफ इकॉनामिक को-ऑपरेशन' द्वारा ही आर्थिक मदत दिली जाते. जर्मनीकडून आर्थिक साह्य मिळणाऱ्या देशात आपला भारत ही एक देश आहे. खोलच्या या विजयामुळे भारताला भविष्यात ही जर्मनीकडून आर्थिक मदत मिळत राहील.

सन् १९९० मध्ये चान्सलर हेल्मेट खोल यांना प्रतिष्ठाप्राप्त पं. जवाहरलाल नेहरू पुरस्कार मिळाला, ही गोष्ट चांदोबाच्या वाचकांना चांगली माहीत आहे. (जानेवरी १९९१ चा अंक)

# वसुली

**वी**रभद्र आणि नारायण गावाच्या मधे असलेल्या चबुतऱ्यावर बसून गप्पा मारत होते. इतक्यात माधव नावाचा एक माणूस धावतच तेथे आला, अन् म्हणू लागला, ''नारायणराव, माझ्यावर आलेल्या संकटातून तुम्हीच मला वाचवू शकाल. मला आत्ता ताबडतोब हजार रुपये हवे आहेत. दोन-तीन महिन्यात व्याजासह ते परत करीन मी.''

''तुझ्या प्रामाणिकपणाबद्दल मला काहीच शंका नाहीय. तरीही शेवटी पैशांचा प्रश्न आहे ना. कोणी प्रतिष्ठित माणूस तुझ्या प्रामाणिकपणाबद्दल शिफारस करत असेल, तर पैशांची व्यवस्था मी करू शकेन.'' असे म्हणत नारायणने वीरभद्रकडे पाहिले.

वीरभद्र ताबडतोब म्हणाला, ''माधवकडून वायदाला एकदोन दिवस उशीर होईलही कदाचित्, पण दिल्या शब्दाला तो नक्की जागेल. घेतलेली रक्कम तो परत नक्कीच करील. असंच समजा, की तुमची रक्कम तिजोरीत अगदी सुरक्षित आहे.''

त्याच दिवशी नारायणने माधवला हजार रुपये दिले. दुसऱ्या दिवशी पुन्हा नारायण अन् वीरभद्र गल्लीत भेटले असता, वीरभद्र नारायणला म्हणाला, ''त्या माधवच्या बाबतीत खूप सावध रहा बरं! त्याच्या मागे फिरता फिरता तुझ्या वहाणा झिजतील. सहजपणे पैसे परत करणाऱ्यांपैकी नव्हे तो!''

''मग काल त्याच्या प्रमाणिकपणाची शिफारस का केलीत तुम्ही?'' नारायणने विचारले.

''काय करू तरी मग! दोन वर्षांपूर्वी मी त्याला दोनशे रुपये दिले होते. ते परत मिळवण्यासाठी दुसरा कोणता उपायच नव्हता माझ्याकडे. काल संध्याकाळी तुम्ही दिलेले पैसे घेऊन जात असतानाच वाटेत पकडलं मी त्याला, अन् माझे दोनशे व्याजासुद्धा वसूल केले मी!'' असे म्हणत वीरभद्र तेथून निघून गेला.





# ''मी आणि आम्ही!''

**रं**गापुर मध्ये माधव नावाचा एक युवक रहात असे. बालवयातच त्याने अनेक शास्त्र-ग्रंथ व काव्य यांचे अध्ययन केले. लोकांनी कोणता ही प्रश्न विचारला तर तो तत्काळ त्याचे उत्तर देई व त्याचा शास्त्रीय आधार सांगे. त्याचे प्रत्येक विधान शास्त्राधिष्ठित व शास्त्र-संमत असे. हळू हळू माधवच्या मनात गर्व उत्पन्न झाला.

एकदा एक तेजस्वी संन्यासी रंगापुर मधे आला. गावकऱ्यांनी त्याचे स्वागत केले. त्याचे उपदेश लोकांनी ध्यानपूर्वक ऐकले.

संन्याशाची प्रशंसा ऐकून माधवच्या मनात ईर्ष्या जागृत झाली. त्याला वाटले की आपले शास्त्रांचे ज्ञान याच्यापेक्षा खूपच जास्त आहे.

एके दिवशी माधव संन्याशाला भेटला आणि म्हणाला - ''स्वामीजी, आपण कोण-कोणत्या ग्रंथांचं कितपत अध्ययन केलंय?''

''माझ्या लहानपणी आई-वडिलांनी खूप प्रयत्न केला, पण मी काही शिकलो नाही. मी कोणत्या ही ग्रंथाचे अध्ययन केले नाही.'' संन्याशाने सत्य सांगून टाकले.

''मग आपण लोकांना एवढे उपदेश कसे देऊ शकता?'' माधवने व्यंगपूर्वक प्रश्न विचारला.

शांतिपूर्वक संन्यासी म्हणाला - ''बेटा, सगळंच काही ग्रंथात लिहिलेलं नसतं. मला जे अनुभव मिळाले, तेच मी लोकांना सांगतो.''

माधवने विचारले - ''आपण आपल्या प्रवचनातून जे सांगता त्याहून ही किती अधिक विषय या ग्रंथात मांडलेले आहेत. तेव्हा हे ग्रंथ वाचून अधिक ज्ञान मिळेल की आपली प्रवचने ऐकून?''

संन्यासी म्हणाला - ''केव्हा ही ग्रंथ वाचूनच अधिक फायदा होईल.''

**प्रभाकर सातारकर**



"मी हे सारे ग्रंथ वाचून, त्यातील ज्ञान आत्मसात् केले आहे. परंतु ज्ञानी असलो, तरी गावकरी आपला आदर करतात, माझा करीत नाहीत.

"तू त्यांच्याकडे लक्ष न दिलेले बरे. सुशिक्षित असणं माणसाचं भाग्य होय हे तू लक्षात घे." संन्याशाने आपली भूमिका माधवला समजावली.

अमळ चिडून माधव म्हणाला - "आपण माझ्यापेक्षा कमी शिकलेले आहात. म्हणून आपण मला सल्ला देण्याची जरूर नाही. आपली इच्छा असेल तर माझ्याशी चर्चा करा, वादविवाद करा. मी आपणास हारवीन याबाबत माझी खात्री आहे. यामुळे लोकांच्या मनात माझ्याबद्दल आदर-भावना वाढेल."

"मी शिकलेलो नाही, तरी पण तुझ्या बाबत एक गोष्ट माझ्या लक्षात आलेली आहे. शास्त्रांचं अध्ययन करून तू जे ज्ञान मिळवलंस, ते तू नीट पचवलेलं नाहीस. तू एकाद्या गुरूच्या मार्गदर्शनाखाली अध्ययन कर, म्हणजे तुझ्या मनात शांति नांदेल." संन्यासी हसत म्हणाला.

माधव नाराज झाला. तेथे हजर असलेल्या गावकऱ्यांसमोर त्याचा अपमान झाला असे त्याला वाटले. दोघांचा वादविवाद चालू होता, तेव्हा काही गावकरी तेथे उपस्थित होते. म्हणून जरा तोऱ्यात त्याने संन्याशाला विचारले - "आपण अनेक प्रांतात फिरला आहात. माझ्यासारख्या शिष्यांचा गुरु बनण्यायोग्य असा कोणी माणूस आपण सुचवू शकाल?"

"अवश्य. मेघनाथ नावाचे एक पंडित आहेत. ते महान् कवि ही आहेत. ठिकठिकाणी जाऊन ते आपल्या कविता लोकांना ऐकवतात. असे करण्यात त्यांचा उद्देश असतो की आपल्याला आपल्या कवितेतील दोष कळावेत. आजपर्यंत त्यांच्या काव्यातील दोष कोणी दाखवून दिलेले नाहीत. एकाद्या दिवशी ते या गावात ही येतील." तेव्हांपासून माधव मेघनाथांची प्रतीक्षा करू लागला.

एक दिवशी आपली पत्नी व मुलांसह मेघनाथ रंगापुरला आले. मेघनाथांनी गावकऱ्यांना आपल्या काही कविता वाचून दाखविल्या.



ती एका संन्याशाची गोष्ट होती. लिहिण्या-वाचण्याची आवड नसल्यामुळे राम नावाचा एक तरुण संन्याशांच्या मंडळात ये-जा करू लागला. संन्याशांच्या सहवासात राहून तो स्वतः संन्यासी बनला आणि सामान्य सुशिक्षित लोकांपेक्षा अधिक शिक्षित झाला, पंडित झाला.

मेघनाथने मोठ्या अद्भुत रूपाने काव्य-रचना केली होती. त्यातील प्रत्येक ओळ मोठी अर्थपूर्ण होती. गावकऱ्यांनी मेघनाथच्या प्रतिभेची प्रशंसा केली. तेव्हा माधव उठून बोलला - "आपल्या काव्यामुळे मला एक धोका दिसतोय. काही विशेष अध्ययन न करताच कोणी मोठा झाला, ज्ञानी झाला तर प्रत्येक माणूस संन्याशी होऊ इच्छील. मग लोकांना खायला अन्न मिळणार नाही, वा रहायला घर मिळणार नाही. अशी कठिण परिस्थिति निर्माण होईल की लोकांना अंगावर घालायला कपडा ही मिळणार नाही."

यावर मेघनाथ हसून म्हणाले - "मनुष्य पण एक प्राणी आहे. जगातील सर्व प्राणी कोठे कपडे घालतात? घरं बांधून राहतात? शेती-वाडी करतात?"

"मग काय तुम्हाला असं म्हणायचंय की मनुष्याने पण इतर प्राण्यांसारखे रहावे?" माधवने प्रश्न केला. यावर सर्व गावकरी खदखदा हसू लागले.

"मनुष्य हा एक सामाजिक प्राणी आहे. इच्छा असली तरी सामान्य प्राणी-सृष्टीतील



एक प्राणी तो बनू शकणार नाही. म्हणूनच मनुष्याला भोजन, कपडा, घर इत्यादींची समस्या नाही." मेघनाथच्या बोलण्यावर खुश होऊन गावकऱ्यांनी टाळ्या वाजविल्या.

माधवचा चेहरा पांढरा पडला, तरी पण आपला पराभव मानायला तो तयार नव्हता. तो म्हणाला - "जर आपण म्हणता त्यावर आपला विश्वास असेल, तर आपण त्याची अंमल-बजावणी करा, तसं प्रत्यक्ष आचरण करा. आपण संन्यासी असूनही आपल्या रचलेल्या काव्याचे मूल्य आपण जाणता असं आपल्याला म्हणायचंय?"

"या विषयावर मी खूप मनन-चिंतन केले आहे. मी संन्यासी आहे म्हणून पत्नी व मुलांना



सोडून जावं असं मला वाटत नाही. काही सोडायचं असेल तर अहंकार, कीर्तीची लालसा नि स्वार्थ!'' मेघनाथांनी माधवला समजावले.

उत्तर देत माधव म्हणाला - ''मग नवीन काव्यांची रचना आपण कशासाठी करता? कविता लिहून आपल्याला प्रसिद्धि मिळावी, सर्वत्र आपले गुण-गान व्हावे, अशी आपली इच्छा असतेच ना? यावरून हे सिद्ध होत नाही का की आपण स्वार्थी आहात? आपल्या पूर्वी ही अनेक कवींनी काव्य-रचना केली होती. ठिकठिकाणी जाऊन आपण अन्य कवींच्या कविता लोकांना का ऐकवीत नाही? मला वाटतं कीर्तीच्या मागे लागूनच आपण आपल्या काव्याचा हा प्रचार करीत आहात.''

मेघनाथांवर या बोलण्याचा काही ही परिणाम झाला नाही. ते शांतपणे म्हणाले - ''मी ज्या कविता करतो, त्यावर कवीचे नाव न लिहिणे हे एक असत्य आहे. श्रीरामचन्द्रांनी दुसऱ्या कोणाच्या नावावर राज्य चालविले अथवा कालिदासाने आपल्या काव्यावर कवि म्हणून दुसऱ्या कोणाचे नाव घातले तर ते असत्यच नाही का? त्यांची गणना अशा लोकात झाली असती, ज्यांनी नव्या पिढीला खोटं सांगितलं, सत्यापासून वंचित ठेवलं! इतिहासाबद्दल आम्हाला आस्था आहे, म्हणून आम्ही काव्यात आपल्या नावाचा उल्लेख करतो. आता राहिली प्रचाराची गोष्ट. जर आम्ही कवींनी आपले काव्य एकाद्या राजाला समर्पित केले तर तो आम्हाला एक लाख अशर्फ्यांचा पुरस्कार देईल आणि आमचे नाव सर्वत्र गाजेल. आम्हाला प्रसिद्धीची हाव नाही, म्हणून आम्ही ठिक-ठिकाणी जाऊन काव्य-पाठ करतो, आणि जनतेची विवेक-बुद्धि जागृत करतो, त्यांची बुद्धि तीक्ष्ण करतो. केवळ कीर्ति प्राप्त करण्यासाठी गावोगाव सपरिवार हिंडत राहणे हे मोठ्या कष्टाचे काम आहे. कारण यात अर्थ-प्राप्तीची आशा नाहीच. तर मग नवीन कविता करण्याची आवश्यकताच काय असा प्रश्न तू विचारशील! सृष्टीच्या प्रारंभी माणूस नग्नच रहात असे. नंतर त्याने वल्कलांनी आपले शरीर झाकले. आता तर आम्ही रेशमी वस्त्रे ही परिधान करतो. कालमानानुसार जसा वस्त्र



प्रावरणात बदल झाला, त्याच प्रमाणे मनुष्याची अभिरुचि बदलली, जीवनाकडे पाहण्याचा त्याचा दृष्टिकोण बदलला. त्यानुसार नवीन कवींनी नव्या काव्याची रचना केली. नवीन काव्यांची रचना का व्हावी हे जाणण्याची तुझी इच्छा असेल तर तुला स्वतःला कवि बनायला हवं. अथवा आमच्या सारख्यांचे काव्य वाचले पाहिजे.''

मेघनाथांचे सारे विवरण ऐकून माधवला मोठे आश्चर्य वाटले. बऱ्याच गोष्टींचे इतके विश्लेषणात्मक अध्ययन आजपर्यंत त्याने केले नव्हते. एकाद्या विषयाचे इतक्या निरनिराळ्या दृष्टिकोणातून चिंतन करता येते हे त्याला माहीत नव्हते. मेघनाथ निःसंशय एक असामान्य व्यक्ति आहेत हे त्याला पटलं. तरी पण आणखी काही प्रश्न विचारून गावकऱ्यांपुढे आपल्या बुद्धीचं प्रदर्शन करण्याची त्याची इच्छा होती.

मेघनाथांनी जेव्हा काही निवेदनकेले तेव्हा त्यांनी स्वतःबद्दल 'मीच्या ऐवजी आम्ही' चा उपयोग केला. 'मी'त विनय दिसतो, तर 'आम्ही'त अहंकार ! याचा अर्थ असा की मेघनाथ अहंकारी आहेत. म्हणून माधव बोलू इच्छित होता की, ''कदाचित् स्वार्थ व यशाची आकांक्षा आपणास नसेल, पण अहंकार आपणात पुरेपूर भरलेला आहे.'' पण त्याने आपल्याला ताब्यात ठेवले. त्याला वाटले, आपण असे विधान करणे योग्य होणार नाही. कदाचित् गावकरी आपला धिक्कार करतील.



म्हणून विचारपूर्वक विधान करणे त्याला उचित वाटले. आपल्या चतुर बोलण्याने मेघनाथांची त्याला थट्टा करायची होती. आपले दोन्ही हात जोडून विनयपूर्वक तो मेघनाथांना उद्देशून म्हणाला - ''आपण सामान्य व्यक्ति नाही, आपण असामान्य महात्मा आहात! आपल्याला ना स्वार्थाची आकांक्षा ना कीर्तीची! परंतु जेव्हा-जेव्हा आपण काव्याबाबत बोलता तेव्हा-तेव्हा स्वतःला 'आम्ही' असे संबोधता. आपण म्हणता - 'आम्ही' कविता-रचना केली, 'आम्ही' असं सांगतो इ. सामान्य लोक याला आपला अहंकार म्हणू शकतील. मी नाही हं म्हणत तसं. पण माझी एक शंका आहे. आपण एक नाही, दोन वा तीन आहात, म्हणून

आपल्याबद्दल आपण 'आम्ही' म्हणता.

जरा ही नाराजी न दाखविता मेघनाथ यावर उत्तरले - "होय बेटा, सरस्वतीचा आशीर्वाद प्राप्त झालेली मेधावती माझी पत्नी आहे आणि मी याला आपले भाग्य समजतो. माझं खरं नाव आहे रंगनाथ. आम्ही दोघे मिळून काव्य-रचना करतो. दोन्ही नावं जोडली की मेघनाथ शब्द तयार होतो. तेव्हा खरंचच मेघनाथ एक नाही, दोन आहेत!"

माधवला फार आश्चर्य वाटले. हात जोडून तो मेघनाथांना म्हणाला - "मला क्षमा करा स्वामीजी!"

हंसत मेघनाथ म्हणाले - "क्षमा मागावी लागेल अशा परिस्थितीत तू कधी पडत जाऊ नकोस. जर तुझी आकाशावर थुंकायची इच्छा असेल, तर खुशाल थुंक. त्याने आकाशाचे काय बिघडेल? पुन्हा असे कधी करू नकोस."

एवढं झाल्यावर ही माधवच्याने गप्प बसवेना. त्याने विचारले - "समजा, मी चूक केली-कबूल. पण आपण आपली तुलना आकाशाशी करीत आहात. हा अहंकारच नाही तर काय?"

"मी आकाश नाही. केवळ ईर्ष्या व अज्ञानामुळे तुझी माझा अपमान करायची इच्छा आहे, यामुळे तुझेच पतन झाले, उत्थान नाही. तुझ्या या प्रयत्नामुळे मी आकाश बनलो. यात माझा काहीच मोठेपणा नाही. जो माणूस अकारण दुसऱ्याचा अपमान करू चाहतो, त्याचा स्वतःचा अपमान होतो आणि दुसरा माणूस आकाशा एवढा विशाल व विस्तृत होतो." मेघनाथांनी आपला दृष्टिकोण स्पष्ट मांडला.

माधवने आपला पराभव कबूल केला. त्याचा अहंकार दूर झाला. त्याचा गर्व पूर्ण नाहीसा झाला. तो मेघनाथांच्या पायी पडला आणि त्यांना प्रार्थना केली - 'मला आपला शिष्य बनवा.' मेघनाथांनी ही विनंती आनंदाने मान्य केली.

मेघनाथांचा शिष्य झाल्यावर माधवची बुद्धि व ज्ञान यांचा विकास झाला. त्याचा अहंकार नाहीसा झाला. तो आपल्या ज्ञानाचा सदुपयोग करू लागला.





# भुवनसुंदरी

## ४

(मोहनने भुवनसुंदरीला पळवून नेले. ग्रीक राजाला यासाठी युद्ध व्हावे, हे अुचित वाटत नव्हते. त्यांनी समजावणीसाठी दूत पाठवला. परन्तु हा प्रयत्न सफल झाला नाही. तेंव्हा भुवनसुंदरीचा पती प्रताप याने ग्रीसमधील सार्‍या राजकुमारांना ट्रॉयवर हल्ला करण्यासाठी मदत करण्याचे आव्हान दिले. त्या सर्वांना एकत्र आणण्यासाठी त्याला फार प्रयत्न करावे लागले. रूपधरने आपल्याला वेड लागल्याचे नाटक केले, तर वज्रकाय स्त्री वेषात राजाच्या अन्तःपुरात लपून बसला. इतके सारे घडूनही शेवटी ग्रीक सेना युद्धासाठी तयार झाली आणि ट्रॉय नगरात पोचली.) -

ग्रीक नौकेवरून तटावर अुतरणारी पहिली व्यक्ति होती चन्द्रप्रभु अन् दुसरी होती वज्रकाय. त्यांच्या पाठोपाठ ग्रीसचे सैन्य अुतरले आणि युद्धासाठी सन्नद्ध झाले.

ट्रोजन सैन्यात मराल नावाचा एक वीर होता. त्याला तलवारीच्या वाराने किंवा बर्छी भोसकण्यानेही मृत्यु न येण्याचे वरदान होते. या मरालने पहिल्या दिवसाच्या युद्धातच कित्येक ग्रीक योद्धयांना यमसदनास पाठवले. वज्रकाय अन् मराल समोरासमोर आले, तेंव्हा त्यांच्यात घनघोर युद्ध झाले. खूप वेळ ते लढले, पण मराल हरला नाही. परन्तु लढाईच्या भरात धक्क्याने मराल जेंव्हा खाली पडला, तेंव्हा वज्रकायने त्याच्यावर झडप मारली अन् तो मरालच्या छातीवर बसला. वज्रकायने मरालचा गळा आवळून त्याला ठार मारले.

मराल मेल्याबरोबर ट्रोजन सैन्य घाबरून सैरावैरा पळू लागले व शेवटी पाठ फिरवून ट्रॉय



शहराकडे पळून गेले. यानन्तर ग्रीकांनी आपल्या नौका समुद्रतटावरील एका सुरक्षित ठिकाणी बांधून ठेवल्या आणि ट्रॉय नगराच्या तटाबाहेर वेढा देऊन ते थांबून राहिले. हा वेढा दहा वर्षे तसाच राहिला. पहिल्या नऊ वर्षात विशेष अशी लढाई झालीच नाही. परन्तु अन्य काही महत्त्वाच्या घटना घडल्या.

ट्रॉयचा राजा वर्धन याला दोन राण्या होत्या. मोहनची आई ही त्याची दुसरी पत्नी होती. वर्धनच्या पन्नास पुत्रांपैकी एकोणीस तर तिच्याच पोटी जन्मले होते. त्यांच्यात सर्वात मोठा होता वीरसिंह. त्याच्या पुत्रांच्यात एकाचे नाव इलीय असे होते. ज्योतिष्यांनी असे सांगितले होते की, 'इलीय वीस वर्षांचा होईपर्यन्त नगरावर कोणी विजय मिळवू शकणार नाही.'

वज्रकायने असे ठरवले की, 'काहीही करून या इलीयला मारून टाकायला हवे.' एके दिवशी इलीय मन्दिराच्या प्रांगणात घोड्यावरून फिरत असताना वज्रकायने त्याच्यावर हल्ला करून बर्ची भोसकून त्याला मारून टाकले. इलीयच्या मरणामुळे ट्रॉयचे नागरिक फार दु:खी झाले.

वर्धनच्या पुत्रांमधे एक वृकाक्ष नावाचा पुत्र होता. तो बगीच्यातल्या झाडांच्या फांद्या तोडून रथाच्या चाकांसाठी आवश्यक असे लाकूड तासत असताना वज्रकाय लपतछपत नगरात गेला अन् वृकाक्ष काम करत असलेल्या बगीच्यात पोचला. वज्रकायने वृकाक्षला पकडले, अन् शिबिरात घेऊन गेला.

या कैद्याचे काय करावे, याबद्दल ग्रीक नेते काही निर्णय घेऊ शकेनात. शेवटी त्यांनी त्याला 'गुलाम' म्हणून एका राजाला विकून टाकले. या राजाच्या दरबाऱ्यांपैकी एकाला त्याच्याबद्दल सहानुभूती वाटून त्याने धन देऊन त्याला राजाकडून विकत घेतले अन् त्याला गुलामीतून मुक्त केले. वृकाक्ष मुक्त होऊन परत ट्रॉय शहराकडे जात असता वज्रकायने त्याला पाहिले, अन् जागच्या जागीच मारून टाकले.

वज्रकायने अशा प्रकारची अनेक घातपाती कृत्ये केली. युद्ध तर चालू नव्हतेच. ग्रीक सैनिकांना काही कामही नव्हते. म्हणून वज्रकायने ग्रीक सैनिकांची एक तुकडी बरोबर घेऊन आसपासच्या प्रान्तात लुटालूट सुरू केली. हे लोक जेंव्हा ऐडा पर्वतावर पोचले, तेंव्हा त्यांना प्रशंसन नावाचा एक माणूस भेटला.

प्रशंसन हा मोहनच्याच वंशातला होता. भुवनसुंदरीला पळवून आणण्यासाठी मोहन स्पार्टा शहरात गेला असताना, प्रशंसनही त्याच्याबरोबर होता. त्यावेळी त्याने मोहनला खूपच मदत केली होती. तरीही भुवनसुन्दरीवरून ग्रीक व ट्रोजन्स मधे युद्ध सुरू झाले, तरी प्रशंसन तटस्थ राहिला होता. युद्धात त्याने स्वत: भाग घेतला नाही.

प्रशंसन या काळात गुराख्यांबरोबर ऐडा पर्वतात रहात असताना वज्रकाय व त्याचे सैनिक तेथे पोचले. वज्रकायच्या सामर्थ्यासमोर ते टिकू शकले नाहीत, त्यामुळे प्रशंसन पर्वत अुतरून पळून गेला. पण वज्रकायने त्याचे गुराखी मारून टाकून पशुसंपदा आपल्या ताब्यात घेतली. प्रशंसन हा एक अुत्तम योद्धा होता. एरव्ही वज्रकाय कोणाचीही पर्वा करत नसे, पण प्रशंसनचे सामर्थ्य तोही जाणून असल्यामुळे तो प्रशंसनबाबत जागरूक होता. आता राहिला ट्रोजन सैनिकांचा विचार. हे सैनिक आपल्या पक्षाच्या वीरसिंहला जितके मानत असत, तितकेच प्रशंसनलाही मानत असत. त्यांच्या मनात तितकाच आदरभाव होता.





वज्रकायने प्रशंसनच्या गुराख्यांचा नाश केल्यावर मात्र त्याला तटस्थ रहाणे अशक्य झाले, अन् तो आपल्या सैन्यासह ट्रॉय शहरात पोचला व युद्धासाठी कटिबद्ध झाला. या युद्धात प्रशंसन अनेकदा जखमी झाला, पण प्रत्येक वेळी तो मरता मरता वाचला.

या युद्धात प्रशंसनचा मृत्यु लिहिलेला नव्हता. उलट 'त्याचे वंशज भविष्यात ट्रॉयचे राजा बनतील' असे लिहिलेले होते.

ट्रॉयशी मैत्रीसंबंध असलेली अन्य अनेक शहरेही होती. त्यांच्यातील अनेकांना वज्रकायने हरवून आपल्या ताब्यात घेतले. जी शहरे त्याने ताब्यात घेतली, त्यात वीरसिंहच्या सासऱ्याचे शहरही होते. हा सासरा व त्याचे सातही पुत्र युद्धात मारले गेले.

इकडे ग्रीकांच्या शिबिरांतही काही भयानक घटना घडल्या. त्यातील एक अशी - एकदा ग्रीक सम्राटाने रूपधरला बोलावून म्हटले, ''काही नौका घेऊन जाऊन त्यात धान्य भरून घेऊन ये.'' या आज्ञेनुसार रूपधर धान्य आणायला गेला, परन्तु रिकाम्या हातांनीच तो परत आला.

ग्रीक वीरांपैकी एक प्रबोध नावाचा वीर रूपधरला म्हणाला, ''तू आळशी अन् भित्रा आहेस, म्हणून रिकाम्या हातांनी परत फिरलास.''

''माझ्या हातून काहीही चूक झालेली नाहीय. मला कुठेच धान्य मिळू शकलं नाही. माझ्याऐवजी राजाने तुला पाठवलं असतं, तर तूही असाच परत फिरला असतास.'' रूपधर त्याला म्हणाला.

प्रबोधला राग आला, अन् जणू आव्हान स्वीकारत तो तावडतोब एक नौका घेऊन निघाला, अन् खरोखरच ती भरून धान्य घेऊन तो परत आला. रूपधरचा अशा तऱ्हेने पराभव झाल्यामुळे त्याच्या मनात प्रबोधचा सूड घेण्याची भावना जागी झाली. त्याला आपला हा मोठाच अपमान झाल्यासारखे वाटत होते. रूपधरने एक कारस्थान रचले अन् त्याने एक दिवस ग्रीक सम्राटाकडे निरोप पाठवला की, ''काल रात्री माझ्या स्वप्नात देवाने दर्शन देऊन असे सांगितले की आपल्या शिबिरात फार मोठ्या प्रमाणात बंड होणार आहे. मला सावधान करत देवाने असे सांगितले की - एक दिवस आणि एक रात्रीपुरती आपल्याला आपल्या शिबिराची जागा बदलायला हवी.''

रूपधरची चेतावणी राजाने अमलात आणली. सर्वच ग्रीकांनी आपापली शिबिरे सोडली अन् पूर्ण एक दिवस व एक रात्र ते सारेजण अन्यत्र जाऊन राहिले. शिबिरे जेंव्हा अगदी ओस पडली, तेंव्हा रूपधर लपतछपत प्रबोधच्या शिबिरात घुसला व त्याने त्याच्या तंबूत अशर्फ्यांची एक थैली लपवून ठेवली.

या नन्तर एका युद्धकैद्याला हाताशी धरून रूपधरने जबरदस्तीने त्याच्याकडून एक असे पत्र लिहवून घेतले की, जणू ते वर्धनने प्रबोधच्या नावे लिहिले आहे. त्या पत्रात असे लिहिलेले होते. - ''ग्रीकांच्या विरुद्ध फितुरी करण्यासाठी तू जे सोने मागितले होतेस, ते मी पाठवत आहे.''

ते पत्र प्रबोधकडे पोचवण्याची आज्ञा रूपधरने युद्धकैद्याला दिली. तो कैदी प्रबोधकडे पोचण्यापूर्वी रूपधरने आपल्या माणसांकरवी त्याला मारून टाकले.

दुसऱ्या दिवशी सकाळी आपापल्या पहिल्या शिबिरांकडे परतत असताना ग्रीकांना शिबिराबाहेर पडलेले युद्धकैद्याचे प्रेत दिसले. त्याच्याजवळचे पत्रही त्यांच्या हाती लागले. त्यातला मजकूर वाचून विषय गंभीर असल्याचे त्यांनी जाणले. अन् ते परत सम्राटाकडे पोचवले.



पत्र वाचून सम्राटाने प्रबोधला चौकशीसाठी बोलावून घेतले. त्याने प्रबोधला त्याच्यावरील आरोप सांगून त्याच्याकडे वर्धनचे पत्र कसे पाठवले गेले, याबद्दल विचारणा केली. प्रबोधने आपण देशद्रोही नसल्याचे सांगून वर्धनने किंवा त्याच्या कोणा माणसाने आपल्याला कधीही सोने वगैरे न दिल्याचे शपथेवर सांगितले.

परन्तु रूपधरने मुद्दा काढला की प्रबोधच्या शिबिराची झडती घेतली की सत्य आपोआपच कळून चुकेल.

शिबिराची झडती घेतली असता प्रबोधच्या शिबिरात अशर्फ्या सापडल्या व त्याला द्रोही ठरवण्यात आले. सर्वच सैनिक ओरडू लागले

की - 'अशा फितुराला दगडांनी ठेचून यमसदनाला पाठवावे.' शेवटी याच पद्धतीने ग्रीकांनी प्रबोधवर दगडांचा मारा केला. मार खाता खाता प्रबोध ओरडत राहिला की, "हे सत्य, आज माझ्या डोळ्यांसमोर तुझा मृत्यु घडून येत आहे!"

वास्तविक प्रबोधला दिलेली शिक्षा सर्वच दृष्टींनी चुकीची होती. तो स्वतः निर्दोषी तर होताच, पण शिवाय तो अत्यंत पराक्रमी आणि प्रतिभावान होता. ट्रॉय नगराला वेढा घालून बसलेल्या सैनिकांच्या मनोरंजनासाठी त्याने 'फाशांचा खेळ' शोधून काढला, स्वतः फासे तयार केले. आणखीही कित्येक नवीन वस्तु त्याने स्वतः बनवल्या. दीपस्तंभाची आवश्यकता जाणून त्यानेच दीपस्तंभाचा शोध लावला. सैनिक शिबिरे आणि अन्य महत्त्वाच्या ठिकाणी पहारा देण्याच्या पद्धतीचे नियम त्यानेच बनवले. अशा कित्येक गोष्टींसाठी ग्रीक त्याचे खरोखर ऋणी होते.

ग्रीसमधे रहाणाऱ्या प्रबोधच्या पित्याला आपल्या पुत्राची मृत्यु-वार्ता मिळताच तो ट्रॉयकडे निघाला अन् तेथे पोचताच त्याने सम्राटाला विचारणा केली की, "माझा पुत्र कशासाठी मारला गेला? तो द्रोही असल्याचे तुम्ही कसे काय सिद्ध केले?"

परन्तु सम्राटाने आपली कैफियत द्यायचे नाकारले. आतापर्यन्त खरे तर त्याला कळून चुकले होते की रूपधरनेच सूड अुगवण्यासाठी हे कारस्थान रचले होते. परन्तु त्याच्या मनात रूपधरबद्दल आदर असल्याने त्याने प्रबोधच्या पित्याला अुत्तर देण्याचे नाकारले.

प्रबोधचा पिता ज्या कामासाठी ट्रॉयला गेला होता, ते तर असफल झाले. तो ग्रीसला परतला, पण तेथे त्याने ट्रॉयला गेलेल्या साऱ्या ग्रीकांच्या पत्नींना संबोधून सांगितले की, "तुमचे पती ट्रॉयच्या कोणा ना कोणा मुलीशी विवाह करून आपल्या बरोबर त्यांना परत घेऊन येत आहेत. अन् पुढे त्याच मुली त्यांच्या राण्या बनून रहाणार आहेत." त्याच्या या वक्तव्यात सत्य तर नव्हतेच; परन्तु अनेक ग्रीक धर्मपत्नींनी ही बातमी अैकून आत्महत्या केली.

क्रमशः



# सोनारामची चूक

हेलापुरीचा रहिवासी सोनाराम हा चांगला धनवान माणूस होता. व्यापार मुलांच्या हाती सोपवून तो आपल्या चार मजली हवेलीत आरामात आपले दिवस घालवू लागला.

एके दिवशी सोनाराम हवेलीच्या दुसऱ्या मजल्याच्या व्हरांड्याच्या भिंतीवरून खाली पडून जखमी झाला अन् वैद्य घरी येऊन त्याच्यावर इलाज करू लागला. त्याचा मित्र माधव याला अपघाताची बातमी कळली.

माधव सोनारामला भेटायला आला. मित्राच्या तब्येतीची चौकशी केल्यावर माधवने विचारले, ''इतका कसा बेसावध झालास? अडीच-तीन फुटी भिंतीवरून खाली पडलासच कसा तू? आश्चर्य वाटतंय मला!''

''अरे काय सांगू माधव? जे काही घडलंय, त्याचं फार वाईट वाटतंय मला, अन् आश्चर्यही! रात्रीचं जेवण झालं की रोज पान खातो मी, तुला माहीतच आहे. काही वेळानं भिंतीपलीकडे ते थुंकून येऊन खाटेवर झोपतो. हा तर माझा रोजचाच कार्यक्रम आहे. पण हा अपघात झाला, तेंव्हा मी काही विचारात गुंगलो होतो. त्यामुळे अनवधानानं मी खाटेवर थुंकलो अन् झोपण्यासाठी व्हरांड्याच्या भिंतीवर अंग टाकलं!'' वेदनेने कण्हत सोनाराम उत्तरला.

हे ऐकून माधव जोरजोरात हसत सुटला! आपल्या हसण्याबद्दल मित्राला वाईट वाटेल, याचे भानही त्याला राहिले नाही!



# वेषांतर

दृढनिश्चयी विक्रमादित्य पुन्हा झाडाजवळ आला. त्याने झाडावरून प्रेत खाली काढले, आणि तो स्मशानाची वाट चालू लागला. हा माणूस आहे, अथवा एकादी अलौकिक शक्ति! हे वेताळाला समजेना. म्हणून त्याला समजाऊन सांगण्यासाठी वेताळ म्हणाला - ''राजा, तू हे घोर परिश्रम कशासाठी करीत आहेस? एकादी दुर्मिळ व अलौकिक शक्ति मिळविण्यासाठी तर कोणी तरी तुला प्रेरित केले नाही ना? तुला सुखी व शांत पाहून त्याला तुझा हेवा वाटलेला असावा. कधी कधी एकादा सामान्य माणूस सुद्धा दुसऱ्याच्या चांगुलपणाचा अनुचित फायदा घेण्याचा प्रयत्न करतो. कुणाच्या गोड गोड बोलण्याने तू त्याच्या ताब्यात तर नाही ना गेलास? उदाहरणादाखल मी तुला चित्रसेन नावाच्या एका राजाची गोष्ट सांगतो.'' आणि वेताळ आपली गोष्ट सांगू लागला.

चित्रसेन मगध देशाचा राजा होता. तो मोठा भोग-विलासी होता. यामुळे राज्य-

## वेताळ कथा



कारभाराची व्यवस्था शिथिल होत चालली होती. प्रजेला अनेक कष्ट सहन करावे लागत होते.

मुख्य मंत्री सुबुद्धि एक दिवस राजाला भेटला आणि एकूण परिस्थितीची राजाला कल्पना देत म्हणाला - ''शासन-व्यवस्था बिघडत चाललेली आहे. कोठे ही शिस्तीचे पालन होत नाही. जनतेची दुःखे दिवसें दिवस वाढत आहेत.''

मंत्र्याच्या बोलण्यावर थोडे चिडून चित्रसेन-ने विचारले - ''राज्यातील सरकारी अधिकारी आपली जबाबदारी पार पाडीत आहेत की नाही?''

महामंत्री चन्द्रसेनला म्हणाला - ''आपण जर लक्ष घातले नाही, तर सारी राज्य-यंत्रणा खिळखिळी होऊन जाईल. कोणी ही दुसऱ्याची पर्वा करणार नाही. सर्व जण आपल्या स्वार्थामागे लागतील. माझी सूचना आहे की आपण वेषांतर करून राजधानीत हिंडावं आणि वस्तु-स्थिति जाणून घ्यावी.''

राजाला मंत्र्याची सूचना आवडली. त्याच रात्री वेषांतर करून तो नगरात अवलोकन करण्यासाठी गेला. राजकर्मचारी लाचलुच-पतीत गुरफटलेले त्याने पाहिले. दुसऱ्या दिवशी त्यांना विचारले तेव्हा ते म्हणाले - ''महाराज, आमच्या शत्रूंनी आमच्याबद्दल काही वाह्यात गोष्टी तिखट-मीठ लावून सांगितलेल्या आहेत!''

राजा म्हणाला - ''तुमची काळी कृत्ये मी स्वतः माझ्या डोळ्यांनी पाहिली आहेत. मी वेषांतर केले असल्यामुळे तुम्ही मला ओळखू शकला नाहीत.'' राजकर्मचारी चन्द्रसेनच्या पाया पडले आणि त्यांनी क्षमा मागितली. ''सावधान, पुन्हा असं केलंत तर नोकरीवरून काढून टाकीन.'' असा इशारा देऊन राजाने त्यांना रवाना केले.

आता सगळ्यांना समजलं की राजा वेषांतर करून राज्यात हिंडतो व राजकर्मचाऱ्यांच्या कामावर लक्ष ठेवतो. यामुळे काही दिवस राज्यातील लाच-लुचपत बंद झाली.

चित्रसेनचे विलासमय जीवन पुन्हा सुरू झाले. महामंत्री त्याला सावध करू लागला तेव्हा राजा म्हणाला - ''मी वेषांतर करून



माझे कर्तव्य करीत आहे. आता राज्यकारभार नीट करायची जबाबदारी तुमची!'' महामंत्र्याला दोष देत राजाने त्याला धमकी दिली.

राजकर्मचाऱ्यांमधील लाल-लुचपत थांबली की राज्यकारभार सुरळीत चालत नाही. राजा स्वतः शासन-सूत्रे आपल्या हाती घेत नाही, स्वतः कार्यप्रवण होत नाही, मंत्र्याचा सल्ला ऐकायला तयार नाही. म्हणून सुबुद्धि जवळच्या जंगलात राहणाऱ्या एका राजर्षीकडे गेला आणि त्याला राजधानीत घेऊन आला. त्या राजर्षीचं नाव होतं जनकसेन.



जनकसेन वृद्ध होता. तो मगध राजाच्या वंशातील होता. या लोकातील सुखांचे त्याला आकर्षण नव्हते. म्हणून अरण्यात जाऊन तो तपश्चर्या करीत होता. मगध राजा त्याची अवज्ञा करू शकत नसे.

चित्रसेनने जनकसेनचे स्वागत केले. चित्रसेनची प्रशंसा करीत राजर्षि म्हणाला - ''पुत्र, तुझ्या राज्यात प्रजा सुखी दिसत नाही. तू याचा कधी विचार केला आहेस का?''

राजर्षीच्या या प्रश्नावर चित्रसेन थोडा चमकला. तरी पण आपल्याला सावरत म्हणाला- ''मी वेषांतर करून राज्यात हिंडतो आणि जनतेची सुख-दुःखे जाणून घेतो. याहून अधिक काय करावं हे माझ्या लक्षात येत नाही. आपले मंत्री, अधिकारी आणि सेवक-वर्गाच्या कर्तव्य-दक्षतेबद्दल मला शंका येतेय. आपण स्वतःच थोडे निरीक्षण करा आणि मला सल्ला द्या.''

हा प्रस्ताव अस्वीकार करीत जनकसेन म्हणाला - ''राजा समर्थ असेल तर प्रजा ही समर्थ बनेल. वेषांतर करून तू जेव्हा राज्यात भ्रमण करतोस जेव्हा 'जनतेचे कल्याण' हा एकच विचार तुझ्या मनात असला पाहिजे. नोकरशाहीच्या अनीतीपेक्षा प्रजेचे कल्याण हे अधिक महत्त्वाचे आहे. एक वर्षानंतर तू जेव्हा अन्य वेषात राज्यात संचार करीत असशील, तेव्हा मी तुला येऊन भेटेन. केव्हा ही, कोठे ही तुला भेटायचा मला अधिकार आहे.''

चित्रसेनने याला स्वीकृति दिली. जनकसेन परत तपश्चर्येसाठी गेला. चित्रसेनला प्रजेच्या दुःखाची हळू हळू चांगली कल्पना आली.



प्रजेच्या अडचणी दूर करण्याचा प्रयत्न ही तो करू लागला. जनतेच्या कल्याणासाठी शक्य ती कार्यवाही त्याने सुरू केली.

इतकं सगळं झालं तरी आपलं विलासमय जीवन चित्रसेन सोडून देऊ शकला नाही. त्याचा बराच काळ गप्पा-गोष्टी, नृत्य व गायनात जाई. महामंत्र्याने याबाबत तक्रार करण्याचे सोडून दिले.

पाहता-पाहता एक वर्ष गेलं. एक दिवशी चित्रसेन आपल्या रंग-महालात पडल्या पडल्या नृत्य पहात होता. गायिका एक राग गात होती. चित्रसेन नृत्य-गायनात तन्मय होऊन गेला होता. मधून मधून दाद द्यायचा नि टाळ्या वाजवायचा. अचानक जनकसेनने महालात प्रवेश केला.

जनकसेनला पाहताच चित्रसेन घाबरून उठून बसला नि राजर्षींच्या पाया पडला. आपली नाराजी प्रकट करीत जनकसेन म्हणाला - ''या वर्षी ही तुझ्या देशात काही प्रगति झालेली दिसत नाही. मी जे सांगितलं होतं, त्याचं श्रद्धापूर्वक आचरण तू केलंस का?''

चित्रसेन नम्रतापूर्वक म्हणाला - ''कालच वेषांतर करून मी एका गरीब माणसाच्या झोपडीत गेलो होतो. तब्येत ठीक नसल्यामुळे बिचारा दुःखी होता. मी त्याच्या औषधोपचाराची व्यवस्था करून आलो.''

''ठीक आहे. तू वेषांतर करून राज्यात संचार करशील तेव्हा प्रजेचं कल्याण हा एकच विषय तुझ्या मनात असला पाहिजे. तू खरोखर तसं केलंस का?'' जनकसेनने कठोरपणे विचारले.

अमळ संकोचाने चित्रसेन म्हणाला - ''एका सामान्य नागरिकाचे स्वास्थ्य ठीक नसता, त्याच्या औषधोपचाराची व्यवस्था मी केली, त्याला आवश्यक ती वैद्यकीय मदत मी मिळवून दिली. इतकं सगळं मी केलं तरी आपलं आज्ञा-पालन केलं नाही असं आपण का समजता?''

''होय, ते सगळं मला समजलं. मी तुला जे विचारतोय ते तुझ्या वेषाबद्दल.'' जनकसेनने विचारले.

चित्रसेनला या प्रश्नाचे आश्चर्य वाटले. त्याने सांगितले - ''होय तर, मी वेषांतर करूनच तिकडे गेलो होतो.''



''कसला वेष केला होतास तू?'' जनकसेनने प्रश्न केला.

''एकाद्या गरीब शेतकऱ्याच्या वेषात मी तिकडे गेलो होतो!'' चित्रसेनने उत्तर दिले.

''गरीब शेतकरी मगधच्या प्रजेतील एक माणूस आहेच. आपल्या प्रजेतील एकाचा वेष तू धारण केलास तर याला वेषांतर कसे बरे म्हणता येईल ?'' जनकसेनने विचारले.

आश्चर्य करीत चित्रसेन म्हणाला - ''मी गरीब शेतकऱ्याचा वेष धारण केला हे वेषांतर नव्हे का? मग आपणच सांगा, या देशाच्या राजाने बहुरूपी बनण्यासाठी कोणता वेष धारण करावा?''

जनकसेन हसत म्हणाला - ''तू मगधच्या प्रजेतील एक आहेस. आपल्या प्रजेतील एकाचा वेष तू धारण केलास तर त्याला वेषांतर म्हणता येणार नाही. तू एक गरीब शेतकरी बनलास आणि एक गरीब शेतकरी आजारी असल्याचे तू पाहिलेस. तू त्याच्या उपचाराची व्यवस्था केलीस. खरे म्हणजे राजा म्हणून सर्व गरीबांच्या चिकित्सेची व्यवस्था तू करायला हवी होतीस. तू जर एकेकाच्या अडचणींचा विचार केलास तर तू राजा कसला? राजाने सर्व प्रजेच्या अडी-अडचणींचा विचार करायला नको का? राजाने एकेक व्यक्तीचा नव्हे, संपूर्ण प्रजेचा विचार करायला हवा. आलं तुझ्या लक्षात मी काय म्हणतो ते?''



आपली चूक कबूल करीत तत्क्षण चित्रसेन म्हणाला - ''येथून पुढे संपूर्ण जनतेच्या कल्याणाचा विचार करूनच मी लोकांच्या अडचणी सोडवीत जाईन.''

राजा विक्रमादित्याला एवढी गोष्ट ऐकवून आता वेताळाने विचारले - ''राजाने राज्यकारभार सुरळीतपणे चालविला पाहिजे. पण चित्रसेन असं न करता विलासात मग्न राहिला. नंतर त्याच्यात जो बदल झाला तो निश्चितच प्रशंसनीय आहे. परंतु जनकसेनने याबाबत चित्रसेनशी जी बोलणी केली, त्यात त्याचे वाक्-चातुर्यच अधिक दिसते, त्याच्या बोलण्यात कधी कधी विसंगति ही दिसते. कोणताही राजा आपल्या देशाच्या

नागरिकांपैकी एक असतो. आपल्या कार्य-सिद्धीसाठी तो कोणताही वेष धारण करू शकतो. त्याने केलेला शेतकऱ्याचा वेष हे वेषांतरच नव्हे असे म्हणणे कितपत योग्य आहे? त्याच्या म्हणण्यानुसार राजाने राक्षस वा देवाचा वेष धारण केला तरच ते वेषांतर होईल, कारण राक्षस व देव हे प्रजेतील कोणी नव्हेत. 'तू जेव्हा वेषांतर करून संचार करीत असशील तेव्हा मी तुला येऊन भेटेन' हे त्याचे म्हणणे तर फारच विचित्र व हास्यास्पद वाटते. माझ्या या शंकांचे निवारण माहीत असून ही तू केले नाहीस, तर तुला माहीतच आहे की तुझे शीर धडावर राहणार नाही."

वेताळाच्या शंकांचे निरसन करीत विक्रमादित्य म्हणाला - "जनकसेन हा एक राजर्षि आहे, हे विसरू नकोस. त्याची विचारांची एक पातळी आहे. त्या पातळीवरून त्याचे विचार योग्यच म्हटले पाहिजेत. याला वाक्‌चातुरी म्हणणं ही तुझी चूक आहे. त्यात तुला दिसणारी विसंगति हा ही तुझा भ्रम आहे. देशात निरनिराळ्या प्रकारचे नागरिक असतात हे चित्रसेनला दाखवून देण्याचा राजर्षीचा हेतू होता. जो सर्वात अधिक समर्थ असतो, तो राजा बनू शकतो. किंवा असे म्हण की राजा सर्वगुणसंपन्न असला पाहिजे. 'तू जेंव्हा वेषांतर केलेले असेल, तेव्हा मी तुला येऊन भेटेन' असे जनकसेन म्हणाला. तो चित्रसेनला भेटायला आला, तेव्हा तो नृत्य-संगीतात मग्न होता. म्हणून जनकसेन त्याला म्हणाला - 'आता तू जे काम करीत आहेस, ते वेषांतरित राजाचे निश्चितच नव्हे.' विवेकसंपन्न व तीक्ष्ण बुद्धीच्या चन्द्रसेनला राजर्षीचा आशय समजला व तो म्हणाला - 'माझी चूक आता माझ्या लक्षात आली आहे.' म्हणून जनकसेनवर केलेला तुझा दोषारोप निराधार आहे. ती त्याची वाक्-चातुरी नव्हे, नि त्याच्या विचारात काही विसंगति ही नाही.

अशा रीतीने राजाचा मौन-भंग झाल्यावर वेताळ प्रेतासह अदृश्य झाला.

**आधार - वसुंधरेची एक कथा.**





# ताजी मिठाई

एके दिवशी संध्याकाळी गावचा तलाठी रामचन्द्र आणि गावचे अन्य काही प्रमुख लोक पारावर बसून गप्पा मारत होते. दुसऱ्या कुठल्याशा गावाहून आलेल्या एका माणसाने तेथे पोचून रामचन्द्रला 'रामराम' केला. रामचन्द्रने त्याला ओळखले. त्याच्या व्याह्याकडे काम करणारा वीर नावाचा नोकर होता तो.

त्याला पहाताच रामचन्द्रने ओळखले, की तो काही चांगली बातमी घेऊन आलेला आहे. त्याने वीरला विचारले, "बोल, काही चांगली बातमी आणली आहेस वाटतंय?"

"होय, शुभ बातमीच आहे. नातू झालाय तुम्हाला." वीर बातमी सांगत म्हणाला.

रामचन्द्रच्या आनन्दाला पारावार राहिला नाही. त्याच्या हातात पाचाची नोट कोंबत रामचन्द्र म्हणाला "असाच आमच्या घरी जा अन् एक टोपलं मागून घेऊन अग्रवालच्या मिठाईच्या दुकानात ये."

रामचन्द्रने या आनन्दात सर्व ओळखी-च्यांना मिठाई वाटायचे ठरवले. तो ताबडतोब अग्रवालच्या दुकानी पोचला.

तलाठी साहेबांना पाहून अग्रवाल म्हणाला, "या तलाठीसाहेब! तुम्ही तर माझ्या दुकानात डोकवतच नाही?"

"पण आत्ता तशी वेळ आलीय नं! मला सर्व प्रकारचे शंभर लाडू अन् दहा किलो जिलबी पाहिजे. पण सारी मिठाई चांगली ताजी हवी."

"वा, वा! अगदी ताजे आहेत सगळे पदार्थ. तिकडे बनले अन् लगेच इकडे अुचलून आणलेत." अग्रवाल अुत्साहाने म्हणाले.

नंतर दोघे मिठायांच्या किंमतीबद्दल बोलू लागले. मधेच या मिठाया कशा बनवल्या जातात याबद्दलही गप्पा निघाल्या.

तलाठी आश्चर्य प्रकट करत म्हणाला, "अरे अग्रवाल, तुम्ही तर जिलबी अन् लाडूंचा डोंगरच अुभा केलाय की! छान गोलाकार रचून ठेवलाय

**नंदिनी जाधव**

माल! यात तर भरपूर वेळ अन् मेहनत खर्ची पडत असेल!''

''कसं सांगू तलाठीसाहेब यात किती वेळ अन् मेहनत लागते! खरं तर बनवायला वेळ कमी, अन् सजवायलाच जास्त लागतो!''

त्याला सहानुभूती दाखवत तलाठ्याने विचारले, ''अन् हे सारं तुम्हाला एकट्यालाच करावं लागतं?''

''मग काय तर! मदतीलाही कोणी नाही माझ्याकडे. हे सर्व सजवायला मला पूर्ण दोन रात्री खर्ची घालाव्या लागल्या. जिलब्या लहानमोठ्या होऊ नयेत, लाडूही एकसारखे अन् नीट गोलाकार व्हावेत म्हणून एक रात्र जास्तीच द्यावी लागली.'' अग्रवालने आपल्या मेहनतीचे वर्णन केले.

आता मिठायांकडे अधिक जवळून पहात रामचन्द्र तलाठी म्हणाला, ''अगोदर तर मला कळलंच नाही, पण आता ओळखलं मी!''

''तुम्हाला काय वाटतं, त्या दोन रात्रीत माझं काम संपलं असेल? तसं नाही हं, या सजवण्यात माझी एक रात्र जास्तच गेली. खूप मेहनत केली; तेंव्हाच तर हे सगळं इतकं सुन्दर रचू शकलो मी! तीन रात्री जराही न झोपता सतत काम करत राहिलो मी. आता समजलं असेल ना तुम्हाला, कि हे काम किती मेहनतीचं आहे?''

इतक्यात वीर एक मोठा हारा घेऊन तिथे पोचला. अग्रवाल खूश होत म्हणाला, ''हारा दे इकडे. मोजून, वजन करून सारी मिठाई ठेवतो मी त्यात.'' अन् हारा घेण्यासाठी त्याने हात पुढे पसरले. पण तलाठी जागचा अुठत एकदम म्हणाला, ''नाही, नाही अग्रवाल. मला तुमच्याकडचं काहीच खरीदायचं नाहीय. मी तर ताजी मिठाई घ्यायला निघालो होतो!''

अग्रवालच्या आता कुठे लक्षात आले की, गप्पा मारता मारता आपण तलाठ्याला खरी गोष्ट सांगून टाकलीय. त्याच्या बोलण्यातून मिठाई तीन दिवसांपूर्वीच बनल्याचे स्पष्ट झाले होते!





**चान्दोबा**
**पुरवणी - ७८**



## भावा

आपल्या देशातील सुन्दर वृक्षांपैकी एक आहे भावा. या झाडावर पिवळ्या रंगाच्या फुलांचे गुच्छ लटकत असताना त्यावर एकही पान आढळत नाही. हे युरोपमधील लॅबर्नम जातीचे झाड आहे. परन्तु याची फुले लॅबर्नमपेक्षा मोठी व सुन्दर असतात. फेब्रुवारी मार्चच्या दरम्यान झाडाची पाने झडू लागून फुलांचे तुरे दिसू लागतात. यानन्तर फुले अुमलून सारे झाड फुलांनीच भरून जाते. हळूहळू फुले गळू लागून पुन्हा एप्रिल-मे मध्ये पाने अंकुरित होअू लागतात.

साधारणतः समुद्रसपाटीपासून १,५०० मीटर अुंचीवरील डोंगरी भागात ही झाडे जास्त प्रमाणात आढळतात. या झाडांची अुंची १२-१४मीटर पर्यन्त असते. यांची खोडे बुटकी असून फान्द्या चारी दिशांना पसरलेल्या असतात. या फान्द्या दाट असून काहीशा झुकलेल्या असतात. पानांचा रंग गडद हिरवा असतो. डहाळीच्या दोन्ही बाजूंना ही पाने जोडीजोडीने चिकटलेली असतात.

भाव्याच्या शेंगा गोल, काळ्या व लांबचलांब असतात. एकेका झाडाला शेकडोंनी या शेंगा लटकलेल्या असतात. शेंगेच्या आत कप्पे-कप्पे असून, प्रत्येक कप्प्यात अंडाकृती, चमकदार, चपट्या बिया असतात. कप्प्याच्या आतल्या थरात गोड पदार्थ असतो. विरेचन बनवताना ज्या निरनिराळ्या औषधि वापरतात त्यात हाही एक पदार्थ असतो. माकडे हा पदार्थ आवडीने खातात. म्हणूनच या शेंगांना हिंदीत 'बंदर-लाठी' असेही म्हणतात.

वृक्षशास्त्रात या झाडाला 'कॅशिया फिस्टुला' म्हणतात. हिन्दी व बंगालीत हे झाड 'अमलताश' नावाने ओळखले जाते. मराठीत या झाडाचे नाव 'भावा' तर तमिळ आणि मल्याळीत ते 'कोंले' असे आहे. केरळमधे एप्रिल महिन्यात येणाऱ्या 'विशु' या सणाला या फुलांचा पूजेसाठी अुपयोग केला जातो.

दिल्ली, कलकत्ता, मुंबई, मद्रास यांसारख्या महानगरातून रस्त्याच्या दोन्ही बाजूंना ही झाडे लावलेली आढळतात. यामुळे नगराच्या सौन्दर्यात चांगलीच भर पडते. मुंबईत 'लॅबर्नम रोड' नावाने एक रस्ता असणे ही विशेष गोष्ट होय.

## आपल्या देशातले महान् कवि



# अतिप्राचीन नाटककार भास

रामायण व महाभारत हे ग्रन्थ काही हजार वर्षांपूर्वी रचले गेले आहेत. कित्येक पिढ्यांपासून ते चालत आले आहेत. अजूनही ते वाचकांचे मनरंजन करीतच असतात. रामायण-महाभारत कथांच्या आधारे विविध भारतीय भाषातून कित्येक काव्ये रचली गेली आहेत, अनेक नाटकेही लिहिली गेली आहेत. संस्कृत भाषेतील अति-प्राचीन नाटककार 'भास' यानेही रामायण-महाभारतातील कथांच्या आधारे अनेक नाटके रचली आहेत.

या सुप्रसिद्ध प्राचीन नाटककाराच्या जीवनाबद्दलचे वर्णन मात्र अुपलब्ध नाही. महाकवि कालिदासाने भासाचा अुल्लेख मोठ्या आदरपूर्वक केलेला आहे. यावरून असे सिद्ध होते की इतिहासकार व साहित्यवेत्त्यांनी भासाला अुच्च स्थान दिलेले आहे.

काही अन्य प्राचीन ग्रंथांतूनही भासाचा व त्याने रचलेल्या 'स्वप्न वासवदत्त'चा आदरपूर्वक अुल्लेख केला गेलेला आढळतो. परन्तु १९१२ पर्यन्त हे नाटक मात्र कोणीही वाचलेले नव्हते.

१९१२ मधे गणपतीशास्त्री नावाच्या एका सुप्रसिद्ध पंडिताने केरळमधे काही ताडपत्रे शोधून काढली. 'स्वप्न वासवदत्त' व आणखी बारा नाटके या ताडपत्रांतच अुपलब्ध झाली. त्यांची रचनाशैली पहाता पंडित व टीकाकारांचे असे म्हणणे आहे की, ही सारी एकाच रचनाकाराने लिहिली असली पाहिजेत. ही गोष्ट तर सर्वविदितच आहे की 'स्वप्न वासवदत्त'चा रचनाकार भासच आहे. तेंव्हा, या आधारे ही बाकी सारी नाटके भासानेच लिहिली आहेत असे मानले जाते.

भास ई.स.पू.४-५ शतकातला कवि आहे असे म्हणतात. त्या काळात संपूर्ण देशातील राजे संस्कृत भाषेला मान देत. त्यामुळे संस्कृत भाषेचा नाटककार भास हा कोणत्या प्रान्तातला होता हे सांगणे कठीण आहे. भासाची नाटके देशभर प्रसिद्ध होती. पूर्वी ताडपत्रे मंदिरांतून सुरक्षित ठेवली जात. अुत्तर भारतातील मंदिरांवर वारंवार हल्ले होत असत, त्यामुळे बऱ्याचशा ताडपत्रांचा नाश झाला असावा. पंडितांचे असे म्हणणे आहे की भासाची नाटकेही अशीच नष्ट झाली असावीत.

एका जुन्या आधारे लिहिलेल्या 'स्वप्न वासवदत्त'ची संक्षिप्त कथा अशी आहे

वत्सदेशचा युवराज अुदयन याने अुज्जयिनीची सौन्दर्यसम्राज्ञी वासवदत्ता हिच्याशी विवाह केला. यानन्तर तो विलासात मग्न राहिला. राज्यकारभाराच्या कामात त्याला रस राहिला नाही. आणि आपल्या जबाबदाऱ्याही तो जणू विसरून गेला. पहावे तेंव्हा विलासी सुख-सामग्री एकत्र करण्यातच तो सारा वेळ घालवू लागला. त्याच्या या वागण्याने राज्य-शासनाची व्यवस्था शिथिल झाली आणि अन्य अधिकारीही आपली कर्तव्ये विसरून जाअू लागले.

या परिस्थितीचा फायदा घेअून शत्रुसैन्याने वत्सदेशावर अचानक हल्ला करून अर्धे राज्य आपल्या ताब्यात घेतले.

प्रधानमन्त्री यौगंधरायण याच्या असे लक्षात आले की, राणी वासवदत्ता हिला दूर केले, तरच राजा उदयन नीट मार्गावर येईल. आपली ही कल्पना अमलात आणण्यासाठी त्याने एक कारस्थान रचले. वासवदत्तेला त्याने विश्वासात घेतले. ती एकदा काही कारणाने बाहेर गेलेली असताना, यौगंधरायणाने अफवा पसरवली की, 'वासवदत्ता अचानक आगीत सापडून ठार झालीय.' या बातमीने राजा अुदयनला मोठाच धक्का बसला, त्याला अमर्याद दुःख झाले. परन्तु जसजसा काळ जाअू लागला, तसतशी त्याने राज्यकारभारात लक्ष घालायला सुरुवात केली; शासनव्यवस्थेत सुधारणा होअू लागली. शत्रुराजाकडून त्याने आपले अर्धे राज्यही परत मिळवले. आता संपूर्ण देशाची राज्य-व्यवस्था त्याच्या हाती आली.

एके दिवशी राजा अुदयन झोपलेला असताना, वासवदत्ता त्याच्या स्वप्नात आली. दचकून डोळे उघडून पहातो, तो खरोखरच वासवदत्ता समोर अुभी दिसली. क्षणभर त्याला हे सारे स्वप्नच वाटले. पण हे स्वप्न नसून सत्यच आहे, हे लक्षात आल्यावर त्याला अपार आनन्द झाला! आपल्याला स्वप्नावस्थेतून चेतनावस्थेत आणणाऱ्या विवेकशील मन्त्र्याची युक्ती पूर्णपणे लक्षात आल्यावर त्याला आणखीनच हर्ष झाला! अशा प्रकारे अुदयन व वासवदत्ता पुन्हा एकत्र येतात.



# तुम्हाला माहीत आहे काय?

१. एव्हरेस्ट शिखर चढून जाण्याचा पहिला विक्रम कोणी केला, केंव्हा?
२. इसवी सनाच्या पहिल्या शतकात आपल्या देशातील अनेक लोकांना ख्रिश्चन धर्माची दीक्षा देऊन, आपल्याच देशात मरून जाणारी व्यक्ती कोण ?
३. आपल्या देशातील सुप्रीम कोर्टाची पहिली महिला न्यायाधीष कोण ?
४. वाघाला 'राष्ट्रीय प्राणी' हा दर्जा केंव्हा देण्यात आला ?
५. टाइपरायटरचा संशोधक कोण? हे संशोधन केंव्हा झाले ?
६. सप्त समुद्रांची नावे काय काय आहेत ?
७. चन्दीगडच्या 'रॉक गार्डन'चा निर्माता कोण ?
८. १८०४ मधे नेपोलियन फ्रान्सचा सम्राट बनला. त्याच वर्षी दळणवळणाच्या जगातही एक महत्वपूर्ण घटना घडली, ती कोणती ?
९. औरंगजेबने आपल्या मुलीला, ती अन्य संप्रदायांच्या विचारांनी प्रभावित असल्याच्या संशयावरून वीस वर्षे कैदेत ठेवले. तिचे नाव काय ?
१०. रशियन भाषेच्या लिपीचे नाव काय ?

नार्वेचे ट्रिग्वी ली संयुक्त राष्ट्र-संघाचे पहिले प्रमुख सचिव होते. (सन १९४६ पासून) (डिसेंबर ९४:चांदोबा). त्यांच्या नंतर क्रमशः स्वीडनचे डंग हॅमर्सक बोल्ड (१९५३), बर्मा चे यू थांट (१९६१), आस्ट्रिया चे कर्ट वाल्डहीम (१९७२) व पेरूचे झेवियर पेरेज डी क्यूलर (१९८२) हे त्या जागी आले. सन १९९२ पासून ईजिप्तचे बुट्रोस घाली प्रमुख सचिव आहेत.

## उत्तरे

१. भारताचा शेरपा तेनसिंह नोर्के व न्यूझीलंडचा सर एडमंड हिलरी. १९५३ मधे.
२. येशूच्या बारा शिष्यांपैकी एक- सेंट थॉमस.
३. केरळमधील जस्टिस फातिमाबीबी.
४. १९७२ मधे.
५. अमेरिकेचे पोल्स गिल्डन सोले. १८६७ मधे.
६. पॅसिफिक, अटलांटिक, आर्क्टिक, दक्षिण महासागर, हिन्द महासागर, अरेबियन समुद्र व बंगालची खाडी.
७. नेकचन्द.
८. आर. ट्रिविटिकने वाफेवर चालणारे रेल्वे एंजिन चालवून दाखवले.
९. झेबुन्निसा.
१०. क्रेलिक.



# निरर्थक स्वार्थ

विदर्भ देशात रामशर्मा नावाचा एक अर्थशास्त्रवेत्ता होता. राजा आणि प्रजेतील लोकही विविध विषयात त्याचा सल्ला विचारत असत. त्यामुळे त्या देशातील दारिद्र्य अजिबात नाहीसे झाले.

इन्द्रपुरी हे विदर्भच्या शेजारचेच राज्य होते. राज्यातल्या साऱ्या सुधारणा इन्द्रपुरी राजाने आपल्या राज्यातही अमलात आणल्या. त्यासाठी त्याने आधी त्यांचा खूप अभ्यास केला. तरीही परिणाम मात्र शून्यच निघाला.

ही हकिकत रामशर्माला समजली. ज्या आर्थिक सुधारणा आपल्या राज्यात इतक्या सफल झाल्या, त्याच सुधारणा शेजारच्या राज्यात कशा काय निरुपयोगी ठरल्या, याचे कारण जाणून घेण्यासाठी तो त्या राज्यात गेला.

रामशर्मा जंगलातून जाताना चालता चालता दमून गेला अन् एका झाडाच्या शीतल छायेत बसला. पण इतक्यात एक भूत झाडावरून त्याच्या पुढ्यातच उडी मारून उभे राहिले.

रामशर्मा थरथर कापू लागला. त्याची ही स्थिती पाहून भूत म्हणाले, "घाबरू नका मला पाहून महाराज! मी इन्द्रपुरी राज्यातला मोठा भाग्यवान नागरिक आहे. एका लहानशा गावात रहात असल्यामुळे माझी मिळकत अन् मालमत्ता यांबद्दल कुणालाच काही माहीत नाहीय. इतकेच काय, ही गोष्टी माझ्या स्वतःच्या माणसांनाही माहीत नाही. मी ते धन सर्वांपासून चोरून दूर ठेवलं, ते कुणाच्या कामी आलं नाही, म्हणून मी आता भूत बनून बसलोय. ते एकाद्या चांगल्या कामी लावलं, त्याचा सदुपयोग झाला, तर मला या पिशाच्चयोनीतून मुक्ती मिळेल. मला माहीत आहे, की तुम्ही अर्थशास्त्रवेत्ता रामशर्मा आहात. तेंव्हा या कामात मला मदत करा. मला पुण्य मिळेल त्यामुळे अन् या रूपातूनही माझी सुटका होईल."

जनार्दन चिंचाळकर



“अरे, इतक्या क्षुल्लक गोष्टीसाठी इतकी चिन्ता कशाला? ते धन राजाकडे पोचवण्याची आवश्यक ती व्यवस्था मी करीन. राजा धन उपयुक्त अशा जनकल्याणाच्या कामी लावेल.” रामशर्माने अुपाय सुचवून पाहिला.

“माझं धन तर तो आपल्या विलासासाठीच खर्च करील. असा जर माझ्या पैशांचा दुरुपयोग झाला, तर मला या भूतयोनीतून सुटका नाही मिळणार.” भूत म्हणाले.

“तुमच्या राजानं जनतेच्या हितासाठी अनेक संस्था निर्माण केल्या आहेत. तुझं धन मी त्यांच्या सुपूर्त करीन. प्रजेलाही लाभ होईल.” रामशर्माने दुसरा अुपाय सुचवला.

“मग तर तुम्हाला आमच्या देशातल्या सेवा-संस्थांबद्दल काहीच माहीत नाही असं म्हणावं लागेल. दहा लाख त्यांच्या हाती पोचले, तर जनतेपर्यन्त एक लाखही पोचणार नाहीत!” भुताने पुन्हा अडचण मांडली.

‘मरणानन्तर आपलं धन एकाद्या कल्याणकारी कार्यात खर्च व्हावं’ हा भुताचा हेतु निःसंशय प्रशंसनीयच होता. रामशर्माला त्याचा हेतु आवडला. ‘असे परोपकारी नागरिक राज्यात असूनही इन्द्रपुरीत दारिद्र्य का असावे?’ ही गोष्ट रामशर्माला कळेना.

काही विचार करून रामशर्मा भुताला म्हणाला-“राजावर माझा पूर्ण विश्वास आहे. देशातील सेवा-संस्थांवरही विश्वास आहे माझा. सगळं पाहून एकूण मला असं वाटतंय की, तुमच्या देशातली परिस्थितीच काहीशी विचित्र आहे. तुला आपल्याच देशातल्या पंडितांची मदत नसती का घेता आली?”

“हं:! आमच्या देशच्या पंडितांची द्रव्याची तहान फार जोरदार आहे. विचारलं तर प्रत्येक जण म्हणेल की - धन माझ्या हाती दे! माझा त्यांच्यावरही काडीइतका विश्वास नाहीय.” भूत अुत्तरले.

रामशर्माने भुताला मदत करायचे आश्वासन दिले. भूत अदृश्य रूपाने त्याच्या बरोबर चालू लागले. जंगल संपवून ते आता इन्द्रपुरीत पोचले. भुताच्या सल्ल्याने रामशर्मा एका धर्मशाळेत अुतरला.



ही धर्मशाळा गावचा प्रमुख व्यापारी धनसेन याने बनवली होती. ‘दान-धर्म अन् पुण्य-कर्माबाबत पहिलं नाव याचंच घ्यावं’ असे मानले जाई.

रामशर्माने भुताला सांगितले की, “याचे वाडवडील त्रिपुर देशचे होते. सत्य अन् प्रामाणिकपणा यांवर त्यांचा विश्वास असे. यामुळेच आतापर्यन्त ज्या ज्या देशांशी त्यांनी व्यापार केला, त्या सर्वांत ते सफल झाले. धनसेनचा भाअू गुणसेन याला आमच्या देशात कित्येकदा पुरस्कार मिळाले आहेत. त्यानं आमच्या देशात दोन देवळं, सात धर्मशाळा अन् चार परिपूर्ण असे दवाखाने बनवले. याशिवाय कित्येक शाळाही त्याने बांधल्या. त्या शाळा उत्तम स्थितीत रहाव्यात म्हणून आजही तो स्वतः लक्ष घालतो, आपलं धन तू त्याच्या हवाली कर.”

“तुमचं बोलणं मला न्याय्य वाटतंय. पण इतकं असीम धन एकाद्या स्वदेशी व्यक्तीला न देता विदेशी व्यक्तीला देणं मला अुचित वाटत नाहीय.” भूत म्हणाले.

इतक्यात एक दरिद्री ब्राह्मण रामशर्माजवळ येअून म्हणू लागला, “महाराज, तुम्ही परदेशी वाटताय, म्हणूनच विचारायचं धाडस करतोय. माझं जुनं घर केंव्हाही पडून जाणारसं वाटतंय. माझी आई आजारी असते. माझ्या सगळ्याच गरजा तुम्ही पुऱ्या करू शकणार नाही. पण जेवढं देता येईल, तेवढं तरी देअून मला मदत



करा. मी या शहरात चाळीस वर्ष रहातोय, पण एकाही महाभागाने एकादी कवडीही देअून मला मदत केली नाहीय. माझ्या या देशातले लोक महास्वार्थी आहेत.”

त्या ब्राह्मणाच्या हातावर एक अशर्फी ठेवत रामशर्मा म्हणाला, “ज्यांनी तुझ्या गरजा पुऱ्या केल्या नाहीत, त्या सर्वांना स्वार्थी म्हणणं योग्य नाही वाटत मला. परकीयांसमोर आपल्या लोकांची निन्दा म्हणजे ती स्वतःची निन्दा केल्यासारखंच होतं. तुझ्या अडचणी लवकरच दूर होतील, धीर धर.” असा हितबोध करून रामशर्माने त्याला पाठवून दिले.

तो गेल्यावर रामशर्मा भुताला म्हणाला कि, “तुझं धन या दरिद्री ब्राह्मणाला दे.” भूत



यावर म्हणाले, "ब्राह्मण गरजवन्त आहे, हे खरंच! पण आता इथवर आल्यावर या शहरातल्या माणसाला मी धन का द्यावं? आपल्याच गावच्या एकाद्याला दिलं, तर मला बरं वाटेल."

धर्मशाळेत थोडी विश्रान्ती घेतल्यावर रामशर्मा भुतासह पुढे निघाला. रस्त्यात राजाचा एक नोकर समोर आला. त्याच्या बोलण्यातून असे कळले की तो अनेक गरजांनी ग्रासलेला आहे, अन् असेही समजले की तो भुताच्या गावचाच आहे.

"माझ्या गावचा तर मिळाला, पण एकादा माझ्याच गल्लीतलाही मिळून जाईल कदाचित्." भुताने आशा व्यक्त केली.

आता रामशर्माला भुताचा अुद्देश नीट लक्षात आला. तो ताबडतोब भुताला म्हणाला, "हं, तुझ्या गल्लीतल्या कुणाला न देता, घरातल्याच कुणाला दिले, तर आणखीनच छान होईल ना? चल, तुझ्या गावीच जाअू या आपण." दोघे भुताच्या गावी गेले. मेलेल्या त्या भाग्यवन्ताच्या घरी ते पोचले. तोच भूत झाला होता ना! आतून खूपच आवाज ऐकू येत होते.

ते पाहून भूत म्हणाले, "हॉं हॉं! आत्ता आठवण झाली पहा! आज माझा वाढदिवस. मी जिवन्त असताना माझ्या या घरात खूप छानछोकीनं अुत्सव साजरा व्हायचा. माझी बायको अन् मुलं मला फुलांचे हार घालून माझी पूजा करत असत. माझ्यासाठी गवई बोलावून सुंदर, मधुर गाणी गायला लावायचे." मोठ्या अुत्साहाने भूत हे सारे सांगत असतानाच रामशर्माने घरात प्रवेश केला. घरातल्या लोकांना तो म्हणाला, "मृत्यु पावलेल्या आपल्या कुटुंब प्रमुखाचा वाढदिवस अजूनही तुम्ही इतक्या अुत्साहानं अन् मोठ्या प्रमाणावर साजरा करत आहात! खरोखरच धन्य आहात तुम्ही!"

एक विधवा, दोन मुलगे, सुना इत्यादि सर्वजण त्याचे हे बोलणे ऐकून आश्चर्याने त्याच्याकडे पाहू लागले. दोन सेकंदांनी ती विधवा म्हणाली, "आम्ही तर विसरूनही गेलो त्यांना! जिवन्त असे पर्यन्त शिस्तीच्या नावाखाली आम्हाला कायम गप्प बसवलं त्यांनी. आमच्या जगण्यात मौजमजा किंवा थट्टा-विनोद काही नसेच. त्यांच्या मरणानंच सुखी झालो आम्ही. आता कुठे स्वातन्त्र्याची गंमत अुपभोगतोय आम्ही. आमची स्वतःची वीस एकरांची शेती आहे, ती खंडानं देअून त्यातनं मिळणाऱ्या पैशातून आठवड्यातून एकदाच का होईना, पण मजा करतो, आनंदानं रहातो."

"मग काय तुम्हाला त्यांची कधी आठवण नाही येत?" शर्माने विचारले.

"नाही कशी येणार? कधी कधी मनात येतं ना, की ते आणखी लवकर वारले असते, तर आणखी काही आनंदाचे दिवस मिळाले असते आम्हाला. असा विचार येणं, म्हणजेही त्यांची आठवण करणंच नव्हे का? माझ्या सवतीचा एक मुलगा आहे. पक्का दारुडा आहे तो. नेहमीच पिअून कुणाला न कुणाला मारत असतो. ते लोक मग फिर्याद घेअून इथे येतात. आम्ही त्यांना वारंवार सांगत असतो की, त्याचा बाप मेल्यावर आता त्याचं आमचं काहीही नातं अुरलं नाहीय. पण ते थोडंच ऐकतात? आम्हाला त्यांच्या तक्रारी ऐकाव्याच लागतात. अशा शिव्या देतानाही त्यांची आठवण येते ना आम्हाला. अन् तुम्ही तर जाणतच असाल की, मेल्या माणसाची आठवण अुगाळण्यानं काही फायदा होत नसतो." मोठ्या विरक्त भावाने भुताची बायको सांगत होती.

आता एक क्षणभरही तिथे थांबायची भुताची इच्छा नव्हती. रामशर्माच्या कानात ते कुजबुजू लागल्यावर जबर्दस्तीने त्याला तेथून निघावेच लागले.





"मला आत्ता कुठं समजून चुकतंय की दुसरं लग्न करून मी आपल्या थोरल्या मुलावर अन्यायच केलाय. तुम्ही त्याला तावडतोब भेटून, बोला त्याच्याशी. त्याला माझ्या दुर्भाग्याची कहाणी सांगा." भूत शर्माला म्हणाले.

रामशर्माने गाववाल्यांना भुताच्या मोठ्या मुलाबद्दल विचारले, तेंव्हा एकजण म्हणाला, "तो तर अगदी कुचकामाचा आहे. सावत्र आईनं त्याला घराबाहेर काढलं, अन् त्याला कसलीही मदत करायला साफ नकार दिला, तेंव्हा आम्ही काही लोकांनी त्याला मदत करायचं आश्वासन दिलं. आम्ही तर त्याला असंही सांगितलं की, तू सुधारलास तर लढून झगडून का होईना, पण त्याला इस्टेटीतला वाटाही मिळवून देऊ. पण, बापाच्या मृत्यूमुळे आपली मानसिक शांती बिघडलीय असा बहाणा करत तो पीतच राहिलाय अजून. ताडाच्या झाडांच्या बनात कुठे तरी पिऊन तर्र झालेल्या अवस्थेत पडलेला सापडेल पहा आत्ताही."

रामशर्मा त्याला जाऊन भेटला अन् त्याने त्याला शुद्धीवर आणला. त्याच्या या अवस्थेचे कारण विचारले असता, तो आपले आई-बाप, भावंडे, गावचे सारे लोक, इतकेच नव्हे तर देवालाही शिव्या देऊ लागला.

त्याला मधेच थांबवत रामशर्मा म्हणाला, "तुझ्या पित्यानं खूपसं धन कमवून ते एका सुरक्षित ठिकाणी लपवून ठेवलं आहे. ते रहस्य आत्ता तुला मी सांगणार आहे. पण, त्यापूर्वी तू असं सांग, की ते मिळाल्यावर तू काय करशील?"

नशेने गुंगलेल्या आपल्या डोळ्यांची अुघडझाप करत तो म्हणाला, "हं मोठसं घर घेईन, दास-दासी कामाला ठेवीन. मनाला वाटेल तितकं खाईन अन् हवी तेवढी दारू ढोशीन! आरामात राहीन अन् ज्या ज्या कोणी माझा अपमान केलाय, माझी पर्वा केलेली नाहीय, त्यांचा अेक अेक अपराध मोजून सूड घेईन. माझ्या बाबांची तसबीर हार घालून सजवीन अन् रोज त्यांची पूजा करीन."

त्याचे हे बोलणे संपल्याबरोबर भूत म्हणाले, "शर्मामहाराज, हाच माझा वारस आहे. माझं धन याला मिळालं, तर माझा आत्मा तृप्त होईल. मला तुमची परवानगी हवीय यासाठी. तुम्ही परवानगी न दिलीत, तर असंतुष्टच राहीन मी."

रामशर्माने त्याला परवानगी दिली अन् भुताने सांगितलेली हकिकत त्याच्या मुलाला सांगून टाकली. भूत तावडतोब तेथून अदृश्य झाले अन् रामशर्मा ही स्वदेशी परतला.

नवऱ्याकडून सर्व काही ऐकून घेतल्यावर रामशर्माची बायको त्याला विचारू लागली, "तुम्ही गेलात कोणत्या कामासाठी, अन् काय करून आलात? काहीच प्रयोजन नसताना इन्द्रपुरीला जायचं कारण तरी काय? एका नालायकाला भुताचं धन देऊन टाकल्यानं कुणाला मोक्ष मिळेलसं वाटलं तुम्हाला? मला तर काही समजत नाहीय, सगळाच गोंधळ वाटतोय."

रामशर्मा हसत अुत्तरला, "इन्द्रपुरीचा राजा विलासी माणूस आहे. तिथल्या सरकारी विभागांतून सर्वत्र अनाचार वाढलाय. राजाचा सरकारी विभाग किंवा संस्थांवर मुळीच विश्वास नाही. त्या राज्यातले लोक अत्यन्त संकुचित विचारांचे आहेत. आपलं गाव, आपली गल्ली याबद्दलच ते बोलत असतात अन् त्याच विचारांच्या ओढ्यात कुढत रहातात. जिवन्त असताना अन् मेल्यावरही तेच ते पुन:पुन्हा बोलत रहातात. असलेलं धन गरजवन्तांच्या अुपयोगी न पडता नालायकांच्या हाती पडतंय. म्हणतात ना, कि इच्छा पूर्ण न झाल्या, तर माणूस भूत बनतो? निरर्थक स्वार्थामागे लागून त्या भुतानं अयोग्य मुलाला आपलं धन दिलं अन् संतुष्ट झालं."

हे बोलणं, ही हकिकत त्या पतिपत्नींपुरतीच मर्यादित राहिली नाही. अनेक लोकांना ती कळली अन् इन्द्रपुरीपर्यन्तही पोचली. इन्द्रपुरीचा राजा अन् प्रजेनेही आपल्या दुरवस्थेचे कारण ओळखले अन् ते फार लज्जित झाले. हळुहळू राज्यात परिवर्तन घडू लागले अन् विदर्भातील सर्व जनते प्रमाणे ते सारे लोकही सुखी झाले.



# चान्दोबाच्या बातम्या



### दोरीवरील उड्यांचा उच्चांक

डॉ. जी. रामप्रसाद मद्रासचे निवासी आहेत. ते हाऊस-सर्जन आहेत. त्यांनी २१ नोव्हेंबर रोजी पाच तासात ४,०१७ वेळा दोरीवर उड्या मारून गिनीजच्या पुस्तकात स्थान मिळविण्याचा प्रयत्न केला. अशा उड्या मारणारे लोक दर तासाला पाच मिनिटांची विश्रांति घेतात. दोन वर्षांपूर्वी त्यांनी एका तासात ३५९० उठाबशा काढल्या, आणि ही बातमी गिनीजच्या प्रकाशकांना दिली. परंतु यापूर्वीच नवे संस्करण प्रकाशित झालेले होते, म्हणून यावेळी सावध होऊन त्यांनी योग्य वेळी प्रकाशकांना सूचना दिली. 'लिम्का'वाल्यांनी अगोदरच प्रकाशित केले होते की डॉ. रामप्रसाद यांनी एक तासात दोरीवर २५५६ उड्या मारल्या. विशेष सांगायची गोष्ट म्हणजे डॉ. रामप्रसाद यांना बाल्य-रोग-चिकित्सेची फार आवड आहे.



### उच्चांक गाठण्याचा प्रयत्न

कोईंबतूरचे एम्. पार्थसारथी व्यायामाचे शिक्षक आहेत आणि लवकरच एक नवा उच्चांक प्रस्थापित करण्याच्या मार्गावर आहेत. ते दर ताशी केवळ ५ मिनिटे विश्रांति घेऊन नऊ तासात २५०० कोलांट्या उड्या मारू शकतात. यासाठी त्यांना १६ कि.मीटर लांबीचा रस्ता पाहिजे. रस्त्यावर काही अडथळा येऊ नये, म्हणून काही सरकारी अधिकाऱ्यांची मदत पाहिजे. ते एक फार उत्तम खेळाडू आहेत आणि त्यांनी कराटे मध्ये ब्लॅक बेल्ट मिळविला आहे. गेले संपूर्ण वर्ष भर ते कोलांट्या उड्या मारण्याचा मन:पूर्वक सराव करीत आहेत. अमेरिकेचे याश्रिरा फर्मन यांनी साडे दहा तासात ८३४१ कोलांट्या मारून एक विक्रम स्थापित केलेला आहे.

### अकरा वर्षे पायी चालणारी



स्कॉटलंडच्या फियोने कांप्रबेलचे वय २७ वर्षांचे आहे. ब्रिटनच्या उत्तरेकडील आपले गाव 'जान ओ ग्रोटस'हून ती वयाच्या सोळाव्या वर्षी निघाली. १३६३ कि.मी. पायी चालून देशाच्या दुसऱ्या सरहद्दीवर पोंचण्याचा तिचा बेत होता. तिथे पोचल्यावर न थांबता ती १४ आक्टोबर रोजी चालत आपल्या गावी परत आली. आकरा वर्षे ती पायी चालत राहिली आणि ३१,३३५ कि.मी. चे अंतर ती चालली. ती ऑस्ट्रेलियात सिडनी पासून पर्थ पर्यंत व अमेरिकेत न्यूयार्क पासून लॉस एन्जेलिस पर्यंत पायी चालली. आफ्रिकेत एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत चालायला तिला दोन वर्षे लागली. इथून पुढे जर कधी प्रवास केला तर एकटीने न जाता कुणाला तरी बरोबर घेऊन जाईन असे ती म्हणते.



# महाभारत -८

हस्तिनापुर जवळच्याच जंगलात हिरण्यधनु नावाचा एक भिल्ल राजा होता. त्याचा पुत्र एकलव्य याला समजले की, हस्तिनापुरात अनेक राजकुमार गुरु द्रोणाचार्यांजवळ धनुर्विद्या शिकत आहेत; द्रोणांचे शिष्य बनून ते सर्वच शस्त्रांचे प्रशिक्षण घेत आहेत.

धनुर्विद्येत प्राविण्य मिळवण्याची एकलव्यची फार इच्छा होती. द्रोणाचार्यांजवळ जाऊन त्याने 'आपल्यालाही शिष्य बनवून धनुर्विद्या शिकवावी' अशी विनंती केली. परन्तु तो भिल्ल जातीचा असल्याचे कळल्यावर त्यांनी त्याला धनुर्विद्या शिकवायला साफ नकार दिला.

द्रोणाचार्यांना विनयपूर्वक नमस्कार करून एकलव्य जंगलात परत गेला. आचार्यांची एक मूर्ती बनवून त्याने तिलाच गुरु मानले आणि त्याने धनुर्विद्येचा अभ्यास सुरु केला. निरंतर अभ्यास व एकाग्रता यांमुळे तो द्रोणांच्या इतर सर्व शिष्यांपेक्षाही धनुर्विद्येत जास्त प्रवीण झाला.

एकदा सारे द्रोणशिष्य शिकारीसाठी एकलव्य रहात असलेल्या जंगलात गेले. त्यांच्या बरोबरच्या शिकारी कुत्र्यांपैकी एक नेमका एकलव्य धनुर्विद्येचा अभ्यास करत असलेल्या जागी पोचला. एकलव्याला पाहून तो कुत्रा जोरजोरात भुंकू लागला. आपल्या अध्ययनात व्यत्यय येऊ लागल्याने एकलव्याने त्याचा फक्त आवाजच बन्द करण्यासाठी, त्याच्या तोंडात एकामागून एक अशा बेताने बाण सोडले की,

एकलव्य



कुत्र्याला जराही इजा न होता त्याचे तोंड मात्र उघडेच राहिले; अन् त्याला भुंकता येईना!

कुत्र्याची अवस्था पाहून राजकुमार त्या धनुर्विद्याविशारदाला शोधत एकलव्यापाशी पोचले. त्यांनी एकलव्याला न ओळखून त्याला विचारले, "तू कोण आहेस? कोणत्या गुरूजवळ तू धनुर्विद्या शिकलास?"

उत्तरादाखल एकलव्याने त्यांना सांगितले, "मी भिल्ल राजा हिरण्यधनुचा मुलगा असून माझे नाव एकलव्य आहे. द्रोणाचार्यांना मी आपले गुरु मानतो."

तेथून हस्तिनापुरी परत आल्यावर राजकुमारांनी हा सारा वृत्तान्त द्रोणाचार्यांच्या कानी घातला. 'एकलव्य हा स्वतःपेक्षाही धनुर्विद्येत पारंगत ठरणार' या विचाराने अर्जुन दुःखी झाला होता. तो द्रोणाचार्यांना म्हणाला, "धनुर्विद्येत माझ्यापेक्षा कोणीही श्रेष्ठ असणार नाही, असे आपण मला वचन दिले होते. पण आपण एकलव्याला माझ्यापेक्षाही जास्त पटाईत केलं आहे!"

अर्जुनाचे बोलणे ऐकून द्रोणाचार्य अवाक् झाले! खरी गोष्ट जाणून घेण्यासाठी एकट्या अर्जुनालाच बरोबर घेऊन ते एकलव्याकडे गेले.

धनुर्विद्येच्या अध्ययनात मग्न असलेल्या एकलव्याने पुढे होऊन आचार्यांचे स्वागत केले, मोठ्या विनयाने त्यांच्या पावलांना स्पर्श करून नमस्कार केला अन् तो म्हणाला, "मी आपला शिष्य एकलव्य आहे."

"तू माझा शिष्य आहेस तर बोल, मला गुरुदक्षिणा काय देशील?" द्रोणाचार्यांनी एकलव्याला विचारले.

"गुरुदक्षिणा म्हणून माझ्या संबंध शरीरावर आपलाच अधिकार आहे." एकलव्य ताबडतोब उत्तरला.

"तसं असेल तर दे पाहू तुझ्या उजव्या हाताचा अंगठा कापून!" द्रोणाचार्यांनी गुरुदक्षिणा मागितली.

जराही विचार न करता एकलव्याने आपल्या उजव्या हाताचा अंगठा ताबडतोब कापून काढून द्रोणाचार्यांना अर्पण केला.

या घटनेनन्तर एकलव्याने डाव्या हाताने धनुष्य पकडून उजव्या हाताच्या उरलेल्या बोटांच्या मदतीने आपला धनुर्विद्येचा अभ्यास चालूच ठेवला. परन्तु त्याला पूर्वीसारखी शक्ति प्राप्त होऊ शकली नाही.

अशा प्रकारे द्रोणाचार्यांनी अर्जुनाच्या मनातील भय दूर केले अन् आपल्या कृत्याबद्दल जराही पश्चात्ताप न बाळगता दोघेही तेथून निघून गेले. निस्वार्थी व त्यागी एकलव्याचे त्यांनी जाताना एका शब्दानेही आभार मानले नाहीत.

द्रोणाचार्यांपासून पांडवांनी खूपशा विद्या शिकून घेतल्या, अन् निरनिराळ्या अन्य विद्यांतही ते पारंगत झाले. धर्मराज सारथ्य करण्यात पारंगत झाला, तर भीम गदायुद्धात. धनुर्विद्येत तर अर्जुन अजोड बनला. या विद्येत त्याचे बुद्धिचापल्य, बाण सोडण्यातली त्याची चलाखी व वेग, शस्त्राचा प्रयोग करण्याच्या पद्धतीतले त्याचे अद्वितीय कौशल्य इत्यादि स्तुत्य होते. 'त्याच्या तोलाचा अन्य वीर नाही' असं निश्चितपणे म्हटले जाई. परन्तु अश्वत्थामाला युद्धाबद्दलची जितकी रहस्ये माहीत होती, तितकी अन्य कोणालाही नव्हती.

नकुल-सहदेव खड्गयुद्धात प्रवीण झाले.

भीमाचे गदायुद्ध-कौशल्य व अर्जुनाची धनुर्विद्येतली पारंगतता पाहून दुर्योधन व त्याचे भाऊ या दोघांचा हेवा करीत असत.

आपल्या शिष्यांची परीक्षा घ्यावी असे एकदा द्रोणाचार्यांच्या मनात आले. सर्व राजकुमारांत जास्त चांगला नेमबाज कोण आहे, हे त्यांना पहायचे होते. त्यांनी एक मातीचा पक्षी बनवला



व तो एका झाडावर ठेवला. बाहेरून तो सहजपणे दिसत नव्हता. आपल्या शिष्यांना घेऊन द्रोण त्या झाडाजवळ जाऊन म्हणाले, "झाडावर ठेवलेला पक्षी, नीट लक्षपूर्वक पाहिलंत तर पानांच्या मधूनही दिसू शकेल. तुम्ही सर्वांनी फक्त त्याच्यावर नेम धरा अन् मी सांगितल्याबरोबर बाण सोडून त्याचं डोकं उडवा."

प्रथम धर्मराजची पाळी होती. द्रोणांनी त्याला विचारले, "नीट पहा, तुला पक्षी दिसतोय?" धर्मराज उत्तरला, "होय".

द्रोणांनी नन्तर विचारले, "त्या पक्षाबरोबरच मी अन् इथं असलेले सर्वजण दिसत आहेत?"

धर्मराज म्हणाला, ''हो, सर्व दिसतायत.''

द्रोणाचार्य म्हणाले, ''तुझी दृष्टी लक्ष्यावर केन्द्रित झालेली नाहीय. तू परत जा.''

द्रोणाचार्यांनी एकेक करून सर्व शिष्यांना बोलावून घेऊन तोच प्रश्न विचारले. त्यांना सर्वांकडून अशीच अुत्तरे मिळाली.

शेवटी अर्जुन आला व त्याने झाडावरचा पक्षी पाहिला. द्रोणांनी त्याला, ''आम्ही सर्वजण तुला दिसत आहोत ना?'' असं विचारताच, ''मला पक्ष्याच्या डोक्याशिवाय काहीच दिसत नाहीय?'' असे अुत्तर त्याने दिले.

द्रोणांनी 'सोड तुझा बाण' असे म्हणायचाच अवकाश! बस, अर्जुनाने आपल्या बाणाने पक्ष्याचे डोके अुडवले! आचार्यांच्या आनन्दाला सीमा राहिली नाही! त्यांनी अर्जुनाची तोंडभर स्तुती केली अन् मनातल्या मनात विचार केला की, द्रुपदाचा कोणी पराभव करू शकेल, तर तो केवळ अर्जुनच!

एकदा आपल्या शिष्यांसह द्रोणाचार्य यमुनेत स्नान करत होते. अचानक एका मगरीने आचार्यांचा पाय पकडला अन् ती त्यांना खोल पाण्यात ओढू लागली. द्रोण ओरडून आपल्या शिष्यांना बाणांनी मगरीला मारायला सांगू लागले. सर्वांनी बाण चालवले; परन्तु कोणीही मगरीला बरोबर बाण मारू शकला नाही; कारण कदाचित् आपल्या गुरुजींनाच बाण लागेल अशी त्यांना भीती वाटली. परंतु अर्जुनाने मात्र पाच बाण मारून आपल्या आचार्यांना इजा न करता मगरीला मारून टाकले.



यावर अर्जुनाही वाहवा करत द्रोण त्याला म्हणाले, ''अर्जुना, तुझं कौशल्य अमोघ आहे. मी तुला मन्त्रासहित ब्रह्मशिरोनामास्त्राची दीक्षा देईन. याचा प्रयोग मानवजातीवर तर होअू शकेलच, परन्तु सामान्य माणसावर तो करण्याने सारा भूलोकच दग्ध होईल.

अर्जुनाने ताबडतोब स्नान करून ब्रह्मशिरोनामास्त्राचा अुपदेश घेतला.

एके दिवशी द्रोण धृतराष्ट्राच्या सभेत गेले असता, तेथे भीष्म, विदुर, कृप, बाल्हिक, सोमदत्त आदि सर्व अग्रगण्य व्यक्ती हजर होत्या.

त्या सर्वांसमक्ष द्रोण धृतराष्ट्राला म्हणाले, ''महाराज, सर्व राजकुमार माझ्याकडून विद्या संपादून तयार झालेले आहेत. आपण त्यांच्या प्राविण्याची परीक्षा घ्यावी.''

या विद्याप्रदर्शनाच्या व्यवस्थेचा भार विदुरावर सोपवला गेला. ही तयारी खूप मोठ्या प्रमाणावर केली गेली. अस्त्र-विद्या प्रदर्शनासाठी एक विशाल भूमी मुक्रर करून ती साफ करण्यात आली, तेथील मोठे दगड झडझाडोरा वगैरे हटवून समतल मैदान तयार करण्यात आले. प्रेक्षकांना बसण्यासाठी ज्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणे आसने बनवण्यात आली. कनाती वगैरे लावून सर्व बाजू सुशोभित केल्या गेल्या अन् अुत्तर बाजूकडे एक भव्य प्रवेशद्वारही बनवले गेले.

एका शुभदिनी सुमुहूर्त निश्चित केला गेला. राजवंशातील सर्वजण हे प्रदर्शन पहायला आले. गांधारी, कुन्ती आदि अंतःपुरातील स्त्रियाही





तेथे आल्या. त्यांच्यासाठी बसण्याची निराळी व्यवस्था होतीच. सर्व लोक आपापल्या जागी स्थानापन्न झाल्यावर द्रोणाचार्य आपला पुत्र अश्वत्थामा याला बरोबर घेऊन सभास्थानी आले अन् रंग-स्थलाच्या (आखाड्याच्या) मध्यावर उभे राहिले. त्यांचे सर्व शिष्य खड्ग, ढाल, धनुष्य-बाण आदि आयुधांनी युक्त होते. त्यांच्यात खूप उत्साह दिसून येत होता. सर्वप्रथम धर्मराज व त्याच्या मागो-माग बाकी सारे राजकुमार मंचावर उपस्थित झाले.

रथ, हत्ती व घोड्यांवर आरूढ होऊन त्यांनी सर्वांनी विविध प्रकारच्या अस्त्रांमधले आपले कौशल्य दाखवले. नन्तर धनुर्विद्येतील कौशल्यही दाखवले. ते सर्व पहात असताना 'चुकून आपण जखमी तर होणार नाही ना!' अशी भीतीही काही जणांना वाटत होती.

मंचावर जे जे काही घडत होते, ते सर्व विदुर सविस्तर वर्णन करून धृतराष्ट्राला सांगत होता, अन् कुन्ती गांधारी वगैरेही ते ऐकत होत्या.

थोड्या वेळाने भीम व दुर्योधन आपापल्या गदा घेऊन मंचावर आले. दोघांच्यात युद्ध सुरू झाले. केवळ प्रदर्शनासाठीच युद्धाचे आयोजन झाले असले तरी, काहीजण भीमाला, तर काही दुर्योधनाला प्रोत्साहन देत होते. ते नंतर तर त्यांना एकमेकांविरुद्ध भडकवू लागले. द्रोणांनी जेंव्हा पाहिले की हा प्रकार अनिष्ट वळण घेऊ पहात आहे, तेंव्हा अश्वत्थामाला पाठवून त्यांनी ती लढत थांबवली.

आता अर्जुन मंचावर आला. त्याला पहाताच लोकांच्या तोंडून हर्षध्वनी निघाले. धृतराष्ट्राने विदुराला विचारले-, "अचानक हा गोंधळ कसला चाललाय?" विदुराने अर्जुन मंचावर आल्याची खबर सांगितली.

अर्जुनाने वर्णनातीत कलाकौशल्य दाखवले. दिव्य अस्त्रांचा प्रयोग करून त्याने आग्नि, मेघ इत्यादींची निर्मिति केली. एका शस्त्राचा प्रयोग करून तो स्वतःच अंतर्धान पावला. त्याचा नेम अमोघ होता. डुकराचा एक पुतळा गोलाकार हलत ठेवलेला होता. अर्जुनाने एकाच वेळी पाच बाण सोडून पुतळ्याचे तोंड छिन्नविच्छिन्न केले.

सर्व राजकुमारांची आपापली कौशल्ये दाखवून झाल्यावर जन्मजात कवचकुंडले धारण करणारा कर्ण मंचावर आला. त्याचा चेहरा बालसूर्यासारखा झळाळत होता. त्याच्या हातात धनुष्यबाण होते. द्रोणाचार्य व कृपाचार्य यांना विनयाने नमस्कार करून त्याने गंभीर स्वरात घोषणा केली, ''अर्जुना! धनुर्विद्येत एकटा तूच मोठा प्रवीण आहेस, असं समजू नकोस. तू आता जे जे चमत्कार करून दाखवलेस ते सारेच्या सारे मलाही करता येतात, आत्ता करून दाखवतो मी.''

कर्णाच्या या क्रोधयुक्त बोलण्याने अर्जुनालाही राग आला. त्याला आपला अपमान झाल्यासारखे वाटले. आता प्रेक्षकांच्यातही कुतूहल निर्माण झाले - पुढे काय होणार?

कर्णाने खरोखरच अर्जुनाने दाखवलेले सर्व चमत्कार करून दाखवले. त्याच क्षणी दुर्योधन व त्याचे भाऊ मंचावर धावत आले आणि त्यांनी कर्णाला मिठी मारली. त्याचे अभिनन्दन करून आलिंगन देत दुर्योधन कर्णाला म्हणाला, ''आजपासून तू माझा खास मित्र झाला आहेस. इतकेच नव्हे तर तू माझा आप्त आहेस, आमच्यातलाच एक आहेस. आमच्या शत्रूचा नाश करण्यात तू आम्हाला मदत कर.''

कर्णाने त्याची विनंती मान्य केली. अर्जुनाशी द्वंद्वयुद्ध करण्यासाठी कर्णाने द्रोणाचार्यांकडे परवानगी मागितली. अर्जुनाने त्याचे आव्हान सहर्ष स्वीकारले. परन्तु आपल्या स्वतःच्याच पुत्रांमधे युद्ध होणार असे पाहून कुन्ती मूर्च्छित झाली. परिचारिका येऊन तिची शुश्रूषा करू लागल्या.

इतक्यात कृपाचार्यांनी कर्णाला विचारले, ''मुला, तू कोणत्या जातीचा आहेस? कुठे रहातोस तू? तुझे आईबाप कोण? तू जर क्षत्रीय असशील, तरच अर्जुन तुझ्याशी द्वंद्वयुद्ध करेल.''

आपले पालनपोषण करणाऱ्यांचे नाव सांगायची कर्णाला लाज वाटू लागली.

क्रमशः





# उदार रामचन्द्र

कीर्तनपुर मध्ये कर्मचंद नावाचा एक सधन शेतकरी रहात असे. तो श्रीमंत असल्यामुळे सर्व लोक त्याला मान देत. आपल्या संपत्तीच्या अहंकारामुळे कर्मचंद नोकरांशी दिलदारपणे वागत नसे.

कर्मचंदला तीन मुलगे होते. पहिला व दुसरा मुलगा वडिलांच्या इच्छेनुसार सर्व करीत राही. अशा रीतीने ते वडिलांचे खरे वारस मानले जात, तिसरा मुलगा रामचन्द्र पित्याहून अगदी वेगळ्या स्वभावाचा होता.

तो म्हणायचा - ''पोटाची खळगी भरण्यासाठी बिचारे नोकर आपल्याकडे राबत आहेत. आपण यजमान आहोत, म्हणून आपल्यात अहंकार निर्माण होता कामा नये. जर दिवस फिरले तर आपली ही दुर्दशा होईल, दारिद्र्यातील यातना सहन कराव्या लागतील. आपण जर सर्वांना आदराने वागवले, तर आपल्या अडचणीच्या वेळी ते आपल्याला मदत करतील.''

त्याचे वडील आणि थोरले भाऊ जेव्हा या सर्व गोष्टी ऐकत, तेव्हा त्याला समजून सांगत - ''नोकरांना आपण ताब्यात ठेवले पाहिजे. त्यांना डोक्यावर घेणं बरं नव्हे. नाहीतर आपणच केव्हा तरी खड्ड्यात पडू.'' निरनिराळ्या परींने ते त्याला सावध करण्याचा प्रयत्न करीत.

कर्मचंदाकडे गोपी नावाचा एक नोकर काम करीत असे. त्याचा एक दूरचा नातेवाईक मेला. मरता मरता आपली एक एकर जमीन त्याने गोपीला दिली. कर्मचंदाला ही बातमी देत गोपी म्हणाला - ''मालक, आपण माझे अन्नदाते आहात. आपण परवानगी दिलीत तर आपल्या बायको व मुलांसह त्या गावी जाऊन आपली शेती-वाडी करीन.''

कर्मचंदला गोपीचा हेवा वाटला. तो म्हणाला - ''अरे, तुला तर मिळाली आहे एक एकर जमीन. एवढ्याशा जमिनीतून तुला

सुहासिनी नाईक



मिळून मिळून मिळणार ते काय? तू माझ्याकडे नोकर आहेस हे विसरू नकोस. ठरलेल्या मुदतीत तुला माझ्याकडे काम केलेच पाहिजे. अजून दोन महिने बाकी आहेत. तुला जर नियमाचं उल्लंघन करून जायचं असेल, तर अगोदरच माझ्याकडून जे धान्य घेतले आहेस ते परत देऊन टाक.''

अशा परिस्थितीत गोपी उरलेले दोन महिने कर्मचंदकडे काम करीत राहिला. मुदत संपल्यावर, मालकाची परवानगी घेऊन, बायको व मुलांसह तो आपली जमीन असलेल्या गावी गेला व तेथे शेती-वाडीचे काम त्याने सुरू केले.

गोपी जेव्हा नोकरी करायचा तेव्हा आपल्या मर्यादित प्राप्तीत काही बचत करू शकत नसे. मिळणाऱ्या पैशात आपल्या कुटुंबाचे पालन-पोषण करणेच त्याला मुश्किल होई, म्हणून शेती करण्यासाठी त्याला थोडे कर्ज घ्यावे लागले. त्याची परिस्थिति पाहून दुसरा एक शेतकरी त्याला म्हणाला - ''गोपी, अर्ध्या एकराची तू मशागत कर, बाकी अर्ध्या एकरात मी शेती करतो. सगळा खर्च मी करीन. जो फायदा होईल तो आपण निम्मा-निम्मा वाटून घेऊ. यामुळे तुला आपल्या शेतीसाठी निराळी रक्कम खर्च करावी लागणार नाही.''

गोपीला ही योजना पसंत पडली. आता त्याला आणखी कर्ज घेण्याची आवश्यकता राहिली नाही, आणि त्याचे शेतीचे काम निर्विघ्नपणे सुरू झाले.

गोपीने आपल्या मुलीच्या लग्नाचा विचार केला आणि एक स्थळ निश्चित केले. तो स्वत: कर्मचंदाकडे गेला आणि त्याला आपल्या मुलीच्या लग्नाचे निमंत्रण दिले. कर्मचंद आणि त्याच्या थोरल्या दोन मुलांनी या निमंत्रणाची थट्टा केली. पण तिसरा मुलगा रामचन्द्र स्वतंत्रपणे भेटून म्हणाला - ''गोपी, तू अनेक वर्षे आमच्याकडे इमानदारीने नोकरी केली आहेस. मी वडिलांवर अवलंबून आहे हे तू जाणतोसच. तरी पण तुझ्या मुलीच्या लग्नाला मी नक्की हजर राहीन.''

वडील आणि भाऊ यांनी रामचन्द्रची टिंगल केली, पण तरी ही तो गोपीच्या मुलीच्या लग्नासाठी गेला. त्यावेळी गोपीशी भागीदारीत शेती करणारा शेतकरी अचानक वारला. तुला द्यावयाचे पैसे मी लग्नाच्या वेळी देईन असा त्याने वायदा केलेला होता. आकस्मिक मृत्यूमुळे भागीदार शेतकऱ्याचे कुटुंबीय दु:खी-कष्टी झालेले होते. त्यांच्याकडे पैशांची मागणी करणे गोपीला इष्ट वाटले नाही.

लग्नाच्या वेळी नवऱ्या-मुलाकडील मंडळींनी हुंड्याची मागणी केली. या दयनीय अवस्थेत गोपी रामचंद्रला म्हणाला - ''आता माझी स्थिति कशी आहे हे आपण जाणताच. आपण एका प्रतिष्ठित शेतकऱ्याचे चिरंजीव आहात. नवऱ्या-मुलाकडील लोकांना आपण थोडे समजाऊन सांगाल?''

नवरा-मुलाच्या वडिलांना रामचन्द्रने गोपीची नाजुक परिस्थिति समजावण्याचा प्रयत्न केला. पण याचा त्यांच्यावर जरा ही परिणाम झाला नाही. ते पर्खडपणे म्हणाले - ''भागीदाराने पैसे दिले नाहीत, यावर मी कसा विश्वास ठेवू? लग्न करायची इच्छा असेल तर आपण असे करू शकाल - अर्धा एकर जमीन माझ्या मुलाच्या नावे लिहून देववा. जर हे शक्य नसेल, तर हे लग्न मोडलं असं समजा.''

गोपी अर्धा एकर जमीन लिहून द्यायला तयार झाला. पण नवरी-मुलगी सुभाषिणीने या प्रस्तावाला विरोध केला. ती म्हणाली - ''आपल्या व्याह्यांच्या म्हणण्यावर ज्यांचा विश्वास नाही, त्यांच्यावर मी कसा विश्वास ठेवू? माझी या लग्नाला तयारी नाही. पैशांच्या मागे लागणारांनी आपल्या मुलासाठी दुसरी एकादी मुलगी पहावी.''





मुलीच्या या बोलण्यावर वर-पक्ष भडकला. मुलाचे वडील म्हणाले - ''एका अविवाहित मुलीला इतकी घमेंड शोभत नाही. एक दमडी ही न घेणाऱ्या कोणाबरोबर लग्न करतेस ते आम्ही ही पाहूच!'' असेच आणखी कटु शब्द ऐकवीत वऱ्हाडाने तेथून काढता पाय घेतला.

मुलाकडचं वऱ्हाड परत निघालेलं पाहून गोपी आ वासून पहातच राहिला. तेव्हा रामचन्द्र त्याला म्हणाला - ''मी लहानपणापासून माणसांचा चांगुलपणा पहात आलो आहे. श्रीमंत नि गरीब असा फरक मी कधी केला नाही. तुझी मुलगी सुभाषिणी मी लहानपणापासून पहात आलो आहे. तिचा स्वाभिमान मला फार आवडला. तुझी हरकत नसेल तर याच मुहूर्तावर माझी तिच्याशी लग्न करायची तयारी आहे. यामुळे माझ्यावर जी संकटं येतील, त्यांचा मी सामना करीन.''

गोपीला माहीत होतं की रामचन्द्रचे वडील चांगले श्रीमंत आहेत. म्हणून त्याने या लग्नाला स्वीकृति दिली नाही. तेव्हा गोपीला समजाऊन सांगत रामचन्द्र म्हणाला - ''ठीक मुहूर्ताच्या वेळी तुझ्या मुलीचं लग्न आडून राहिलं आहे, या वेळी तिच्याशी लग्न करायला कोणी सरसावेल असं मला वाटत नाही. माझ्या घरच्या लोकांची तू काळजी करू नकोस. मी त्यांना समजाऊन सांगेन. तू या लग्नाला संमति दे.''

अशा रीतीने ठरलेल्या मुहूर्तावर रामचन्द्र आणि सुभाषिणी यांचे लग्न झाले. कर्मचन्द खूप रागावला. दोन्ही थोरल्या भावांनी त्याची नाचक्की केली. बराच विचार करून शेवटी कर्मचंद म्हणाला -''झालं ते होऊन गेलं. शेवटी तू माझा मुलगा आहेस. मी तुला थोडे पैसे देतो. मी या गावात मान-मरातबाने रहावं असं तुला वाटत असेल, तर आपल्या बायकोला घेऊन दुसऱ्या एखाद्या गावी जाऊन रहा.''

वडिलांनी दिलेले पैसे घेऊन रामचन्द्र आपल्या बायकोच्या गावी आला. तिथे त्याने थोडी जमीन खरेदी केली आणि शेतीवाडी करू लागला. चार वर्षांच्या काळात त्याने पाच एकर जमीन खरेदी केली. आवश्यकतेनुसार तो अन्य शेतकऱ्यांना सल्ला देऊन त्यांना मदत करू लागला. त्याच्या परोपकारी स्वभावामुळे त्याने समाजात मानाचे स्थान मिळविले.



एक वर्षी पावसाळ्यात जोराचे वादळ आले, समुद्र खवळला. यामुळे गावातील शेतजमीन खाऱ्या पाण्याने भरून गेली. सर्व पिकांची नासाडी झाली. कर्मचंदाची सारी जमीन निरुपयोगी झाली. निदान चार-पाच वर्षांत जमिनीत काही उगवण्याची चिन्हे दिसेनात. गावचा सधन शेतकरी कर्मचन्द आणि त्याचे नोकर यात काही फरक राहिला नाही. ज्या ठिकाणी वादळाचा उपद्रव झाला नव्हता अशा गावी लोकांनी स्थलांतर केले.

रामचन्द्रला जेव्हा हे सारं समजलं तेव्हा आपल्या गावातील काही लोकांना त्याने आश्रय दिला. शक्य तेवढी त्यांना मदत केली. आपले वडील व भाऊ गाव सोडून कोठे तरी दूर गेलेले आहेत हे ही त्याला समजले. त्यांना शोधण्यासाठी तो निघाला. बरोबर गोपी व त्याची बायको होतीच.

एका गावाच्या सरहद्दीवर त्याने पाहिले की आपले वडील व भाऊ असहाय्य स्थितीत अन्नासाठी तडफडत बसलेले आहेत. अंगावरील कपड्यांशिवाय त्यांच्याजवळ अन्य काही नव्हते. आपला मुलगा व सून यांना पाहून कर्मचन्दच्या डोळ्यात अश्रू भरून आले.

वडिलांचे हात आपल्या हातात घेत रामचन्द्र म्हणाला - ''आपण मुळिच काळजी करू नका. जिथं फुलं असतात तिथं काटे ही असणारच. खारे पाणी भरलेल्या आपल्या शेतात आता चार-पांच वर्षे तरी शेती करता येणार नाही. तोपर्यंत आपण सर्व जण मिळून शेती करू. आमच्या इथे कोणी मालक नाही, ना कोणी नोकर!''

बायको व गोपी यांनी ही कर्मचन्दला विनंती केली, ''चला, आपण सर्व जण एकत्र काळ्या आईची सेवा करू या.''

रामचन्द्रचा चांगुलपणा पाहून वडील व भाऊ आनंदित झाले. त्याच क्षणी त्यांनी आपल्या स्वार्थाचे विचार सोडून दिले. गरीबां बद्दलची त्यांच्या मनातील दुर्भावना नष्ट झाली. रामचन्द्रच्या मदतीने सर्वांनी एका नवीन जीवनाला प्रारंभ केला.





# अति लोभाचा परिणाम

तो बिचारा अगदीच निर्धन होता. आसपासची गावे फिरून तो भीक मागत असे. गावाबाहेरील शेतात काम करणारी माणसं आपलं खाणं खाअून झालं, की अुरलंसुरलं त्याला देत. पण याशिवाय गावात कोणत्याही घरी त्याला भीक मिळत नसे. एकाद्या घरी भीक मागितली, तर घरातला कुत्रा मागे लागून त्याला पळवून लावी.

त्यावर्षीही भिकाऱ्याही स्थिती तशी हलाखीचीच राहिली. जेंव्हा लागोपाठ दोन दिवस त्याला खायला काहीच मिळाले नाही, तेंव्हा गाव सोडून तो दुसऱ्या गावात गेला. वाटेत त्याला एक म्हातारा भेटला. तो भिकाऱ्याला म्हणाला, ''मला फार दया येतेय तुझी. हा घे एक चणा.'' असे म्हणत म्हाताऱ्याने चण्याचा एकच दाणा भिकाऱ्याच्या हातावर ठेवला.

भिकाऱ्याने विचारले. ''या एका चण्यानं माझं पोट कसं भरेल?''

''तो खाअून तुझा काहीच फायदा नाही होणार; पण तो तुझ्या जवळ असेल, तर मात्र गावात कुठेही तुझा पाहुणचार होईल बघ.'' म्हातारा म्हणाला.

नंतर दोघेही आपापल्या दिशेने चालू लागले. अंधार होता होता तो गावात पोचला, अन् एका घरासमोर अुभा राहून ओरडू लागला, ''अन्न वाढा माई !''

घरचा मालक हाक ऐकून ताबडतोब बाहेर आला. त्याने भिकाऱ्याला पाहिले. तो आपल्या गावचा नाही, अशी खात्री झाल्यावर मालक भिकाऱ्याला आपल्या घरात घेअून गेला. त्याने त्याला पोटभर जेवू घातले. तो भिकाऱ्याला म्हणाला, ''आजची रात्र इथेच घराच्या कट्ट्यावर झोप.''

भिकारी खूपच खूष झाला. आजपर्यन्त त्याला कोणीच इतक्या आदराने वागवले नव्हते.

**चान्दोबात पंचवीस वर्षांपूर्वी प्रकाशित झालेली गोष्ट.**

त्याच्या मनात आले की, 'हा नक्की त्या चण्याचाच प्रभाव!' त्याने तो चणा आपल्या अुशाशी नीट ठेवला अन् आरामात झोपून गेला.

सकाळी त्या घरवाल्याची कोंबडी दाणे टिपत टिपत भिकाऱ्याजवळ आली. तिच्या हालचालीमुळे तो झोपेतून जागा झाला. इतक्यात त्याला असे दिसले की कोंबडीने आपला चण्याचा दाणा चोचीत अुचलून गट्टम् केला!

भिकारी ओरडू लागला, ''बाप रे, माझा चणा कोंबडीनं खाल्ला!''

घरमालक बाहेर आला. त्याला जेंव्हा हकिकत कळली, तेंव्हा तो म्हणाला, ''मी देतो ना तुला हवे तेवढे चणे!''

''मला जास्त चण्यांची गरज नाहीय. मला माझा तोच चणा हवा. त्यातच माझं भाग्य आहे. तो एका सिद्धपुरुषाने दिलेला चणा आहे.'' भिकारी जास्तच तक्रार करत म्हणाला.

''पण आता मी तरी काय करू? चणा तर कोंबडीच्या पोटात गेला. हवी तर कोंबडीच घेअून जा.'' मालकाने अुपाय सुचवला.

भिकाऱ्याला वाटले की, शहरात नेअून कोंबडी विकली, तर बऱ्यापैकी रक्कम हाती येईल. पण त्याच दिवशी तो शहरात पोचू शकला नाही. त्यामुळे वाटेतल्या एका गावात त्याने मुक्काम करायचे ठरवले. त्याने एका माणसाला रात्रीपुरता त्याच्या घरात आसरा मागितला. त्या माणसाने दया दाखवून त्याला



जेवणही दिले अन् झोपायला जागाही दिली. कोंबडी आपल्या जवळ ठेवून भिकारी झोपून गेला. तो झोपल्याबरोबर कोंबडी तेथून पळाली अन् घरातल्या इतर कोंबड्यात जाअून त्यांच्याशी ती भांडू लागली. घरातल्या कोंबड्यांनी एकत्र येअून तिला चोची मारून बाहेर हाकलायला सुरुवात केली. कोंबडी घाबरून गोठ्यात शिरली अन् एका छोट्या गायीच्या पायाखाली येअून मरून गेली.

''अरे माझी सोन्याची कोंबडी!'' असे म्हणत भिकारी जोरजोरात ओरडू लागला. घराच्या मालकाने त्याला आपल्या दोन कोंबड्या त्या बदल्यात द्यायचे कबूल केले, तेंव्हा तो म्हणू लागला की, ''ज्या गायीच्या पायाखाली



येऊन माझी कोंबडी मेली, ती गायच मला हवी.'' ती गाय घेऊन भिकारी पुढे निघाला.

शहरात पोचता पोचताच भिकाऱ्याला अंधाराने गाठल्याने गावाबाहेरच दिसलेल्या घरात जाऊन भिकारी तेथील गृहस्थाला म्हणाला, ''मी खूप दुरून आलोय. या शहरात माझ्या परिचयाचं कोणीही नाहीय. आजची रात्र मला इथेच राहू द्याल?'' त्या सद्‌गृहस्थाने भिकाऱ्याला परवानगी दिली.

त्या दिवशी त्या घरात काही शुभकार्य होते आणि त्यानिमित्त बरेचसे नातेवाईक तेथे आलेले होते. भिकाऱ्यालाही सर्वांबरोबर मिष्टान्न-भोजन मिळाले. मध्यरात्री त्याची गाय दावे तोडून गेली अन् घरवाल्याच्या घोड्याजवळ जाऊन त्याचे गवत खाऊ लागली. पण आपल्या खाण्यात गायीने तोंड घातलेले घोड्याला आवडले नाही. त्याने तिला इतक्या लाथा मारल्या की ती बिचारी लहानशी गाय तिथेच मरून गेली.

दुसऱ्या दिवशी भिकाऱ्याने घरमालकाशी भांडण सुरू केले. तो गृहस्थ बिचारा गरीब स्वभावाचा होता. म्हणून त्याने मुकाट्याने आपला घोडा भिकाऱ्याला देऊन टाकला.

भिकारी आता घोड्यावर बसून शहरात जायला निघाला. त्याने मनाशी विचार केला, ''आता माझे चांगले दिवस आलेले दिसतायत. माझं भाग्य उजळलंय! म्हाताऱ्याने दिलेला चणा चांगलाच प्रभावी दिसतोय. पण फक्त घोडा मिळवून काय उपयोग? यावेळी तर चांगलसं घर, सुन्दरशी बायको अन् थोडीफार इस्टेटही मिळवीन मी! फार झालं आता भटकणं! कुठेतरी कायम वस्ती करून रहावं!''

संध्याकाळपर्यन्त तो शहराच्या मध्यावर पोचला. एका गल्लीतून जात असताना त्याला एक मोठीशी धर्मशाळा दिसली अन् समोरच एक सुंदरशी मुलगीही. त्याला असे वाटले की, अशी सुन्दर मुलगी आपली बायको झाली तर किती छान होईल! म्हणून तो घोड्यावरून उतरून धर्मशाळेत शिरला. त्याने तिथल्या नोकराशी बोलणे केले अन् एक खोली घेतली.

भिकाऱ्याने जी मुलगी पाहिली होती, ती या नोकराचीच मुलगी होती. अन् ती त्याची एकुलती एक मुलगी होती. त्याने ठरवले की तिच्याशी लग्न करून या धर्मशाळेतच रहावे. अशा तऱ्हेने त्याची घराची, बायकोची अन् भोजनाची सोय आपोआपच होणार होती; आरामात दिवस काढता येणार होते.

धर्मशाळेच्या खोलीत प्रवेश करत तो त्या नोकराला म्हणाला, ''हे पहा, माझ्या घोड्याची नीट व्यवस्था करा. त्याला वेळेवर चारापाणी द्या. तो फार उत्तम जातीचा घोडा आहे. लक्षात ठेवा, तो काही साधासुधा घोडा नव्हे.''

गिऱ्हाइकाने घोड्याबद्दल इतके सारे बजावून सांगितल्यामुळे तो नोकर स्वतःच घोड्याला पाणी पाजायला गेला. घोडा पाणी पिता पिता नोकराची नजर चुकवून दूर पळून गेला. नोकराने भिकाऱ्याकडे येऊन ही खबर देताच, तो कर्कश्श आवाजात ओरडला, ''मी तुला प्रथमच सांगितलं होतं की घोडा उत्तम आहे. पण तू इतकी बेपर्वाई दाखवलीस? घोडा किती मूल्यवान् होता, हे तुला काय माहीत! माझा घोडा आत्ता ताबडतोब परत आणून दे. सकाळीच मला राजाला भेटायला जायचं आहे. माझं काम फार महत्त्वाचं आहे.''

''आपण फिकीर करू नका. सकाळी मी घोडा शोधून आणीन. त्यासाठी मला कितीही त्रास झाला तरी बेहत्तर!'' नोकर याचना करत म्हणाला.

''हो तर! तुझी मुलगी अशी नाहीशी झाली, तर सकाळपर्यन्त वाट पहाशील का? माझा



घोडा तर मला त्यापेक्षा कितीतरी पटीने महत्त्वाचा आहे!'' भिकारी राग व्यक्त करत म्हणाला.

''आपण सांगा, अशा मध्यरात्री मी तरी काय करू?'' नोकर आता चिडत म्हणाला.

''तुझ्या बेपर्वाईनं माझा घोडा गेला. आता त्या ऐवजी तुझी मुलगी दे मला!'' भिकाऱ्याने मागणी केली.

आता मात्र नोकर चांगलाच एकेरीवर आला. दोघात 'तू तू', 'मी मी' सुरू झाले. इतक्यात नोकराची बायको तेथे आली. ती आपल्या नवऱ्याला म्हणाली, ''चूक तर आपलीच आहे ना. तेंव्हा आता चुप बसाना जरा, आपल्या मुलीनं जर मान्य केलं, तर हे म्हणतायत तसंच

करू आपण. आज ना उद्या तिला कुणा परक्या हाती सोपवावंच लागणार आहे ना! आपल्याला शोधूनही असा जावई सापडणार नाही. तिची काय इच्छा आहे, हे पाहून येते मी. तोपर्यन्त तुम्ही आपलं भांडण बन्द ठेवा.'' तिचे बोलणे ऐकून भिकाऱ्याला आपला हेतु सफल होत आहेसे वाटले.

थोड्याच वेळात नोकराची बायको धावतपळत तेथे आली अन् म्हणाली, ''माझी मुलगी तुमच्याशी लग्नाला तयार नाहीय. म्हणून मी तिला गुंगवून एका पोत्यात बन्द करून ठेवलंय. तुम्ही पोतं घेऊन ताबडतोब इथून बाहेर पडा. खूप दूर गेल्यावर सकाळ होईल तेंव्हा आपण कुठे आहोत, इथे कशा आलो, वगैरे काहीच तिला कळणार नाही. तिला घरी तर परत येता येणार नाही. नंतर मग तिला समजवा, धमकी द्या, पण काहीही करून लग्न करा तिच्याशी.''

असे काही होईल असे भिकाऱ्याला वाटलेही नव्हते. तरीही नोकराच्या बायकोचा सल्ला त्याला बरोबर वाटला. त्याने ठरवले की, प्रथम त्या मुलीला लग्नाला तयार करावे अन् नन्तर पुन्हा परत येऊन या धर्मशाळेत तळ ठोकावा.

पोते वाहून नेत तो मध्यरात्री शहराबाहेर पडला. पोत्याचं वजन काही खास जास्त नव्हते; पण आतल्या हालचालीमुळे ते वाहून नेणे जड जात होते. या शिवाय अंधारच अंधार असल्याने प्रत्येक पाऊल सावधगिरीने टाकावे लागत होते. तरीही सकाळ उजाडता उजाडता तो कसाबसा जंगलात पोचला.

मोठ्या आशेने त्याने पोते उघडले. पोत्यातून एक कुत्रा उडी मारून बाहेर आला अन् एकदम भिकाऱ्यावर तुटून पडला. त्याचे नाक जखमी करून तो वेगाने तेथून पळून गेला.

चणा जे भाग्य त्याच्यासाठी घेऊन आला होता, ते आता समाप्त झाले होते. आता पुन्हा भीक मागण्यावाचून गत्यंतर नव्हते. करणार तरी काय? आता पुन्हा गावोगाव भीक मागत आपला उदरनिर्वाह करणे त्याच्या नशिबी आले.



# बहुरूपा वसुन्धरा

## धोकेबाज मासा

मद्रास मधील मरीना समुद्र-किनाऱ्यावर एक मत्स्य-शाळा आहे. तुकताच तेथे एक मासा आणण्यात आला. त्याला फुलपाखरासारखे पंख आहेत. पाठीवर टोकदार काटे आहेत. याच्या पंखांमुळे समुद्री प्राणी याच्या जवळ यायला भीतात. 'रफ्सल्स स्कॉर्पियन फिश' नावाच्या या माशाचे वर्णन १९३० साली प्रकाशित झालेल्या पुस्तकात लिहिलेले आढळते. हा मासा विषारी आहे. पंख व पाठीवरील काट्यांनी जवळ येणाऱ्या प्राण्याला हा घायाळ करतो. म्हणून त्या काळी हा समुद्री सापापेक्षा ही अधिक धोकेबाज मानला जात असे आणि त्याला फार भीत. या प्रकारचा मासा समुद्राच्या पाण्यातच जीवित राहू शकतो. म्हणून याला वारंवार समुद्री पाण्यात बुडवावे लागते.

## भुंकणारे हरिण

मद्रासच्या जवळील वंडलूर येथील प्राणी-संग्रहालयात एका हिरण बालकाचा जन्म झाला. याचे डोळे फार सुंदर आणि चमचमणारे आहेत. त्याच्या जवळ गेलं की हे कुत्र्याप्रमाणे भुंकते. म्हणून याला भुंकणारे हरिण म्हणतात.

## पांढरा कावळा

तुम्ही कधी पांढरा कावळा पाहिला आहे? उत्तर नकीच मिळणार- नाही. तर मग तुम्ही मद्रासच्या चिल्ड्रेन्स पार्क मध्ये जा. तेथे तुम्हाला पांढरा कावळा दिसेल. लालसर रंगाचे डोळे आणि दुधासारखे पांढरे शुभ्र शरीर. हा १० दिवसांचा शिशु आहे. पण नित्य होत राहणाऱ्या शारीरिक बदलामुळे हा फार लहान दिसतो. कोट्टूर येथील झाडीत जेंव्हा काळे कावळे याला पळवून लावीत होते, तेंव्हा कोणी तरी याला वाचवले आणि पार्कच्या अधिकाऱ्यांकडे सोपविले.







PolioPlus



# IMMUNIZATION AN ASSURANCE OF GOOD HEALTH TO CHILDREN

VACCINATIONS When and How Many

| Age to Start Vaccination | Name of Vaccine | Name of Disease | How Many Times |
|---|---|---|---|
| Birth | BCG | Tuberculosis | Once |
| 6 weeks | Polio | Polio | Three times with intervals of at least one month |
| 6 weeks | DPT | Diphtheria Pertussis (Whooping Cough) Tetanus | Three times with intervals of at least one month |
| 9 months | Measles | Measles | Once |

**Babies should receive all vaccinations by the time they are twelve months old.**



Pregnant women should get themselves vaccinated against Tetanus (TT) twice — in an interval of at least one month — during the later stages of pregnancy.

HEALTHY CHILD — NATION'S HOPE & PRIDE

Design courtesy : World Health Organisation



# हजार दिवस चाललेले युद्ध संपले!

३१ डिसेंबर, १९९४ रोजी बोस्निया मध्ये चर्चमधील घंटा-नादाऐवजी लोकांनी ऐकले तोफांचे आवाज! गेली काही वर्षे हा क्रम चालू होता, म्हणून लोकांना त्यात काही नवीन वा विचित्र वाटले नाही. पण जेव्हा तोफांचे गर्जन संपले तेव्हा लोकांना हायसे वाटले. स्लावेनिया, क्रोशिया व मॅसिडोनिया प्रमाणे बोस्निया-हेर्जगोविना युगोस्लाविया फेडरेशन मधून फुटून स्वतंत्र झाले. याच मुद्यावर तीन वर्षांपासून या दोन देशात युद्ध जुंपले. आता फक्त सेर्बिया व मॉंटनिग्रो युगोस्लाविया फेडरेशन मध्ये आहेत.

मॅसिडोनिया सोडून बाकी तिन्ही गणराज्यात हिंसात्मक घटना होत आल्या आहेत. युगोस्लाविया फेडरेशनच्या सैन्यात सेर्ब अधिक संख्येने आहेत. विशेषत: बोस्निया-हेर्जगोविना यांच्यात गेले ३२ महिने युद्ध चालू आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर म्हणजे १९४५ नंतर दीर्घकाळ चाललेले युरोपातील हेच एक युद्ध म्हटले पाहिजे.

अधिक संख्येने असलेले मुसलमान आणि अल्पसंख्यक क्रोशियन यांच्याशी सेर्ब युद्ध करीत आहेत. सेर्बांनी राजधानी सरातीनोच्या विमान-तळावर ताबा मिळविला. तेव्हापासून संयुक्त राष्ट्र-संघाच्या शांति-सेनेला आपली कामगिरी बजावण्यात यश आले नाही. जेथे घनघोर युद्ध चालू होते, तेथे जीवनावश्यक वस्तु पाठविणे सुद्धा कष्टाचे झाले.

अमेरिका, रशिया, फ्रान्स, जर्मनी व इंग्लंड या पाच देशांनी एक संयुक्त समिति बनविली आणि तिच्या तर्फे शांतता स्थापन करण्यासाठी अनेक प्रस्ताव मांडले. पण युद्धात गुंतलेल्या पक्षांनी त्या सर्वांची हेटाळणी केली. शेवटी असा निर्णय झाला की शेकडा ४९ टक्के प्रांत सेर्बांना देण्यात यावा व बाकीचा इतरांना. पांच देशांनी मांडलेला हा प्रस्ताव सत्तारूढ मुसलमान शासकांनी स्वीकृत केला. क्रोटच्या प्रजेने ही हा प्रस्ताव मान्य केला.

याच वेळी अमेरिकेने संयुक्त राष्ट्र-संघाचे वतीने पाठवलेल्या शांति-सेनेवर सेर्बांनी हल्ला चढविला. या परिस्थितीत बोस्नियाला शस्त्रास्त्रे पुरवली जातील अशी अमेरिकेने धमकी दिली. तेव्हा सेर्बांनी अमेरिकेचे माजी अध्यक्ष जिम्मी कार्टर यांच्याकडे मदतीची याचना केली. जिम्मी कार्टर यांनी यापूर्वी अमेरिका-कोरिया व हैतीतील आंतरिक युद्ध संपुष्टात आणण्यासाठी सफल प्रयत्न केलेले होते.

कार्टर यांनी मुसलमान व सेर्ब नेत्यात चर्चा घडवून आणल्या. संयुक्त राष्ट्र-संघाचा शांतता-प्रस्ताव सेर्बांनी मान्य करावा यासाठी त्यांनी प्रयत्न केले. एक आठवड्या-भरातच ता. ३१ डिसेंबर रोजी दोन्ही पक्षांनी निर्णय घेतला की आता चार महिने युद्ध-विराम घ्यावा. मे अखेर पर्यंत समस्या संपूर्णपणे सुटावी यासाठी आवश्यक ती बोलणी लगेच सुरु झाली. अशा प्रकारे जवळ जवळ हजार दिवस लढल्यानंतर बोस्निया मध्ये शांति स्थापन झाल्याची चिन्हे दिसत आहेत.





# वीरचे साहस

आपल्याच गावातील एक मुलगी गौरीवर वीरचं प्रेम होतं. तिच्याशी लग्न करायची त्याची इच्छा होती. पण गौरीच्या मनात एका हिऱ्यांच्या हाराची लालसा होती. तो खरेदी करण्यासाठी निदान दहा हजार अशर्फ्यांची आवश्यकता होती. एवढी मोठी रक्कम बिचारा वीर कोठून आणणार ?

अधिकाधिक पैसे कमवता येतील, असा काही उद्योग-धंदा वीरला माहीत नव्हता. म्हणून तो आचाऱ्याचे काम शिकला. जो बोलावील त्याच्या घरी जाऊन भाज्या चिरणे, वाटण वाटणे व स्वयंपाकात मदत करणे असली कामं तो करू लागला. या कामांतून त्याचा उदर-निर्वाह कसा-बसा होई, पण हजार अशर्फ्या शिल्लक टाकणं फार कठिण काम होतं. काही झालं तरी गौरीशी लग्न करण्याची जबर इच्छा त्याच्या मनात होती.

अशा परिस्थितीत त्या देशाच्या राजाने एक घोषणा केली, राजाने जाहिर केले की जो कोणी अचाट साहस करून दाखवील, त्याला दहा हजार अशर्फ्यांचे बक्षिस दिले जाईल.

एकादं साहस करायची वीरची इच्छा होती. पण तो भित्रट स्वभावाचा होता. स्वप्नात बेडुक दिसला तरी भयाने त्याचा थरकाप होई, म्हणून तो शेतीचे काम ही करीत नसे. त्या गावचा रहिवासी राम दादा मोठा कल्पक माणूस होता. तो अनेकांना सल्ला देत असे. वीर त्याच्याकडे गेला नि म्हणाला-"राम दादा, माझ्या आवाक्यातलं एकादं छान साहस सुचवाल ?"

राम दादाला वीरचा स्वभाव चांगला माहीत होता. तो म्हणाला-"हे बघ वीर, भय हा एक भयंकर रोग आहे. ज्याला साहस करता येत नाही, त्याने औषध घेऊन या रोगावर उपचार केला पाहिजे. जर मनातील भय नष्ट झालं तर अनेक साहसाची कामे करता येतील. तू चंद्रपूरला जा. तिथे डोंगरावरील एका गुहेत एक साधु राहतो. भय कमी करण्यासाठी काही जडी-बूटी त्याच्या जवळ आहेत."

सुमन देसाई

वीर लगेच गौरीला भेटला आणि म्हणाला-"तुझ्यासाठी मी चंद्रपूरला निघालो आहे. तिथे जाऊन जडी-बूटी खाईन आणि निर्भय होईन. तेथून पुढे राजधानीत जाईन, राजाला साहस करून दाखवीन आणि दहा हजार अशर्फ्यांचं बक्षिस मिळवीन. मग तुझ्यासाठी हिऱ्यांचा हार खरेदी करीन !"

गौरी हसून म्हणाली-"आता तू चंद्रपूरला जाणार म्हणतोस. भैरव तर राजधानीकडे गेला सुद्धा, जर तुझ्या अगोदर त्याने मला हिऱ्यांचा हार आणून दिला, तर मी त्याच्याशीच लग्न करीन."

गौरीवर भैरवचं पण प्रेम होतं. तो वीर सारखा सुंदर नव्हता, पण मोठा साहसी होता. तो सापाला सहज पकडून आपल्या हातात घेई. ज्या वडाच्या आसपास भुतं वावरतात, त्या झाडाखाली मध्य-रात्री भैरव आरामात झोपी जाई. वीर विचार करू लागला की आपल्याला भैरवची बरोबरी करता येईल का ? तरी पण मनाचा हिय्या करून तो चंद्रपूरला गेला. बैराग्याला भेटून आपल्या मनातील गोष्ट सांगितली. वीरची प्रार्थना ऐकून बैरागी म्हणाला-"जवळच्या गुहेत ती जडी-बूटी आहे. जा आणि घेऊन ये."

वीर गुहेत प्रवेश करू लागला आणि त्याने जिकडे-तिकडे बेडूकच बेडूक पाहिले. तो चांगलाच घाबरला, धावत-पळत बैराग्याकडे



येऊन म्हणाला-"स्वामीजी, गुहा तर बेडुकांनी भरलेली आहे. मी कसा जाऊ आत ?"

"साप डसतात, बेडूक काही इजा करीत नाहीत. जा, नि जडी-बूटी घेऊन ये. बेडकांशिवाय तेथे अन्य हींस्र प्राणी नाहीत." बैराग्याने सुचविले.

वीर नम्रतापूर्वक म्हणाला-"स्वामीजी, दया करा माझ्यावर. आपणच जाऊन ती जडी-बूटी घेऊन या. आपले उपकार मी जन्मभर विसरणार नाही."

"स्वत: जाऊन आणलीस, तरच त्या जडी-बूटीचा उपयोग होईल." बैराग्याने वीरला समजाऊन सांगितले.

आपल्या दुर्भाग्याला दोष देत बिचारा वीर परत निघाला. रस्त्यात त्याला एक टांगा



दिसला. टांग्यात त्या भागातील पहिलवान रुस्तुम व त्याची मुलगी रागमती बसली होती. वीरला पाहून रागमतीने टांगा थांबवला. ती मोठ्या कडवट स्वभावाची व घमेंडखोर होती. यामुळेच वीस वर्षांची झाली तरी अजून कोणी तिच्याशी लग्नाला तयार झाला नव्हता. रुस्तुमने ही अनेक प्रयत्न केले, पण आपल्या या मुलीचे लग्न करू शकला नाही.

वीर टांग्याजवळ पोचला, तेव्हा रागमती त्याला म्हणाला-''किती सुंदर आहेस रे तू! मी पहिलवान रुस्तुमची मुलगी आहे. तुझ्याशी लग्न करायची माझी इच्छा आहे.''

''माझं तर गौरीवर प्रेम आहे. तिला सोडून दुसऱ्या कोणाशी मी लग्न करणार नाही.'' वीरने स्पष्टपणे सांगून टाकले.

रागमतीने गौरी बाबत पूर्ण माहिती करून घेतली आणि मग म्हणाली-''तू तर मूर्खच आहेस की रे! ती दरिद्री गौरी कुठे, अन् मी पहिलवान रुस्तुमची मुलगी कुठे? मला नकार देऊन तिच्याशी लग्न करणार तूं?'' नाराज होत रागमती म्हणाली.

वीरने मान हालवीत आपला निश्चय पक्का असल्याचे दर्शविले. एवढ्यात एक झुरळ त्याच्यावर येऊन पडले. वीर घाबरून जोराने ओरडूं लागला. रागमतीच्या लक्षात आलं की हा तर एक नंबरचा भेकड आहे. तिने वीरला धमकावलं-''जर तू माझ्याशी लग्न करणार नसलास, तर झुरळांनी भरलेल्या खोलीत तुला कैद करून ठेवीन. समजलं?''

हे ऐकून वीरने तेथून धूम ठोकली. रागमती टांग्यातून त्याचा पाठलाग करू लागली. त्याच वेळी भैरव तिकडून येत होता. टांगा थांबवून त्याने विचारले-''हो काय जबर्दस्ती चाललीय?'' रागमतीने भैरवला सारी हकिगत सांगितली.

''बेडूक आणि झुरळांना सुद्धा भीणारा हा भित्रट रुस्तुम पहिलवानाच्या मुलीशी लग्न करणार! असला माणूस पहिलवानाचा जावई झाला तर सर्व लोक हसतील नाहीतर काय करतील?'' भैरवने प्रश्न विचारला.

''हं, तुझं म्हणणं बरोबर आहे. एकाद्या साहसी माणसाशीच मी लग्न करीन. भित्रटाशी नाही. आता राहिली सौंदर्याची बाब, त्याबाबत नंतर विचार करीन.'' असं म्हणत तिने टांगा



वळवला आणि निघून गेली.

घाबरट वीरने भैरवचे आभार मानले. आणि मग म्हणाला-''तू आता राजधानीहून परत येत आहेस होय? तिथं कुठलं साहस करून दाखवलंस ते तर सांगशील?''

वीरच्या या प्रश्नावर भैरव आनंदित झाला. सांगू लागला-''दोन मगरींशी एकाच वेळी सामना केला नि यशस्वी होऊन आलो. राजाने खुश होऊन दहा हजार अशर्फ्या दिल्या मला. त्या सुवर्णकाराकडे देऊन हा हिऱ्यांचा हार खरीदला आहे बघ. आता जाऊन गौरीला हा देतो आणि तिच्याशी लग्न करतो.'' तो बोलत होता, इतक्यात झाडावरून एक जाळे खाली पडले नि दोघे ही त्यात चांगलेच गुरफटले.

जाळ्यातून आपली सुटका करून घेण्यासाठी वीर व भैरव यांनी खूप प्रयत्न केले. पण व्यर्थ! इतक्यात झाडावरून चार चोरांनी उड्या मारल्या, भैरवच्या जवळ असलेला हिऱ्यांच्या हार बळकावून त्यांनी धूम ठोकली.

थोड्या वेळाने भैरव व वीर कसे-बसे जाळ्यातून बाहेर पडले. भैरव वीरला म्हणाला-''झाडावर चोर लपून बसलेत हे तर आपल्याला माहीतच नव्हतं. माझ्याजवळ हिऱ्यांच्या हार आहे हे समजताच त्यांनी झाडावरून जाळं टाकलं. मी चोरांना असं-तसं सोडणार नाही. त्यांना पकडीन आणि आपला हार परत मिळवीन. तोपर्यंत तू गावात जा आणि गौरीला मी येत असल्याची खबर दे.''



ज्या दिशेला चोर पळून गेले, तिकडे भैरव पळत सुटला. वीर गावात आला आणि गौरीला सर्व हकिगत सांगितली.

भैरवची प्रशंसा करीत गौरी म्हणाली-''चार चोरांना पकडण्यासाठी एकटा गेला हं? खरोखरीच बहादुर आहे माझा भैरव!''

गौरीने लग्न केलं तर आता ती भैरवशीच करणार निश्चित. थोड्या वेळात हिऱ्यांचा हार घेऊन तो निश्चित येणारच, असा विचार करून वीर धाडसाने गौरीला म्हणाला-''हिऱ्यांच्या हाराशी लग्नाचा काय संबंध आहे? तुला धन महत्त्वाचं वाटतं कीं प्रेम? मी तर हिऱ्यांच्या हार तुला देऊ शकणार नाही. पण माझं प्रेम आहे तुझ्यावर! गौरी, तू माझ्याशी लग्न कर ना.''

हसून गौरी म्हणाली-''माझं पण तुझ्यावर

प्रेम आहे. तू ही गोष्ट अगोदरच सांगितली असतीस, तर तेव्हांच मी लग्नाला संमति दिली असती. निदान आता तरी तू हे साहस केलंस हे बरं झालं. मी लग्न तुझ्याशीच करीन.''

वीरचा आनंद गगनात मावेना. इतक्यात भैरव हिऱ्यांचा हार घेऊन तेथे येऊन पोचला.

''तू उशीर केलास. तू जे साहस करू शकला नाहीस, ते वीरने करून दाखविले. म्हणून मी आता वीरशीच लग्न करणार आहे.'' गौरी भैरवला म्हणाली.

आश्चर्याने भैरवने विचारले-''याने कुठलं साहस केलं ? बेडूक नि झुरळांना भिणारा हा वीर साहस काय करणार ? त्याने केलं तरी काय ते सांग.''

''साहस करण्यासाठी तलवारींनी लढायला पाहिजे असं नाही. मनातली गोष्ट साहसपूर्वक सांगणं सर्वांना जमत नाही. वीर धैर्यवान आहे, म्हणून पहिलवानाच्या मुलीशी लग्न करायला त्याने साफ नकार दिला. हिऱ्यांच्या हारासाठी जर मी तुझ्याशी लग्न केले तर हा एक व्यापारच नाही का होणार ?'' गौरी म्हणाली.

गौरीचं म्हणणं भैरवला ही पटलं. तो म्हणाला-''तुझा विचार योग्य आहे. साहस करण्याची माझी इच्छा होती, म्हणून मी राजधानीला गेलो. पहिलवानाच्या मुलीचं सौंदर्य पाहून मी तिच्यावर मोहित झालो. एकाद्या साहसी माणसाशी लग्न करीन असं जेव्हा ती म्हणाली, तेव्हा तिच्याबद्दल माझ्या मनात आकर्षण निर्माण झालं. पण आपल्या मनातील गोष्ट तिला सांगायचं धाडस मी करू शकलो नाही. आवश्यक अशा वेळी जे साहस करता येत नाही त्याचा काय फायदा ? खरोखरीच वीर माझ्याहून अधिक साहसी आहे.''

आता वीरचा उत्साह वाढला. तो म्हणाला-''तर मग 'मी साहसी आहे' हे तू मानलंस हं ! चल, पहिलवानाच्या मुलीशी तुझं लग्न व्हावं म्हणून मी तुला यथाशक्ति मदत करतो. तुझं साहस एक प्रकारचं आहे, माझं एका वेगळ्या प्रकारचं !''

हंसत गौरी म्हणाली-''होय, प्रत्येकाचं साहस आपलं आपलं असतं!''

काही दिवसात साहसी भैरवचे रागमतीशी व साहसी वीरचं गौरीशी थाटामाटात लग्न झाले.





# माशांची शिकार

**चांद** काही कामासाठी शहराकडे निघाला होता. वाटेत तलावाच्या किनारी त्याला काही विचित्र दृश्य दिसलं. दोन माणसं हातात आरसे घेऊन उभी होती. त्यानी आरसे अशा प्रकारे धरले होते की सूर्याचे किरण त्यांच्यावर पडून कवडसा तळ्याच्या पाण्यावर पडावा.

चान्द त्यांच्याजवळ गेला. त्याच्या असं लक्षात आलं की दोघांपैकी एक माणूस तर त्याच्याच गावातला कृष्णा नावाचा तरुण आहे; अन् दुसऱ्या माणसाच्या पोशाखावरून तो कोणी शहरी बाबू असावा असं वाटत होतं. चांदनं दोघांना विचारलं, ''हे तर काही विचित्रच वाटतंय! काय करताय तुम्ही?''

शहरी बाबू म्हणाला, ''हं! अडाण्याला सर्व विचित्रच वाटतं. आम्ही इथे तलावाकाठी उभे आहोत; अन् खाली दिसतोय, तो आहे तलाव! आम्ही इथं मासे पकडत आहोत.''

आपलं आश्चर्य प्रकट करत चान्द म्हणाला, ''पण मी आजपर्यन्त तुमच्या प्रकारानं मासे पकडलेले पाहिले नाहीत कधी.''

''ही मासे पकडायची एक कला आहे. ती जाणणाराला आपले हातपाय ओलेही करावे लागत नाहीत की चिखल पाण्यानं बरबटून घ्यावे लागत नाहीत.'' शहरी बाबू रुबाब दाखवत म्हणाला.

बाबू गंम्भीर आवाजात पुढे म्हणाला, ''आमच्या वाडवडलांनी ही कला आम्हाला शिकवलीय. पण तुझ्याकडून फी घेतल्यावाचून मी फुकट का शिकवावी तुला? बघ याच्याकडे. तळ्याच्या काठी उभं राहूनच यानं ती विद्या शिकून घेतलीय; तुला सुद्धा ही विद्या शिकायची असेल, तर पन्नास रुपये दे अन् ही कला शिकून घे.''

चांदनं ताबडतोब खिशातनं पैसे काढून त्यातून पन्नास रुपये मोजून बाबूच्या हातावर ठेवले. ते घेऊन तो चान्दला म्हणाला, ''सगळं रहस्य तर या आरशातच लपलेलं आहे.

**विलास पाटील**

आमच्यासारखा हालचाल न करता आरसा घेअून अुभा रहा इथं. पण एक गोष्ट लक्षात ठेव की, सूर्याचे किरण आरशावर पडून, त्यांचा कवडसा फक्त पाण्यावर एकाच जागी स्थिर राहिला पाहिजे. त्या किरणांची अुष्णता सहन न होअून मासे थकून पाण्याच्या वर येतील. फक्त ते हातांनी अुचलून घ्यायचं तेवढं आपलं काम आहे.''

काही संशय येअून चांदनं त्याला विचारलं, ''आतापर्यन्त अशा तऱ्हेनं किती मासे मिळाले तुला?''

यावर हसून शहरी बाबू अुत्तरला, ''तुला धरून हा सहावा मासा गळाला लागला माझ्या!''

आता चान्द ''धोका! दगा!'' असं ओरडू लागला.

''ओरडून काही अुपयोग नाही आता. तुझ्यासारखी आणखी एकाद्या माशाची शिकार मिळत नाही, तोवर तुला इथे आरसा पकडून अुभं रहायला हवं. तू तसं केलंस, तर मी तुझे पंचवीस रुपये परत करीन. आहे कबूल?'' असं म्हणत त्यानं त्यातले पंचवीस रुपये कृष्णाच्या हातावर ठेवले, अन् त्याची सुटका केली.

नंतर अर्धा तास निघून गेला, अन् त्यांना असं दिसलं की, कृष्णा आपल्याबरोबर हातात मजबूत लाठ्या पकडलेल्या चार माणसांना घेअून गावातून तळ्याकडेच येत आहे!

त्यांना पाहून प्रथम तर शहरी बाबू खूश झाला, पण नंतर त्याच्या मनात शंका अुत्पन्न झाली. तो चान्दला विचारू लागला, ''कृष्णानं माझ्याकडून विद्या शिकून घेतली. आता तो आणखी चार माणसांना घेअून येतो आहे, हे तर ठीकच आहे. पण त्यांनी हातात लाठ्या का आणल्या आहेत, हे नाही समजत मला?''

जोराने हसत चान्द म्हणाला, ''लाठ्यांनी शिकार कशी करावी हे तुला शिकवायला येत आहेत ते! मला तर दयाच येतेय तुझी! हातपाय तुटल्यावर तू शहरात कसा जाअू शकशील, याची काळजीच वाटतेय मला!''

शहरी बाबूनं लगेच आपल्या खिशातले सारे पैसे चान्दच्या हातात कोंबले अन् मागे वळूनही न पहाता त्यानं शहराच्या दिशेनं पोबारा केला!






८

(ट्रोजन राजाचा मुलगा मोहन हा भुवन सुंदरीला पळवून घेअून आला. ग्रीकांनी आपली जहाजे आणि सेना तयार करून ट्रॉय नगरावर हल्ला केला. पहिल्या दिवशी ट्रोजन सेनेचा पराभव झाला अन् ती नगरात परत आली. यानन्तर पुन्हा ग्रीक सेनेने ट्रॉयला वेढा घातला आणि आसपासच्या देशात लुटालूट सुरू केली. ट्रॉयला अनेक वर्षं वेढा घालून राहिले. या नअू वर्षात युद्ध तर झाले नाहीच, पण ग्रीक शिबिरांच्या आत अन् बाहेर अनेक घटना घडल्या.) यानन्तर -

ट्रॉय नगराच्या वेढ्याला नअू वर्षे झाली. परन्तु ग्रीक लोक युद्ध करू शकले नाहीत. थंडीचे दिवस सुरू झाले. त्या भागात या काळात युद्धे होत नसत. त्यामुळे त्या काळात ग्रीकांनी आपल्या शिबिरांचा विस्तार केला. धनुर्विद्येत आपली अधिक प्रगती करत ते दिवस काढत राहिले.

युद्धभूमीपासून थोड्याच अंतरावर सूर्यदेवाचे एक मंदिर होते. तो भाग तटस्थ गणला जाई. त्या मंदिरात बळी देण्याचा विधी पार पाडण्यासाठी ग्रीक व ट्रोजनही जातयेत असत. ट्रोजन प्रमुखही त्या मंदिरात आलेले ग्रीकांना अधूनमधून दिसत.

एक दिवस वज्रकाय बलीविधी पार पाडण्यासाठी त्या मंदिरात गेला असता वर्धनची पत्नी व कन्या यांना त्याने पाहिले. त्या पण तिथे त्याच कामासाठी आलेल्या होत्या. वर्धनची कन्या प्रमोदिनी ही लावण्यवती होती. तिला



पाहिल्याबरोबर वज्रकायचे तिच्यावर मन बसले. शिबिरात परत आल्याबरोबर त्याने वीरसिंहकडे एक दूत पाठवला. दूताने वीरसिंहला म्हटले, ''तुमची भगिनी प्रमोदिनी हिच्याशी विवाह करायची वज्रकायची इच्छा आहे.'' त्याच दूताकरवी वीरसिंहने वज्रकायला कळवले की, ''तू जर आपलं ग्रीक शिबिर सोडून माझे पिता वर्धन यांच्या पक्षाला येऊन मिळालास, तरच तुला माझ्या बहिणीशी विवाह करता येईल. पण आपल्या ग्रीकांशी जर तुला बेइमानी करायची नसेल तर कमीत कमी एक काम कर - आपल्या बाजूच्या वीरांपैकी भूधव व आणखी काहींना ठार मारून टाक. पण हे काम पुरं करण्याची तुला प्रतिज्ञा करावी लागेल अन् आमची खात्री करून द्यावी लागेल.''

वज्रकायला या अटी पाळणे शक्य झाले नाही. आता थंडीचे दिवस संपून वसंतकाल सुरू झाला होता. अन् पुन्हा युद्धाला तोंड लागले. युद्धकाळात वीरसिंहला भेटायचा वज्रकायने अनेकदा प्रयत्न केला. परन्तु तो सफल होऊ शकला नाही. एकदा वीरसिंहला भेटायला जात असताना एका भावाने त्याचा तळहात बाणाने जखमी केला.

युद्धाची स्थिती पाहता, असे स्पष्ट दिसत होते की परमेश्वराची ग्रीकांना साथ नसून, उलट तो त्यांना प्रतिकूल आहे.

प्रथम वज्रकायने जेंव्हा ट्रॉयच्या आसपासच्या राज्यात लुटालूट केली, तेंव्हा त्याला अनेक स्त्रिया दासी म्हणून मिळाल्या होत्या. त्यांच्यात हेमा व भामिनी नावाच्या दोन दासी होत्या. ग्रीक वीरांनी मिळालेल्या सर्व स्त्रिया आपसात वाटून घेतल्या, तेंव्हा हेमा सम्राटाच्या अन् भामा वज्रकायच्या ताब्यात आली होती.

हेमाच्या पित्याचे नाव हमांबर असून, तो आपल्या मुलीला सम्राटाकडून परत मिळवू इच्छित होता; म्हणून त्याने अनेक मूल्यवान वस्तु सम्राटाला भेट म्हणून अर्पण केल्या अन् 'आपली मुलगी आपल्याला परत द्यावी' अशी सविनय प्रार्थना केली.

सम्राटाने ती मागणी झिडकारली अन् भेटवस्तु परत पाठवल्या. त्याबरोबर त्याने हमांबरला खूप शिव्याही देऊन हाकलून लावले. ही घटना घडली, तेंव्हा ग्रीकांच्या शिबिरांवर बाणांचा वर्षाव होत राहिला. हे बाण कोठून येत आहेत, हेही कोणाला कळले नाही. त्यामुळे अनेक ग्रीक सैनिक प्राणाला मुकले. दहा दिवसांनंतर ग्रीक नौकांचा मार्गदर्शक म्हणून आलेल्या कांशुक नावाच्या व्यक्तीला ते रहस्य उलगडले.

कांशुकने ग्रीक सेनापतींना सांगितले, ''हमांबर हा सूर्योपासक असून सूर्याला तो अतिशय प्रिय आहे. तो आपल्या मुलीला परत न्यायला आला असता सम्राटाने त्याला अपशब्द बोलून रिकाम्या हातांनी परत पाठवले. त्याने सूर्यदेवाची निष्ठेने पूजा केली अन् फलस्वरूप सूर्यच हे बाण सोडून आपल्याला शिक्षा देत आहे. या धोक्यातून आपली सुटका हवी असेल तर एकच उपाय आहे; अन् तो म्हणजे हेमाला तिच्या पित्याकडे परत पाठवणे.''

सम्राटाचा यावर विश्वास बसला अन् हेमाला त्याने तिच्या पित्याकडे परत पाठवले. आता त्याने वज्रकायची दासी भामा हिला आपल्या ताब्यात घेतले. त्याला असे वाटले की आपल्या या कृत्याला कोणीही विरोध करणार नाही.

परन्तु राजाच्या या कृतीबद्दल वज्रकाय चांगलाच संतापला. त्याने जाहीर केले की, ''आता यापुढे या लढाईशी माझा काहीच संबंध नाही; मी युद्धात मुळीच भाग घेणार नाही.'' त्याचे तर अगोदरच प्रमोदिनीवर प्रेम बसले



होते. तिचा पिता वर्धन याला खूश करायला त्याला योग्य संधी चालून आली होती. वज्रकायबरोबरच त्याचे सैन्यही युद्धातून मागे सरले.

वज्रकायच्या या प्रतिज्ञेमुळे ट्रोजनांच्या आनन्दाला पारावार राहिला नाही. वज्रकायसारख्या महान योद्धयाचे युद्धातून अंग काढून घेणे म्हणजे त्यांना वरदानच वाटले. मोठ्या उत्साहाने ते आता ग्रीकांवर तुटून पडले. त्यांच्या हल्ल्याने सम्राट घाबरून गेला अन् त्याने ट्रोजनांकडे युद्धसमाप्तीचा संदेश पाठवला.

युद्ध थांबले. ते तर भुवनसुन्दरीसाठी सुरू झाले होते. असा निर्णय घेण्यात आला की तिचा पति प्रताप व तिला पळवून नेणारा मोहन



यांच्यात द्वंद्वयुद्ध व्हावे, अन् त्यात जिंकणाराला भुवनसुन्दरीचा ताबा मिळावा. प्रताप व मोहन यांच्यात तसे युद्ध झालेही. परन्तु ते अनिर्णित राहिले. कारण मोहन मधेच अदृश्य झाला. नंतर असे सांगितले गेले की मायादेवीने आपल्या मायेने त्याला अदृश्य करून ट्रॉय शहरात पोचवले.

द्वंद्वयुद्ध अनिर्णित राहिल्यामुळे युद्धसमाप्तीत अडचण उपस्थित झाली. कंटक नावाच्या एका ट्रोजन वीराने प्रतापवर बाण सोडला. यामुळे रागावून देवमयने कंटकला तेथल्या तेथे मारून टाकले. त्याने प्रशंसनलाही जखमी केले.

यानन्तर वीरसिंहने वज्रकायला द्वंद्वयुद्धाचे आव्हान दिले. परन्तु वज्रकायने कळवले की, “मी आता युद्धातून अंग काढून घेतलेले आहे.” मग ग्रीकांनी भूधवची वीरसिंहाशी युद्ध करण्यासाठी निवड केली; कारण वज्रकायनंतर ग्रीकांकडे भूधव हाच नाव घेण्याजोगा योद्धा होता.

वीरसिंह व भूधव यांच्यात सूर्यास्तापर्यन्त द्वंद्व झाले परन्तु कोणीच हरला किंवा जिंकलाही नाही. दोघेही समान राहिले. सूर्यास्त होताच त्यांनी नियमाप्रमाणे युद्ध थांबवले. दोघांनी युद्धकौशल्याबद्दल एकमेकांची प्रशंसा करून एकमेकांना बक्षिसेही दिली. दोन्ही पक्षांनी युद्धसमाप्तीची घोषणा दिली. ग्रीकांनी युद्धात मेलेल्यांना एका खड्डयात गाडले अन् त्यावर एक अंचवटा बनवून वर एक भिंत बांधली. भिंतीसमोर एक खोल चर खोदून त्यांनी त्यासमोर एक कुंपण उभे केले.

काही काळानन्तर पुन्हा युद्धाला सुरुवात झाली. या युद्धात ग्रीकांनी फार मोठ्या प्रमाणावर मार खाल्ला. ट्रोजनांनी पाठलाग करून त्यांना दूर हाकलून लावले. त्या रात्री समुद्रतटावर पोचून ट्रोजनांनी ग्रीकांच्या जहाजांसमोर आपले तंबू ठोकले.

ग्रीकांचा सरसेनापती सम्राट हा परिणाम पाहून फार नाउमेद झाला. आता काहीही करून वज्रकायला युद्धात भाग घ्यायला लावायचा विचार त्याने केला. तसे न घडले तर आपला पराभव होणार अशी त्याची खात्री होती. शेवटी रक्तवर्ण, भूधव व रूपधर यांच्याबरोबर आणखी दोन वीरांना सम्राटाने वज्रकायची समजून



काढण्यासाठी पाठवले. जाताना त्यांच्याबरोबर अनेक अमोल उपहारही सम्राटाने वज्रकायसाठी पाठवले, अन् त्याला कळवले, "आपली भामिनी परत घे अन् युद्धात भाग घे."

भामिनीला वज्रकायच्या हाती परत सोपवण्याचे आणखीही एक कारण होते. पित्याकडे परत पाठवलेल्या हेमाने आपल्या पित्याला म्हटले होते, "मी इथे तुमच्याकडे रहाणार नाही. मला सम्राटाकडेच परत जायचे आहे, कारण तिथे माझे दिवस फार मजेत जात होते." पित्याचे काही एक न ऐकता, ती सम्राटाकडे परत आली होती.

सम्राटाच्या दूतांशी वज्रकाय फारच चांगला वागला, खूप गोड बोलला त्यांच्याशी; पण आपला निर्णय बदलायला मात्र त्याने साफ नकारच दिला. वज्रकाय त्या दूतांना म्हणाला, "मी तर उद्याच आपली जहाजं घेऊन स्वदेशी परत जाणार आहे."

रूपधर व देवमय यांनी त्याच रात्री ट्रोजन शिबिरांवर हल्ला करायचा निश्चय केला. ते जेंव्हा या कामासाठी निघाले, तेंव्हा वाटेत त्यांना ट्रोजनांचा एक हेर भेटला. या दोन्ही ग्रीक वीरांनी त्याला पकडून खूप मारले अन् शत्रूची बरीचशी गुपिते त्याच्या तोंडून वदवून घेतली. नंतर त्यांनी त्याला ठार मारले.

त्याने सांगितलेले सर्वात मुख्य रहस्य असे - ट्रेस देशचा राजा विच्छेदन हा थोड्याच दिवसांपूर्वी ट्रॉयला आला होता. त्याच्या बरोबर त्याचे सैन्यही होते. त्याने आपल्याबरोबर वायुवेगाने धावणारे, दुधासारखे स्वच्छ पांढरे असे काही घोडेही आणले होते. त्यांच्याबद्दलचे असे भविष्य होते की, 'हे घोडे जर ट्रॉय नगरात चरले अन् नगराच्या दक्षिणेला वहाणाऱ्या स्कामंदर नदीचे पाणी प्यायले, तर ट्रॉय नगर कोणीही जिंकू शकणार नाही.' विच्छेदनच्या घोड्यांनी अजूनपर्यन्त यातील एकही कृत्य केलेले नव्हते. त्याच हेराकडून असेही समजले की विच्छेदन आज रात्री अमूक अमूक तंबूत मुक्कामाला असणार आहे. रूपधर व देवमय हेराला मारल्यानन्तर लगेच विच्छेदनच्या तंबूकडे गेले. तेथे गाढ झोपलेल्या विच्छेदन व त्याच्या



बारा सोबत्यांनी त्यांना यमसदनाला पाठवले आणि मोठ्या आनन्दाने विजयोत्सवाच्या उन्मादात घोडे बरोबर घेऊन ते आपल्या शिबिरात परतले.

थोड्या वेळाने विच्छेदनच्या अन्य लोकांना आढळले की आपला मालक व त्याची बारा माणसे मारली गेली आहेत अन् घोड्यांचीही चोरी झालेली आहे ! ते घाबरून परत जाऊ लागताच ग्रीकांनी त्यांनाही रस्त्यात पकडून मारून टाकले.

इतके सारे घडल्यानंतर दुसऱ्या दिवशीही लढाईत ग्रीकांचा पराभव झाला. असे म्हणावे लागले की आतापर्यन्त ट्रोजनांकडून त्यांचा इतका दारुण पराभव कधीच झाला नव्हता. स्वतः सम्राट, देवमय, रूपधर आदि सर्व प्रमुख वीर जखमी झाले. त्यांच्या जखमा पाहून वाटले की त्यांच्यापैकी कोणी ही आता जिवंत राहणार नाही.

वीरसिंह हा महान् वीर होता. रणांगणावर तो सिंहासारखा गरजत शत्रूवर तुटून पडे. त्याच्या शक्ती व पराक्रमापुढे ग्रीक वीर कधीच टिकू शकले नाहीत. त्याने ग्रीकांना युद्धभूमीवरून पळवून लावले. नुसत्या त्यांच्या पलायनाने त्याचे समाधान झाले नाही. तो त्यांचा दूरवर पाठलाग करत राहिला. सर्व ग्रीक वीरांनी आपणाकडून खूप प्रयत्न केला, आपली सारी शक्ती पणाला लावली, तरीही वीरसिंहपुढे त्यांची डाळ शिजली नाही. त्यांचे सर्व प्रयत्न विफल झाले.

भूध्वने फेकलेला परशू वीरसिंहला लागला. क्षणभर असे वाटले की, तो जणू मूर्च्छित होऊन पडला आहे. परंतु इतक्यात सावध होऊन तो आपल्या सेनेला प्रोत्साहन देऊ लागला. त्याच्यात नवीन वीरश्रीचा संचार झाला.

पहाता पहाता ट्रोजन ग्रीक नौकांजवळ पोचले; एका नौकेला त्यांनी आग लावली. ती चन्द्रप्रभूची नौका होती. ग्रीक नौका ट्रॉयच्या समुद्रतटावर पोचल्या, तेंव्हा किनाऱ्यावर उडी घेणारा पहिला साहसी वीर हा चन्द्रप्रभूच होता. अन् सर्वात प्रथम मरणारा ग्रीक वीरही हाच होता.

क्रमशः



## चांदोबाच्या बातम्या

### आरामात गाडी चालवा

मागे आरामात टेकून बसून चालवता येईल अशी एक रिक्षासारखी गाडी नुकतीच बनवण्यात आली आहे. त्यावर बसून चालवताना असे वाटेल की जणू आपण चाकेवाल्या एकाद्या खुर्चीवरच बसून आराम करत आहोत. तीन चाकेवाल्या या रिक्षाचे एकएक चाक ६० सें.मी. रुन्दीचे असून ते चढउतार ही अगदी सहजपणे पार करु शकते. या वाहनाला २४० व्होल्टेजची मोटर लावलेली असून, हे वाहन वेगाने, हळूहळू न मागे आणि पुढेही चालू शकते. यासाठी याला तीन पुशबटन्स लावलेली असतात. तुम्हाला हवे तर याचे भाग सुटे करून ही गाडी मोटरकारच्या मागे टाकूनही नेता येते. इतक्या सोयींनी युक्त ही गाडी कोणाकरता बनवली गेली आहे, हे माहीत आहे तुम्हाला? हातपाय धडधाकट असणाऱ्या माणसांसाठी नक्कीच नव्हे हं! ती बनवली आहे पंगु लोकांसाठी.



### गाण्यातला अुच्चांक

मद्रासच्या कॉलेजांतील काही विद्यार्थ्यांनी 'लक्ष्मण श्रुति' नावाच्या एका संगीत सभेची स्थापना केलीय. या संस्थे द्वारा सुगम संगीतातील गीते गायली जातात, पण मुख्यतः हे गायक चित्रपट-गीते गातात अन् श्रोत्यांचे भरपूर मनोरंजन करतात. मागील डिसेंबर १७ रोजी यांनी सतत ३६ तास चित्रपट गीते गाअून नवा अुच्चांक प्रस्थापित केला. त्यांनी यापूर्वीच गिनीज बुक ऑफ वर्ल्ड रेकॉर्डच्या अधिकाऱ्यांना आपल्या या अुपक्रमाचा अुल्लेख त्या पुस्तकात व्हावा, याबद्दल लिहून कळवले होते.

### खूप वेगच वेग, पण धोका नाही

'शिन कानसेन' नावाची बुलेट आगगाडी गेली तीस वर्षे जपानमधील टोकियो व ओसाका या दोन शहरांदरम्यान धावत असते. ताशी २२० कि.मी. वेगाने ती धावते, परन्तु आजतागायत कोणताही अपघात तिला झालेला नाहीय. ही गाडी सुरु झाली १ ऑक्टोबर १९६४रोजी. जपानमधे धावणाऱ्या सर्व गाड्यांना 'मार्गदर्शन करणारी गाडी' असे तिला म्हणायला हरकत नाही. या नंतर ज्या गाड्या अस्तित्वात आल्या, त्या काही न काही कारणाने बन्द करण्यात आल्या. पण ही मात्र चालूच राहिली. ताशी २७० कि.मी. वेगाने धावणारी 'नोजोमी' नावाची गाडी १९९२ मधे प्रविष्ट झाली. हिच्यामुळे टोकियो-ओसाका या प्रवासाला (५१२ कि.मी.) एकोणीस मिनिटे कमी लागतात. परन्तु काही अडचणींमुळे सध्या ती बंद पडलेली आहे.



# राक्षसाचे दान

विक्रमादित्य प्रेत खांद्यावर टाकून स्मशानाची वाट चालू लागला. वेताळ म्हणाला-''हे बघ राजा, अलौकिक शक्ति असलेला एक मणी मिळवल्यावर तो कुपात्री दान करणाऱ्या रक्ततर्पण नावाच्या एका राक्षसाची गोष्ट मी तुला सांगतो, ती ऐकत तुझा थकवा ही थोडा कमी होईल.'' आणि वेताळ गोष्ट सांगू लागला.

दंडकारण्यात रक्ततर्पण नावाचा एक राक्षस रहात असे. त्याच्या निवास-स्थानाच्या एका बाजूला होता हिमगिरि, तर दुसऱ्या बाजूला होती सिंहपुरी. वाटसरूंना जंगलातून जावेच लागे. रक्ततर्पण सर्वांना गिळंकृत करी.

एकदा चंद्रकांता नावाची एक गंधर्व-कन्या भूलोकीचे सौंदर्य अवलोकन करण्यासाठी भूमीवर उतरली. दंडकारण्यात विहार करत असताना तिच्या गळ्यातील अनुपम माळेचा एक मणी ओघळला, चंद्रकांताने तिकडे फार लक्ष दिले नाही.

बेताळ कथा



रक्ततर्पण वाटसरूंच्या शोधात हिंडत असता चंद्रकांताचा ओघळलेला मणी त्याला दिसला. अद्‌भुत कांतीने तो चमकत होता. त्याने तो उचलून आपल्या गळ्यात घातला.

तो मणी परिधान करताच रक्ततर्पणचा कायापालट झाला. त्याच्या मनातील विचार आमूलाग्र बदलले. त्याच्या अत्यंत कठोर हृदयात दया, करुणा आदि सात्विक भाव उत्पन्न झाले.

जंगलातून जाणाऱ्या वाटसरूंकडे त्याचे लक्ष गेले. एक लहान मुलगा आपल्याला कडेवर घेण्यासाठी वडिलांपाशी हट्ट करतो आहे असे त्याने पाहिले. जरा नाराजीने बाप सांगत होता- 'तू पायीच चाल.' रक्ततर्पणच्या मनात सहानुभूति जागृत झाली. त्यांना सामोरे जात तो म्हणाला- "लहान मुलगा चालू शकत नाही. त्याला कडेवर घेतलंस तर काय बिघडेल? बरं, मी तुला मदत करतो. तुम्ही दोघे ही माझ्या खांद्यावर बसा. तुम्हाला जिथे जायचंय, तिथे मी तुम्हाला पोचवून देतो."

राक्षसाला पाहताच बाप घाबरून गेला. मुलाला उचलून तो पळून जाऊ लागला.

वाटसरू पाहिला की त्याच्यावर झडप घालायची रक्ततर्पणला सवय होती. पण आता त्याला मदत करायची इच्छा त्याला झाली. आपल्या स्वभावात झालेला बदल पाहून रक्ततर्पणला मोठे आश्चर्य वाटले. असं काय झालंय हे त्याला समजेना. तो विचार करीत एका झाडाखाली बसला. तेव्हा धर्मवेद नावाच्या एका मुनीने त्याला पाहिले. मुनीजवळ अद्‌भुत तपोशक्ति होती.

आपल्या तपोशक्तीच्या साह्याने मुनीला रक्ततर्पणच्या मनातील प्रश्न समजला. त्याच्या जवळ येऊन तो मुनीला म्हणाला-"राक्षसा, आपला व्यवहार तुझा तुलाच विचित्र वाटतो आहे ना? त्याचं कारण आहे-तुझ्या गळ्यात लटकणारा हा मणी! दयाळू स्वभावाची गंधर्वकन्या चंद्रकांताचा हा मणी आहे. मनातील अपूर्ण इच्छा पूर्ण करायची अद्‌भुत शक्ति या मण्यात आहे. म्हणून तुला जर लोकांना मदत करावीशी वाटत असेल, तर मनुष्य-रूप धारण करून तू सत्कार्य करू शकतोस." एवढं सांगून मुनी अदृश्य झाला.



मुनीचे बोलणे ऐकून रक्ततर्पणच्या मनात मण्याच्या प्रभावाची परीक्षा करण्याची इच्छा निर्माण झाली. त्याने मनातल्या मनात मनुष्य बनण्याची इच्छा केली. आणि हा-हा म्हणता तो माणूस होऊन गेला. त्या दिवसापासून रक्ततर्पण जंगलातून जाणाऱ्या वाटसरूंना मदत करू लागला. त्यांना लुबाडणाऱ्या लुटारूंना त्याने ठार मारून टाकले. वाटसरूंना प्यायला पाणी मिळावे म्हणून त्याने जंगलात काही ठिकाणी विहिरी खोदल्या. रस्त्यावरील काटेरी झाडे-झुडपे उपटून टाकली.

परंतु अनपेक्षितपणे एक संकट आले. मुनी धर्मविद रक्ततर्पणला जेव्हा मण्याचा महिमा सांगत होता, तेव्हा झाडावर लपून बसलेल्या आदित्यने ते ऐकले. आदित्य सिंहपुरीचा हेर होता. सिंहपुरीचा राजा विक्रमभूपति याच्या मनात सम्राट बनण्याची जबरदस्त इच्छा निर्माण झाली. त्याने शेजारच्या हेमगिरी राज्यावर एकदम आक्रमण करून ते जिंकायची एक गुप्त योजना बनविली.

हेमगिरीचा राजा विजयादित्य धार्मिक प्रवृत्तीचा होता. त्याच्या अमलाखाली देश सुसंपन्न होता. प्रजेला कुठल्याही प्रकारचा त्रास नव्हता. लोक आनंदाने सुखात रहात होते.

विक्रमभूपतीच्या आपल्यावर आक्रमणाची बातमी जेव्हा विजयादित्याला समजली तेव्हा तो घाबरून गेला. तो मनात अत्यंत दुःखी



झाला. त्याचं कारण होतं हेमगिरीची आर्थिक दुर्बलता आणि आवश्यक सेना-बलाचा अभाव. विजयादित्याने तह करण्याचा संदेश पाठविला, पण त्याचा काही उपयोग झाला नाही. आता युद्ध अटळ होते.

सिंहपुरीचा हेर आदित्य राजधानीत पोचला आणि राजाला सर्व वार्ता सांगितली. तो राजाला म्हणाला-"जर राक्षसाकडील तो मणी आपल्या हाती आला, तरी आसपासच्या सर्व राज्यांना आपण जिंकू शकू."

आदित्यचा सल्ला ऐकून विक्रमभूपतीला वाटले जणू आपण सम्राट झालो आणि आता आपला शत्रु बनण्याचं साहस कोणी ही करणार नाही. त्याचा आनंद गगनात मावेना. तो

रथावर स्वार होऊन रक्ततर्पणला भेटण्यासाठी जंगलाकडे निघाला.

याच वेळी हेमगिरीचा राजा विजयादित्य वेषांतर करून राज्यात संचार करू लागला. जवळ येऊन ठेपलेल्या युद्धाबाबत जनतेला काय वाटते हे जाणून घ्यायचा त्याचा विचार होता. एका ठिकाणी वृक्षाच्या शीतल छायेत विश्रांति घेत असलेला मुनी धर्मविद त्याला दिसला. मुनीच्या मुख-मंडलावरील अद्भुत तेज पाहून विजयादित्याला मोठे आश्चर्य वाटले. तो मुनीच्या जवळ गेला आणि विनयपूर्वक नमस्कार करून उभा राहिला.

धर्मवेदने राजाला नखशिखान्त नीट न्याहाळले आणि म्हणाला-"राजा, तुझ्या मनातील दुःख मी जाणले. सिंहपुरीचा राजा विक्रमभूपतीशी सामना करायचा असेल तर एकच एक उपाय मी सुचवितो. तू ताबडतोब दंडकारण्यात जा. तेथे रक्ततर्पण नावाचा एक राक्षस आहे. त्याच्या जवळ असलेल्या मण्याच्या प्रभावाने हल्ली तो माणसाच्या रूपात वावरत आहे. संकटग्रस्तांना तो सर्व प्रकारे मदत करतो. गळ्यात लटकणारा मणी पाहून तू त्याला सहज ओळखू शकशील. आपली अडचण तू त्याला सांग. आणि तो महिमाशाली मणी मिळविण्याचा प्रयत्न कर."

विजयादित्य ताबडतोब घोड्यावर स्वार होऊन भेटायला निघाला. परंतु सिंहपुरीचा राजा विक्रमभूपति यापूर्वीच मानवरूपधारी रक्ततर्पणला भेटला होता. तो म्हणाला होता-"राक्षसोत्तम, आपली कीर्ति मी खूप ऐकली आहे. मी सिंहपुरीचा राजा विक्रमभूपति. अन्य देशांचे राजे आपापसात भांडत आहेत. एकमेकांचा नाश करण्यासाठी टपून बसले आहेत. मी त्या सर्वांना आपल्या ताब्यात आणू इच्छितो. त्या सर्वांचा सम्राट बनण्याची माझी इच्छा आहे. जन-कल्याणाच्या योजना आखून प्रजेला सुखी बनवणे हाच माझा एकमात्र उद्देश आहे. यात माझा स्वत:चा काही स्वार्थ नाही. आपण कृपा केली तरच हे शक्य आहे. म्हणून मी आपल्या भेटीसाठी आलो आहे. आपण आपल्या जवळचा प्रभावशाली मणी मला द्यावा अशी मी आपणास प्रार्थना करतो. मण्याच्या साह्याने मी जनकल्याणाच्या योजना यशस्वी करून दाखवू शकेन. यामुळे आपल्याला ही पुण्य मिळेल. मण्याच्या प्रभावाने मी जनतेचे कष्ट दूर करीन, प्रजेला सुखी बनवीन."

रक्ततर्पणने उत्तर दिले-"तुझी मागणी मान्य करायची असेल, तर प्रथम मला तुझ्या राज्यात येऊन शासन कसे करतोस हे पाहिले पाहिजे. तुला मणी द्यायचा की नाही याचा निर्णय मी नंतरच घेऊ शकेन."

विक्रमभूपतीने राक्षसाचे आभार मानले आणि आपल्या राजधानीला परत आला.

दुसऱ्या दिवशी विजयादित्य जंगलात आला. त्याने राक्षसाला ओळखले आणि म्हणाला-"महाराज, मी हिमगिरी राज्याचा राजा विजयादित्य. सिंहपुरीचा राजा विक्रमभूपति माझ्या देशावर आक्रमण करणार आहे. तो फार दुष्ट स्वभावाचा आहे. आपल्या मण्याच्या साह्यावाचून त्याला जिंकणे मला केवळ अशक्य







आहे. आपण मला मदत कराल अशी माझी खात्री आहे.''

रक्ततर्पण म्हणाला-''राजा, काळजी करू नकोस. मी तुझ्या देशात येईन आणि तेथील परिस्थिति स्वत: पाहीन. मग मला काही निर्णय घेता येईल. तुझा शत्रु विक्रमभूपति याला ही मी असेच वचन दिलेले आहे.''

विजयादित्याने रक्ततर्पणला नम्रपणे नमस्कार केला आणि आपल्या देशी परत आला.

रक्ततर्पण प्रथम हिमगिरी देशात गेला. तेथील सर्व परिस्थिति पाहून त्याला समजले की विजयादित्य धार्मिक प्रवृत्तीचा राजा आहे आणि त्याच्या राज्यात प्रजा सुखी आहे. त्याच्या हे ही लक्षात आलं की सिंहपुरीचा राजा आक्रमणाच्या तयारीत मग्न आहे. तो तेथून सिंहपुरीला गेला. राजा विक्रमभूपति क्रूर व अत्याचारी आहे हे ही तो समजून चुकला. त्याची प्रजा दु:खी आहे आणि सम्राट बनण्याची त्याची महत्त्वाकांक्षा आहे. अन्य देशांचे आधिपत्य आपल्याकडे यावे यासाठी तो प्रयत्नांची शिकस्त करीत आहे.

आता रक्ततर्पण विचारात पडला की या दोन राजांपैकी आपला मणी कोणाला द्यावा? या मण्याचा खरा अधिकारी कोण? तो राजा विक्रमभूपतिला भेटला आणि म्हणाला-''मी तुला हा मणी देतो. याचा तू स्वीकार कर.'' मणी देऊन रक्ततर्पण जंगलात निघून गेला.

वेताळाने विक्रमादित्याला एवढी गोष्ट ऐकवली आणि नंतर म्हणाला-''राजन्, रक्ततर्पणाचं हे दान कुपात्री आहे. विक्रमभूपति क्रूर आणि अत्याचारी आहे. त्याच्या राज्यात प्रजा सुखी नाही. जनतेवर निरनिराळ्या प्रकारचे अत्याचार होत आहेत. याशिवाय तो शेजार पाजारच्या राज्यांना गिळंकृत करू चाहतो, त्यांच्यावर आपली सत्ता गाजवू इच्छितो. त्याची सम्राट बनण्याची महत्त्वाकांक्षा आहे आणि रक्ततर्पणला हे सर्व माहीत आहे. अशा महत्त्वाकांक्षी, अयोग्य व अत्याचारी राजाला मणी देण्याचा अर्थ होतो की राजा त्याला उत्तेजन देऊ चाहतो. त्याची अशी इच्छा आहे की त्याने अन्य राजांना त्रास द्यावा, त्यांचे देश आपल्या छत्रछायेखाली आणून निरंकुश सत्ता चालवावी. अशा राजाच्या हाती मणी सोपविणे अपात्रदानच आहे. विक्रमभूपतीला मणि देऊन राक्षसाने अक्षम्य अपराध केला आहे. विजयादित्याला मणी देणेच न्यायसंगत झाले असते. कारण तो धर्मात्मा आहे. शांत स्वभावाचा आहे. जर त्याला मणी दिला असता तर त्याने विक्रमभूपतीच्या आक्रमणाला यशस्वीपणे तोंड दिले असते, त्याला राजपदावरून हटवून प्रजेला सुखी बनविले असते. धर्म व न्याय यांची स्थापना झाली असती. माहीत असून ही माझ्या या शंकांचे पूर्ण समाधान तू केले नाहीस तर तुझे शिर धडावर राहणार नाही हे तुला माहीतच आहे.

विक्रमादित्याने उत्तर दिले-''तू म्हणतोस त्याप्रमाणे रक्ततर्पणचा निर्णय वरवर अविवेकाचा वाटणे शक्य आहे. असे वाटते की हे अपात्री दान आहे. परंतु रक्ततर्पणाने आपल्या अनुभवांच्या आधारे मोठे विवेकपूर्ण कार्य केले. जंगलातून जाणाऱ्या वाटसरूंना मारून खायची त्याची सवय होती. तो मोठा क्रूर होता. मण्यामुळे त्याच्यात संपूर्ण परिवर्तन झाले. राक्षसाचा तो साधु बनला. त्याच्यातील क्रूरता नाहीशी झाली आणि दया, करुणा वगैरे सात्त्विक भावनांचा त्याच्यात संचार झाला. रक्ततर्पणला वाटले की या मण्यामुळे विक्रमभूपतीच्या प्रवृत्तीत ही बदल होईल. सम्राट बनून दुसऱ्या देशांवर आक्रमण करावे असे त्याला वाटणार नाही. मण्यामुळे तो एक सुयोग्य व समर्थ राजा बनू शकेल. धर्मपरायण, सात्त्विक व शांत स्वभावाच्या विजयादित्यवर अद्भुत मण्याचा काही परिणाम निश्चितच होणार नाही. कारण मूलत:च सगळे सद्गुण त्याच्यात आहेत. म्हणून त्याला मणी देण्याचा उपयोगच काय? असा सर्व विचार करूनच रक्ततर्पणने योग्य व्यक्तीला मण्याचे दान दिले. त्याचा हा निर्णय संपूर्ण सुसंगत व न्यायपूर्ण आहे.''

अशा प्रकारे विक्रमादित्याचा मौन-भंग झाल्यावर वेताळ प्रेतासह अदृश्य झाला.

**आधार - रामनारायण त्रिपाठी यांची एक कथा.**



# जन्मपत्रिका

लावण्या ही धर्मपुरीचा राजा अनंगपाल याची एकुलती एक कन्या होती. तिने शिकलेल्या अनेक शास्त्रात ज्योतिष शास्त्राचाही समावेश होता. ती अुपवर झाली, तेंव्हा राजा तिच्यासाठी योग्य वर शोधू लागला.

एके दिवशी राजकुमारी आपल्या पित्याला म्हणाली, "बाबा, माझ्या जन्मपत्रिकेत, माझा पती सम्राट होईल असं लिहिलेलं आहे. तुम्ही राजकुमारांच्या जन्मकुंडल्या मागवा. जो भाग्यशाली सम्राट बनेल, त्याच्याशीच मी विवाह करीन."

राजाने कन्येच्या इच्छेप्रमाणे खूपशा राजकुमारांच्या पत्रिका मागवल्या अन् त्याबरोबरच त्यांच्या तसबिरीही मागवल्या. त्या सर्वांचे निरीक्षण करून राजकुमारीने निर्णय घेतला की यांच्या पैकी तर कोणीच सम्राट बनण्याइतका भाग्यशाली नाहीय.

तेंव्हा राजा तिला म्हणाला, "बेटी, ही जन्मपत्रिकांची गोष्ट विसरून जा. त्यांच्या फक्त तसबिरी नीट पाहून त्यांच्यातल्या एकाची निवड कर. नन्तर तुझे गुरु ज्योतिषमार्तण्ड तू निवडलेल्या त्या राजकुमाराच्या सम्राट बनण्याच्या शक्यतेची परीक्षा करतील."

दुसऱ्याच दिवशी राजकुमारी लावण्याने शेजारच्याच राजपुत्राची तसबीर पाहून ती पसन्त केली. राजाने ताबडतोब शुभमुहूर्त काढून मोठ्या थाटाने तिचा विवाह लावून दिला.

गुरु ज्योतिषमार्तण्ड त्यावेळी काशीयात्रेला गेलेला होता. मग तिच्या पतीची जन्मपत्रिका कोण तपासणार? राजकुमारीने हा प्रश्न अुपस्थित करताच राजा हसून अुत्तरला, "तुझ्या जन्मकुण्डलीत तर लिहिलं आहे ना, की तुझा पती सम्राट बनेल? मग झालं तर! नवरदेवाची पत्रिका पहायची गरजच काय?"



# प्राचीन किल्ले

## आपल्या देशातील किल्ले - १

पुरातत्व विभागाने १९६० च्या आसपास राजस्थानातील कोरड्या पडलेल्या सरस्वती नदीच्या खोऱ्यातील अवशेषांच्या जागी अुत्खनन सुरू केले. तेथे सापडलेल्या काळ्या बांगड्यांच्या आधारे त्यांनी या शहराचे नाव ठेवले - 'काली बंगा' (काली-काळी, बंगा-बांगडी). हे शहर ई.स.पू. २२०० - १७०० यांमधील काळातले होते. याच्या चारही बाजूंना किल्ल्याच्या भिंती होत्या. असे अनुमान केले गेले, की हा किल्ला 'सिंधु-खोरे-संस्कृति' काळातला असावा.

*रचना : मीरा गुप्त*
*चित्रांकन : गौतम सेन*

याच काळाशी संलग्न असणारे काही किल्ले अुत्खननात गुजराथ, राजस्थान व हरियानात सापडले आहेत. किल्ले हे सामान्यपणे शत्रूंपासून स्वतःला वाचवणे व त्यांच्या आक्रमणांना तोंड देणे या कामांसाठी बांधले जात असत. यांचा आणखीही एक चांगला अुपयोग होत असे. त्या काळात नद्यांनी आपली संस्कृति जिवन्त ठेवणे व त्यांचे पोषण करणे या कामात अुत्तम भूमिका बजावली आहे. शिवाय जेंव्हा या नद्यांना महापूर येई, तेंव्हा नागरिक या किल्ल्यांत आश्रय घेत. अशा प्रकारे हे किल्ले नागरिकांची संरक्षणशिबिरे बनत असत. यामुळेच सारे प्रमुख किल्ले अुंचावरील जागेत बांधले गेले आहेत.

ऋग्वेदात

**सिंधु - खोरे - संस्कृति काळातील कालीबंगा**

किल्ल्यांना 'दुर्ग' किंवा 'पुर' म्हटले गेले आहे. इन्द्राचे एक नाव 'पुरंदर' असे आहे. 'पुरंदर' याचा अर्थ आहे - किल्ल्यांवर विजय प्राप्त करणारा.

यजुर्वेदातील धनुर्वेद या भागात दुर्ग-निर्माणासंबंधी विस्तृत वर्णन आहे. धनुर्वेदात सहा प्रकारच्या किल्ल्यांचे वर्णन आहे. पर्वतावर निर्मित असणारा 'गिरिदुर्ग', पाण्यात बांधलेला 'जलदुर्ग', अरण्यात बांधलेला 'वनदुर्ग', जमिनीवर बांधलेला 'महिदुर्ग', वाळवंटात असणारा 'धन्वा दुर्ग', वृक्षांनी वेष्टित असलेला 'वृक्षदुर्ग'. या सहाही प्रकारात गिरिदुर्ग अत्यन्त श्रेष्ठ मानला जातो. दुर्गाशिवाय असणाऱ्या राजाची तुलना विषहीन सापाशी केलेली आहे.

पुरंदर इंद्र

जलदुर्ग

आयोध्या व लंका नगरात असणाऱ्या किल्ल्यांचे वर्णन रामायणात आहे. अयोध्येच्या किल्ल्याच्या चारी बांजूना खंदक असून तटाला उंच उंच बुरूज असल्याचा उल्लेख आहे. लंकेतील किल्ले आकाशाला स्पर्श करणारे प्राकार, दुर्गम अरण्ये, नद्या, दऱ्या यांनी वेढलेले असल्याने त्यावर चढणे देवांनाही अशक्य असल्याचा उल्लेख आहे.

सेतुबंधन

महाभारतात हस्तिनापुर, इन्द्रप्रस्थ, मथुरा, राजगृह, अहिच्छत्र व द्वारका या नगरातील किल्ल्यांचे विस्तृत वर्णन आहे. त्यांचे तंतोतंत वर्णन प्रत्ययकारी आहे.

इन्द्रप्रस्थ दुर्गाचे बुरूज गोपुरांसारखे होते. संपूर्ण नगराच्या रक्षणाची व्यवस्था येथूनच केली जाई. दुर्गाला महाद्वार नसून गरुडद्वार या नावाने गुप्त द्वार असे.

अलाहाबादजवळ उत्खनन झाले आणि फलस्वरूप तेथे कौशांबी नगरातील घरांचे अवशेष मिळाले. परीक्षिताचा नातू विचाक्ष याने हे नगर वसवले होते, असे मानले जाते.

बुद्ध काळात चंपा, राजगृह, वाराणसी आदि दुर्गयुक्त मुख्य नगरे होती. पश्चिम व उत्तरेकडील भागांत तक्षशिला, पुष्कलावती व गान्धार ही खूपच प्रबळ अशी राज्ये होती. शिकंदराने ज्यावेळी त्यांच्यावर हल्ला केला, तेव्हा या साम्राज्यांनी त्याला निकराने तोंड दिले. पुष्कलावतीचा किल्ला सर करायला अलेक्झांडरला एक

यापेक्षाही अधिक काळ लागला.
या युद्धात राजा पुरुषोत्तम याने
झांडरला चांगलेच जेरीस आणले.
णावर हत्तींनी आपली करामत
न सैन्य अुधळून लावले. भारतीय
नी आपले शौर्य व साहस दाखवून
ना सैन्यात घबराट अुत्पन्न केली. मगध



पाटलीपुत्रचे दरवाजे

ासक धनानन्दाच्या वीरतेच्या गोष्टी ऐकून ग्रीक सेना भयाने थरथर कापू लागली. यानन्तर चन्द्रगुप्त मौर्य हा
गध देशाचा राजा बनला, तेंव्हा ग्रीक प्रवासी मॅगस्थेनीस हा भारतात आला होता. त्याने मगधची राजधानी
ाटलीपुत्र येथे बांधल्या गेलेल्या किल्ल्याचे अद्‌भुतरम्य, विपुल वर्णन आपल्या ग्रंथात केले होते. किल्ल्याचा तट
कूण ४० कि.मी. पेक्षाही अधिक लांबीचा होता. तटाच्या चारी बाजूंना ३.५ मीटर खोल व १८० मीटर लांब
सा खंदक होता. खंदकातल्या पाण्यात मगरी पोहत रहात असत. किल्ल्याला एकूण ६४ दरवाजे व ५७० बुरुज
ते.

आपल्या देशाने दुर्ग-बांधणीच्या कलेत ई.स.पू. ३०० पूर्वीच परिपूर्णता प्राप्त केलेली होती.

*येथे दिलेली सर्व चित्रे, अुपलब्ध माहितीच्या आधारे, चित्रकारांनी आपल्या कल्पनेने काढलेली आहेत.*
*वरचे रेखाचित्र स्तूपाच्या अुठावचित्राच्या आधारे.*



शत्रूने वेढा घातलेला किल्ला



# सोन्याची लांडोर

विन्ध्यारण्य प्रदेशात एक सोन्याची लांडोर फिरत असल्याची बातमी कनकपुरमध्ये पसरली. कनकपुरचे महाराज विचित्रसेन यांना लोकविलक्षण व अद्‌भुत वस्तु अन् प्राणी जमवण्याची आवड होती. त्यामुळे ही बातमी कळताच काही सैनिकांना बरोबर घेअून राजा विंध्यारण्याकडे निघाला.

विन्ध्यारण्यातील पर्वत पायथ्याशी आदिवासी लोकांची एक वस्ती होती. त्या वस्तीच्या प्रमुखाने राजाचे स्वागत करून त्याचा सादर पाहुणचार केला. राजाने त्याला, आपण त्या भागात फिरणाऱ्या सोन्याच्या लांडोरीला पकडण्यासाठी तेथे आल्याचे सांगितले.

सोन्याच्या लांडोरीचा राजाच्या तोंडचा अुल्लेख ऐकून प्रमुखाचा चेहरा दु:खी दिसू लागला. तो म्हणाला, ''महाराज, ती सोन्याची लांडोर काही दिवसांपासून इथे दिसेनाशी झाली आहे. एक महिन्यापूर्वी तिला पकडून आपणाला भेट देण्यासाठी माझी मुलगी जंगलात गेली. पण रात्र झाली, तरी ती परत न फिरल्यामुळे तिच्या शोधात आम्ही जंगलात गेलो. तिथे एका ठिकाणी आम्हाला लांडोरीचे एक सोन्याचे पीस सापडले.'' अन् हे सांगता सांगता त्याने जवळ अुभ्या असलेल्या एका युवकाकडे पाहिले.

तो युवक लगेच झोपडीत जाअून कपड्यात काळजीपूर्वक गुंडाळून ठेवलेले ते पीस घेअून आला. पीस त्याने राजाच्या हाती दिले.

''अद्‌भुत वस्तु आहे ही! पण यामुळेच तुझी मुलगी नाहीशी झालीय. त्या सोन्याच्या लांडोरीबरोबरच मी तुझ्या मुलीलाही शोधायचा प्रयत्न करीन.'' असे म्हणून राजा जंगलाकडे निघाला.

जंगलात त्याने त्या लांडोरीसाठी खूप शोधाशोध केली. सूर्यास्ताच्या एकादा तास अगोदरच एक शिपाई धावतपळत येअून सांगू

कमल देशपांडे



लागला, की आपली फणा उभारून फुत्कारत आपल्याला डसायला आलेल्या एका नागाशी ती सोन्याची लांडोर लढत होती. ती नागाला आपल्या पायांनी तुडवत चोचीने मारायचा प्रयत्न करत होती.

आपापल्या घोड्यांवर बसलेल्या राजा व त्याच्या सैनिकांनी ताबडतोब तेथे जाऊन लांडोरीला घेरले. तिच्या जेंव्हा हे लक्षात आले, तेंव्हा नागाचा नाद सोडून ती जवळच्या झाडीपलीकडे अुडून गेली व झाडीच्या आधाराने पळू लागली.

राजा लांडोरीचा पाठलाग करत तिच्या बराच जवळ पोचला. इतक्यात ती तेथील सरोवराच्या किनाऱ्यावरील एका झोपडीत शिरली.

झोपडीतल्या म्हातारीने त्या लांडोरीला आपल्या हातात अुचलून घेअून विचारले, "पुन्हा कसलं संकट आलं?" अन् ती लांडोरीचे पंख मोठ्या प्रेमाने कुरवाळू लागली.

राजा विचित्रसेन झोपडीसमोर घोड्यावरून अुतरून आत शिरला. तो पर्यन्त बाहेर काळोख पसरला होता. परंतु त्या दाट काळोखातही लांडोरीच्या लखलखीत पंखांच्या प्रकाशामुळे झोपडीत स्वच्छ अुजेड पडलेला होता.

म्हातारीच्या हातात आरामात स्थिरावलेल्या लांडोरीकडे आश्चर्याने पहात राजा, "आजीबाई या सुवर्ण-लांडोरीला पकडण्याच्या प्रयत्नातच मी इथे आलोय. बरं झालं, ही तुझ्या हाती आली. दे ती माझ्याकडे अन् बदल्यात बक्षिस म्हणून हा माझा हिऱ्यांचा हार घे." असे म्हणत आपल्या गळ्यातला हार काढू लागला. परन्तु राजाकडे नीट निरखून पहात म्हातारी म्हणाली, "हे काय म्हणत आहेस तू? ही तर माझी पाळीव लांडोर आहे. तुझा हट्टच असेल, तर मी हिचं एक पीस देते तुला. घेअून जा ते."

पण राजा काहीसा रागावून, "मी या देशाचा राजा आहे. या अरण्यातल्या पक्ष्यांवर, प्राण्यांवर माझाच अधिकार आहे. मग ही लांडोरही माझीच आहे ना?" असे म्हणत म्हातारीच्या हातून ती लांडोर जबरदस्तीने आपल्या हाती घेअू लागला.





पण जणू विजेचा धक्का बसल्याप्रमाणे राजा अचानक खाली कोसळला! जरा वेळाने अुठून बसणाऱ्या राजाला म्हातारी म्हणाली, "बघ बेटा, ही काही सामान्य लांडोर नव्हे. तिच्यात दैवी अंश आहे. माझ्या परवानगीवाचून तिला कोणीही घेअून जाअू शकत नाही. ही वीणा घे, अन् तिच्या तारा छेडत मेघमल्हार रागात एकादं सुन्दर गाणं म्हण. तसं केलंस, तर तुला निदान या लांडोरीचं एक अंड तरी देईन मी." अन् तिने वीणा त्याच्या हाती दिली.

राजा पद्मासन घालून बसून गोड आवाजात मेघमल्हार गाअू लागला. ते ऐकत लांडोर खूप नाचली अन् तिने एक सोन्याचे अंडे दिले. ते अंडे राजाच्या हातात ठेवत म्हातारी म्हणाली, "मुला, एका आठवड्यात अंडं फुटून त्यातून एका सोन्याच्या लांडोरीचा जन्म होईल. पण नीट लक्षात ठेव की सूर्याच्या किरणांचा याला स्पर्श होअून चालायचं नाही. आणखीही एक गोष्ट लक्षात ठेव की या अंड्याबद्दल कोणालाच काही कळता कामा नये. कळलं तर याचा प्रभाव नाहीसा होईल." सर्व काही नीट सांगून म्हातारीने त्याला सावधगिरीचा इशारा दिला.

मोठ्या आनन्दाने अंड्याचा स्वीकार करून राजा आपल्या शिपायांसह आपल्या किल्ल्यात परतला. ते अंडे त्याने एका चंदनाच्या छोट्या पेटीत जपून ठेवले अन् पेटी महालाच्या एका विशिष्ट दालनात नीट ठेवली.

सहा दिवस निघून गेले. सातव्या दिवशी संध्याकाळी राजाची बारा वर्षांची कन्या राजकुमारी दीप्तिरेखा आपल्या सख्यांसह लपंडाव खेळता खेळता त्या दालनात आली अन् चंदनाची पेटी पहाताच तिने अुत्सुकतेने ती अुघडली.

सोन्याचे ते चमकदार अंडे पाहून राजकुमारी चकित झाली अन् ते आपल्या सख्यांना दाखवण्यासाठी बाहेर अुद्यानात गेली. संध्याकाळच्या सूर्याचे किरण त्या अंड्यावर पडून एकदम स्फोट झाल्यासारखा आवाज होअून ते फुटले. त्यातून चमचमत्या सोनेरी रंगाचा एक छोटासा साप बाहेर पडला अन् तो राजकुमारीच्या डाव्या पायाला डसला.

त्याबरोबर राजकुमारी सोन्याच्या लांडोरीत



परिवर्तित होऊन उडत उडत किल्ल्याबाहेर निघून गेली. राजकुमारीच्या सख्या ओरडा आरडा करू लागल्या व त्यांनी राजा विचित्र-सेनला ही वार्ता कळवली. ताबडतोब घोड्यावर स्वार होऊन राजाने त्या लांडोरीचा पाठलाग सुरू केला. पण ती राजाच्या हाती सापडू शकली नाही. अन् तशीच उडत-पळत शेवटी ती त्याच म्हातारीच्या झोपडीत शिरली.

बिचारा दुःखी राजाही तिच्या मागोमाग झोपडीत पोचला. त्याला तिथे सोन्याच्या तीन लांडोरी दिसल्या. त्या तिघीही अगदी एकसारख्याच दिसत होत्या. थोडासाही कसला फरक नव्हता त्यांच्यात.

राजाला पाहून म्हातारी म्हणाली, "काय बेटा, पुन्हा कशासाठी आलास इथे? मी दिलेलं अंडं फुटलं नाही का? आणखी एक अंडं हवं का तुला?" ती अशा स्वरात राजाला हे प्रश्न विचारत होती की, मध्यन्तरी घडलेली हकिकत जणू तिला माहीतच नव्हती.

राजा एकदम चिडून बोलला, "अग म्हातारे! अजाणपणाचा आव आणून नाटक करू पहाशील तर मी तुकडे तुकडे करून टाकीन बघ तुझे! माझी एकुलती एक मुलगी लांडोर बनून इथे आलेली आहे. मुकाट्यानं तिला तिचं खरं रूप देऊन माझ्या हवाली कर; नाहीतर खरंच मारून टाकीन मी तुला." असे बोलत त्याने आपली तलवार म्यानातून बाहेर काढली.

म्हातारी आपलं दंतविहीन तोंडाचे बोळके उघडून विकट हास्य करीत म्हणाली, "माहीत आहे तू मोठा तलवारबहाद्दर आहेस ते! म्यानात घाल ती तलवार अगोदर! या तीन्ही लांडोरींमधून तुझी मुलगी कोणती ते सांगू शकलास, तर आपोआपच ती स्वतःच्या रूपात प्रकट होईल. पण तुझी चूक झाली, तर मात्र तूही कायम इथे सोन्याचा मोर बनून रहाशील!"

राजा विचित्रसेनने आपली तलवार म्यानात घातली अन् लक्षपूर्वक तो त्या लांडोरींकडे पाहू लागला. त्यांच्यातली एक अश्रुभरल्या डोळ्यांनी डोके वर उचलून राजाकडे पाहू लागली. त्यातली दुसरी एक लांडोर अगदी हीन दीन होऊन डोके खाली घालून बसून होती. तिच्या डोळ्यातही अश्रू होते.





थोडा वेळ काही विचारात राजा गढून गेला अन् मग एकदम म्हातारीला म्हणाला, "धैर्यानं डोकं उचलून माझ्याकडे पहाणारी ही लांडोर माझी दीप्तिरेखा आहे. डोकं खाली घालून धरणीकडे दीनतेनं पहाणारी ही वनप्रमुखाची कन्या मोहिनी आहे. दे यांना त्यांचं खरं रूप! मग मी त्यांना आपल्या बरोबर घेऊन जाईन. असे न केलेस तर त्याचा परिणाम तुला भोगायला लागेल हे विसरू नकोस."

राजाच्या परीक्षणशैलीची प्रशंसा करत म्हातारी, "मुला, तू आपल्या मुलीला बरोबर ओळखलंस. या सुवर्ण लांडोरीला मी परत तिचं पूर्वरूप देऊन टाकते." असे म्हणत पुढे सरकू लागली.

इतक्यात राजा ओरडून म्हणाला, "थांबा आजीबाई! फक्त माझ्याच मुलीला नव्हे, तर त्या वनप्रमुखाच्या मुलीलाही पुर्वरूप द्या."

राजाकडे आश्चर्याने पहात म्हातारी म्हणाली, "त्या आदिवासी लोकांच्या प्रमुखासाठी तू कशाला हैराण होतो आहेस?"

विचित्रसेन उत्तरला, "तो प्रमुख माझीच प्रजा आहे ना? स्वतःच्या मुलीपेक्षाही त्याच्या मुलीचं रक्षण करणं हा राजधर्म आहे. मी सांगितल्याप्रमाणे करणं तुला पसंत नसेल, तर मलाही सुवर्ण-मोर बनव."

म्हातारीने लगेच राजाच्या खांद्यावर प्रेमाने आपले हात ठेवले अन् म्हटले, "राजा, तुझी धर्मबुद्धी, न्यायबुद्धी अन् दयेचा गुण पाहून मी फार प्रसन्न झालेय. मीही तुझीच प्रजा आहे, हे ही ध्यानात ठेव. माझी तुला एक विनन्ती आहे. हे प्राणी कोणाला त्रास न देता वनात संचार करत असतात. ते कितीही सुंदर, आकर्षक वाटले, तरी त्यांना पकडून बांधून ठेवणं किंवा ठार मारणं ही क्रूरता आहे, अत्याचाराची पराकाष्ठा आहे. हा अन्याय तू थांबव." इतके बोलून ती त्या लांडोरीजवळ गेली अन् तिने त्यांना त्यांचे पूर्वरूप दिले.

विचित्रसेनने म्हातारीचे आभार मानले अन् आपली कृतज्ञता व्यक्त केली. वनप्रमुखाहाती त्याची मुलगी सोपवून अन् दीप्तीरेखाला बरोबर घेऊन तो आपल्या राजधानीकडे निघून गेला.





# कलेचा सन्मान

मुगलसराईचा जमीनदार झोपेतून जागा झाला नि स्तुति-पाठकांनी प्रशंसात्मक बिरुदावलि गायला सुरुवात केली. रोज रोज ही गीते ऐकून जमीनदाराचे कान किटले. आपल्या दिवाणाला बोलावून तो म्हणाला - ''ही सर्व मंडळी आळशी बनली आहेत. यांना काम करायला नको. आळशांची संख्या दिवसें दिवस वाढतच चालली आहे. इथून पुढे यांच्यावर खर्च करायचा नाही. यांना आपण दरमहा जे वेतन देतो ते बंद करून टाका. त्यांना सांगून टाका की त्यांनी आता आळस सोडून शारीरिक मेहनतीची कामे करावीत.''

मंदस्मित करीत दिवाण म्हणाला - ''महाराज, आपलं अन्न खातो आहे, आपलं कल्याण व्हावं हीच माझी इच्छा. म्हणून माझा विचार आपण समजून घ्यावा. मनुष्याच्या जीवनात विनोदाची आवश्यकता आहे. स्तुति-पाठकांची गाणी आपल्याला आवडली नाहीत, म्हणून त्यांना आळशी ठरविणे योग्य नाही. देशाच्या सर्वांगीण विकासासाठी लोकांनी जसे शारीरिक श्रम केले पाहिजेत, तशीच कलेची साधना ही केली पाहिजे.''

जमीनदाराने जरा चिडून दिवाणाकडे पाहिले आणि म्हणाला - ''देश-रक्षणासाठी व देशाच्या प्रगतीसाठी वीरांना प्रोत्साहन देणे आपले कर्तव्य आहे. त्यांना मदत करून देशाची स्थिति सुधारली पाहिजे. पोटाची खळगी भरण्यासाठी हास्यविनोद करणाऱ्या या आळशांना प्रोत्साहन देणे मला योग्य वाटत नाही.''

यावर दिवाण बिचारा काय बोलणार? लोकांच्या हे लक्षात आलं की जमीनदाराच्या मतानुसार कलाकार आळशी लोक आहेत.

लोक ही कलाकारांना आळशी समजू लागले. यामुळे मुगलसराईच्या जमीनदाराच्या दरबारी नृत्य-गायनाचे कार्यक्रम बंद झाले. कवींच्या कविता निरुपयोगी ठरल्या. काव्याची राज्यात बूज राहिली नाही. शिल्पकला व चित्रकला यांचा ही ऱ्हास झाला. फिरत्या नाटक-मंडळींचे नाट्य-प्रयोग आता कोठे दिसेनासे झाले.

अशा स्थितीत एकदा जमीनदाराच्या बायकोला एक असाध्य रोग जडला. ती जिवंत राहील अशी आशा नव्हती. मुगलसराईच्या प्रसिद्ध वैद्याने जमीनदाराला सांगितले - ''महाराज, जमीनदारीण बाईंना आवश्यक तो सर्व औषधोपचार मी केला आहे. आता त्यांच्या शरीरात कुठला ही रोग नाही. आपण त्यांची नित्य योग्य ती काळजी घ्यावी. त्यांच्या मनोरंजनाची चांगली व्यवस्था करावी. यामुळे त्यांची प्रकृति झपाट्याने सुधारेल. त्या सतत आनंदी व उत्साही राहिल्या तर पुन्हा त्यांना रोग शिवणार नाही. आनंद हेच अर्ध बळ असतं असं म्हणतात. मन स्वस्थ असेल तर शरीर स्वस्थ राहील. लवकरच त्यांची प्रकृति पूर्ववत् होईल.''



वैद्यांचा सल्ला ऐकून जमीनदार विचारात पडला. दिवाण शेजारीच उभा होता. योग्य संधि आलेली पाहून त्याने ही जमीनदाराला समजवण्याचा प्रयत्न केला. तो म्हणाला - ''प्रभु, काम करून थकलं अथवा मनात शांति नसली तर आपले पूर्वज ललित कलांचा आधार घेत. स्वत:साठी नको असली, तरी निदान जमीनदार बाईंसाठी काही मनोरंजनाची व्यवस्था आपण अवश्य करावी. निदान मला तशी अनुमति द्यावी.''

थोड्याच दिवसात जमीनदाराच्या दरबारात अनेक कलाकार दिसू लागले. दोन-तीन दिवस जमीनदाराची अवस्था थोडी विचित्र होती, पण हळू हळू रंजन-कार्यक्रम पाहिल्यावाचून त्याच्याच्याने ही रहावेना. हास्यविनोदाचे जीवनातील स्थान त्यांच्या चांगले लक्षात आले.

लवकरच जमीनदार बाई मोठ्या उल्हासाने जीवन जगू लागल्या. एक दिवशी दोन भाट तेथे आले. जमीनदार थोडा चिडला. वक्र दृष्टीने त्यांच्याकडे पाहिले. तरी पण त्यांनी

सुनंदा सिरपुरकर

जमीनदाराची खूप प्रशंसा केली. जमीनदाराला जरा बरे वाटूं लागले. शेवटी एक भाट दुसऱ्याला म्हणाला - ''बाप व मुलगा यांनी एका स्त्रीला एक-एक पुत्र दिला. या दोन मुलात युद्ध झाले. परमेश्वराने एकाला मारून टाकले व दुसऱ्याला सम्राट बनविले. परमेश्वराच्या घरचा न्याय ही काय विचित्र ! महाराज, गाईच्या दुधाने त्या परमेश्वराचा अभिषेक करा. तो प्रसन्न झाला तर आपले सर्व प्रकारे कल्याण होईल. आपली भरभराट होईल. आपल्याला कशाची ददात पडणार नाही. रयतेची सर्व दुःख नाहीशी होतील व ती सुखाने नांदू लागेल.''

दुसरा म्हणाला - ''कोणत्या गाईच्या दुधाने म्हणतोस?'' हे ऐकून जमीनदार संतप्त झाला. तावातावाने म्हणाला - ''काय मूर्खासारखी बडबड करीत आहात? या दोघांना ही हाकलून लावा. तोंडात येईल ती बकवास करताहेत लेकाचे!''

तेव्हा दिवाण नम्रतापूर्वक जमीनदाराला म्हणाला - ''प्रभु, ही काही निरर्थक बडबड नव्हे. गायीच्या दुधाने श्रीकृष्णाला अभिषेक करायला ते आपणास सांगत आहेत. सूर्य आणि यम हे पिता-पुत्र होत. दोघांनी कुंतीला वरदान देऊन दोन पुत्र दिले - कर्ण व धर्मराज. कुरुक्षेत्राच्या लढाईत श्रीकृष्णाने धर्मराजाला मदत केली आणि कर्णाला मारून टाकले. अशा श्रीकृष्णाचा गाईच्या दुधाने अभिषेक करायला हे भाट आपणास सांगत आहेत. त्यांची बडबड निरर्थक नाही.''

हे सर्व समजल्यावर जमीनदार खुश झाला. तो म्हणाला - ''तुमचे बोलणे मोठे चमत्कृतिपूर्ण आहे. त्यात गूढार्थ भरलेला आहे. तुम्ही तर एक कोडंच सांगितलं. कोड्याचं उत्तर समजल्यावर तुमच्या बोलण्यातील कौशल्य लक्षात आलं. तुमचं कौतुक करावंस वाटतंय मला. अगोदर माझ्या नीट लक्षात आलं नाही''

केवळ भाटांचाच नव्हे, तर अन्य कलाकारांचा ही जमीनदाराने सन्मान केला. पुरस्कार देऊन त्यांचा गौरव केला.

या घटनेनंतर मुगलसराईच्या जमीनदारीत ललित कलांना खूप उत्तेजन मिळू लागले. रयत सुखा-समाधानाचे जीवन जगू लागली.





# महाभारत

कृपाचार्य कर्णाला म्हणाले - ''अर्जुनाशी द्वंद्वयुद्ध करायचे असेल, तर नियमाप्रमाणे तुलाही राजा किंवा राजपुत्र असणे आवश्यक आहे.'' परंतु कर्ण आपल्या मातापित्यांचे नाव सांगायला संकोचत होता. दुर्योधन पुढे होऊन कृपाचार्यांना म्हणाला, ''शास्त्रानुसार क्षत्रीय वंशात जन्म झालेल्या आणि ज्याच्याजवळ मोठे सैन्य आहे, अशा माणसाला राजा म्हटले जाऊ शकते, मानले जाऊ शकते. 'तरीही राजा नसणे' हीच जर अर्जुनाशी लढण्यासाठी कर्णाची योग्यता कमी मानली जात असेल, तर मी जाहीर करत आहे की, या क्षणापासून कर्ण हा अंग-देशाचा राजा आहे.''

दुर्योधनाच्या आज्ञेने तावडतोब त्या मंडपात पुरोहित आणले गेले, सोन्याचे एक सिंहासन मागवले गेले, आणि दुर्योधनाने कर्णाला सिंहासनावर बसवून त्याला राज्याभिषेक केला.

हे कर्मकांड संपल्यावर कर्ण दुर्योधनाला म्हणाला, ''महाराज, आपण मला राजा बनवलं आहात. आपणच सांगा कि हे आपलं ऋण मी कसं फेडू ?''

दुर्योधन म्हणाला, ''मला या बदल्यात फक्त तुझ्यासारख्या पराक्रमी व्यक्तीची मैत्री हवीय.''

कर्णाचे पालनपोषण सूत अधिरथाने केले होते. रथात बसलेल्या अधिरथाने खाली उतरून अंगराज कर्णाचे अभिनन्दन केले. कर्णानेही पुत्र-भावाने त्याला प्रणाम केला. दोघांच्याही नेत्रांतून आनन्दाश्रु वहात होते.

आता तर सर्वासमक्ष हे प्रकट झाले की, कर्ण सूत अधिरथ याचा पुत्र आहे. तेव्हां भीम त्याला उद्देशून म्हणाला, ''सूतपुत्रा, घोड्यांचे लगामच तू हाती घ्यावेस हे बरं! कशाला उगाच अर्जुनाशी



द्वंद्वयुद्धाची अपेक्षा करतोस? अंग देशाचा राजा बनून तरी तू काय करणार आहेस?''

आपल्या भावांसमवेत बसलेला दुर्योधन म्हणाला, ''भीमसेना! तुझं हे बोलणं अयोग्य आहे. राजाने नेहमीच कोणत्याही बलशाली वीराशी लढायला तयार असले पाहिजे. अर्जुनाचाही हाच धर्म आहे. नदीचं मूळ व शूर व्यक्तीचं कूळ कधीच कोणी पहायचा प्रयत्न करू नये. या कर्णात सर्व दिव्य लक्षणं आहेत, जन्मजात कवचकुंडलांनी युक्त असा हा असाधारण तेजस्वी माणूस आहे. केवळ अंग राज्यच काय, पण संपूर्ण विश्वाचं राज्य चालवायची क्षमता याच्यात आहे. हा महान पराक्रमी आहे. याच्या शौर्याबद्दल, वीरतेबद्दल कोणी थोडाही संशय घेऊ नये. मी याला अंगदेशाचा राजा बनवला याबद्दल कोणाचा काही आक्षेप असेल, तर मीच द्वंद्वयुद्धाला आव्हान देत आहे.'' जय-पराजयाचा निर्णय इथेच होऊन जाईल.''

दुर्योधनाच्या या बोलण्याने सभेत हाहा:कार उडाला. पण द्वंद्वयुद्ध सुरू होण्यापूर्वीच सूर्यास्त झाला. काही लोक अर्जुनाची प्रशंसा करत राहिले, काही दुर्योधनाची, तर अनेक कर्णाचीही भरपूर प्रशंसा करत राहिले. नंतर सर्वजण स्वगृही परतले. परंतु आजचा दिवस दुर्योधनाला मात्र पर्वणीचा दिवस वाटला. आजपर्यन्त अर्जुन त्याला मार्गातला काटा वाटत होता. पण आज कर्णाला आपला मित्र बनवून तो स्वत: निर्भय झाला. त्याने ओळखले की कर्ण हा अर्जुनाला तोडीस तोड आहे. त्यामुळे आता तो सुखाने झोपू शकणार होता.

असेच दिवस जात राहिले. एके दिवशी प्रात:काळी द्रोणाचार्यांनी आपल्या सर्व शिष्यांना बोलावून म्हटले, ''आता मला तुमच्याकडून गुरुदक्षिणा हवी.'' सर्वांनी प्रणाम करून विचारले, ''सांगा, कोणती गुरुदक्षिणा हवी आपल्याला?''

''ऐश्वर्याने मदांध झालेल्या अविवेकी द्रुपद राजाला बांधून आणून माझ्या हवाली करायचे. - हीच ती गुरुदक्षिणा!'' अशी त्यांनी मागणी केली.

गुरुआज्ञा पाळायला सगळेच राजकुमार तयार झाले. द्रुपदाशी युद्धाची पूर्ण तयारी करून आपल्या गुरूसह ते पुढे निघाले.

पांचालपुरच्या जवळ पोचल्यावर अर्जुन द्रोणाचार्यांना म्हणाला, ''यांच्यापैकी कोणीच द्रुपदराजाला पकडून आणू शकणार नाही. ते विफल होऊन परत येईपर्यन्त आम्ही पांडव इथेच त्यांची प्रतीक्षा करू. नंतर आम्ही जाऊन द्रुपदाला कैद करून आणू.''

दुर्योधन आपले भाऊ व कर्ण यांच्यासह पांचाल राजधानीकडे निघाला. हे सर्व बढाया मारत आपल्याला कैद करण्यासाठी येत आहेत हे कळल्याबरोबर द्रुपदराजा आपले सैन्य व भावांना बरोबर घेऊन युद्धासाठी निघाला. समोरासमोर आल्यावर कौरवबंधु काही वेळ त्याच्याशी लढले; परन्तु द्रुपद व त्याच्या सैन्याच्या जबरदस्त हट्टापुढे ते टिकू शकले नाहीत. शेवटी आपले प्राण वाचवण्यासाठी युद्धभूमी सोडून ते पळून परत आले, व पांडव थांबले होते, तेथे पोचले.

यानन्तर अर्जुनाने द्रोणाचार्यांना प्रणाम केला अन् धर्मराजाकडून अनुमती व आशिर्वाद घेतला. भीमाला त्याने आपला सेनापती बनवला व नकुल-सहदेवांवर आपल्या रथाची जबाबदारी सोपवली. नन्तर द्रुपदाला बांधून आणायचे वचन देऊन अर्जुन युद्धाला निघाला.

भीम व अर्जुन द्रुपदसेनेला भारी ठरले. त्यांनी ते सैन्य उधळून लावले. द्रुपद-सैन्याचे मनोधैर्य खचून सर्वजण प्राण रक्षणाचा मार्ग शोधू लागले. आपले युद्ध-कौशल्य दाखवत अर्जुन आता खुद्द द्रुपदाला भिडला. क्रोधाने पेटलेला द्रुपद





अर्जुनावर धावून गेला व मोठ्या तडफेने त्याच्याशी लढू लागला. युद्धाच्या मधेच एकाएकी द्रुपदराजा दिसेनासा झाल्यावर त्याच्या सैन्यात हाहा:कार माजला. अर्जुनाला घनघोर युद्ध करावे लागले. त्याने द्रुपदाचे घोडे व रथ यांचा विध्वंस केला. अन् शेवटी त्याला पकडलेच.

इकडे भीम, नकुल, सहदेव द्रुपदसेनेचा संहार करतच होते. या भावांच्या पराक्रमासमोर पाठ दाखवून ते पळून जात होते. इतक्यात अर्जुनाने ओरडून आपल्या बंधूंना म्हटले, ''मी द्रुपदाला कैद केलं आहे. ज्या कामासाठी आलो, ते तर पूर्ण झालंय; मग आता अनावश्यक सैन्याचा संहार थांबवा.''

अर्जुनाने द्रुपदाला बांधले व ते पोटले त्याने आपल्या गुरुसमोर गुरुदक्षिणा म्हणून अर्पण केले. तेव्हां द्रोण द्रुपदाला म्हणाला, ''पांचालराजा, तुझं कांपिल्यनगर आता माझ्या हाती आलं. आता तरी मान्य करतोस का, की मी तुझा बालमित्र आहे. घाबरू नकोस. मी ब्राह्मण आहे अन् शान्तताप्रिय आहे. आपली मैत्री मी तरी विसरलो नाहीय. तुझ्या मैत्रीसाठीच मी तुला इथे आणायला सांगितलं आपल्या शिष्यांना. राजे लोकांशी मैत्री आवडते मला. पण आता तू राजा नाहीयेस. तुझं राज्य आता बळकावलं गेलंय. तेव्हां केवळ तुझ्या मैत्रीसाठी मी तुला अर्धं राज्य परत देतोय. गंगेच्या दक्षिणेकडचं तुझं राज्य, तुझंच राहील; पण उत्तरेकडचं माझं आहे. इथून पुढे कसलं ही शत्रुत्व न ठेवता आपण आपापलं राज्य संभाळू या.''

द्रुपदाने द्रोणाच्या या शाश्वत मैत्रीच्या प्रस्तावाला मान्यता दिली. द्रुपदाला सोडून देऊन द्रोणाने सन्मानपूर्वक पाठवून दिले.

तेव्हांपासून द्रुपद दक्षिण पांचालचाच फक्त राजा राहिला. माकंदी व कांपिल्य ही राजधानीची शहरे होती. सेनाबलाच्या आधारे द्रोणाला जिंकणे अशक्य आहे, हे द्रुपद समजून चुकला होता. त्याला कोणी मूलबाळही नव्हते. या दोन्हीं कारणांनी तो साधुसंतांच्या आश्रयाने देशभ्रमण करत राहिला.

द्रोण उत्तर पांचालचा राजा बनला. अहिच्छत्र ही त्याची राजधानी होती.

एक वर्ष निघून गेले. धृतराष्ट्राने धर्मराजाला यौवराज्याभिषेक करायचे ठरवले. धर्मराज हा साहसी, सहनशील व सरळ स्वभावाचा होता. आपल्या हाताखालच्या लोकांना तो आदराने वागवत असे. युवराज बनून धर्मराजाने राज्यकारभार व्यवस्थित चालवला, आणि स्वत:चे सामर्थ्य सिद्ध केले. लोक तर असेही म्हणू लागले की शासनभार संभाळण्यात तो आपल्या पित्याहूनही अधिक समर्थ व दक्ष आहे.

भीम हा बलरामाचा शिष्य होता. त्याने गदा व खड्गयुद्धात प्राविण्य संपादन केले. अर्जुनाने एकदा धनुष्य हाती घेतले, की हाताला जखम झाली तरी तो ते इष्ट साध्य झाल्याशिवाय सोडत नसे. त्याने धनुर्विद्येचा उत्तम अभ्यास केला. खूप वेगाने तो बाण सोडत असे व त्याचा नेमही अचूक होता. त्याच्या या प्राविण्यावर गुरु द्रोण अतिशय प्रसन्न होते. अन्य सर्व शस्त्रेही तो उत्तम प्रकारे हाताळत असे.

''समोर कोणीही मोठा माणूस युद्धाला उभा राहिला, तरी त्याच्याशी अवश्य लढाई कर. त्याच्या बाबतींतल्या श्रद्धा किंवा भक्तीच्या आहारी जाऊन युद्ध करायचं सोडू नकोस. युद्ध करणं हा तुझा धर्म आहे.'' इत्यादि उपदेश द्रोणाचार्य अर्जुनाला नेहमीच देत.

अर्जुन हा द्रोणाचा प्रिय शिष्य बनून राहिला. सौवीरचा राजा विमल, दत्तमित्र व त्याचा भाऊ हे कौरवांचे शत्रू होते. त्यांचा पिताही याबाबतीत त्यांना विरोध करू शकला नाही. अर्जुनाने त्या तिघांचाही वध केला. या





कामासाठी तो एकटाच रथात बसून गेला व तीन्ही राजे आणि त्यांच्या दहा हजार सैनिकांनाही त्याने मारून टाकले. यांशिवाय आसपासच्या अनेक राजांना त्याने हरवून कौरव राज्याचे मांडलीक बनवले. त्यांच्याकडून कराच्या व भेटीच्या रूपात त्याने अगणित संपत्ती वसूल केली व ती सर्व हस्तिनापुराला आणली.

नकुल-सहदेवांनीही कौरव राज्याच्या कित्येक शत्रूंना यमसदनास पाठवले. आणि असीम धनराशि आणून त्यांनी राज्याचा खजिना भरला.

पांडवांची ख्याती दशदिशांना दुमदुमू लागली. त्यांच्या या प्रसिद्धीमुळे धृतराष्ट्र मनोमन त्यांचा द्वेष करू लागला. त्याला हे सर्व सहन होईनासे झाले. पण त्यांची कीर्ती अशीच वाढू द्यायची की त्यांना दाबून टाकावे हे त्याला ठरवता येईना. त्यांच्या प्रगतीत अडथळा आणावा, की असेच पहात चुप रहावे, हेही कळेना. त्याने मग कणक नावाच्या एका धूर्त ब्राह्मणाला सल्ला विचारला. त्याने असा सल्ला दिला की, लबाडी करून का होईना, पण शत्रूचा विनाश जरूर करावा, तो अधर्म होत नाही.

धृतराष्ट्राप्रमाणेच दुर्योधनही द्वेषाच्या अग्नीत जळत होता. तो आता एकसारखा पांडवांच्या विनाशाचा उपाय शोधत राहू लागला. आपला मित्र कर्ण, मामा शकुनी अन् बंधु दुःशासन यांना बोलावून घेऊन त्यांच्याशी तासन्तास पांडवांच्या नाशाबद्दल चर्चा करू लागला. त्याने धृतराष्ट्राला आपला निर्णय ऐकवला. ''तात, पांडवांची कीर्ती वाढत चालली आहे. लोक अगदी तोंड फाटे पर्यन्त त्यांचीच स्तुती करत आहेत. उत्तम, योग्य आचरणवाले अन् धर्मात्मा म्हणून त्यांचाच उदोउदो करत आहेत. शूर म्हणून सर्वांनी त्यांना डोक्यावर चढवून ठेवलं आहे. त्यांच्यासमोर तुमची मुलं आम्ही सर्वजण क्षुद्र वाटत आहोत. आम्हाला कमी मानून आमचा अपमान केला जातोय. असं दिसतंय की भविष्यात तेच सम्राट बनून रहातील, आमचा कुठे मागमूसही रहाणार नाही, असं वाटतंय आम्हाला. लवकरच त्यांचा अन्त करायचं आम्ही ठरवलं आहे.'' मुलांच्या या निर्णयाने धृतराष्ट्राला आनन्दच वाटला. त्यानेही दुर्योधनाला आपली सम्मती दर्शवली, अन् त्याच्या योजनेचे सहर्ष समर्थन केले.

पांडवांना वारणावतपुर (काशी)ला पाठवून, तेथे त्यांची लाखेने बनवलेल्या घरात रहायची व्यवस्था करून त्यांच्यासकट ते घर जाळून टाकायची योजना बनवण्यात आली.

धृतराष्ट्राच्या आज्ञेवरून त्याचा मन्त्री पांडवांकडे जाऊन वारणावत नगराच्या सौन्दर्याची खूप स्तुती करून त्यांना एकदा त्या नगराला भेट देण्यासाठी सुचवून गेला.

धृतराष्ट्राने स्वतःही एकदा पांडवांना बोलावून घेऊन म्हटले, ''मुलांनो, वारणावतपुर पाहून जन्म सार्थकी लागतो असं म्हणतात. तिथलं सौन्दर्यही वर्णनातीत आहे. लवकरच तिथे भगवान शिवाचा मोठा उत्सव होणार आहे. खूपशी युद्धं करून अन् पराक्रम गाजवून तुम्ही थकले असाल. थोडा बदलही तुम्हाला आवश्यक आहे. तुम्ही तुमच्या मातेलाही बरोबर घेऊन काही दिवस तेथे जाऊन रहा. तुमची तेथे रहाण्याची छान व्यवस्था केली जाईल.''

धर्मराजाला यात काही काळेबेरे असल्याचा संशय आला. त्याला वाटले की ही आपल्याला एक प्रकारे हद्दपारीच घडणार आहे. या निमित्ताने आपलं काही अहित करण्याचाच यांचा विचार आहे.

इकडे दुर्योधनाने पुरोचन नावाच्या एका शिल्पकाराला बोलावून म्हटले, ''आमचे तात पांडवांना वारणावतपुराला पाठवत आहेत. त्यांना रहाण्यासाठी एक उत्तम महाल बांधायला हवा. तू लवकर तेथे पोचून लाख अन् तशाच प्रकारच्या लवकर पेट घेणाऱ्या वस्तु वापरून एक सुंदर महाल बांधून ठेव. एका रात्री ते गाढ निद्रेत असताना महालाला आग लावून देऊन तू परत ये. ते एकदा त्यात जळून राख झाले म्हणजे मी सुखाचा श्वास घेईन. नंतर मी राजा झालो की तुझ्या उपकारांची उचित फेड करीन. इतकं मूल्य देईन की तू कल्पनाही करू शकणार नाहीस.''

पुरोचनाने या बेताला आपली मान्यता दिली. वायुवेगाने धावणाऱ्या घोड्यांच्या रथावर स्वार होऊन तो वारणावतला पोचला व आपल्या कामाला लागला.



# गोपीचा अंदाज

गोपीची बुद्धी भ्रष्ट झाली, आणि त्याचा चुलत भाऊ समर यानं त्याला वैद्याच्या हवाली केलं. वैद्यानं काही महिने त्याच्यावर अुपचार केले अन् आता तो ठीक झालाय असं सांगून त्याला घरी जायला सांगितलं.

घरी जात असताना गावच्या हद्दीवर चिंचेच्या झाडाखाली अुभा असलेला एक माणूस आपल्याकडे येत असलेला गोपीला दिसला. त्याला पाहून पूर्वी याला आपण कुठेतरी पाहिलं आहे असं त्याला वाटलं.

त्याच्या जवळ जाअून गोपी म्हणाला, ''मी कुठे तरी पाहिलंय तुम्हाला असं वाटतंय. मला वाटतं गेल्या वर्षी नरहरपुरच्या नारायणच्या मुलाच्या लग्नात पाहिलं असावं. माझा अन्दाज बरोबर आहे ना?''

काहीशा नाराजीने गोपीकडे पहात तो माणूस म्हणाला, ''नाही, नाही! तिथं नाही भेटलो आपण!''

''हॉं, आत्ता बरोबर आठवलं पहा! वराहपुरच्या गुरांच्या बाजारात ओळख झाली होती आपली! बरोबर ना?'' गोपीनं विचारलं.

जास्तच नाराज होत तो माणूस म्हणाला, ''मुळीच नाही.''

''मग ठाकुर जयसिंगच्या नातीच्या लग्नात झाली आपली ओळख!'' गोपी ठासून बोलला.

आता मात्र तो माणूस सहन न होअून ओरडला, ''बास कर, मूर्ख कुठचा! मी तुझा चुलत भाअू समर. चल आता माझ्या बरोबर. अजूनही तुझं डोकं ताळ्यावर आलेलं दिसत नाहीय.'' अन् पुन्हा गोपीला बरोबर शहरात घेअून जाअून त्याने वैद्याकडे पोचवले.



## चान्दोबा पुरवणी - ७६

## आपल्या देशाची वृक्षसंपदा

### कडुलिंब

एक स्त्री धावतपळत एका वैद्याकडे येअून म्हणू लागली, ''माझे पती दूर देशी जात आहेत. त्यांचं जाणं मला मुळीच पसंत नाहीय. असा काही अुपाय सांगा की ते सुरक्षित परत येतील.'' तिला अुपाय म्हणून वैद्याने सांगितले, ''तू आपल्या नवऱ्याला जाताना ठिकठिकाणी चिंचेच्या झाडाखाली आराम करत जा, असं सांग; अन् परत येताना कडुलिंबाखाली विश्रान्ती घ्यायला सांग. बायकोने सांगितल्या प्रमाणे तिचा पती जाताना चिंचेचे झाड पाहून त्याखाली विश्रान्ती घेत पुढे जात राहिला. परन्तु मधेच आजारी पडून त्याला परत फिरावे लागले. परत येताना अनेक ठिकाणी तो कडुलिंबाखाली विश्रान्ती घेत घेत आला. घरी पोचेपर्यन्त तो परत पहिल्यासारखा धडधाकट झाला होता. निंबाच्या (कडुलिंबाच्या) झाडाची महती सांगणारी ही गोष्ट खूप जुनी आहे. निंबात औषधी गुण असतात ही गोष्ट शंभर टक्के खरीच आहे. या गोष्टीवरून असे कळते की चिंचेची सावली व हवा आपली तब्येत बिघडवते व निंबाच्या झाडामुळे ती सुधारते. त्याच्यामुळे शरीराला लाभच लाभ होतो.

निंबात अनेक औषधी गुण असतात. मुख्यतः यात किडे वगैरे मारण्याची शक्ती आहे. साबण व टुथपेस्ट बनवण्यासाठी निंबाच्या तेलाचा वापर केला जातो. आजही खेडेगावातली माणसे निंबाची काडी चावून त्याने आपले दात साफ करतात. निंबाची हवा आरोग्यदायी असल्याने देवीच्या साथीत घराला निंबाच्या डहाळ्या बांधून ठेवायची पद्धत आहे. नववर्ष दिनी (चैत्र पाडव्याला) निंबाच्या फुलांचा रस काढून प्यायला असता वर्षभर आरोग्य चांगले रहाते अशी समजूत आहे. या झाडापासून मिळणाऱ्या डिंकाचे सेवन केल्यास भूक वाढते. निंबाचे लाकूड मजबूत असते. ते कडू असल्याने त्याला कीड लागत नाही. हे लाकूड विशेषतः जहाजे, बोटी बांधण्यासाठी वापरले जाते.



निंबाचे झाड चांगले अुंच वाढते याला चारी बाजूंना फांद्या असतात. याची छोटी छोटी गडद रंगाची पाने टोकदार असतात. तशी तर याला वर्षभर पाने असतात. परन्तु विशेषतः मार्च एप्रिल मधे पाने खूपच घनदाट असतात. लहान लहान पांढऱ्या फुलांना मधाचा सुगंध येतो. वर्षातून दोनदा झाडाला फुलांच्या मंजिऱ्या फुटतात. याची छोटी फळे साल काढून तोंडात टाकल्यास गोड लागतात.

हिन्दीत याला नीम, बंगालीत नीमगाछ, कानडीत बेवु, तमिळमधे वेंबु, मल्याळी व तेलगूत वेप, मराठीत कडुलिंब व इंग्रजीत मार्गोसा म्हणतात.



# कालिदास

कालीदास अन् त्याचा आश्रयदाता विक्रमादित्य ही जोडी माहीत नसणारा कोण असेल? सर्वांना हे ही माहीत आहे की, दर महिन्याला आपण ज्या वेताळकथा वाचतो, त्यांच्याशीही याच विक्रमादित्याचा संबंध आहे.

महाकवी कालिदास रचित काव्ये व नाटके प्राचीन भारतीय साहित्यात अुच्च स्थानी आहेत, ही गोष्ट निर्विवाद खरी आहे. परन्तु त्याच्या जीवन-कालाबद्दल पंडितांचे एकमत नाहीय. त्यांची मते भिन्न-भिन्न आहेत. काही पंडितांच्या मताप्रमाणे कालिदास ई.स.पू. आठव्या शतकाच्या काळातला आहे; तर काहीजण त्याला ई.स.पू. दुसऱ्या शतकातला मानतात. काही पंडित असेही म्हणतात की तो ई.स.पू. चौथ्या शतकातला आहे.

आपल्या देशाच्या इतिहासात विक्रमादित्य नावाचे अनेक राजे आहेत.यांच्यात दोन विक्रमादित्य विशेष प्रसिद्ध आहेत. विक्रमशतक सुरू करणारा राजा पहिला विक्रमादित्य होय. तो ई.स.पू. पहिल्या शतकातला होता. दुसरा राजा होता द्वितीय चन्द्रगुप्त. याचा शासन-काळ म्हणजे चौथ्या व पाचव्या शतकाचा मध्यकाल. बऱ्याच इतिहासकारांचा असा विश्वास आहे की कालिदास हा याच विक्रमादित्याचा दरबारी कवी होता. परन्तु यालाही अगदी नाममात्रच आधार आहेत. विक्रमादित्याच्या आश्रयाला कालिदास धरून 'नवरत्न' नावाने प्रसिद्ध नअू पंडित होते. ते म्हणजे - कालिदास, धन्वन्तरी, क्षपणक, अमरसिंह, शंकु, वेतालभट्ट, घटकर्पर, वराहमिहिर व वररुचि. परंतु यालाही संपूर्ण आधार अुपलब्ध नाही, की ही 'नवरत्ने' द्वितीय चन्द्रगुप्ताच्याच दरबारातली होती. त्यामुळे ही नवरत्ने या पूर्वीच्या विक्रमादित्याच्या काळातीलही असू शकतील.

काहीही असो, कालिदास अुज्जयिनी नगरवासी होता यात मात्र काही शंका नाही. प्राचीन काळच्या सुप्रसिद्ध नगरांपैकीच अुज्जयिनीही एक गणले जाते.

कालिदासासंबंधी एक विचित्र गोष्टही प्रचलित आहे. युवक कालिदास हा अडाणी होता. अगदीच निरक्षर होता तो. आपल्या विद्येबद्दल गर्व असणाऱ्या एका राजकन्येने काही पंडितांचा घोर अपमान केला. त्यांनी तिचा सूड घेण्याची एक योजना बनवली. अडाणी व निरक्षर कालिदासाला त्यांनी एका महान पंडिताच्या रूपात अुपस्थित करून त्याचा राजकन्येशी विवाह लावून दिला. परन्तु आपली फसवणूक झाली आहे, हे राजकन्येच्या लवकरच लक्षात आले. अन् अत्यन्त क्रोधित होअून तिने आपल्या नवऱ्याला राजवाड्यातून हाकलून दिले. कालीदास हा कालीमातेचा अुपासक होता. तो दुःखी होअून कालीमातेच्या मूर्तीसमोर अुभा राहिला. आणि तिथल्या त्रिशूलाने त्याने आपला अन्त करायचे ठरवले. त्या वेळी कालीमाता प्रकट झाली व तिने त्याला महाकवि बनण्याचा वर दिला. तेंव्हा शुद्ध निरक्षर असणारा हा कालिदास या वरदानाने, कालीमातेच्या कृपेने 'महाकवि कालिदास' बनला व जगभर प्रसिद्ध झाला.

कालिदासाने रघुवंश व कुमारसंभव ही दोन काव्ये रचली. विक्रमोर्वशीयम्, मालविकाग्निमित्रम्, अभिज्ञानशाकुन्तलम् नावाची तीन नाटके व मेघदूत व ऋतुसंहार नावाची दोन खंडकाव्येही लिहिली.

केवळ संस्कृत वाङ्मयावरच नव्हे, तर भारताच्या विविध भाषांच्या साहित्यावर पडलेला कालिदासाचा प्रभाव वर्णनातीत आहे.



# तुम्हाला माहीत आहे काय?

१. आपल्या देशात तयार झालेल्या अंतरिक्ष प्रक्षेपणास्त्राचे नाव काय आहे? त्याचा प्रयोग कोठे करण्यात आला?
२. साप किती प्रकारचे असतात?
३. गुजराथमधील पोरबंदर कशासाठी प्रसिद्ध आहे?
४. इंग्लंडचे पहिले प्रधानमन्त्री कोण होते?
५. आपल्या देशातला सर्वात अधिक लांबीचा मंदिर मंडप कोठे आहे?
६. दुर्बिणीचा शोध कोणी लावला? केंव्हा?
७. आपल्या देशाचे वृक्षशास्त्र परिशोधनासाठी आठ भागात विभागले गेले आहे. ते आठ भाग कोणते?
८. 'मेर्डिका कप' कोणत्या खेळाशी संबंधित आहे?
९. आपल्या देशात पहिली 'पंचवार्षिक योजना' केंव्हा सुरू झाली?
१०. आपल्या देशातला पहिला त्रिमिती चित्रपट कोणता? तो केंव्हा बनला?
११. भारताच्या स्वातन्त्र्यासाठी लढणाऱ्या आयरिश महिलेचे नाव काय?
१२. आपल्या देशात 'हवाई डाक' केंव्हा सुरू झाली?
१३. 'फ्लाईंग सिख' नावाने प्रसिद्ध व्यक्ती कोण?
१४. लोकसभेचे पहिले अध्यक्ष कोण होते?
१५. 'ब्राह्मो समाज'चे संस्थापक कोण?
१६. वर्तमान ज्वालामुखींपैकी सर्वात अधिक उंच कोणता?
१७. 'ओशन टु स्काय' या नावाच्या आपल्या देशातील प्रसिद्ध साहसी पर्वतारोही तुकडीचे नेतृत्व कोणी केले?
१८. कोणती वनस्पती आपल्या पानात आपला आहार सुरक्षित ठेवते?

## उत्तरे

१. रोहिणी. त्रिवेन्द्रम जवळील 'तुंबा' हून. १० नोव्हें. १९६७ रोजी.
२. दोन हजारांहून अधिक.
३. महात्मा गांधीचे जन्मस्थल.
४. सर रॉबर्ट वॉलपोल.
५. रामेश्वर.
६. नेदरलंडच्या हॅन्स लिप्परशेने. ऑक्टो. १९०८ मधे.
७. दक्षिण मलबार, सिंधु खोरे, गंगा खोरे, आसाम, पूर्व हिमालय, पश्चिमी हिमालय व अंदमान.
८. फूटबॉल.
९. १९५१ मधे.
१०. माय डियर कुट्टिसातान (मलयालम) किंवा छोटा चैतन्य(हिन्दी), १९८४ मधे.
११. ॲनी बेझंट.
१२. १९११ मधे.
१३. खेळाडू मिल्खासिंग. १९६०च्या रोम ऑलिम्पिक्स मधे.
१४. जी.व्ही. मावळंकर. १९५२ ते १९६० पर्यन्त.
१५. राजा राममोहन रॉय.
१६. अर्जेंटिनातील ओटोफाला. ६४५० फू. उंची.
१७. सर एडमंड हिलरी.
१८. कोबी.



# निरुपयोगी मैत्री

प्रताप बारा वर्षांचा होता. घरातील सर्व कामात तो आपल्या आई-वडिलांना मदत करी. शेजार-पाजारच्या लोकांना ही कधी मदत लागली, तर तो धाऊन जाई. आपल्या चांगुलपणाने त्याने सर्वांचे मन जिंकले. नरेन्द्र नावाच्या एका त्याच्या वयाच्या मुलावर त्याचे फार प्रेम होते.

नरेन्द्रचे घर त्याच्या जवळच होते. तो श्रीमंत बापाचा मुलगा होता. त्याला घरातील कामे मुळिच करावी लागत नसत. वेळ मिळाला की तो प्रतापकडे येई. प्रतापच्या घरात तो बराच वेळ असायचा, पण आपल्या घरी मात्र प्रतापला त्याने कधी बोलावले नाही.

एके दिवशी संध्याकाळी गावातील काही मुले गावा बाहेरच्या मैदानावर हुतुतू खेळत होती. खेळून-खेळून दमल्यावर सर्व मुले एका जागी बसून गप्पा-गोष्टी करू लागली. इतक्यात एक व्यापारी मिठाई विकण्यासाठी तेथे आला.

आज त्याने एक नवीन प्रकारची मिठाई आणली होती. सर्वांनाच मिठाई खूप आवडली. प्रतापने थोडी मिठाई खरेदी केली. पण जवळ नरेन्द्र मुकाट्याने बसलेला होता. प्रतापने नरेन्द्रला विचारले-''का रे ? तुझ्याजवळ पैसे नाहीत वाटतं ?''

नरेन्द्रने उत्तर दिले -''पैसे केव्हा लागतील सांगता येत नाही, म्हणून पैसे खर्च न करता मी शिल्लक ठेवतो. शिवाय माझ्या आईने मला सूचना दिलीय की बाहेरच्या वस्तु कधी खरेदी करून खाऊ नयेत.''

''पण तू मिठाई खरेदी केलीस हे घरातल्या लोकांना कसे कळेल ? माझं म्हणणं ऐक. तू ही थोडी मिठाई करेदी कर आणि मजेने आमच्या बरोबर खा.'' प्रतापने सुचवले.

नरेन्द्र म्हणाला-''माझ्या जवळ किती पैसे आहेत हे आई मोजून पाहील आणि कमी असले तर लगेच विचारील की कशासाठी पैसे खर्च

अलका इनामदार



केले ?''

''भिकाऱ्याला दान दिलं म्हणून सांग. नाहीतर सांग की कुठे तरी हरवले. आता तू काही लहान मुलगा नाहीस. घरातल्या लोकांचा तुझ्यावर एवढा विश्वास नाही ?'' आश्चर्याने प्रतापने विचारले.

थोडा वेळ नरेन्द्र गप्प बसला. मग म्हणाला- ''त्यांच्या माझ्यावर विश्वास आहेच. पण माझी आजी नेहमी सांगते- 'खोटं बोलणं हे पाप आहे.' आजीची शिकवण नेहमी बरोबरच असते असं मला वाटतं !''

अमळ दुःख प्रकट करीत प्रताप म्हणाला- ''हे बघ, माझ्यापाशी थोडे पैसे आहेत. मी तुला मिठाई खरेदी करून देतो. पण ती तू खाणार नाहीस. कारण बाहेरचं काही खाऊ नये असं आईने तुला शिकवलंय !''

''तू खरेदी केलीस तर मी खाईन. कारण माझ्या पैशातून काही पैसे कमी होणार नाहीत, तर आई ही काही म्हणणार नाही. तिने काही विचारलं नाही तर खोटं बोलावं लागणार नाही.'' नरेन्द्रने आपली अक्कल पाजळली.

प्रतापने मिठाई खरेदी करून नरेन्द्रला दिली. मिठाई खाऊन संतुष्ट झालेला नरेन्द्र म्हणाला- ''तुझ्यामुळेच असली सुरेख मिठाई मला खायला मिळाली. पण ही गोष्ट तू आपल्या आईला सांगू नकोस. ती चुकून माझ्या आईला सांगेल.''

प्रतापने हे कबूल केले. एकदा नरेन्द्रचे आई - वडील बाहेर जाता - जाता प्रतापला म्हणाले- ''बेटा, नरेन्द्र घरात एकटाच आहे. आम्ही दोन तासात परत येऊ. तोपर्यंत तू नरेन्द्र जवळ रहा !''

आजपर्यंत प्रतापने एकदा सुद्धा नरेन्द्रचे घर आतून पाहिलेले नव्हते. तो घर पहायला आतुर होताच.

नरेन्द्र म्हणाला- ''माझ्या घरात इतक्या वस्तु भरलेल्या आहेत, त्यात वेळ कसा जातो कळत नाही. तरी पण तुझ्याशी गप्पा-गोष्टी करीत बसायला मला फार आवडतं. मजेत जातो माझा वेळ !''

या बोलण्यावर खुश होऊन प्रताप म्हणाला- ''तुझ्या कपाटातून जी खेळणी नि पुस्तके आहेत ती मला एकदा पहावीशी वाटतात. जरा कपाट उघड ?''

पण नरेन्द्रने त्याला कशाला ही हात लावू दिला नाही. तो म्हणाला - ''बाहेरच्या कोणी या वस्तु हाताळल्या तर खराब होतील असं घरातील मोठी माणसं सांगतात.''

''तू जेव्हा आमच्या घरी येतोस तेव्हा घरातल्या सर्व वस्तु हातात घेऊन पाहतोस की नाही ?'' प्रतापने विचारले.

''तुझ्या घरातील मोठी माणसं तसं करू देतात, म्हणून !'' नरेन्द्र म्हणाला. मग खूप वेळ दोघे बसले नि एकमेकांना गोष्टी ऐकवीत राहिले. पण प्रतापच्या मनात मात्र एक गोष्ट खटकत राहिली.



एकदा गावातील मुले गावाबाहेर झाडाखाली बसून गप्पा-गोष्टी करीत होती, तेव्हा एक बासरीवाला बासऱ्या विकत तेथे आला. त्याच्या बासरीतून मधुर ध्वनि निघत होते. एक बासरीची किंमत होती दोन रुपये. नरेन्द्रने एक बासरी विकत घेतली. प्रताप पाशी एकच रुपया होता. म्हणून त्याने नरेन्द्रला एक रुपया मागितला. नरेन्द्र फटदिशी म्हणाला- '' माझे आजोबा सांगतात की मित्राला कधी कर्ज देऊ नये. कर्ज दिलं की मैत्री बिघडते !''

प्रताप मनातल्या मनात नाराज झाला. निदान तीन-चारदा तरी त्याने नरेन्द्रला मिठाई खरेदी करून दिली होती. हिशोब केला तर वीस रुपयांहून जास्त खर्च केला होता. आता मी एक रुपया मागतोय तर लागला मला शिकवायला. हा कसला मित्र ? मी पुष्कळ मदत केली याला. पण मला मात्र काही द्यायची याची इच्छा नाही !

तो रागाने नरेन्द्रला म्हणाला- ''कर्ज दिलं की दोस्ती बिघडते असं तू म्हणाला होतास. ते नीट लक्षात ठेव. तू कर्ज दिलं नाहीस नि आता आपली दोस्ती बिघडू घातलीय. मी जर बासरी खरेदी करू शकलो नाही तर समज आपली मैत्री संपली !''

नरेन्द्र म्हणाला- ''असं नको म्हणूस प्रताप. तुझ्यासारखा मित्र मी कधी ही गमावणार नाही.'' असं म्हणून ही त्याने खिशातून रुपया मात्र काढला नाही.

एवढ्यात रमेश नावाच्या एका मुलाने एक



बासरी खरेदी केली आणि ती प्रतापला दिली. तो म्हणाला–"तू मला किती तरी वेळा मदत केलेली आहेस. मी तुला आणखी अनेक बासऱ्या खरेदी करून दिल्या तरी तुझ्या उपकारांची परतफेड होणार नाही."

आनंदित होऊन प्रताप म्हणाला–"मी तुला दिलेल्या कर्जाबद्दल पुन्हा कधी बोलू नकोस. हा घे एक रुपया. आणखी एक रुपया उद्या देईन." असे म्हणत रुपया त्याने रामेशच्या खिशात घातला आणि म्हणाला–"पाहिलंस? याला म्हणतात मैत्री! मित्र असावा तर असा."

नरेन्द्रचा चेहरा पाहण्यासारखा झाला, पण दुसऱ्याच क्षणी आनंदाने म्हणाला–"आजपासून रामेश पण माझा मित्र झाला, कारण त्याच्यामुळे तुला बासरी मिळाली. हे काम करून त्याने आमची दोस्ती आज पक्की केली. तू म्हणाला होतास की मी जर तुला बासरी खरेदी करून दिली नाही, तर आपली दोस्ती संपली. तुला माहीत नाही मला फार वाईट वाटलं. रामेशमुळे माझे दुःख दूर झाले." नरेन्द्रने आपली बाजू मांडली.

त्या दिवसापासून प्रताप नरेन्द्रपासून दूर-दूरच राहू लागला. नरेन्द्रने खूप प्रयत्न करून पाहिला, पण प्रताप त्याच्याशी बोलायचे सतत टाळत राहिला. नरेन्द्रने प्रतापच्या आजोबांना आपल्या मनातील दुःख सांगितले. प्रतापच्या आजोबांनी नरेन्द्रला आपल्या घरी बोलावणे पाठविले आणि मग म्हणाले–"मी तर समजत होतो की तूच नरेन्द्रचा जिवलग मित्र आहेस. तू तर मोठा स्वार्थी निघालास!"

प्रताप त्रासून म्हणाला–"स्वार्थी कोण? मी का तो?"

आजोबांनी आपला विचार सांगितला–"नरेन्द्र तुझा मित्र आहे. आवश्यकतेनुसार तू त्याला मदत केलीस. हा खरोखरीच तुझा सद्गुण आहे. फळाची आशा बाळगणं हा ही एक स्वार्थच आहे. इतक्या लहान वयात स्वार्थी होणं बरं नव्हे."

प्रताप थोड्या नाराजीने म्हणाला–"पण आवश्यक असेल तेव्हा त्याने ही मला मदत करायला नको का?"

"त्याला वाटलं तर तो मदत करील. अथवा काही वस्तु खरेदी करून दिल्यामुळे मैत्री दृढ होत नाही. एकमेकांचे विचार जाणून घेतले पाहिजेत. यामुळे आपली बुद्धि व सहृदयता यांचा विकास होतो. यासाठी मैत्री निभावली पाहिजे. देवाण-घेवाण ही तर व्यापारी वृत्ति झाली! खऱ्या मैत्रीचे रहस्य तू नीट समजून घेण्याचा प्रयत्न कर." आजोबांनी नातू प्रतापला समजाऊन सांगितलं.

आजोबांचं म्हणणं प्रतापला पटलं, तरी पण मनात एक शंका राहून गेली. तिचे निरसन करावे असे त्याला वाटले. म्हणून त्याने आजोबांना प्रश्न केला–"तर मग नरेन्द्रची काहीच चूक नाही असं का म्हणायचंय आपल्याला?"

"चूक त्याची नाही, तुझी आहे. कारण तू जे काही केलंस ते नरेन्द्रला खुश करण्यासाठी केलंस. त्याला पसंत नसलेलं काम करायची त्याची इच्छा नाही, ते जबर्दस्तीने करून घ्यायचा प्रयत्न ही तुझी चूक आहे. नीट विचार कर, म्हणजे तुला पटेल." आजोबांनी आणखी स्पष्ट करून सांगितलं.

"होय, आपण म्हणता ते ठीक आहे आजोबा! पण योग्य वेळ आल्यावर सुद्धा ज्या मैत्रीचा काही उपयोग होत नाही, ती कसली मैत्री?" प्रतापने खोचक प्रश्न विचारला.

"असं का बरं म्हणतोस? फळाची अपेक्षा न करणारी मित्रता कशी असते हे आपल्या प्रत्यक्ष व्यवहाराने नरेन्द्रने तुला शिकवले की नाही? जर नरेन्द्रला तुझ्याकडून काही शिकता आले नाही, तर त्याच्या दृष्टीने तुझ्याशी मैत्री निरुपयोगीच नाही का? माझा दृष्टिकोण तू समजून घे." आजोबांनी प्रतापला जरा विचार करायला लावला.

आजोबांचा संदेश आता प्रतापच्या लक्षात आला. त्यांच्या म्हणण्याचा हेतु त्याला चांगला समजला. नंतर त्याने फळाची आशा मनात ठेवून कोणाशी ही मैत्री केली नाही. आजोबांनी प्रतापला जी शिकवण दिली ती नंतर नरेन्द्रला ही समजली. आपण जे काही केलं त्याची त्याला लाज वाटली आणि त्याने आपल्यात सुधारणा घडवून आणली. आवश्यकतेनुसार तो आपल्या मित्रांना मदत करू लागला. प्रतापच्या मैत्रीमुळे नंतर त्याचा पुष्कळ फायदा झाला.





# इस्टेटीची वाटणी

कपिलेश्वरजवळच्या एका गावात एक जमीनदार होता. गावच्या आसपासच्या नऊ गावातल्या बऱ्याचशा जमिनी या जमीनदाराच्या असून तोच गावचा ग्रामाधिकारी व न्यायाधीशहोता. तोखूप धनवान असून त्याला चार मुलगे होते. सर्वात थोरला धान्य व्यापाराची देखरेख करी, दुसरा मुलगा गुराढोरांची व्यवस्था पाही अन् तिसरा शेतीविषयक कामे संभाळी. सर्वात धाकट्यालामात्र शिक्षण, परमेश्वरा-संबंधीची कार्ये व दानधर्म वगैरेची विशेष आवड होती.

वय वाढता वाढता जमीनदाराची शक्ती क्षीण होत गेली व तो अंथरुणाला खिळला. आपल्या मुलांना जवळ बोलावून घेऊन तो त्यांना म्हणाला, ''मुलांनो, आजपर्यंत आपण दुसऱ्यांच्या झगड्यांचा न्यायनिवाडा केला. पण आपल्याला आपला न्यायनिवाडा करून घेण्यासाठी दुसऱ्यांकडे जायची वेळ आली नाही. असं वाटतंय की, मी आता थोड्याच दिवसांचा सोबती आहे. यमदूत दाराशी उभे आहेत. कोणत्याही क्षणी त्यांचा फासा माझ्या गळ्यात पडेल. तेंव्हा आता तुम्ही चौघंजण माझ्या खाटेच्या चार खुरांजवळ उभे रहा. मी मेल्यावर तुम्ही या आपापल्या खुरांच्या ठिकाणी खणा. पण हाँ, इस्टेटीबाबत एकमेकांशी भांडू नका.''

चारही भाऊ खाटेच्या चार पायांशी उभे राहिले व त्यांनी आपापला खूर निश्चित करून घेतला. पित्याने त्यांना विचारले, ''आता मी तुमच्यासाठी आणखी काही करणं आवश्यक आहे काय?''

आणखी काही करायची गरज नसल्याचे चौघांनीही एकमुखाने सांगितले व 'नारायण, नारायण' म्हणत निश्चिंत मनाने जमीनदाराने देह ठेवला.

पित्याच्या अंत्यसंस्कारांनन्तर चौघाही भावांनी कुदळी घेऊन आपापल्या खुरांखाली खणून पाहिले.

**पंचवीस वर्षांपूर्वी 'चांदोबा' त प्रकाशित झालेली गोष्ट**

थोरल्याने खणल्या जागी त्याला भुस्सा मिळाला. दुसऱ्याला मिळाले शेण अन् तिसऱ्याच्या हाती नुसतीच माती लागली. चौथ्या मुलाला मात्र सोनं-चांदी ठेवलेली थैली मिळाली. ते पाहून बाकीच्या तिघांना फारच राग आला.

तिघांना वाटले, ''पहा, बाबांचं धाकट्या वरच जास्त प्रेम होतं. खरं तर तो नुसताच निरुद्योगी होता. पण त्याच्याच वाट्याला सोनं चांदी आली; अन् आम्ही मात्र नुसते भुस्सा, शेण अन् मातीचे धनी!''

''पण खाटेचा जो जो खूर बरा वाटला, तो तो तुम्ही प्रथम निवडलात. मी बापडा उरलेल्या खुराशी उभा राहिलो होतो. यात आता माझी काय बरं चूक?'' चौथा भाबडेपणाने शान्त स्वरात बोलला.

परन्तु रागाने धुमसत बाकी तिघेजण म्हणाले, ''नाही. आम्हाला हे मुळीच मान्य नाही. आपण कपिलेश्वरच्या न्यायालयात जाऊन याचं निराकरण करून घेऊ.''

त्यांचे सर्व बोलणे न्यायाधीशाने ऐकून घेतले व थोडा विचार करून त्याने विचारले, ''नीट सर्व विचार करून आपल्या पित्याची एकूण इस्टेट काय काय आहे, हे मला सांगा बरं?''

जमीनदाराची चारही मुले म्हणाली, ''आमचे वडील जमीनदार होते. गुरं, धान्य, व्यापार, सोनं चांदी वगैरे सर्वकाही त्यांच्याजवळ होतं.''

''तर मग त्यांनी योग्यच वाटणी केलेली आहे. धान्याचा व्यापार थोरला करत होता, गुरांची देखरेख दुसरा करत होता, शेती-वाडी तिसऱ्याच्या ताब्यात अन् सोनं चांदी धाकट्याची. आता याप्रमाणे आपापल्या वस्तूंचा ताबा घ्या अन् आरामात रहा.'' न्यायाधीशाने निवाडा केला.

हा निवाडा तिघा भावांना बरोबर वाटला, त्यांचे समाधान झाले. त्यांच्या लक्षात आले की, 'बाबांनी धाकट्याच्या बाबतीत मुळीच पक्षपात केला नाहीय, त्याच्यावरच जास्त प्रेम केलेलं नाहीय. कोणाच्याच बाबतीत त्यांनी अन्याय केलेला नाहीय.' चौघेही आपल्या गावी परतले व गुण्यागोविन्दाने राहू लागले.



# सांघिक अभिवृद्धि

डॅनिश राजधानी कोपनहेगन मध्ये ता. ६ ते १२ मार्च पर्यंत 'सांघिक अभिवृद्धि' बाबत विचार-विनिमय करण्यासाठी जागतिक महासभा आयोजित करण्यात आली. संयोजकांनी १८५ देशांना या महासभेत भाग घेण्यासाठी पाचारण केले होते. एक आठवडाभर चाललेल्या या महासभेत १२१ राष्ट्रांनी निदान एक दिवस का होईना भाग घेतला. एका अपूर्व विषयावर येथे विचार-मंथन झाले. १८० देशांच्या ६००० हून अधिक प्रतिनिधींनी परिषदेत भाग घेतला. एक हजाराहून अधिक खाजगी संस्थांचे प्रतिनिधि परिषदेत सामिल झाले होते. यावरून ही परिषद किती महत्त्वाची होती हे लक्षात येते.

परिषदेत चर्चिलेला प्रमुख विषय होता - सांघिक अभिवृद्धि. म्हणजे येथील जनतेचे कुशल-क्षेम व विकास. जगातील लोकसंख्येत बहुसंख्य लोक दारिद्र्यात पिडलेले आहेत. साक्षरतेचा अभाव ही खूप जाणवतो. काही देशात बेकारीचा प्रश्न सर्वांना भेडसावतो आहे. काही लोक सरकारी मदतीची अपेक्षा करीत आहेत, तर कोणत्याही मदतीच्या अभावी अनेक लोक नाना यातना सहन करीत आहेत. विश्वशांति आणि गरिबी यांचा निकटचा संबंध आहे हे तेथील अनेक उपस्थित नेत्यांनी मान्य केले. भारताचे प्रधान मंत्री श्री.पी.व्ही. नरसिंह राव आपल्या भाषणात म्हणाले - "दुःख आणि दारिद्र्य जगातील कोणत्या ही देशाच्या कोपऱ्यात असो, ते जगातील शांतीचा भंग करते. सांघिक अभिवृद्धीसाठी, मानवाच्या सर्वांगीण विकासासाठी दारिद्र्याचा विनाश करण्याची शक्ति प्रजेत असली पाहिजे." या विचाराचे जोरदार समर्थन करीत त्यांनी सर्वांना सावध केले.

विश्व - शांतीला बाधक ठरणाऱ्या अनेक भयंकर समस्यांबाबत विश्व-नेते यापूर्वी ही अनेक वेळा बोललेले आहेत; ही काही पाहिलीच वेळ नव्हती. परंतु यापूर्वी झालेल्या परिषदांतून केवळ याबाबत विचार झाला की विश्व-शांतीसाठी सरकारांनी काय करावे ? पण कोपनहेगनच्या या संमेलनात सरकारांनी काय करावे याबाबत चर्चा व विचार-विनिमय झाला नाही. या परिषदेत नेत्यांनी घोषित केले की दारिद्र्य, निरक्षरता, बेकारी इत्यादि समस्या सोडविण्याचे उपाय जनतेनेच शोधून काढले पाहिजेत. या कामी जनतेचे सक्रिय सहकार्य महत्त्वाचे आहे.

खासगी संस्थांनी या कामात जो उत्साह दाखविला, तो पाहून जगातील नेत्यांचा उत्साह द्विगुणित झाला. त्यांच्यात खासगी संस्थांबाबत विश्वास उत्पन्न झाला. म्हणून या समस्या कशा समूळ उपटून टाकता येतील याचे उपाय शोधण्यावर त्यांनी भर दिला.

आज विस्फोटक आयुधे मानव-जातीचा विनाश करायला टपलेली आहेत. या आयुधांचा नाश करण्यासाठी विसाव्या शतकात खूप प्रयत्न केले गेले. शतकाच्या शेवटी मनुष्य आपल्या या प्रयत्नांना रचनात्मक वळण देत असल्याची शुभ-चिन्हे दिसत आहेत. आपले प्रधान मंत्री श्री.पी.व्ही. नरसिंह राव म्हणाले - "जगात सर्व राष्ट्रांनी एकमेकां ना मदत केली पाहिजे. दारिद्र्य, निरक्षरता आदि रोगांचे निर्मूलन करण्यासाठी आंतरराष्ट्रीय सहकार्य अत्यंत महत्त्वाचे आहे."



# परमेश्वर प्रकटला

धर्मपुरीत राहाणारा मोहन मोठा चिक्कू होता. वडील आजारी असले तरी त्याने त्यांना औषधोपचार केला नाही. त्यामुळे वडिलांना मृत्यु आला. नवरा मेल्यामुळे आईला फार दु:ख झाले. पण मोहनला त्याची काही पर्वा नव्हती. बिचारी आई पण काही दिवसात स्वर्गवासी झाली. मोहनची बायको आणि मुले कशीबशी जगत होती. त्यांना खायला पुरेसे अन्न मिळत नव्हते. आपल्या जवळचे पैसे व्याजी लावून मोहनने लाखो रुपये कमवले.

मोहनच्या समोरच्या घरात सुधाम रहात असे. तो मोठा देवभक्त होता. तो परोपकारी स्वभावाचा होता. त्याने मोहनला अनेक वेळा समजावून सांगण्याचा प्रयत्न केला,पण सर्व पालथ्या घड्यावर पाणी!

मोहनची बायको होती रुक्मिणी. ती मोठी पतिव्रता स्त्री होती. नवऱ्याचा शब्द कधी खाली पडू देत नसे. त्यांना दोन मुलगे होते. ते आई-वडिलांच्या सतत आज्ञेत असत. रुक्मिणी व मुलांना मोहन विरुद्ध बंड करण्यासाठी प्रवृत्त करण्याचा सुधामने अनेकदा प्रयत्न केला, पण कशाचा काही उपयोग झाला नाही.

कर्ज घेण्यासाठी मोहनकडे जे लोक येत त्यांना सुधाम सावध करीत असे. पण ते तरी बिचारे काय करणार ? गरजवंताला अक्कल नसते. ते म्हणत - ''मोहन पैसे संभाळून ठेवतो, आपली संपत्ति वाढवतो. त्यात त्याची काय चूक आहे बरं?''

हे सर्व सुधामला असह्य झाले. मोहनच्या अन्यायाला कसा लगाम घालावा हे काही त्याला सुचेना . त्याने मोहनला मारून टाकायचा निश्चय केला.

सुधामने आपल्याशीच तर्क-वितर्क केला - ''मोहनने माझे काहीच नुकसान केलेले नाही. त्याला मारले तर मला काहीच फायदा होणार नाही. फायदा झाला तर लोकांना होणार ! म्हणजे मोहनला मारून टाकणं परोपकाराचं काम आहे.''

सुधामला एक सवय होती. कोणतं ही काम करण्यापूर्वी तो रामाच्या मंदिरात जाई, रामाच्या मूर्तीला नमस्कार करून तो आशीर्वाद मागे. आणि मगच तो काम सुरु करी.

यावेळी ही सुधाम रामाच्या देवळात गेला. देवळात पुजारी नव्हता. त्याने प्रार्थना करून डोळे उघडले तर काय चमत्कार - समोर सोळा वर्षांचा एक देखणा युवक उभा! तो तरूण सुधामला म्हणाला - ''मी परमेश्वर आहे. चल मी आज तुझ्या बरोबर तुझ्या घरी येतो.''

सुधाम आश्चर्याने म्हणाला - ''तू आणि परमेश्वर ! मी यावर कसा विश्वास ठेवू?''

परमेश्वर म्हणाला - ''तुझ्याच्याने होणार नाही, असे काम करायला तू निघाला आहेस. म्हणून मी दिव्य लोकातून या भूतली उतरलो आहे. मी तुला मदत करायला आलो आहे. मोहनला मारून टाकणे तुला शक्य होणार नाही. पापी माणसात पाप-बल असायला हवं. तुला युक्तीने काम करायला हवं, शक्तीने नाही !''

मोहनला मारण्याचा सुधामचा विचार दुसऱ्या कोणाला माहीत असण्याची शक्यताच नव्हती. म्हणून हा युवक भगवान आहे यावर सुधामला विश्वास ठेवावाच लागला. त्याने परमेशवरापुढे लोटांगण घातले.

त्याला उठवीत परमेश्वर म्हणाला - ''मोहन



शिवाय अन्य कोणाला ही 'मी परमेश्वर आहे' हे समजता कामा नये. आणि मग जे होईल ते तू पहात रहा.''

दोघे सुधामच्या घरी आले. त्या दिवशी घरात छान-छान पक्वान्ने बनविण्यात आली. दोघांनी यथेष्ट भोजन केले. काही स्वादिष्ट पक्वान्ने घेऊन सुधाम मोहनच्या घरी आला. पक्वान्नांवर ताव मारीत मोहनने विचारले - ''तू आणलेली पक्वान्ने फारच छान आहेत! आज कशासाठी ही सर्व बनविली?''

सुधामने उत्तर दिले - ''प्रत्यक्ष परमेश्वर आज माझ्या घरी आला. तुला सोडून अन्य कोणालाही हे रहस्य मी सांगू नये अशी परमेश्वरनाने मला आज्ञा दिली आहे. चुकून

शशिकान्त जाधव



कोणाला हे सांगू नकोस. समजलं ?''

मोहन म्हणाला - ''परमेश्वर कसा असतो हे पाहण्याची माझी इच्छा आहे. माझ्या घरी घेऊन ये न परमेश्वराला.'' सुधाम घरी गेला आणि आपल्या बरोबर परमेश्वराला घेऊन आला. मोहनने परमेश्वराकडे न्याहाळून पाहिले आणि विचारले - ''तू परमेश्वर आहेस? उतरायला सुधामचं घर सोडून अन्य एकादे घर सापडले नाही तुला ?''

''सुधाम माझा भक्त आहे, म्हणून मी त्याच्याच घरी आलो.'' परमेश्वर उत्तरला.

''तू परमेश्वर आहेस यावर मी कसा विश्वास ठेवावा?'' मोहनने अमळ थट्टेच्या सुरात विचारले.

परमेश्वराने समजाऊन सांगितले - ''ते सर्व लवकरच तुला कळेल. ऋणपत्र लिहून न घेता रोज एक हजार रुपये तू सुधामला देत जा. असं तू दहा दिवस करीत रहा. तुझी रक्कम शंभर पटीने वाढेल. ही सर्व रक्कम सुधाम तुला देईल. त्यातून फक्त दहा हजार रुपये तू सुधामला द्यायचेस.''

मोहनने विचारले - ''तुम्ही दोघांनी संगनमत करून हे सर्व नाटक रचले आहे. ऋण-पत्र लिहून न घेता मी सुधामला रक्कम दिली आणि शेवटी तो नाही म्हणाला म्हणजे मी काय करू?''

''परमेश्वर स्वतः साक्षी आहे, मग ऋण-पत्राची जरूरच काय?'' परमेश्वराने हसत विचारले.

गंभीरपणे मोहन म्हणाला - ''तू भगवान आहेस यावर माझा मुळि विश्वासच नाही.''

त्यावेळी त्या गावातील भूषण नावाचा एक माणूस तेथे आला. त्याची दहा एकर जमीन होती. मालकीचं एक मोठं घर होतं. तो परोपकारी नि दानशूर होता, म्हणून त्याच्या हाती पैसा टिकत नसे.

त्याचा नोकर रामू याच्या मुलीचं लग्न ठरलं, त्याला शंभर रुपयांची आवश्यकता होती. म्हणून भूषणला तेवढे कर्ज पाहिजे होते. मोहनला त्याने अगोदरच सूचना देऊन ठेवली होती. म्हणून मोहनने ऋण-पत्र तयार करून ठेवले होते.

परमेश्वर भूषणला म्हणाला - ''तू मोठा परोपकारी आणि उदार दिसतोयस. ऋण-पत्र व साक्षीवाचून तू रोज एक हजार रुपये या सुधामला दहा दिवस देत रहा. दहा दिवसांनी तुझी रक्कम शंभर पट होईल. ते सारं धन तुझंच. त्यातून फक्त दहा हजार रुपये तू सुधामला द्यायचे.''

''तू म्हणतोस, तसंच मी करीत. पण रोज हजार रुपये मी कुठून आणू?'' भूषणने दैन्यभऱ्या स्वरात विचारले.

भगवान म्हणाला - ''मोहन तुला कर्ज देईल.''

मोहन लगेच भूषणला म्हणाला - ''साक्षीवाचून कर्ज तर मी कधीच देणार नाही. आपलं घर नि शेत गहाण ठेवत असलास तर घेऊन जा एकदम दहा हजार रुपये. रोज एकेक हजार कशाला?''

''कर्ज तू एका हप्त्यात घेऊ शकतोस, पण परत एका हप्त्यात नाही करायचं. तसं केलंस तर तुझं भाग्य तुला मदत नाही करणार ! समजलं?'' परमेश्वराने भूषणला सावध केले.

मोहनच्या नियमानुसार भूषणने ऋण-पत्र लिहून दिले आणि दहा हजार रुपये कर्जाऊ घेतले. रोज सुधामला एक हजार रुपये द्यायचं त्याने ठरवलं. परमेश्वराने भूषणला सांगितले - ''गावातील तुझ्या सर्व परिचितांना हे सर्व सांग. रोज कमीत कमी एक हजार रुपये दिले पाहिजेत असं नाही. एक रुपया दिलास तरी चालेल. त्याचे लाख रुपये होतील. तू जे काही देशील त्याच्या शंभर पट रक्कम तुला मिळेल हे लक्षात ठेव.''

''ठीक आहे.'' म्हणून भूषण तेथून





निघाला.

मोहन म्हणाला - "तुम्ही लोकांनी मला थिकारी बनवायचा कट रचला आहे असं वाटतंय. जर तू खरा परमेश्वर असशील तर काही चमत्कार करून दाखव पाहू."

"तर मग पहाच. मी आपले दाही अवतार तुला दाखवतो!" भगवान म्हणाला.

मोहन परमेश्वराकडे पहात राहिला. त्याला परमेश्वरात काहीच बदल झालेला दिसला नाही. सुधाम मात्र परमेश्वराचे दहा अवतार पाहण्यात रंगून गेला. तो आनंदाने डोलत होता. परमेश्वराची प्रशंसा करीत तो भक्ति-गीत गाऊ लागला.

नाराज होऊन मोहन ओरडला - "ही सर्व धोकाबाजी आहे. तुम्ही मला मूर्ख बनवीत आहात. चालते व्हा इथून!" परमेश्वर आणि सुधाम तेथून निघाले.

त्या दिवशी संध्याकाळी मोहनच्या घरापुढे खूपच गर्दी जमा झाली. सर्व लोक आपली जमीन अथवा घर गहाण ठेवून त्याच्याकडून कर्ज घेत होते व ती रक्कम सुधामला देत होते. सुधामच्या घरी अलोट संपत्ति जमा झाली.

हे सर्व पाहून आता सुधाम घाबरला आणि तो परमेश्वराला म्हणाला - "मला काही समजत नाही. मी अगदी त्रस्त होऊन गेलो आहे. एका चिक्कू माणसाला मारण्यासाठी हा काय सारा गोंधळ? तुझ्यामुळे मोहन आहे पाहून अधिक श्रीमान् होईल. त्याचं कल्याण होईल. ज्या लोकांनी जन्मात कधी कर्ज घेतलं नाही, ते कर्जासाठी रांगेत उभे आहेत. ते मोहनच्या जाळ्यात अडकत आहेत. तुझ्या लीलांचा गूढार्थ माझ्या काही लक्षात येत नाही. मोहनला धडा शिकवण्याची तुझी योजना सफल झालेली दिसत नाही!" सुधामने आपली चिंता व्यक्त केली.

स्मित हास्य करीत परमेश्वर म्हणाला - "मोहनला धोका देण्याची माझी इच्छा नाही. मी त्याला जे खरं तेच सांगितलं. दहा लाख रुपयांचे दहा कोटी रुपये बनविण्याची संधि मी त्याला दिली. आता दहा दिवसांचा अवधि आहे. या दहा दिवसात त्याच्यात काही बदल होतो का हे पाहूं या."

दहा दिवस झाले. परमेश्वर सुधामला म्हणाला - "आता थोड्याच वेळात सर्वांचं धन शंभर पटीने वाढेल. ठरल्या प्रमाणे त्यांची रक्कम शिल्लक राहील, तेवढ्यात तुझी मुले नि त्यांची मुले सुखाने जीवन जगतील. माझं आता थोडंच काम शिल्लक राहिलं आहे. ते संपलं की मी निघून जाईन." असे म्हणून परमेश्वर मोहनकडे जायला निघाला.

परमेश्वराकडे हसत पाहून मोहन म्हणाला - "दहा दिवस तर झाले. आता तू इथून पळून जा. नाहीतर फसलेले सगळे लोक तुझ्यावर दगड फेकतील. पुन्हा एकदा आपल्या करंगळीवर गोवर्धन पर्वत उचलायला इथे जवळपास डोंगर सुद्धा नाही."

"मी परमेश्वर आहे. मी नवीन पर्वत निर्माण करू शकतो. इच्छा असेल, तर पहा माझा हा कृष्णावतार!" असे म्हणत परमेश्वराने आपले गोवर्धन गिरिधारीचे रूप धारण केले.

अत्यंत आश्चर्यचकित होत मोहन म्हणाला - "तर काय तू खरोखर परमेश्वर आहेस?" आणि एक शब्द ही न बोलता परमेश्वर अंतर्धान पावला.

मोहन चांगलाच घाबरला. काय करावं हे त्याच्या लक्षात येईना. ऋणकरी एक-एक करीत आत येऊ लागले. सुधामला दिलेली रक्कम शंभर पटीने त्यांना परत मिळाली. कर्ज परत देण्यासाठी आलेले लोक मोहनला आपले पैसे परत घेण्यासाठी आग्रह करू लागले.

रडत रडत मोहनने सर्वांचा हिशोब केला. मुद्दल व व्याजाच्या सर्व रकमा त्याने वसूल केल्या. लोक परत गेल्यावर त्याच्या मनात पश्चात्तापाची भावना निर्माण झाली.

आपल्याला सन्मार्ग दाखविण्यासाठी प्रत्यक्ष परमेश्वर आला होता हे आता त्याला समजले. आपण अगोदरच परमेश्वरावर विश्वास ठेवला असता तर किती बरं झालं असतं असं त्याला वाटू लागलं.

पश्चात्तापाच्या आगीत धुमसत मोहन आजारी पडला. आता या गावात राहू नये असं त्याला वाटलं. म्हणून तो एका दूरच्या गावी जाऊन राहू लागला. तेथे तो गरीबांना मदत करू लागला. दान-धर्म करीत अतिशय संतोषाने त्याने आपले आयुष्य घालविण्याचा निश्चय केला.



# तोटा की फायदा

राजधानीत युवराजाच्या वाढदिवसाचा महोत्सव साजरा करण्यात येणार होता. तो पहाण्यासाठी भास्कर व रुद्र नावाचे दोन तरुण जवळच्या खेड्यातुत निघाले. दोघेही अगदी भोळे-भाबडे असल्याने लोकांनी त्यांना सावधानतेचा इशारा देत सांगितले की, - "राजधानीत लबाड माणसे खूप असतात. त्यांच्यापासून सावध रहा."

दोघेही राजधानीच्या नगरात पोचले अन् मोठ्या थाटामाटाने साजऱ्या होणाऱ्या जन्मोत्सवातील गमती पहाण्यात गुंगून गेले. वाटेत त्यांना राणीचा महालही दिसला. फारच सुंदर अन् विशाल असा महाल होता तो. त्याच्या चारही बाजूंना काचेची रंगीबेरंगी तावदाने बसवलेल्या खिडक्या होत्या. महालाच्या सौन्दर्याची तारीफ करत दोघे त्याच्या भोवती फिरू लागले.

चालता चालता भास्कर खिडक्या मोजू लागला - एक, दोन, तीन, ....सात.... सोळा .... एकवीस, बावीस......

अजून त्याच्या खिडक्या मोजून संपल्या नाही इतक्यात एक माणूस आपली ऐट दाखवत म्हणाला, "किती खिडक्या मोजल्यास?"

भास्कर बिचारा घाबरत अुत्तरला, "सोळा."

"मग सोळा रुपये काढ पाहू मुकाट्याने" तो माणूस आपली मिशी पिळत गरजला.

भास्करने थैलीतून सोळा रुपये काढून त्याच्या हातावर ठेवताच, तो माणूस तेथून निघून गर्दीत नाहीसा झाला.

रुद्र चेहरा पाडत म्हणाला, "पाहिलंस भास्कर ! त्यानं कसं फसवलं आपल्याला !"

भास्कर म्हणाला, "अरे त्यानं कुठं फसवलं? मीच तर फसवलंय त्याला. मी तर बावीस खिडक्या मोजल्या होत्या; पण त्याला खोटंच सांगितलं की, सोळाच मोजल्या. मग आपलाच सहा रुपयांचा फायदा झाला की नाही?"

- अच्युत फडके






# भुवनसुंदरी - ७

(ट्रॉय शहरावर हल्ला केल्यानन्तर ग्रीकांच्या शिबिरात आपसात झगडे माजले. ग्रीकांच्या अग्रगण्य वीराने - वज्रकायने युद्धातून अंग काढून घेतले. या सुवर्ण-संधीचा फायदा घेअून ट्रोजन त्यांच्यावर तुटून पडले व त्यांनी ग्रीकांचे अतोनात नुकसान आरंभले. ग्रीकांच्या एका जहाजालाही त्यांनी आग लावली. आता मात्र स्वस्थ राहून हे वज्रकायला पहावेना. तो पुन्हा युद्धभूमीत अुतरला, अन् त्याने ट्रोजन-वीर वीरसिंह याला ठार केले. नंतर भुवनसुंदरीला पळवून आणणाऱ्या मोहनने सूर्यमन्दिरात वज्रकायच्या डाव्या पायाच्या तळव्यात विषसिक्त बाण मारून त्याची हत्या केली.) - यानंतर -

वज्रकायच्या मृत्यूनन्तर रिवाजाप्रमाणे स्पर्धा घेण्यात आल्या. धावण्याची स्पर्धा देवमयने जिंकली, तर चक्र फेकण्यात भूधव पहिला आला.

उरलेल्या ग्रीक योध्द्यांपैकी सर्वात अुत्तम ठरणाऱ्या योध्द्याला आपल्या पुत्राची अस्त्र-शस्त्रे व चिलखत वगैरे देण्याची वज्रकायच्या आईची इच्छा होती. शत्रूच्या शिबिरातून वज्रकायचे प्रेत मोठ्या धाडसाने व शौयनि अुचलून आणण्याचे काम भूधव व रूपधर यांनी केले होते; म्हणून वज्रकायच्या या साऱ्या वस्तु मिळवण्याचा आपलाच हक्क आहे असा या दोघांचा दावा होता. अन् त्यांच्या विरुद्ध बोलण्याचे सामर्थ्य ही कोणात नव्हते.

पण या दोघात महान् कोण याचा निर्णय सम्राट ही घेअू शकेना, म्हणून वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध असणाऱ्या नवद्योतकडे त्याने याविषयी सल्ला मागितला.

ग्रीक पौराणिक कथा

"आपल्या पराक्रमाबद्दल आपल्यापेक्षा आपल्या शत्रूचेच मत जास्त योग्य असते, तेन्हा ते जाणून घेण्यासाठी आपल्या गुप्तचरांना रात्रीच्या वेळी किल्ल्याच्या तटाजवळ पाठव. आत असणाऱ्या ट्रोजनांच्या बोलण्यावरून या दोघात श्रेष्ठ कोण हे गुप्तचरांना आपोआप समजून येईल." असा सल्ला नवद्योतने सम्राटाला दिला.

ग्रीकांचे गुप्तचर याप्रमाणे रात्रीच्या वेळी किल्ल्याच्या तटाशी पोचले. तटाच्या दुसऱ्या बाजूला काही ट्रोजन तरुणी आपसात बोलत असल्याचे त्यांच्या ध्यानी आले.

या तरुणी आपसात ग्रीक वीरांनी वज्रकायचे प्रेत कसे पळवून नेले, याबद्दलच बोलत होत्या. त्यांचे बोलणे गुप्तचरांना स्पष्ट ऐकू येत होते.

एक ट्रोजन युवती म्हणत होती, "आपले वीर अस्त्रांचा वर्षाव करत होते; तरीही भूधवने त्याची काहीही पर्वा केली नाही. मोठ्या निर्भयपणे तो वज्रकायचं प्रेत खांद्यावर टाकून निघून गेला. त्याची वीरता खरोखरच फार स्तुत्य आहे."

दुसरी एक तरुणी तिला अडवत लगेच म्हणाली, "हं:! प्रेत खांद्यावर टाकून नेणं, म्हणजे फार मोठी गोष्ट नव्हे हं! स्वत:चं अन् त्याबरोबरच भूधवचंही रक्षण करत निघून जाण्यात रूपधरनंच कमालीचं शौर्य दाखवलंय. तो आपल्याकडच्या वीरांशी लढत राहिला. त्याने मोठ्या निग्रहाने शत्रूला तोंड दिलं अन् वज्रकायचं प्रेत सुरक्षित घेऊन गेला. वीर असावा, तर असाच!"

बाकी साऱ्या तरुणींनीही या दुसऱ्या तरुणीलाच दुजोरा दिला.

गुप्तचरांनी ही वार्ता सम्राटाला सांगितली. नंतर त्याने वज्रकायची सामग्री रूपधरच्या हवाली केली.

परन्तु भूधवला हा आपला अपमान वाटला. त्याला असे वाटले की वज्रकाय स्वत: जिवन्त असता, तर त्याने आपल्यावर असा अन्याय कधीच होऊ दिला नसता. त्याने ताबडतोब रूपधर व सम्राटाचा सूड घेतला असता. तो आता जिवन्त नसल्यामुळेच सम्राटाने रूपधरला मोठा योद्धा ठरवला अन् त्यालाच पुरस्कार दिला. रागाने भूधवची बुद्धीच भ्रष्ट झाली. त्याचा स्वत:वर ताबा राहिला नाही. ट्रॉयच्या आसपासच्या प्रदेशात ग्रीकांनी त्याचे पशुधन लुटले होते. ते सारे पशु एकाच ठिकाणी होते. अुन्मादाच्या अवस्थेत भूधव तेथे पोचला, अन् त्यांना धडाधड मारून टाकू लागला. दोन पाय पांढरे असलेली एक बकरी त्याला सम्राट वाटली, अन् त्याने ताबडतोब तिचे डोके अुडवले; तर दुसरी एक बकरी त्याला रूपधर वाटली. त्याने त्या बकरीला खुंटाला बांधले अन् तो तिला चाबकाने मारू लागला. इतके सर्व केल्यानन्तर त्याचा आवेश थंड पडला. यानन्तर तो समुद्रकिनारी गेला व स्वत:ला चाकूने भोसकून घेऊन त्याने आत्महत्या केली.

'भूधवचा अन्त्यसंस्कार वीरोचित पद्धतीने न करता त्याचे फक्त दफन करावे' असा प्रतापचा आग्रह होता, परंतु रूपधरने त्याला विरोध करून भूधवचा अन्त्यसंस्कार वीरोचित पद्धतीनेच







करायला लावला.

वज्रकायच्या मृत्युमुळे ग्रीक शिबिरात नैराश्य पसरले. त्यांचा सारा अुत्साह नाहीसा झाला. अशा परिस्थितीत ग्रीक ज्योतिषी कांशुक याने भविष्यवाणी वर्तवली. तो म्हणाला, ''धनधव हा लिम्नोस द्वीपाचा शासक आहे. त्याच्याजवळ देवाने दिलेले धनुष्य व बाण आहेत. या वस्तु मिळवल्या, तरच ग्रीकांना विजय मिळू शकेल.''

हे कार्य साधण्यासाठी सम्राटाने रूपधर व देवमय या दोघांना एका जहाजातून पाठवले. लिम्नोस द्वीप ग्रीकांच्या शिबिरापासून चाळीस मैल अंतरावर होते. ग्रीक तेथे पोचले, तेंव्हा धनधव व्रण झाल्यामुळे त्रस्त झालेला होता.

रूपधर हा आपल्या कपटी स्वभावाबद्दल प्रसिद्ध होता. त्याने गोड बोलण्याचे जाळे पसरून धनधवला त्यात अडकवण्याचा विचार केला. कपटाने धनुष्य बाण मिळवायचा त्याचा अुपाय देवमयला मुळीच पसन्त नव्हता. त्याने असे घडू दिले नाही.

धनधवला देवाने स्वप्नात येअून सांगितले, ''तू ट्रॉयला जा. त्या युद्धामुळे तुला कीर्ती प्राप्त होईल अन् अधिक लाभही होईल. तू आणि वज्रकायचा मुलगा नवयोध ट्रॉयचं पतन घडवून आणण्यात मोठा वाटा मिळवाल. पण तुम्हा दोघांपैकी एक जण जरी तेथे गेला नाही, तर हे कार्य सिद्ध होणार नाही.''

देवाच्या आदेशानुसार धनधव आपले धनुष्यबाण घेअून ग्रीक लोकांबरोबर रणक्षेत्रात पोचला. ग्रीक शिबिरात कुशल शल्य चिकित्सक होते. त्यांनी धनधवला स्नान घातले अन् झोपवले. नंतर त्यांनी त्या व्रणावर शल्यचिकित्सा केली.

धनधवचा व्रण ठीक झाला. ज्या दिवशी तो नीट अुभा राहू शकला, त्याच दिवशी त्याने मोहनला धनुर्युध्दासाठी आव्हान दिले. या युध्दात धनधवचा पहिला बाण मोहनला लागला नाही. पण दुसरा बाण मात्र मोहनच्या धनुष्य पकडलेल्या डाव्या हाताला लागला. तिसऱ्या बाणाने मोहनचा अुजवा डोळा फुटला. पायाच्या तळव्याला जाअून लागला.

मोहनची कठीण अवस्था पाहून प्रतापला वाटले की आता ताबडतोब त्याला मारून टाकले जावे. परंतु मोहन लंगडत, लंगडत तेथून पळून गेला. तो प्रतापच्या हातीं लागला नाही. कसातरी तो किल्ल्याच्या आत पोचला. मोहनला औषधोपचार करण्यासाठी टोपलीभर औषधी ऐडा पर्वतातून मागवल्या गेल्या. पण त्या पोचण्यापूर्वीच त्याचा प्राण निघून गेला.

मोहनचा मृत्यु झाल्याबरोबर त्याचे दोन भाअू चन्द्र व अरिभयंकर यांच्यात, 'आता भुवनसुंदरी माझी पत्नी होणार' असे म्हणत झगडा सुरू झाला. अरिभयंकरने लढाईत जास्त पराक्रम दाखवल्यामुळे त्याचा पिता वर्धन याने त्याचेच समर्थन केले. परन्तु इकडे 'आपण स्पार्टाची राणी व मोहनची पत्नी आहोत' ही गोष्ट भुवनसुंदरी विसरू शकत नव्हती. पळून जाअून ग्रीकांना मिळण्यासाठी ती एका रात्री किल्ल्याच्या भिंतीवर चढली व तिने एक दोर खाली सोडला. परन्तु एका पहारेकऱ्याने हे पाहिले व तिला पकडून तो राजमहालात घेअून गेला. अरिभयंकरने जबरदस्तीने तिच्याशी विवाह केला.

या घटनेमुळे चन्द्र विरक्त बनून ट्रॉय शहर सोडून ऐडा पर्वतावर निवास करायला निघाला. कांशुकने सम्राटाला सांगितले की, कसेही करून या चन्द्रला पकडावे अन् त्याच्या तोंडून ट्रॉय शहराची गुप्त रहस्ये वदवून घ्यावी. असे झाले की ट्रॉय शहरावर विजय मिळवणे शक्य होईल. हे ऐकून सम्राटाने चन्द्रला पकडून आणण्यासाठी रूपधरला प्रोत्साहन दिले.

चन्द्र यावेळी हेयाच्या पित्याचा अतिथि





बनून सूर्य मन्दिरात रहात होता. रूपधर त्याला शोधत बरोबर मन्दिरात पोचला.

''मी भीती वाटल्यामुळे इथे आलेलो नाहीय. याच मंदिरात मोहननं वज्रकायला कपटानं मारलं होतं. त्या पापाचं अजूनही काही प्रायश्चित्त न घडल्याचं मला दुःख आहे. एकाद्या दूरच्या प्रान्तात माझ्या सुरक्षित रहाण्याची व्यवस्था होत असेल, तर ट्रॉयची गुप्त रहस्यं तुम्हाला सांगायला मी तयार आहे.'' चन्द्रने रूपधरला स्पष्टच सांगून टाकले.

रूपधरने मोठ्या खुशीने त्याचा हा प्रस्ताव मान्य केला.

''येत्या अुन्हाळ्याच्या दिवसात ट्रॉयचं पतन नक्कीच होणार आहे. पण त्यापूर्वी तीन गोष्टी घडणं आवश्यक आहे. पहिली म्हणजे, पिसामधे असलेलं भूम्रमुखच्या मणक्याचं हाड तुम्ही आपल्या शिबिरात आणायला हवं. दुसरं काम - नवयोधला युद्धभूमीवर आणणं आवश्यक आहे. अन् तिसरं म्हणजे, बुद्धिमतीदेवीची मूर्ती किल्ल्यातून चोरून आणायला हवी. ती मूर्ती जोपर्यन्त किल्ल्यात आहे, तोपर्यन्त किल्ल्याला तर तुम्ही फोडू शकणार नाही.'' चन्द्रने ट्रॉय संबंधीची रहस्ये रूपधरला सांगितली.

ही रहस्ये कळल्याबरोबर सम्राटाने भूम्रमुखच्या मणक्याचे हाड आणण्यासाठी काही वीरांना पिसाकडे रवाना केले. वज्रकायचा पुत्र नवयोध अजून बाराच वर्षांचा कुमार होता. तो स्कँटासमधे रहात होता. त्याला घेऊन येण्यासाठी रूपधर, रक्तवर्ण व देवमय असे तिघे नावेतून निघाले. नवयोधने रणक्षेत्रात पाऊल ठेवल्याबरोबर त्याला आपल्या पित्याचा आत्मा तेथे भटकत असलेला दिसला. रूपधरने वज्रकायची अस्त्रे नवयोधला दिली. वय कमी असूनही नवयोधने रणक्षेत्रात आपल्या पित्याची कीर्ती वाढवली. याशिवाय त्याने ग्रीकांना रणनीतीबद्दल अमूल्य अशा सूचनाही दिल्या.

आता फक्त बुद्धिमतीची मूर्ती मिळवण्याचे काम तेवढे अुरले. रूपधर व देवमय यांनी हे काम अुरकण्याचा विडा अुचलला. रूपधरने मुद्दामच देवमय कडून स्वतःला खूप मारवलं, त्याच्या अंगातून रक्त ही वाहू लागले.



आश्रयाला आलेल्या दासा प्रमाणे त्याने शहरात प्रवेश केला. केवळ भुवनसुंदरीनेच त्याला ओळखले व शहरात येण्याचे कारण विचारले. परन्तु रूपधरने तिच्या प्रश्नांना समाधानकारक अुत्तर दिले नाही. ती त्याला आपल्या घरी घेऊन गेली. तिने त्याचे यथेच्छ स्वागत केले. तिने त्याला एका स्वच्छ आसनावर बसविले व गरम दुधाचा एक पेला त्याच्या पुढे ठेवला. त्याचे स्नान झाल्यावर तिने त्याला जेवणही दिले व म्हणाली, ''मी इथे एकाद्या कैद्यासारखी जगत आहे. मी आपल्या देशात परत जाऊ इच्छित आहे. हे रहस्य केवळ माझ्या सासूला माहीत असून तिची मला पूर्ण सहानुभूती आहे. आता बोल, तुझा काय बेत आहे? मला काही मदत करण्याची तुझी इच्छा असल्यास तसा काही विचार कर.'' भुवनसुंदरीने हे सारे सविस्तर सांगितले; इतक्याच वर्धनची पत्नी तेथे पोचली. रूपधर भयाने कापू लागला अन् तिच्या पायावर लोळण घेऊन याचना करू लागला, ''माझ्या इथल्या अुपस्थितीबद्दल कृपा करून कोणाजवळ बोलू नका.'' राणीनेही हे रहस्य कोणाला सांगितले नाही. अुलट त्याच्या सुरक्षित परत जाण्याची जरूर ती व्यवस्थाही केली.

परत फिरताना रूपधरने बुद्धिमती देवीची मूर्ती चोरली अन् तिच्याच प्रतीक्षेत भिंतीपलिकडे अुभ्या असलेल्या देवमयच्या हवाली केली. चांदणी रात्र होती. सर्वत्र शुभ्र चांदणे पसरले होते. दोघेही स्वच्छ चन्द्र प्रकाशातून चालू लागले. वाटेत रूपधरच्या डोक्यात एक कपटकारस्थान शिजले. मूर्ती आणण्याचे सारे श्रेय स्वतःलाच मिळावे म्हणून एक पाऊल मागे राहून त्याने आपली तलवार देवमयवर अुगारली. पण देवमयला सावलीत तलवार दिसताच, तो गर्रकन मागे वळला अन् त्याने रूपधरच्या हातची तलवार हिसकून घेतली. रूपधरचा हात पिरगाळून मागे पकडून ठेवून, मारत मारत देवमय त्याला शिबिराकडे घेऊन गेला. रूपधरने प्रतिकार करण्याचा काही ही प्रयत्न केला नाही.

**क्रमशः**



## चान्दोबाच्या बातम्या

### तीन, फक्त तीनच

फेब्रुवारी आणि मार्च मधे ज्या चार प्रान्तात निवडणुका झाल्या, त्यात अरुणाचल प्रदेश एक आहे. त्यातल्या कामेंग जिल्ह्यातील त्रिशिनो बुरागोनच्या निर्वाचन क्षेत्रात चक्रू नावाचे एक गाव आहे. जंगलातून वाट काढत या गावात पोचायला तीन दिवस लागतात. चक्रू गावासाठी निवडणूक अधिकाऱ्यांनी मत-पत्रिका, शाई इत्यादि आवश्यक साहित्याची व्यवस्थित सोय केली. परन्तु या गावात केवळ तीनच मतदाता आहेत! आपल्या देशाच्या लोकतन्त्र राज्यप्रणालीचे हे खास अुदाहरण होय.

### विमान चालकाशिवाय विमानाची भरारी

फेब्रुवारी २६ रोजी अमेरिकेतील हॉवर्ड येथून एक विमान अुडाले. ते सत्तर मीटर अुंचीवर पोचले अन् हृदयविकाराचा झटका येअून विमान-चालकाचा जागच्या जागीच अंत झाला. परन्तु विमान चालूच



राहिले. ते तसेच दोन तास अुडत राहून अुत्तर कैलिफोर्नियाच्या निर्जन प्रदेशात अुतरले. लोकांना ते आपल्या घरावर पडेल अशी भीती वाटत होती. पण तसे घडले नाही.

### थैलीत मांजर

बांगला देशातील चांदपुर हे राजधानी डाक्क्याहून ६५ कि.मी. अन्तरावर आहे. डाकेचा थैलीतून पत्रांबरोबर एका मांजराने ही हा प्रवास केला. मांजराच्या गळ्यात पत्ता लिहिलेला कागद नव्हता. डाकघरात थैली अुघडल्या बरोबर म्यांव म्यांव करत हे मांजर बाहेर पडले अन् पळून गेले! ही थैली रेल्वेच्या



बोगीत टाकताना, किंवा गन्तव्य स्थानी बाहेर फेकली गेली, तेव्हा या मांजराने जरा सुद्धा आवाज केला नव्हता. फेब्रुवारी ५ ला ही घटना घडली. डाक अधिकाऱ्यांना ही गोष्ट कळली नाही की हे मांजर थैलीत गेलेच कसे?

### स्वच्छता

'अंटार्टिका' हे नाव घेताच आपल्या डोळ्यांसमोर बर्फच बर्फ दिसू लागते. तेथे मॅकमुर्डो नावाचे एक शहर आहे. अुन्हाळ्याच्या दिवसात इथली लोकसंख्या १,२०० अन् हिवाळ्यात ती केवळ २०० इतकीच असते. इथली जनता केरकचरा गावा बाहेरील खड्ड्यात जाळून टाकत असे. भोजन झाल्यावर अुरले सुरले पदार्थ ते याच खड्ड्यात फेकत. ते खाण्यासाठी समुद्र पक्ष्यांसारखे काही पक्षी तेथे येत. एकूण हा एक फार कलुषित असा भाग असे. पर्यावरण संरक्षकांनी तेथील लोकांना स्वच्छतेबाबत समजावून सांगितल्यावर आता स्थिति काहीशी सुधारली आहे

# चंद्ररेखेचे स्वयंवर

दृढनिश्चयी विक्रमादित्य पुन्हा झाडापाशी आला प्रेत आपल्या खांद्यावर लादून तो नेहमींप्रमाणे स्मशानाची वाट चालू लागला. तेव्हा प्रेतातील वेताळ बोलू लागला - "राजा, तुझ्यासारखे साहसी क्वचितच सापडतील हे मी मानतो. कधी कधी असं ही होतं की नालायक व असमर्थ लोकांना केवळ त्यांच्या बलवत्तर भाग्यामुळे सगळं काही मिळतं. मी तुला एका अपूर्व सुंदरीची गोष्ट सांगतो. तिने आपल्या स्त्री-सुलभ करुणेने एका अयोग्य तरुणाशी विवाह करून त्याला उंच शिखरावर नेऊन ठेवलं. गोष्ट ऐकता-ऐकता तुझा श्रम-परिहार ही होईल." आणि वेताळ गोष्ट सांगू लागला.

कनकपुर राज्याचा राजा होता जयकेतन. त्याची मुलगी चंद्ररेखा अपूर्व सुंदरी होती. बुद्धिबळे खेळण्यात ती फार निपुण होती. स्वतः राजा जयकेतन ही बुद्धिबळे छान

वेताळ कथा



खेळायचा, म्हणून त्याने आपल्या मुलीला या खेळाचे चांगलेच प्रशिक्षण दिले होते.

एक दिवशी चंद्ररेखेच्या लग्नाची गोष्ट निघाली. तेव्हां ती आपल्या वडिलांना म्हणाली - ''पिताजी बुद्धिबळात मला जो हरवील, त्यांच्याशीच मी लग्न करीन. माझ्याशी खेळताना जो पहिल्यांदा हारेल, त्याला चाबकाचे शंभर फटके सहन करावे लागतील. दुसऱ्या वेळी जो हारेल, त्याला आपल्या कुल-देवतेची शपथ घेऊन जीवनभर अविवाहित रहावे लागेल. जर तिसऱ्या वेळी ही तो हारला तर त्याला फाशी दिले जाईल. माझ्या या अटी आपण जाहिर करा, आणि ज्या राजकुमारांना माझ्या या अटी मान्य आहेत, त्यांनाच माझ्या बरोबर बुद्धिबळे खेळण्याची परवानगी द्या.''

आपल्या मुलीच्या या विचित्र इच्छेचे जयकेतनला मोठे आश्चर्य वाटले. आपल्या मुलीचा हट्टी स्वभाव त्याला माहीत होता. म्हणून त्याने तिच्या इच्छेनुसार विवाहाच्या अटींची घोषणा केली.

अद्भुत व अद्वितीय सुंदरी चंद्ररेखाशी लग्न करण्याच्या उद्देशाने काही राजकुमार तिच्या बरोबर बुद्धिबळे खेळले. बुद्धिबळे खेळण्याचे थोडे-फार शिक्षण या सर्वांनी घेतलेले होते, पण चंद्ररेखेच्या चातुर्यापुढे त्यांचा काही टिकाव लागला नाही. त्यांनी स्पर्धेत भाग घेतला आणि बिचारे पराभूत झाले. त्यांनी चाबकाचे शंभर फटके सहन केले. दुसऱ्या वेळी खेळायला कोणी ही तयार झाला नाही.

चारुशीला नगरीचा राजकुमार सूर्यतेज याच्यापर्यंत या विचित्र स्वयंवराची वार्ता पोचली. तो अजून अविवाहित होता.

सूर्यतेजला आतांपर्यंत बुद्धिबळाच्या खेळाचे काही ही ज्ञान नव्हते. म्हणून या खेळाचे प्रशिक्षण घेण्याचा त्याने निश्चय केला. विश्वनाथ नावाचा एक खेळाडू बुद्धि-बळपटू होता. बुद्धिबळाच्या अनेक स्पर्धांत त्याने प्रथम क्रमांक पटकावला होता. सूर्यतेजाने त्याच्याकडून या खेळाचे बरेच बारकावे शिकून घेतले. सहा महिने तो विश्वनाथकडून शिक्षण घेत राहिला.

एक दिवशी विश्वनाथ सूर्यतेजला म्हणाला - ''बस, आता तुझं शिक्षण संपलं. तू आता बुद्धि-बळे खेळण्यात पूर्णत: प्रवीण झाला आहेस.''

सूर्यतेजाने विश्वनाथला बहुमूल्य भेटी देऊन त्याचा निरोप घेतला. आणि चन्द्ररेखेशी बुद्धिबळाचे डाव खेळायला निघाला.

प्रमुख राज्य-कर्मचारी आणि चंद्ररेखेचे आई-वडील यांच्या उपस्थितीत स्पर्धा सुरू झाली.

मोठ्या उत्साहाच्या वातावरणात स्पर्धा सुरू झाली. दोघे ही मोठ्या चातुर्याने बुद्धि-बळाची प्यादी हालवीत राहिले. सूर्यतेज सुद्धा आपली सर्व बुद्धि पणाला लावून खेळत होता, पण चंद्ररेखेच्या चातुर्यापुढे तो फिका पडत होता. दुपार पर्यंत खेळ खेळून झाल्यावर चंद्ररेखेने सूर्यतेजाच्या राजाला बंदी बनवलं. राजकुमारीचा जय झाल्यावर सर्वांनी आनंदाने टाळ्या वाजवल्या आणि तिचे अभिनंदन केले. चाबुकी हाती घेऊन दोन सैनिक जेव्हा सूर्यतेजाकडे येऊ लागले, तेव्हा त्याने त्यांच्याकडे दीनवाणेपणाने पाहिले. सर्वांना वाटलं की सूर्यतेज आता आपल्या राज्यात परत जाणार. पण तसं घडलं नाही. तो चंद्ररेखेशी दुसऱ्या वेळी खेळायला तयार झाला.

कनकपुरचे महामंत्री आदित्य यांनी सूर्यतेजला सावध करीत म्हटले - ''दुसऱ्या वेळी राजकुमारीने हारवले तर काय शिक्षा भोगावी लागेल हे माहीत आहे ना तुला?





आपल्या कुल-देवतेची शपथ घेऊन तुला निश्चय करावा लागेल की आजन्म अविवाहित राहीन.''

''हे मला पुन्हा सांगण्याची आवश्यकता नाही, कारण दुसऱ्या कुठल्या मुलीशी लग्न करण्याचा प्रश्नच नाही. केवळ तुमच्या समाधानासाठी मी ही शपथ घेत आहे. समजलं?'' असे म्हणून सूर्यतेजने आपले कुलदैवत शिव भगवानची शपथ घेतली.

दुसऱ्यांदा बुद्धि-बळांचा खेळ सुरू झाला. यावेळी सूर्यतेज आपलं सर्व कौशल्य पणाला लावून प्यादी हालवू लागला. परंतु चंद्ररेखा जरा ही विचलित न होता शांतिपूर्वक खेळू लागली, जणू आपल्या प्रतिस्पर्ध्याची तिला काही पर्वाच नव्हती. ती मोठ्या कुशलतेने आपली प्यादी हलवीत होती. तिची गति नि निपुणता पाहून सूर्यतेज आश्चर्यचकित झाला. खेळ चालू असताना मधेच तो एकदा चंद्ररेखेचं सौंदर्य पहात राहिला. यामुळे त्याच्या चित्ताची एकाग्रता तुटली. मंत्र्याचं प्यादं पुढे सरकवण्याऐवजी त्याने हत्तीचं प्यादं पुढे सरकवलं. तो मंत्र्याचं प्यादं पुढे सरकावू इच्छित होता, परंतु त्याचं लक्ष विभागलं गेल्यामुळे त्याच्या हातून चूक झाली. पण त्या परिस्थितीत ती घोडचूक होती. आता चंद्ररेखेने त्या चुकीचा फायदा घेऊन सूर्यतेजला पराभूत केले. पुन्हा एकदा सर्वांनी जोरजोरात टाळ्या वाजवून चंद्ररेखेचे अभिनंदन केले.

आता सूर्यतेज निश्चित आपल्या राज्यात परत जाणार असे सर्वांना वाटले. पण आश्चर्य असे की तो तिसऱ्यांदा ही खेळायला तयार झाला. त्याचा हा हट्ट पाहून सर्वांना मोठे आश्चर्य वाटले. त्याच्या खांद्यावर हात ठेवीत राजा जयकेतन म्हणाला - ''राजकुमार सूर्यतेज, सोनेरी भविष्य तुझ्या पुढ्यात ठाकले आहे. एक राजा बनून अनेक जबाबदाऱ्या तुला पार पाडायच्या आहेत. ते सर्व विसरून तू आपल्या प्राणांची बाजी कशासाठी लावीत आहेस? आता तू खेळ संपवावास हे बरे असे मला वाटते. माझा सल्ला आहे की तू परत जावेस.''



हसत सूर्यतेज म्हणाला - ''आपल्या सल्ल्याबाबत मी आपला आभारी आहे. जय-पराजय दैवाधीन आहे असे वडीलधारी माणसं म्हणतात. यावेळी माझा जय होणे ही शक्य आहे.''

सूर्यतेजचे म्हणणे राजकुमारी लक्षपूर्वक ऐकत होती. त्याची जिद्द पाहून तिला ही मोठे आश्चर्य वाटले. प्राण पणाला लावून खेळासाठी सिद्ध झालेल्या या राजकुमाराचे व्यक्तित्व निश्चित अपूर्व असले पाहिजे असे तिला वाटले. क्षणभर टक लावून तिने त्याच्याकडे पाहिले आणि ती आपल्या वडिलांना म्हणाली - ''पिताजी, मी आपला पराजय मान्य करते.'' आणि तिने लाजून मान खाली घातली.

तिथे हजर असलेल्या लोकांना राजकुमारीच्या या निर्णयाचं फार आश्चर्य वाटलं. ज्या राजकुमारीने दोन वेळा अगदी सहज राजकुमाराला हारवले, ती आता यावेळी का पराजय स्वीकारीत आहे हे कोणाला समजेना.

राजा जयकेतनच्या लक्षात सर्व परिस्थिति आली. आपल्या मुलीचे अभिनंदन करीत तो म्हणाला - ''बेटा, योग्य वेळी तू योग्य निर्णय घेतला आहेस!''

एवढी गोष्ट ऐकवून आता वेताळ म्हणाला - ''राजा, या सूर्यतेजाला चंद्ररेखेने जेव्हा पहिल्यांदा हारवले, तेव्हाच त्याला कळून चुकले असेल की चंद्ररेखेला बुद्धि-बळात जिंकणे त्याला शक्य होणार नाही. असे असताना ही दुसऱ्यांदा व तिसऱ्यांदा तो



खेळायला तयार झाला ही सूर्यतेजच्या मूर्खपणाची पराकाष्ठाच नव्हे का? स्त्री-सुलभ दयेने तिने आपला पराभव मान्य केला हे ठीकच झाले. नाहीतर बिचाऱ्या सूर्यतेजला फाशीची शिक्षा भोगावी लागली असती. 'तू योग्य वेळी योग्य निर्णय घेतलास' हे राजा जयकेतनचे म्हणणे ही अनुचित व असंगत नाही वाटत? मुलीची प्रशंसा करीत त्याने काढलेले हे उद्गार अर्थहीन वाटतात. माझ्या या शंकांचे उत्तर माहीत असून ही तू दिले नाहीस तर तुझं शिर धडावर राहणार नाही हे लक्षात ठेव."

राजा विक्रमादित्याने उत्तर दिले - "चंद्ररेखा आपला निश्चित पराभव करणार हे न समजण्याइतका सूर्यतेज काही मूर्ख खास नव्हता. कारण तो पहिल्या प्रथम जेव्हा चंद्ररेखेशी खेळला, तेव्हाच ती बुद्धिबळात किती प्रवीण आहे हे तो समजून चुकला. दुसऱ्या व तिसऱ्या वेळी तो तिच्याशी खेळायला तयार झाला, याचे कारण असे की त्याच्या मनात तिच्याविषयी आकर्षण निर्माण झाले. तिचे रूप व तिची तीक्ष्ण बुद्धि यांनी त्याला भुरळ पाडली. हे रहस्य चंद्ररेखेच्या ही लक्षात आल्याशिवाय राहिले नाही. स्वयंवर तर केवळ एक बहाणा होता. कोणता राजकुमार आपल्या प्राणांची बाजी लावायला तयार होतोय, हे चंद्ररेखेला पहायचे होते! हारल्यावरही आपला पराभव मान्य न करणारा एकच एक राजकुमार निघाला - सूर्यतेज. त्याने तीन वेळा स्पर्धेत भाग घेतला. चंद्ररेखा अशाच सुयोग्य वराच्या शोधात होती. जेव्हा तिला असा राजकुमार सापडला तेव्हा पराजित न होताच तिने आपला पराजय स्वीकार केला. यात तिची तीक्ष्ण बुद्धि दिसून येते. तिला दया आली असे यात मुळीच काही नाही. राजा जयकेतनने आपल्या मुलीच्या मनातील विचार बरोबर जाणला आणि तिचे मन:पूर्वक अभिनंदन केले."

अशा रीतीने वेताळ राजा विक्रमादित्याचा मौन-भंग करण्यात यशस्वी झाला. तो प्रेतासह अदृश्य झाला आणि पुन्हा झाडावर जाऊन बसला.





# हुशारी

जांभुळगावच्या प्रसादचा मुलगा माधव आठ वर्षाचा होता. सर्वात लहान मूल, म्हणून त्याला लाडाकोडाने वाढवले गेले होते. सगळे नातेवाईक कौतुकाने म्हणत की - हा मोठा हुशार व चलाख मुलगा आहे.

परन्तु फार बुद्धिमान मानला जाणारा हा माधव एका बाबतीत मात्र फार मूर्खपणाने वागे. एकदा त्याचा एक नातेवाईक काही कामासाठी प्रसादच्या घरी आला होता. परत निघण्यापूर्वी त्याने आपल्या खिशातून एक चांदीचे व एक तांब्याचे अशी दोन नाणी काढून माधवपुढे धरली अन् त्यातील एक त्याला घ्यायला सांगितले. माधवने पटकन तांब्याचे नाणे उचलले.

माधवच्या या निवडीचे नातेवाईकाला मोठे आश्चर्य वाटले. हुशार मानल्या गेलेल्या माधवने चांदीचे सोडून तांब्याचे नाणे घेतले. असे त्याने का केले हे काही त्याला कळेना. तो त्याच्या मूर्खपणाला हसत चांदीचे नाणे खिशात टाकून आपल्या घरी निघून गेला.

पण ही घटना लपून राहिली नाही, सर्वांना ते समजले. गावभर ती वार्ता पसरली. सर्वजण समजत होते की माधव आपल्या पित्यापेक्षा हुशार आहे, अन् मोठा झाल्यावर आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर व्यापारात लाखो रुपये कमवील. पण या घटनेनन्तर मात्र लोक समजू लागले की तो मूर्ख व बावळट आहे.

तेव्हापासून त्याची गंमत करण्यासाठी, त्याची टिंगल उडवण्यासाठी व स्वत:ची करमणूक करण्यासाठी गावचे लोक मुद्दाम प्रसादच्या घरी येऊन चांदीची व तांब्याची नाणी माधवसमोर ठेवून त्याला निवडायला सांगत. माधव प्रत्येक वेळी तांब्याचे नाणेच उचलत असे; अन् गावचे लोक मात्र टवाळी करायचा आपला उद्देश सफल झाल्याचे पाहून हसत सुटत.

एक दिवशी प्रसादच्या घरी विनोद नावाचा त्याचा एक नातेवाईक त्याला भेटायला आला.

चन्द्रकांत भोसले

तसा तो माधवचा मामाच लागत असे. माधवच्या बाबतीतली गावकऱ्यांची टीका त्याच्या कानावर आलेली होतीच. विनोदला याबद्दल फार वाईट वाटले. त्याला असेही वाटू लागले की माधवची बौद्धिक पातळी इतकी घसरलेली असेल, तर मोठा झाल्यावर पुढे तो आपल्या पित्याचा व्यवसाय संभाळू शकणार नाही. इतर लोक त्याची सगळी इस्टेट लुबाडतील अन् सारे कुटुम्ब देशोधडीला लागेल.

जांभुळगावातले आपले काम संपल्यावर विनोदला ज्या दिवशी आपल्या गावी परतायचे होते, त्या दिवशी त्याने माधवला आपल्याजवळ बोलावून घेतले. नंतर त्यानेही चांदीची व तांब्याची काही नाणी त्याच्यासमोर ठेवून म्हटाले, ''माधव, यातली तुला हवी ती नाणी घे तुला.''

माधवने ताबडतोब तांब्याची नाणीच अुचलली ! पण त्याच्या या मूर्खपणाबद्दल विनोदला इतर लोकांप्रमाणे हसू आले नाही. अुलट त्याला माधवबद्दल सहानुभूती वाटली. त्याने माधवला विचारले, ''माधव, बाळा तू चांदीची चांगली किंमती नाणीं सोडून नेहमी तांब्याची नाणी अुचलणं का पसंत करतोस? तू काय इतका अडाणी आहेस की तुला या दोहोतला फरक कळत नाही? तांबं आणि चांदी या दोन धांतूत चांदी अधिक मूल्यवान आहे हे तुला माहीत आहे ना? मग तांब्याऐवजी चांदीचं ताणं तू का घेत नाहीस?''

आता माधव हळूच अुत्तरला, ''मामा, अहो मी चांदीची नाणी प्रथम अुचलली असती, तर गावचा कोणीही माणूस आपली करमणूक करून घेण्यासाठी माझ्याशी असा खेळायला आला नसता. अन् त्या परिस्थितीत मला तांब्याची नाणीही कधी मिळाली नसती. पण अशी नेहमी तांब्याची नाणी अुचलत राहिल्यामुळे माझ्याजवळ ढिगांनी तांब्याची नाणी जमा झालीयत पहा!'' अन् विनोदला बरोबर आपल्या खोलीत घेअून जाअून त्याने तांब्याच्या नाण्यांचा ढीग दाखवला.

इतकी सगळी नाणी पाहून आता विनोद अवाकच झाला! तो काही बोलणार, इतक्यात त्याला टोकत माधव म्हणाला, ''पण मामा, माझी ही गंमत कुणाला सांगू नका बरं का !''





## आपल्या देशातील किल्ले - ३

# रजपूतांचे किल्ले - १

चित्रांगद मोरीने सातव्या शतकात चित्रकूट गड बांधला होता. शंभर वर्षानन्तर गुहिल प्रमुख बाप्पा रावळ याने किल्ल्याचे नाव 'चितोड' असे ठेवून तेच आपले निवासस्थान बनवले.

बाप्पा रावळच्या सिसोदिया वंशजांनी चितोडवर ८०० वर्षे शासन केले. किल्ल्याच्या प्रांगणात आज ही एक विजयस्तंभ दिसतो. राणा कुंभाने १४५८ मधे माळवा सुलतानाला जिंकले या घटनेच्या स्मरणार्थ त्याने हा स्तंभ बांधला. या नअू मजली स्तंभाची अुंची ३६ मीटर असून तो बांधायला जवळजवळ दहा वर्षे लागली.

क्षेत्रफळाच्या दृष्टीने हा आपल्या देशातील सर्वात विशाल गड होय.

किल्ल्याच्या आवारात अनेक विहिरी व पायऱ्या असलेल्या बावड्या आहेत. यांचे पाणी पिण्यासाठी व शेतीसाठी वापरले जाई. त्यामुळे सलग दोन वर्षे शत्रूचा वेढा पडला, तरी किल्ल्यातील लोकांना खाण्यापिण्याची ददात जाणवत नसे.

अकबर बादशहाच्या नेतृत्वाखाली १५६७ मधे मोगल सेनेने या किल्ल्याला वेढा दिला. राणा अुदयसिंहने किल्ल्याच्या संरक्षणाचा भार आपले विश्वासू सेनापती जयमल्ल व पट्टा



'सबात' च्या संरक्षणाखाली चितोडप्रवेश करणारी मोगल सेना साबात संरक्षक मंडप



**रामपाल द्वार, चितोडगड**

याच्यावर सोपवला व तो स्वत: अरवली पर्वत आश्रयाने राहू लागला.

जयमलच्या नेतृत्वाखाली त्याचे सैनिक मोठ्या वीर लढले. मोगलसेना त्यामुळे पुढे सरकू शकली नाही. महिन्यांच्या वेढ्यानन्तर अचानक एक दिवस च अुडालेल्या तोफेच्या गोळ्यामुळे जयमल जबर ज झाला. त्याच्या मृत्युमुळे रजपूत निराश झाले. त्यांच स्थितीचा फायदा घेअून मोगल सेनेने किल्ला जिंकल

किल्ला तर पडला; परन्तु अुदयसिंह मोगलांना जायला तयार नव्हता. त्याचा पुत्र राणा प्रताप व त्य साथीदारांनी तर अशी कठोर प्रतिज्ञा केली की, 'चि पुन्हा जिंकून घेईपर्यन्त आम्ही कोणत्याही प्रकारचे अुपभोगणार नाही.'

अशी प्रतिज्ञा करणाऱ्यांच्यात काही लोहारही त्यांनी अशी शपथ घेतली की, 'किल्ल्यात पुन्हा ठेवीपर्यन्त आम्ही आमच्या गाड्यातूनच राहू.'

दिवसापासून हे लोहार आपापल्या बैलगाडीत राहून भटके जीवन जगू लागले. त्यांना 'गाडिया-लोहार' असे म्हणले जाई. १९५५ मधे समारंभपूर्वक त्यांना किल्ल्यात घेअून जाईपर्यन्त ४०० वर्षे ते असेच भटके जीवन जगत राहिले. अन् आपली प्रतिज्ञा पार पाडत राहिले.

अुदयपुरच्या जवळच राणा कुंभाने १४८५ मधे कुंभलगड बांधला. याचा भक्कम तट आसपासच्या अनेक टेकड्यांवरून गेलेला आहे. सात मीटर रुंदीच्या तटाच्या भिंतीवरून एकाच वेळी आठ घोडेस्वार आपले घोडे दौडत नेअू शकतात. या किल्ल्यावर अनेकदा हल्ले झाले. परन्तु फक्त अकबरच तो केवळ काही काळापुरताच



**कुंभलगडचा तट**



जिंकू शकला.

रणतंभोर किल्ला ११९२ मधे बांधण्ट आला. या किल्ल्यानेही सात टेकड्या जोड आहेत. भरतपुर, आग्रा, जयपुर, चितो ग्वाल्हेर या सर्व प्रमुख किल्ल्यापासून सारख्याच अंतरावर असून दऱ्या, घळी आ दाट अरण्याने वेढला असल्यामुळे हल्लेखोर तेथे पोचायलाच फार त्रास होई.

१२०९ व १५६९ च्या दरम्यान किल्ल्यावर एकूण तेरा वेळा हल्ले केले गे

**(डावीकडील) रणतंभोरवर (अुजवीकडे) तात्पुरत्या बांधलेल्या तटाआडून हल्ला करणारे मोगल सैनिक**

हमीरदेवच्या काळात अल्लाअुद्दीन खिलजीच्या एका सेनापतीच्या विनंतीवरून त्याला येथे आश्रय दिला गेला होत याने खिलजीविरुद्ध बंड केले असल्याने अल्लाअुद्दीन खिलजीच्या सैन्याने किल्ल्याला वेढा दिला, परन्तु तो कि ताब्यात घेअू शकला नाही. नन्तर तेथून तो पळून गेला.

१३०९ मधे पुन्हा जेव्हा हल्ला झाला, तेव्हा खिलजीने स्वत: जबाबदारी अंगावर घेतली. यावेळी हमीर देव मन्त्र्यांनी फितुरी केली. त्यांच्या कारस्थानामुळे खिलजीने लढाई जिंकली. युद्धात हमीरचा मृत्यु ओढवला. त्या

शूर व साहसी सेनापतीला महम्मदशहाला शत्रूने पकडले व त्याचा वध केला.

१९६८ मधे अकबरने या किल्ल्यावर हल्ला केला. किल्ल्याचा तट फोडण्यासाठी दोनशे बैलांनी मोठमोठ्या तोफा ओढून आणल्या. हल्ला बरेच दिवस चालू राहिला, पण किल्ला हाती येण्याचे चिन्ह दिसेना. शेवटी अकबरने अंबरचा राजा भगवान् दास याला रणतंभोरचा राजा राव सुरजन हाडा याच्याकडे तहाची बोलणी करण्यासाठी पाठवले. तहाच्या अटी ठरून त्यावर उभयपक्षांनी शिक्कामोर्तब केले व पुन्हा त्या प्रदेशात शांती नान्दू लागली.

या किल्ल्याभोवतीचे अरण्य आता वाघांसाठी अभयारण्य बनवले गेले आहे.

मारवाडची राजधानी मंडेर ही होती. परन्तु पंधराव्या शतकात राठोड प्रमुख राव जोधा याने ती नऊ मैल पुढे असणाऱ्या टेकडीवर न्यायचे ठरवले. त्याने स्वत:च्या नावे 'जोधपुर' नावाच्या एका शहराची स्थापना करून तेथे मेहरनगड नावाचा किल्ला बांधला.

प्रान्तातल्या इतर किल्ल्यांप्रमाणे या किल्ल्यावर मोगल व अफगाणांनी हल्ले केलेच; पण त्याहीपेक्षा जास्त हल्ले अन्य रजपूत राजे व सेनापती यांनीच केले.

या किल्ल्यात किलकिला, शंभुबाण व गाजीखान नावाच्या तोफा उत्तम स्थितीत सुरक्षित ठेवलेल्या आहेत.



मेहरनगड, जोधपुर





# सोमची बडबड

सोमची स्वत:ची अशी काही मालमत्ता नव्हती, पण गावात त्याचे नातेवाईक मात्र होते. याच आधारे तो स्वत:ला 'मोठा माणूस' समजे. जे तोंडी येईल, ते बोले. त्याचा मेहुणा त्याला खूप सांगे, पण पालथ्या घड्यावर पाणी!

सोमच्या घरामागे एक विहीर होती. एकदा पाय घसरून आत पडता पडता, पेरूच्या झाडाला धरल्यामुळे तो कसाबसा वाचला. पण या प्रयत्नात त्याचा पाय लचकलाच. त्याची बायको सावित्री हे सारे पहात होती. तिला एकदम हसू फुटले.

बायकोचे हसणे पाहून सोम एकदम उखडलाच, "इकडे तुझा नवरा दु:खानं विव्हळतोय, अन तू खुशाल हसते आहेस? असं जगण्यापेक्षा एकाद्या विहिरीत उडी मारून जीव दे ना!"

यावर काहीही न बोलता सावित्री हसतच तेथून निघून गेली.

पाय लचकल्यामुळे सोमला चालायला त्रास होत होता. कसा तरी लंगडत तो दरवाजापर्यन्त पोचला. इतक्यात पाठीमागून येणारा त्याचा मेहुणा रामू म्हणाला, "काय जीजाजी! विहिरीपासून दरवाजापर्यन्त पोचायला इतका वेळ लावलात?"

"ओहो! म्हणजे इथेच इतका वेळ उभा राहून तू माझी गंमत बघत होतास? जरा मदतीला तरी यायचं होतंस!" सोम म्हणाला.

"पण तुमचं उचकत उचकत चालणं छान वाटत होतं मला! ते पहाता पहाता स्वत:लाच विसरून गेलो मी." रामू हसत उत्तरला.

"मी तुझ्याहून मोठा आहे याचं काही भान आहे का तुला? असलं जिणं जगण्यापेक्षा एकाद्या विहिरीत जीव दे ना!" सोम बोलला.

रामूही हसत हसत तेथून निघून गेला.

वसंत पवार



सोम हळूहळू घरात शिरला अन् त्याने बोळाच्या बाजूचा दरवाजा अुघडला. इतक्यात एक भिकारी लंगडत तेथे आला, अन् ''साहेब, लंगडा आहे मी, चार पैसे भीक द्या ना!'' असे म्हणत भीक मागू लागला.

मोठ्या कष्टाने पुढे येत सोम त्याला म्हणाला, ''मी सुद्धा लंगडतोय बघ! पण मी काय भीक मागतोय तुझ्यासारखा?''

''तुम्हाला गरज नाही, म्हणून भीक मागत नाही आहात. पण आता लंगडे झाला आहात, तेव्हा दोन-चार घरी मागून पहा न भीक. किती त्रास असतो त्यात, हे तरी कळेल!'' भिकारी बोलला.

आता मात्र रागाने लाल होत सोम गरजला, ''बदमाश कुठला! एकाद्या घाणेरड्या विहिरीत पडून मर ना!'' हे ऐकून भिकारी हसत निघून गेला.

सोम बाहेर येअून लंगडत लंगडत समोरच्या पारावर जाअून बसला. तेथे चार-पांच खोडकर पोरे खेळत होती. दिवसातून एकदा तरी या पोरांची गोटी सोमला लागत असे अन् तो त्यांना रागावत असे. रोजच चाले असे.

पण त्या दिवशी मात्र ती मुले एक नवाच खेळ खेळत होती. नीट पाहिले, तेंव्हा लक्षात आले की, एक मुलगा डोळे मिटून घेअून आंधळ्याचे सोंग करत होता; दुसरा कानावर हात ठेवून बहिरा बनला होता; तिसरा एकदम मुका बनून विचित्रसे आवाज काढत होता. आणखी एकजण लंगडा असल्यासारखा पाय अुचलून अुचलून टाकत होता, अन् तो म्हणाला, ''तुमची नावं काय काय आहेत ते मला माहीत नाही, पण माझं नाव आहे सोम.''

ते ऐकल्याबरोबर बाकी सारेजण खो खो हसू लागले. तो खरोखरीच अगदी हुबेहूब सोमसारखाच लंगडत होती. इतक्यात आंधळा बनलेल्या मुलाने डोळे अुघडले.

आता मात्र सोमला हे सहन होईना. त्याने मुलांना शिव्या द्यायला सुरुवात केली. त्याबरोबर ती तेथून पळून गेली.

इतक्यात तेथे एक अनोळखी माणूस आला. त्याला काही विचारण्यापूर्वी तो सांगू लागला, ''मी सीतारामपंतांकडे नव्यानेच नोकरीला लागलोय. सोम म्हणून कोणी इथे रहातात, त्यांना काही सांगायला आलोय मी.''

''मीच तो सोम, बोल काय काम आहे?'' सोमने विचारले.

''हं! नुसत तुम्ही सांगून मी थोडाच विश्वास ठेवीन ? जरा चालून दाखवा बरं! चार मुलं मला सांगत होती की, सोम लंगडत चालतात. मला जे काही सांगायचंय, ते सोमशिवाय इतर कुणाला सांगू नको, असं मालकांनी बजावलंय मला.'' नोकर अुत्तरला.

''मी, अन् चालून दाखवू तुला? एकाद्या कोरड्या आडात अुडी मार ना!'' असे म्हणत सोमने त्याला शिव्यांची लाखोली वाहिली.

शिव्यांचा वर्षाव थांबल्यावर नोकर म्हणाला, ''या गावात शिव्या देण्यात तुमचा नंबर पहिला आहे, असं मालक सांगत होते. तुम्हीच सोम आहात, असा आता माझा विश्वास बसलाय. चालून दाखवायची गरज नाही. मालकांनी ताबडतोब तुम्हाला नव्या घरी बोलवलंय.''

कुरकुरत सोमने विचारले, ''हे नवं घर कुठे आहे?''

''इथून चार घर टाकली, की एक गल्ली येईल. त्या गल्लीत एक सोम नावाचा कुत्रा आहे; त्याला ओलांडलं, की अुजवीकडे एक बोळ आहे. तिथे एक बैल सोम रहातो. तिथे लिंबाचं झाड असलेलं एक घर आहे. या





घराच्या बाजूला एक गल्ली आहे. या गल्लीत एक सोम नावाचा रेडा आहे. या सोम रेड्याला जिथे बांधून ठेवलंय, त्याच्याच बरोबर समोर हे नवं घर आहे.'' नोकराने सगळी माहिती दिली.

हे ऐकल्यावर तर सोमचा स्वतःवर ताबाच राहिला नाही. गरजत तो म्हणाला, ''शेपुटवाल्या माकडा, वटवाघळाचे डोळेवाल्या, गाढवाचे लांब कानवाल्या, तुझं इतकं धाडस? इतका गर्व झालाय तुला? स्वतःला समजतोयस काय तू? जनावरांबरोबर माझं नाव जोडतोयस तू? इतकी हिंमत तुझी?'' अन् मग पुन्हा तो शिव्या बरसत राहिला.

जेव्हा हा वर्षाव थांबला, तेव्हा नोकर म्हणाला, ''मी काहीच चुकीचं सांगितलं नाही सोमसाहेब! मी आत्ता ज्या ज्या प्राण्यांची नावं घेतली, त्या सर्वांचा एक पाय लंगडा आहे पहा !'' अन् तो निघून गेला.

सोमला सीतारामबद्दल फार आदर वाटे, म्हणून चालायला कष्ट पडले, तरी तो सीतारामच्या घरी पोचला. रस्त्यात लंगडा कुत्रा, लंगडा बैल, अन् लंगडा रेडा पाहून त्याला मनातल्या मनात फार राग आला.

नव्या घरात पाय ठेवल्याबरोबर सीतारामने सोमचे मोठ्या प्रेमाने स्वागत केले. सोमने त्याला विचारले, ''तू इथे या घरात कसा? हे तर नारायणचं घर आहे ना?''

सीताराम म्हणाला, ''हो, घर तर नारायणचंच आहे. पण तो कुठे दूरगावी गेलाय; अन् जाता जाता किल्ली मला देऊन म्हणाला की, गरज पडली तर माझं घर वापर. कालच माझे काका सहकुटुम्ब इथे आलेत, म्हणून त्यांना या घरात मुक्कामाला ठेवलंय. माझ्या काकांच्या नातीला-गौरीला-अचानक काय झालंय कुणास ठाऊक? कशालाशी घाबरलीय ती; अन् तेव्हापासून नुसती डोळे फाडफाडून एकटक पहात राहिलीय. आम्हाला कोणाला ओळखत नाहीय, अन् काही बोललं, तर ऐकूनही घेत नाहीय ती! वैद्य म्हणाला की, ती एकदा चांगली हसली तर एकदम बरी होऊन जाईल ती. आम्ही खूप प्रयत्न केले, पण तिला कोणी हसवू शकलो नाही. या कामासाठीच मी बोलावून घेतलंय तुला.''

''तुम्हा लोकांना जमलं नाही, ते काम मला तरी कसं जमेल?'' आश्चर्य प्रकट करत सोमने विचारले.

''का बरं नाही जमणार? मी ऐकलंय की आज तू लंगडतो आहेस. अन् लचकत चालतोयस. तुझं चालणं बघून सगळे जण आपोआप हसू लागलेयत. सारं गाव बोलतंय असं. मग एकदा या आमच्या गौरीसमोर चालून दाखव नं!'' सीतारामने विनंती केली.

सीतारामच्या या बोलण्याने सोमची चीड वाढलीच. त्याने सीतारामला पोटभर शिव्या देऊन घेतल्या. तरी मन हलके न झाल्याने त्याने गौरीला हातात अुचलले आणि म्हणू लागला, ''काय ग माकडतोंडे! टिचभरही वाढली नाहीयेस अन् तुला चेष्टा करायला सुचतेय होय ? माझी गंमत करू पहाते आहेस? जा जाऊन माकडांच्या टोळीत बस !'' जराही मधे न थांबता तो बडबडतच राहिला.

झाले गौरीला एकदम हसू फुटले ! हसणे थांबता थांबता ती नेहमीच्या स्थितीतही आली. या बदललेल्या गौरीला पाहून सोमही आश्चर्यचकित झाला. सुधारलेल्या अन् तब्येत ठीक झालेल्या गौरीला पाहून सर्वजण सोमचीही स्तुती करू लागले.

सोम म्हणाला, ''म्हणजे पोरीच्या आजाराची गोष्ट खरीच? मला तर वाटलं होतं की माझी चेष्टा करण्यासाठी तुम्ही माझ्याशी खेळत आहात! अरे, मी तर आपला पाय लचकल्यमुळे लंगडत होतो. अन् माझं हे चालणंच तुम्हाला विनोदाचा विषय झाला होय?''

सीताराम हसून म्हणाला, ''या स्थितीबद्दल तर सर्वांना सहानुभूती वाटेल तुझ्याबद्दल! पण तुझ्या या शिव्या आहेत नं, त्यामुळेच हसू येतं सर्वांना ! गौरीचंच पहा नं. तुझ्या शिव्या ऐकूनच हसू आलं तिला!''

आपली निरर्थक बडबड दुसऱ्यांच्या विनोदाचा विषय बनली, हे पाहून सोमला लाज वाटली, अन् त्या दिवसापासून तो शान्त झाला.





# वैद्याची निवड

**ल**क्ष्मीपुरचा जमीनदार सूर्यभूपती हा फार दयाळू व धर्मात्मा होता. आसपासच्या जवळजवळ शंभर गावांवर त्याचेच आधिपत्य होते. त्या सर्व गावात लक्ष्मीपुरच सर्वात मोठे होते. सूर्यभूपतीच्या पणजोबांच्या पित्याने (खापर पणजोबांनी) त्या गावात एक रुग्णालय बांधले होते. सूर्यभूपतीच्या काळापर्यन्त आसपासच्या गावचे लोक ही रोगचिकित्सेसाठी तेथे येऊ लागले होते. याचे कारण म्हणजे या रुग्णालयाचे वैद्य नीलकण्ठशास्त्री.

असे हे सुप्रसिद्ध नीलकण्ठशास्त्री वृद्धावस्थेमुळे दिवंगत झाले. जनतेला व भूपतीला ही त्यामुळे फार दुःख झाले. काही लोकांनी भूपतीला असा सल्ला दिला की, शास्त्रींच्या चार प्रमुख शिष्यांपैकी एकाची त्यांच्या जागी निवड करावी. सूर्यभूपतीने ही कामगिरी आपला निकटवर्ती मित्र चन्द्रवर्मा याच्यावर सोपवली अन् म्हटले, ''तू स्वतः ही समस्या सोडव.''

चन्द्रवर्मा त्याला म्हणाला, ''ठीक आहे. मग त्या चारही शिष्यांना अुद्या सकाळी बरोबर आठ वाजता कचेरीत हजर रहाण्यासाठी निरोप पाठव. त्यांच्यात जो जास्त हुशार असेल त्याची निवड करायची जबाबदारी अुचलतो मी.'' या बरोबरच त्याने भूपतीला आणखीही एक गुप्त सूचना दिली.

सूर्यभूपतीने मित्राच्या सांगण्यानुसार त्या चारीजणांना निरोप पाठवला. तेही अशा निरोपाची वाटच पहात होते, त्यामुळे दुसऱ्या दिवशी आठ वाजण्यापूर्वीच ते कचेरीत हजर झाले.

तेथील नोकरांनी त्यांना आदरपूर्वक बसवून घेअून म्हटले, ''काही अत्यावश्यक कामात् गुंतले आहेत जमीनदार. तुम्हाला त्यांची जरा वाट पहावी लागेल.''

परन्तु जमीनदार बराच वेळपर्यन्त आलेच नाहीत. अकरा वाजल्यानन्तर सूर्यभूपती आणि चन्द्रवर्मा दोघे मिळूनच तेथे पोचले. ते आल्याबरोबर हे चार शिष्य ताबडतोब अुठून अुभे राहिले व त्यांनी दोघांना नमस्कार केला. दोघांनी त्या चारीजणांकडे एकदा निरखून पाहिले अन् त्यांना बसायला सांगितले. नंतर सूर्यभूपति व चन्द्रवर्माही समोर बसले.

**शांता गायकवाड**

दोघांपैकी कोणालाही वैद्यकशास्त्राबद्दल थोडी सुद्धा माहिती नव्हती. परीक्षा कशी घ्यावी हे ही त्यांना काही कळत नव्हते. इतक्यात एक नोकर पाण्याने अर्धी भरलेली एक काचेची सुरई घेअून तेथे आला. त्याने सुरई जमीनदारासमोर ठेवली.



नोकर गेल्याबरोबर चन्द्रवर्मा म्हणाला, ''मी तुम्हाला तीन प्रश्न विचारणार आहे. एकेकाने अुत्तरे द्यावी.'' अन् जयन्त नावाच्या शिष्याला खूण करून जवळ बोलवले.

जयन्त आल्याबरोबर सुरईकडे निर्देश करत चन्द्रवर्माने त्याला विचारले, ''जयन्त याच्याबद्दल एका वाक्यात काय सांगशील?''

जयन्तला वाटले होते की प्रश्न वैद्यकशास्त्रासंबंधी विचारला जाईल. या असल्या प्रश्नाची त्याला अपेक्षा नव्हती. तरीही तो म्हणाला, ''या सुरईत अर्धं पाणी आहे.'' आपली नाराजी झाकत चन्द्रवर्माने पाने झडलेला एक वृक्ष दाखवत त्याला म्हटले, ''या झाडाबद्दलही एक वाक्य बोल.''

चिडत जयन्त अुत्तरला, ''ऋतुमाना प्रमाणे याची पान झडत आहेत.''

यावर चन्द्रवर्मा म्हणाला, ''आता माझा तिसरा प्रश्न असा की, हे तीन प्रश्न मी तुला का विचारले?''

हा प्रश्न ऐकून जयन्त दचकलाच. त्याने काहीतरी गुळमुळीत अुत्तर तर दिले. पण ते कोणाला ऐकूही गेले नाही.

आता चन्द्रवर्मा हसला अन् त्याने जयन्तला बसायला सांगितले. अन् नन्तर बाकीच्या तिघांना एकएक करून बोलावले. नरेन्द्र आणि मोहनने जवळजवळ जयन्तसारखीच अुत्तरे दिली; शब्दात काय थोडा फरक असेल तेवढाच. शेवटी ललितची पाळी आली. तो अुत्तरला, ''ही सुरई अर्धीच भरलीय ती पूर्ण भरणं सोपं

आहे.'' त्याच्या अुत्तरावर खुश झालेल्या सूर्यभूपतीच्या तोंडून 'शाबास' शब्द आपोआपच बाहेर पडला. त्याने त्याच्या पाठीवर हात ठेवला.

नन्तर वृक्षाकडे पाहून ललित म्हणाला, ''शिशिर ऋतु चालू असल्याने आत्ता याची पानं झडली आहेत खरी; पण हेमन्त सुरू होताच तो पुन्हा नव्या पालवीने झाकून जाईल, अन् सुंदर दिसू लागेल.'' तेव्हा चन्द्रवर्मा त्याला म्हणाला, ''आमच्या शेवटच्या प्रश्नाचंही अुत्तर दे अन् आपल्या मित्रांनाही ऐकव.''

ललित नम्रतापूर्वक म्हणाला, ''वैद्यकशास्त्रातला मनोविज्ञान हा एक श्रेष्ठ भाग आहे. माणसाला जेव्हा एकादा रोग होतो, तेव्हा त्याचं मनोबल कमी झालेलं असतं. अशा वेळी आशादायक गोड शब्दात बोलून त्याचं मनोबल पूर्वस्थितीत आणणं, हे वैद्याचं कर्तव्य असतं. मगच वैद्यानं दिलेली औषध अमृतासारखी काम करतात, व रोगी बरा होतो. अन्यथा चांगल्या चांगल्या औषधांचा ही रोग्यावर काही परिणाम होत नाही. कुशल वैद्याला रोग्याचं मन जाणणं फार महत्त्वाचं आहे. हा मनोविज्ञानाचा भाग लक्षात घेऊनच तुम्ही आम्हाला सुरई आणि वृक्षाबद्दलचे प्रश्न केलेत.''

चन्द्रवर्मा हसत म्हणाला, ''ललित, तू नीलकंठशास्त्रींचा योग्य शिष्य आहेस, हे सिद्ध केलंस बघ. हां, पण एक गोष्ट सांगतो - वैद्याकडे जे रोगी येतात, त्यांच्याशी वैद्यानं जसं गोड बोलून त्याला धीर देणं आवश्यक असतं, त्याहीपेक्षा वैद्याला स्वतःजवळ सहनशक्ती असणं आवश्यक असतं.''

ललितच्या लक्षात आले की चन्द्रवर्माने आपले अुदाहरण समोर ठेवूनच ही गोष्ट काढलीय; कारण चार तास वाट पहाताना इतर तिघांबरोबर तो स्वतःही नाराज झाला होता.

आपली चूक लक्षात घेऊन तो म्हणाला, ''रोगचिकित्सा करता करता मी आपली सहनशक्तीही वाढवीन.'' चन्द्रवर्माची निवड जमीनदार सूर्यभूपतीलाही खूप पसन्त पडली. तो वैद्य ललित व मित्र चन्द्रवर्मा यांच्याकडे समाधानाने पाहू लागला.





# महाभारत

माझे तुझ्यावर मन बसले असून तुझ्याशी विवाह करायची माझी इच्छा आहे - असे हिडिंबेने सांगितल्यावर भीम तिला म्हणाला, ''हे कसं शक्य आहे? तुझ्याशी विवाह करून मी या सर्वांचा बळी देऊ की काय?''

यावर हिडिंबा म्हणाली, ''मी तुझी आई अन् भावांचं माझ्या भावापासून रक्षण करीन. तू या सर्वांना जागं कर.''

''हे तर सगळेजण शान्त झोपले आहेत. त्यांना अुठवणं बरं नाही वाटत मला. राहता राहिली तुझ्या भावाची गोष्ट. मी कोणत्याही राक्षसाला भीत नाही. कोणालाही मारून टाकायची शक्ति आहे माझ्या अंगात.'' भीम आत्मविश्वासाने म्हणाला.

'बराच वेळ झाला तरी आपली बहीण माणसांना पकडून घेऊन आली नाही' असे पाहून, इकडे हिडिंब झाडावरून अुतरला अन् पांडवांच्या दिशेने येऊ लागला. आपल्या रागावलेल्या भावाला पाहून हिडिंबा भीमाला म्हणाली, ''माझा भाऊ यमासारखा इकडे यायला निघाला आहे. आता तुम्हा लोकांचं इथं असणं योग्य नव्हे. मी तुम्हा सर्वांना आकाशमार्गानं एकाद्या सुरक्षित ठिकाणी पोचवते, चला.''

''राक्षसी, याला भ्यायचं काही कारण नाही. तुझ्या भावाचं मरण जवळ आलेलं दिसतंय; म्हणूनच तो इकडे यायचं धाडस करतो आहे. एकटा हाच काय, पण याचे सारे बंधु चालून आले तरी मी एकटा त्या सर्वांना यमसदनास पाठवीन. तूही पहात रहा, मी ते

**हिडिंबा**



काम कसं सहज करून टाकतो ते!'' भीम तिला म्हणाला.

''पण मला तर भीतीच वाटतेय. माझ्या भावानं आजपर्यंत कित्येक बलवानांना मारून टाकलेलं आहे. म्हणूनच मी तुला सावधगिरीची सूचना देत आहे. पुढे तुझी मर्जी!'' हिडिंबेने तरीही भय व्यक्त करत म्हटले.

आता हिडिंब अगदीच जवळ आला. सुंदर वस्त्रे नेसून सजलेली आपली बहीण पाहून त्याच्या मनात आले, ''बाई साहेबांना प्रेमरोग झालेला दिसतोय!'' रागाने डोळे लाल करत अन् विकट हसत तो तिला म्हणाला, ''अग ए हिडिंबे! मी तिकडे भुकेनं मरतो आहे, अन् तू? तू कोणाला तरी आपल्या मोहपाशात गुंतवण्याच्या विचारात दिसतेयस? का ग? आपला राक्षस वंश सोडून तू मनुष्य प्राण्याशी संबंध जोडू पहाते आहेस? माझ्याच विरुद्ध जाऊ पहातेस? थांब, या लोकांना मारून मी तुला ही मारून टाकतो बघ!'' अन् असे बोलत तो भीमाकडे वळला.

भीम त्याला म्हणाला, ''अरे अधम राक्षसा! तुलाच मारून टाकून मी या वनातला त्रास दूर करतो बघ.''

हिडिंब हात पसरून भीमाच्या जवळ गेला. भीमाने त्याला मोठ्या हुशारीने अन् चपळाईने पकडले अन् त्याला धरून तो दूर घेऊन गेला. इतक्यात स्वतःला सोडवून घेऊन हिडिंब राक्षसाने भीमाला छातीशी घट्ट आवळले व तो जोराने ओरडला.

त्याच्या ओरडण्याने आपले भाऊ जागे होऊ नयेत, म्हणून त्याच्या आलिंगनातून आपली सुटका करून भीम त्याला आणखी दूर घेऊन गेला. हिडिंब राक्षसाने आता ओळखले, की भीम काही कोणी सामान्य माणूस नव्हे; चांगलाच बलिष्ट अन् मजबूत शरीराचा आहे. त्याने आपले बळ द्विगुणित केले अन् तो भीमाशी भिडला.

दोघांनी युद्धाला सुरुवात केली, तेव्हा भूमी कापू लागली. झाडे-झुडुपे, लता-वेली तुटून पडल्या. कुन्ती व अन्य पांडवही जागे झाले. श्रृंगार केलेल्या, सजलेल्या, जवळच उभ्या असलेल्या हिडिंबेला पाहून कुंतीने हळूच विचारले, ''मुली, तू कोणी अप्सरा असावीस असं वाटतंय, कोण आहेस तू? कुठे जात होतीस? इथे कशी आलीस? आपली माहिती सांग बरं!''

हिडिंबेने सर्व काही खरेखुरे सांगून टाकले. ती म्हणाली, ''माते, मी अन् माझा हा राक्षस भाऊ हिडिंब याच अरण्यात रहात असतो. त्याला तुम्हा सर्वांना खाऊन टाकायचं मनात होतं. त्यानं मला तुम्हाला घेऊन यायला फर्मावलं होतं. पण इथे पोचल्यावर मी तुमच्या पुत्रावर मोहित झाले. म्हणून मी आपल्या भावाची आज्ञा मानली नाही. मी आपल्या मनची इच्छा तुमच्या मुलाजवळही प्रकट केली, आणि इतक्यात माझा भाऊही इथे येऊन पोचला. तुमचा मुलगा त्याला जरा दूर खेचून घेऊन गेला आहे. आता त्या दोघात घनघोर युद्ध जुंपलं आहे.''

हिडिंबेचे बोलणे ऐकून धर्मराज, अर्जुन, नकुल व सहदेव उठले व युद्ध चालू असलेल्या ठिकाणी पोचले. भीम व हिडिंब हे दोघेही दोन सिंहांसारखे गरजत होते व एकमेकांशी लढत होते. दोघे ही धुळीने माखले होते. अर्जुनाच्या लक्षात आले की हिडिंबची सरशी होत आहे. तेव्हा तो म्हणाला, ''भीमसेन, तू दमला असशील तर थोडा वेळ मी याच्याशी युद्ध करतो.''

''अर्जुना, तू मुळीच गडबड करू नकोस. हा मला शरण आणील, अशी चुकीची कल्पना करून घेऊ नकोस. एकदा आता तो माझ्या तावडीत सापडलाच आहे, तेव्हा आता तो कसा सुटेल हे पहातोच ना मी!'' भीम त्याला आश्वासन देत म्हणाला.

''तर मग लवकर संपवून टाक त्याला.





आपण इथे अधिक वेळ घालवणं अुचित नव्हे. आता सूर्यास्त ही होईल. संध्याकाळ होता होता राक्षसांचं बळ वाढत जातं. याच्याशी खेळण्यात जास्त वेळ घालवू नकोस. जरूर तर मीच आपल्या बाणानं याचं मस्तक धडावेगळं करून टाकतो.'' अर्जुनाने पुन्हा एक इशारा दिला.

अर्जुनाच्या या बोलण्याने भीमाला अधिकच चेव आला अन् त्याने हिडिंबला अुचलून गरागरा खूप फिरवले अन् एकदम जमिनीवर आपटून त्याची कंबर मोडून टाकली. नंतर तो त्याच्या एकेका अवयवाला पीडा देअू लागला. शेवटी जोराने हाहाःकार करत हिडिंबने प्राण सोडला.

कुन्ती व अन्य बंधूंनी भीमाचे अभिनन्दन केले. अर्जुन त्याची खूप प्रशंसा करून म्हणाला, ''दूर एक गाव दिसतंय. आपण आता लवकर तिथे पोचणं बरं. दुर्योधनाच्या गुप्त हेरांना आपला पत्ता लागायला नको.''

कुन्तीला घेअून सर्वजण तेथून वेगाने निघाले. हिडिंबाही त्यांच्या बरोबरच निघाली, ''या मोहिनी रूपात येअून आपल्या भावाच्या वधाचा सूड घ्यायचा विचार आहे काय तुझा? यासाठीच तू आमच्याबरोबर निघाली आहेस का? चल चालती हो. नाहीतर तुलाही मृत्युलोकात पाठवीन बघ.'' भीम म्हणाला.

धर्मराजाने भीमाचा हा रोख पाहून म्हटले, ''भीमा, अरे असं काय बोलतोस? एका स्त्रीला मारायची धमकी देतोस? तिचा आपल्यावर राग असला, तरी असू दे. ही आपलं काय वाकडं करू शकेल? हिडिंबला मारून तू चांगलं कृत्य केलंयस. पण ही केवळ त्याची बहीण आहे, या कारणासाठी तू तिलाही मारणार? असं करणं अनुचित आहे.''

हिडिंबेने धर्मराज व कुन्तीला पदस्पर्श करून नमस्कार केला व म्हटले, ''राक्षसधर्म अन् प्रवृत्ती सोडून मी मनापासून मोठ्या आशेनं याच्यावर प्रेम केलंय. ते जर त्यांनी ठोकरलं, तर मी आत्महत्या करीन. आपण माझं रक्षण करून आपला धर्म पाळावा. तुमच्यावर काही संकट आलं, तर मला फक्त इशारा करा. मी पळभरात तुम्हा सर्वांना हे जंगल पार करून पोचवीन.''

धर्मराज तिला म्हणाला, ''माझा तुझ्या



बोलण्यावर विश्वास बसलाय. हा भीम तुझा नक्की स्वीकार करील. तुम्ही दोघं दिवस भर हवे तसे एकत्र रहा. पण रात्री मात्र त्याला आम्ही असल्या ठिकाणी पोचवत जा.''

हिडिंबेने ते मोठ्या आनन्दाने कबूल केले. ती माता बनेपर्यन्त या प्रकारे तिच्याबरोबर पती बनून रहाण्याचे भीमाने ही कबूल केले. हिडिंबा भीमाला आकाशमार्गाने उडत दूर घेऊन गेली व यानंतर दोघे पर्वत शिखरांवर, पहाडी गुहांमधे, नदीतटावर व सुंदर झाडीत आनन्दाने जीवन घालवत राहिले. आपल्या ऐहिक इच्छा पूर्ण करून कालक्रमानुसार हिडिंबा गर्भवती झाली. तिने एका पुत्राला जन्म दिला. जन्मताच मोठा होऊन हा पुत्र आपल्या मातापित्यांना नमस्कार करून उठून उभा राहिला. त्याच्या डोक्यावर एक ही केस नव्हता; डोके एखाद्या घटासारखे तुळतुळीत होते. हिडिंबेला याचे फार आश्चर्य वाटले, अन् तिने त्याचे नाव ठेवले 'घटोत्कच'! (उत्कच घट = केशरहित घट)

आपल्या मातापित्यांसमोर गुडघे टेकून बसत घटोत्कच म्हणाला, ''माझी जरूर भासेल तेव्हा माझं नुसतं स्मरण करा. मी तावडतोब तुमच्या समोर हजर होईन.'' अन् तो उत्तरेकडे निघून गेला. हिडिंबाही ठरलेल्या अटीप्रमाणे भीमाचा निरोप घेऊन निघून गेली.

पांडव वल्कले नेसले अन् ब्राह्मणकुमारांच्या वेषात ते त्रिगति, पांचाल व कीचक असे देश फिरत खूप दूर निघून गेले.

ही यात्रा करत असतानाच त्यांना एका ठिकाणी व्यास भेटले. सर्वांनी त्यांना सविनय नमस्कार केला अन् दीनवदनाने त्यांच्या समोर ते उभे राहिले. व्यास म्हणाले, ''तुम्ही पांडव व कौरव सर्वजण माझ्या दृष्टीने समानच आहात. परन्तु लोकांनी तुमच्याशी अन्याय केलेला आहे. इतक्या लहान वयात तुम्हाला या स्थितीत पाहून मला तुमची फार दया येत आहे. पण या कष्टांमुळे तुम्ही दुःखी होऊ नका. इथून जवळ एकचक्रपुर नावाची नगरी आहे. तो मोठा सुंदर व आरोग्यसम्पन्न प्रदेश आहे. आपले खरे स्वरूप लपवून काही काळासाठी तुम्ही तिथेच रहा. तुम्ही पांडव आहात, हे मात्र कोणाला कळू देऊ नका.''

व्यास स्वतःच त्यांना एकचक्रपुरात घेऊन गेले अन् एका ब्राह्मणाच्या घरात त्यांची रहायची सोय करून दिली. कुन्तीला ते म्हणाले, ''मुली, एक महिना तुम्ही सर्वजण इथेच रहा. मी पुन्हा येऊन तुम्हाला भेटेन.'' नंतर ते तेथून निघून गेले.

कुन्ती व पांडव त्या ब्राह्मणाच्या घरात राहून दिवस घालवू लागले. ते सर्वांशी मिळूनमिसळून वागत आणि भिक्षा मागून जे मिळे त्यातून आपला उदरनिर्वाह करत. पाचीजणांनी आणलेल्या भोजन पदार्थांचे कुन्ती दोन भाग करी. एक भाग भीमाला खायला देऊन बाकीचा भाग पाचजण मिळून खात. याच भागातून काही पदार्थ ती अतिथींनाही देई. भिक्षा मागून पोट भरत असताना पांडव वेदाध्ययनही करीत. तलावात पोहून झाडांच्या सावलीत आराम करत. अशा तऱ्हेने ते आपले जीवन सुखमय करत असत.

एके दिवशी धर्मराज, अर्जुन, नकुल व सहदेव भिक्षा मागण्यासाठी नगरात गेले होते. भीम व कुन्ती घरीच होते. त्यावेळी त्या ब्राह्मणाच्या घरातून रुदनध्वनी ऐकू येऊ लागला. कुन्ती भीमाला म्हणाली, ''या घरातल्या लोकांवर काही आपत्ती आली असावी. इथे रहायला जागा देऊन या लोकांनी आपल्यावर मोठे उपकार केलेले आहेत. आपण ही बरेच दिवस इथे रहात आहोत. त्यांच्यावर कसले संकट आले आहे; ते का दुःखी आहेत ही माहिती करून घेणं हे आपलं कर्तव्य आहे. आपल्याला जमेल ते आपण त्यांच्यासाठी करू या. प्रथम मी चौकशी करून येते.'' अन् ती ब्राह्मण परिवार रहात असलेल्या भागात गेली.

तेथे पोचल्यावर कुन्तीला असे दिसले की, ते पतिपत्नी व मुलगी एकत्र बसून कळवळून रडत आहेत. मुलगा तर इतका लहान होता की, हे सारेजण का रडत आहेत, हे ही त्याला कळत नव्हते. इतर रडतात म्हणून तो ही अधून-मधून रडत होता व आलटून-पालटून आपल्या आई-बापांच्या गळ्यात मिठी मारत होता. कुन्तीही त्यांच्याजवळ जाऊन बसली. त्यांच्यावर काय आपत्ती कोसळली आहे, हे जाणून घ्यायला ती आतुर होती.

**क्रमशः**



# खरे वय

**को**दंड हा एका खेड्यातला शेतकरी होता. त्याला एका गुराख्याची गरज होता. गावातला कामकरी पुरवणारा दलाल दशरथ याला बोलावून घेऊन तो म्हणाला, ''अुन्हात अन् पावसातही गुरांना गावापासून दूर चरायला न्यावं लागेल; तेव्हा विशीच्या आतला एकादा गुराखी माझ्याकडे पाठव.''

कोदण्डने दशरथला दहा रुपये अनामत दिले. ते घेअून दशरथ म्हणाला, ''हो, हो! समजलं मला. पंधरा - सतरा वर्षांचा एकादा चपळ मुलगा घेअून येईन मी तुमच्याकडे.''

दुसऱ्या दिवशी एकजण कोदंडकडे येअून त्याला नमस्कार करत म्हमाला, ''मालक, माझं नाव आहे पिलू, दशरथरावजींनी मला तुमच्याकडे पाठवलंय.''

पिलूकडे पायापासून डोक्यापर्यन्त पहात कोदण्ड म्हणाला, ''मी तर दशरथला एकादा विशीच्या आतला पोरगा पाठवायला सांगितलं होतं. तू तर चांगला पंचवीसच्या पुढचाच वाटतोयस? गुरांच्या मागे शेतीवाडीतून अन् झाडाझुडपांमधून कसा धावू शकशील तू? त्यांना काबूत ठेवणं जमणार नाही तुला.''

पिलू ताबडतोब म्हणाला, ''असं नका म्हणू मालक? मी जरा बारीकराव आहे ना, म्हणून वय जास्त वाटतं माझं. पण मी फक्त सतरा वर्षांचाच आहे.''

क्षणभर विचार करून कोदण्ड म्हणाला, ''जा समोरच्या झोपडीत जाअून बस. सावध रहा हं? तिथे मिठाची पोती आहेत. अुन्दीर खातील मीठ एकादे वेळी!''

आश्चर्याने पिलू म्हणाला, ''असं कसं होईल मालक? 'अुन्दीर मीठ खातात' असं माझ्या तीस वर्षांच्या आयुष्यात कधीच ऐकलं नाही मी!''





# मोहाचे झाड

**अस्वलाला** मध फार आवडतो हे सर्वांना माहीतच आहे. अुत्तर भारतातील अस्वले मोहाची फुले मोठ्या आवडीने खातात. कधी कधी ती ही फुले जास्त खातात अन् एकाद्या दारुड्या सारखी झिंगून झुलत रहातात. अुत्तर भारतात मोहाची झाडे खूप आढळतात. जंगलातील लोकांना जेंव्हा तांदूळ मिळत नाही, तेंव्हा ते ही फुले खाअून आपले पोट भरतात. संध्याकाळी हे लोक झाडाखालची जागा साफ करतात. रात्री फुले अुमलतात अन् सकाळीच झडत रहातात. फुलांचा रंग पिवळा असतो. ही फुले गोळा करून ते नीट ठेवून देतात व जरूर पडेल तेव्हा कच्ची किंवा अुकडूनही खातात. असे म्हटले जाते की, अत्याचारी आदिवासींना वठणीवर आणण्यासाठी काही मराठा शासक तेथील मोहाची झाडे कापून टाकत असत.

मोहाच्या झाडाला संस्कृतमधे मधूक, गुजराथीत महुदा, हिन्दीत महुआ, तमिळमधे इलुप्पै, मल्याळीत इलूप, तेलगूत इप्पा व इंग्रजीत 'इंडियन बटर' असे म्हणतात. गंभीर साधू सारख्या दिसणाऱ्या या मोहाच्या झाडाची अुंची २० मीटर पर्यंत असते. फांद्यांच्या शेवटाला गोल आकाराची दाट, कोमल पाने असतात. फुलेही डहाळ्यांच्या टोकालाच येतात. गराने भरलेली अंड्याच्या आकाराची याची फळे हिरव्या रंगाची असतात. याचे लाकूड चांगले मजबूत असले, तरी सहसा ही झाडे कोणी तोडत नाही; कारण त्याची फुले व फळे अुपयुक्त व मौल्यवान असतात. मोहाच्या बियांपासून तेल कादले जाते व त्यापासून साबण व औषधे बनवतात. मोहाची फुले, झाडातून गळणारा डिंक, साल वगैरे औषधे बनवण्याच्या कामी येतात.



आपल्या देशातील ऋषि-मुनि : २

# विश्वामित्र

विश्वामित्राने राज्यत्याग केला व तो तपस्येत लीन झाला. तरीही अजून त्याच्या मनातला वसिष्ठांबद्दलचा द्वेष संपला नव्हता. तो त्यांच्यावर विजय मिळवू शकला नाही. मागील अंकात वसिष्ठमुनींबद्दल वाचताना आपल्याला हे कळले आहे. हळूहळू विश्वामित्राने आपल्या या कमजोरीवरच विजय मिळवला व वसिष्ठांनीच त्याला 'ब्रह्मर्षि' म्हणून संबोधित केले.

राजकुमार सत्यव्रत याला वाईट सवयी जडल्या होत्या. अत्यंत घाणेरड्या व्यसनांनी तो पछाडला होता. आपल्या पुत्राच्या या अधोगतीमुळे चिडून जाऊन त्याच्या पित्याने त्याला हद्दपार केले. राज्यातून निघून तो जंगलात पोचला. विश्वामित्र याच अरण्यात पत्नी व मुलांसह राहून तपस्या करत होता. एकदा विश्वामित्र तेथे अुपस्थित नसल्या काळात तेथे मोठा दुष्काळ पडला. त्यावेळी सत्यव्रतने त्याच्या बायकामुलांना खाऊ घालून वाचवले. एके दिवशी खायला काही मिळाले नाही, म्हणून त्याने वसिष्ठांच्या आश्रमातला एक प्राणी मारला. त्याचे थोडे मास त्याने स्वतः खाल्ले अन् बाकीचे विश्वामित्राच्या कुटुम्बाला देऊन टाकले. ही माहिती कळल्यावर क्रोधाने वसिष्ठमुनींनी सत्यव्रतला शाप दिला.

विश्वामित्र आश्रमात परतल्यावर त्यांना 'सत्यव्रतने आपल्या कुटुंबासाठी केलेल्या कष्टां' बद्दल कळले. त्यांना फार संतोष वाटला अन् दिवसें दिवस सत्यव्रतबद्दल त्यांचा आदरही वाढू लागला.

सत्यव्रतला क्षमा करून काही काळाने त्याच्या पित्याने त्याला परत बोलावून घेतले. पित्याच्या मृत्यूनन्तर तो स्वतः राजा झाला. नंतर 'आपण सशरीर स्वर्गाला जावे' अशी इच्छा सत्यव्रतच्या मनात निर्माण झाली, अन् आपले कुलगुरु वसिष्ठ यांना त्याने यासाठी आवश्यक तो यज्ञ करायची विनन्ती केली. ते असेही म्हणाले की, ''सशरीर स्वर्गी जाणे ही अशक्य गोष्ट आहे.'' पण सत्यव्रतला ते पटेना. दोघात संघर्ष इतका वाढला की, ''तू 'त्रिशंकु' होशील'' असा शाप वसिष्ठांनी त्याला दिला. (त्रिशंकु = ज्याच्या हातून तीन पापे घडली, असा.)

त्रिशंकु नन्तर विश्वामित्राकडे गेला व त्याने त्यांच्याजवळ आपली इच्छा व्यक्त केली. 'आपण वसिष्ठापेक्षा ही श्रेष्ठ आहोत' हे दाखवून देण्याची विश्वामित्राची इच्छा असल्याने त्याने ताबडतोब एक यज्ञ सुरू केला. त्या प्रभावामुळे त्रिशंकु स्वर्गद्वारापर्यन्त जाऊ शकला. पण देवांनी त्याला आत प्रवेश न देता परत खाली ढकलले. जमिनी- कडे कोसळता कोसळता सत्यव्रतने विश्वामित्राला हाका मारल्या. विश्वामित्र एकदम ओरडला, ''तू आहेस तिथेच थांब.'' पण यामुळे त्रिशंकु अधांतरी लटकू लागला. विश्वामित्राने आपल्या तपोबलाने अवकाशातच प्रतिसृष्टि निर्माण केली. या स्वर्गाचे नाव 'त्रिशंकु स्वर्ग' असे पडले. यावरून आपल्या लक्षात येईल, की तपःसमार्थ्याने काहीही मिळवता येते.

विश्वामित्राची तपस्या भंग करण्यासाठी इन्द्राने मेनका नावाच्या अप्सरेला पाठवले. तिला पाहून विश्वामित्राचे तपस्येतील लक्ष ढळले. मेनकेच्या सौन्दर्यावर भाळून त्यांनी तिच्याशी विवाह केला व काही दिवस तिच्यासह गृहस्थजीवन व्यतीत केले. त्यांना एक मुलगी झाली. या बालिकेचेच नाव शकुंतला. मोठी झाल्यावर तिचा दुष्यंताशी विवाह झाला. तिने भरत नावाच्या पुत्राला जन्म दिला. या भरतावरूनच आपल्या देशाचे 'भारत' हे नाव पडले.

हरिश्चन्द्राने आपल्या जीवनात अनेक यातना सोसल्या, अगणित कष्टांना तोंड दिले. परन्तु दाही दिशांना त्याची कीर्ती पसरली. सत्य व वचनपालन या गुणांसाठी आजही त्याचे नाव अग्रक्रमावर आहे. एक प्रकारे विश्वामित्रच या कीर्तिला कारण बनला. एके दिवशी देवलोकात वसिष्ठांनी, ''हरिश्चन्द्र हा आपल्या वचनाचा पक्का असून, कोणत्याही स्थितीत तो आपले वचन मोडत नाही.'' असा दावा केला. विश्वामित्राने लगेच या विधानावर आक्षेप घेऊन ''हं:! तो शेवटी एक माणूसच आहेना! मी त्याच्याच तोंडून असत्य वदवून दाखवीन.'' असे वसिष्ठांना आव्हान दिले. नंतर एक निश्चित योजना आखून विश्वामित्र हरिश्चन्द्रकडे गेला अन् त्याला म्हणाला की, ''तू माझा कर्जदार आहेस.'' ते वसूल करण्यासाठी त्याने आपला एक शिष्य ही पाठवला व हरिश्चन्द्राला अतिशय त्रास दिला. वचनबद्ध हरिश्चन्द्राने आपले वचन पाळण्यासाठी आपले सारे काही त्याला देऊन टाकले. काशीला त्याने आपली पत्नी व पुत्र एका ब्राह्मणाला विकून टाकले व स्वतः डोंब म्हणून स्मशानात देखरेख करू लागला. हे काम करत असताना त्याने पुत्राचे शव जाळण्यासाठी प्रत्यक्ष आपल्या पत्नीकडेही वर्गणीची मागणी केली. त्याच्या या सत्यवचनामुळे प्रसन्न होऊन देवांनी त्याला त्याचे राज्य, पत्नी व सजीव पुत्र ही परत दिला.

सत्यवचनामुळे हरिश्चंद्राला तीन्ही लोक प्राप्त झाले; त्याची कीर्ती चिरस्थायी झाली. अन् या सर्वाला कारण झाला विश्वामित्र.



# तुम्हाला माहीत आहे काय?

१. 'सात बहिणी' म्हणून ओळखले जाणारे आपल्या देशातले प्रान्त कोणते?
२. डायनोमाचा शोध कोणी लावला?
३. प्रथम श्रेणी क्रिकेटमधून सुनील गावसकर केव्हा निवृत्त झाला?
४. आफ्रिका खंडातील सर्वात मोठे शहर कोणते?
५. 'तुलू' ही भाषा आपल्या देशातल्या कोणत्या प्रान्तात अधिक बोलली जाते?
६. 'सामुराई' वर्गाचे प्रसिद्ध साहसी सैनिक कोणत्या देशातील आहेत?
७. आपल्या देशात प्रकाशित झालेले सर्वात प्राचीन वर्तमानपत्र कोणते?
८. जगातील सर्वात मोठी घंटा कोणती?
९. 'मौर्य' वंशाचा संस्थापक कोण?
१०. 'ट्युनिशिया' चे जुने नाव काय?
११. अहमदाबाद कोणत्या नदीकिनाऱ्यावर आहे?
१२. रामाने लंकेला पोचण्यासाठी एक सेतु बांधला असे म्हटले जाते. त्या सेतूचे आजचे नाव काय?
१३. जगातील सर्वात मोठी खाडी कोणती?
१४. 'अुत्कल' नावाने प्रख्यात असलेल्या प्रान्ताचे आजचे नाव काय?
१५. 'टेस्ट मॅच' मध्ये भाग घेणारा पहिला भारतीय खेळाडू कोण?
१६. टेलिव्हिजनचा शोध कोणी लावला?

## अुत्तरे

१. अरुणाचल प्रदेश, असाम, मणिपुर, मेघालय, मिझोराम, नागालॅण्ड, आणि त्रिपुरा.
२. मायकेल फॅरेडे.
३. नोव्हेंबर १९८७.
४. इजिप्तची राजधानी कैरो.
५. दक्षिण कर्नाटक.
६. जपान.
७. बॉम्बे समाचार.
८. मास्कोतील 'द ग्रेट बेल'.
९. चंद्रगुप्त मौर्य.
१०. कार्तेज.
११. साबरमती.
१२. ॲडम्स ब्रिज.
१३. बंगालची खाडी.
१४. ओरिसा.
१५. के.एस्. रणजीतसिंह.
१६. जॉन लागी बायिर्ड.



# सुप्रतीकचे तीन प्रश्न

रत्नगिरीचा राजा सत्याकर मोठा साहित्य-प्रेमी होता. अनेक पंडितांना आपल्या दरबारात त्याने स्थान दिले होते. त्यांना आश्रय देऊन त्यांच्या पालन-पोषणाचा भार ही त्याने आपल्यावर घेतला होता. त्याला कोठेही एकादा प्रतिभा-संपन्न माणूस दिसला की तो त्याचा आदर-सन्मान करी.

एकदा त्याने आपल्या राजधानीत एक कला-संमेलन आयोजित केले. या संमेलनात भाग घेण्यासाठी निरनिराळ्या देशातून प्रसिद्ध साहित्यिक आले होते. दरबारी पंडितांनी बाहेरून आलेल्या पंडितांना चांगलेच नामोहरम केले. राजा सत्याकरच्या दरबारातील पंडित अन्य पंडिताहून श्रेष्ठ आहेत हे त्यांनी सिद्ध करून दाखविले. आपले पंडित आणि कवि यांच्या विद्वत्तेवर राजा सत्याकर अतिशय खुश झाला.

सत्याकरने आपल्या पंडितांचे विजय-चिन्ह म्हणून उत्तम शिल्पकारांकडून पंच-धातूंची एक सुरेख घंटा बनवून घेतली. ती दरबारात उच्च स्थानी लटकवण्यात आली. त्याने घोषणा केली - "ही घंटा या दरबारच्या प्रतिष्ठेचे प्रतीक आहे. या दरबारातील पंडितांचा पांडित्यात जो पराभव करील त्याला ही घंटा पुरस्कार म्हणून दिली जाईल. शिवाय एक लाख मोहरा देऊन त्या विजेत्या पंडिताचा गौरव करण्यात येईल." हा पुरस्कार प्राप्त करण्यासाठी अनेक महापंडित आले, पण दरबारी पंडितांना कोणी जिंकू शकले नाहीत. कंकण नावाच्या एका पंडिताला हे सर्व वर्तमान समजले. तो स्वतः बहुभाषाकोविद व प्रचंड बुद्धिमान होता.

कंकण आणि दरबारी पंडित यांच्यात सतत दोन दिवस वाद-विवाद झाले. पण ते तुल्यबल ठरले. कोणीच जिंकलं नाही, नि कोणी हारला नाही. तिसऱ्या दिवशी मात्र कंकणच्या जयाची

विनायक जोशी

चिन्हे दिसू लागली. सर्व प्रजाजन निर्णय काय होतोय, तो जाणण्यासाठी आतुर झाले होते. लोकांना आपापसात बोलण्यासाठी अन्य विषयच उरला नाही.

चवथ्या दिवशी कंकणचा विजय घोषित करण्यात आला. दरबारी पंडितांनी आपला पराभव स्वीकृत केला. या पराजयामुळे राजाला फार दु:ख आले. घोषणेनुसार राजाने कंकणला घंटा पुरस्कार म्हणून समर्पण केली आणि त्याचा भव्य सत्कार केला. एक लाख मोहरांनी भरलेली थैली ही त्याला अर्पण केली.

विजयोत्साहात पालखीत बसून कंकण जेव्हा रत्नगिरीच्या सरहद्दीपर्यंत आला तेव्हा एका धनगराने त्याला अडवले. तो कंकणवर रागावलेला दिसला. तसा तो मोठा कला-प्रेमी होता. दरबारी पंडितांबद्दल त्याच्या मनात नितांत आदर होता. त्यांच्या पराजयाने तो ही दु:खी झाला होता.

कंकणच्या समोर येत तो म्हणाला - "महाराज, आमचे राजे सत्याकर प्रजाजनांना आपली संतति समजतात. ते आम्हाला परमेश्वरासारखे आहेत. आपल्या दरबाराची प्रतिष्ठा त्यांना श्वासासारखी वाटते. ही घंटा म्हणजे त्या प्रतिष्ठेचं चिन्ह होय. ही घंटा या राज्याच्या सरहद्दीपार जाऊ नये, यासाठी मी काही प्रयत्न करूं का ?"

कंकणने त्याच्याकडे आपादमस्तक पाहिले आणि संमतिदर्शक स्मित हास्य केले. या हास्यामुळे सुप्रतीकच्या रागाचा पारा आणखी चढला. उच्च स्वरात तो म्हणाला - "असे हसू नका. आपण महापंडित आहात, नि मी एक अडाणी धनगर हे मी जाणतो. माझं जे काही थोडंसं ज्ञान आहे, त्याच्या आधाराने मी आपल्याला तीन प्रश्न विचारतो. माझ्या तिन्ही प्रश्नांची बरोबर उत्तरे आपण द्यायची आहेत. कोणत्याही एका प्रश्नाचे उत्तर आपण देऊ शकला नाहीत तर ही घंटा आपल्याला इथेच सोडून जावी लागेल. आपल्याला दिलेल्या लाख मोहरा ही आपणास परत कराव्या लागतील. आपणास पालखीतून उतरावे लागेल व स्वतः राजा पर्यंत जाऊन घंटा परत करावी लागेल. आपणास माझी ही अट मान्य आहे?"

सुप्रतीककडे तुच्छतेने पहात कंकण म्हणाला - "हं, विचार तुझे प्रश्न!"

सुप्रतीकने पहिला प्रश्न विचारला - "माहीत असल्याशिवाय सांगता येत नाही, सांगितल्याशिवाय माहीत होत नाही, विचार केल्यावरच जाणता येतं; ते काय?"

खदखदा हसत कंकण म्हणाला - "माणसाचं नाव!"

सुप्रतीक म्हणाला - "नाही. हे एक कोडं आहे. माणसाचं नाव काय आहे हे त्याने स्वत: सांगितलं तरच माहीत होऊ शकतं. विचार करून नाही. ते जर एक कोडं असेल तर काही चिंतन करून उत्तर देता येईल."

कंकणचा चेहरा पाहण्यासारखा झाला. "आता माझा दुसरा प्रश्न! एक झाड आहे. त्याला दोन फांद्या आहेत. प्रत्येक फांदीवर पाच-पाच जण बसले आहेत. पाचांचे गळे कापले, पण एक थेंब रक्त बाहेर पडले नाही.





कुणाचा ही प्राण गेला नाही. हा सर्व काय चमत्कार आहे?'' सुप्रतीकने विचारले.

कंकणने बराच विचार केला. आपल्या वेदांताच्या ज्ञानावर आधारित काही उत्तरे दिली. सुप्रतीक म्हणाला - ''ही सर्व उत्तरे चुकीची आहेत.'' कंकणने जेव्हा आपला पराजय कबूल केला तेव्हा सुप्रतीकने आपल्या प्रश्नाचे उत्तर दिले - ''हे झाड म्हणजे मनुष्य. दोन फांद्या म्हणजे त्याचे दोन हात. गळे म्हणजे माणसाची नखे. नखे कापली तर रक्त येत नाही, किंवा काही वेदना ही होत नाहीत.''

कंकणने विचारले - ''आता तुझा तिसरा प्रश्न कोणता आहे?''

सुप्रतीकने तिसरा प्रश्न विचारला - ''सुविशाल सौशील्य देशावर सुशील पासून आताच्या राजभूपाल पर्यंत अनेक राजे राज्य करीत आले. या परंपरेत सर्वोत्तमच्या मृत्यूपूर्वी सौशील्यचा राजा कोण होता?''

कंकणने ताबडतोब उत्तर दिले - ''हात्तिच्या, हा तर अगदीच सोपा प्रश्न आहे! सर्वोत्तमच्या पूर्वी राजा होता, राजवर्धन.''

''आपण याला फार सोपा प्रश्न समजला, हीच तर आपली मोठी चूक! सर्वोत्तम राजाच्या मृत्यूपूर्वीचा राजा सर्वोत्तमच. दुसरा कोणी होऊंच कसा शकेल?'' जोरजोरात हसत सुप्रतीकने कंकणला हारवले.

आपली चूक कंकणच्या लक्षात आली. त्याने आपला पराजय मान्य केला. सुप्रतीकने घातलेल्या अटीनुसार तो पालखीतून उतरला. पालखीत घंटा ठेवून तो राजाकडे परत आला व घंटा राजाला देऊन टाकली. राजा सत्याकरचा आनंद गगनात मावेना. त्याने सुप्रतीककडून सर्व हकिगत जाणून घेतली.

''महाराज, मी विद्वानांच्या परिवारातील आहे. माझे आई-वडील लहानपणीच वारले, म्हणून मी हा धनगराचा पेशा पत्करला!'' सुप्रतीकने राजाला निवेदन केले.

दरबाराची प्रतिष्ठा सुप्रतीकने सुरक्षित ठेवली. प्रतिष्ठेचे चिन्ह असलेली घंटा राज्याच्या बाहेर जाऊ दिली नाही. म्हणून राजाने त्याचा भव्य सत्कार केला आणि त्याला आपल्या दरबारात स्थान दिले.





# मंगलेची समस्या

तुकाराम हा एक धनवान शेतकरी होता. त्याच्या घराजवळच मंगलाची झोपडी होती. मंगला बिचारी गरीब होती. घराजवळच्या थोडेयाशा मोकळ्या जागेत तिने काही फुलझाडे लावली होती. ती फुले माळून आपल्या पाच वर्षांच्या नातवासह ती सुखा-समाधानाने रहात असे. तिचा मुलगा व सून केव्हाच देवाघरी गेले होते.

मंगलाची जागाही हडपून आपल्या जागेला जोडून घ्यावी असा विचार बरेच दिवस तुकारामच्या मनात घोळत असे. एके दिवशी मंगलाला बोलवून तो म्हणाला, ''हे पहा मंगला, तुझी जागा माझ्या जागेत मिळवून घ्यावी असा माझा विचार आहे, तेव्हा ही जागा मला दे. मी तुला त्याचे थोडेफार पैसे देईन.''

परन्तु मंगलाने या गोष्टीला साफ नकार दिला. ती तुकारामला म्हणाली, ''ही झोपडीच काय तो माझा अन् माझ्या नातवाचा आधार आहे. त्याशिवाय आमच्याजवळ आणखी काहीच नाहीय. ती सोडून आम्ही कुठे जायचं? कसं रहायचं? तीच तर आमचं सर्वस्व आहे. माझा नवरा, माझा मुलगा, सून यांनी याच झोपडीत तर आपले प्राण सोडले. मीही तिथेच मेले तर माझ्या आत्म्याला शान्ति लाभेल.''

गोड बोलून मंगला वाकणार नाही हे ओळखून आता तुकारामने तिला धमकी दिली, ''तुला अद्यापर्यन्त झोपडी खाली करायलाच हवी.''

मंगला ही गरजून विचारू लागली, ''मी का खाली करीन? अन् तसं करायला लावायचा तुम्हाला काय अधिकार?''

मंगला आता बधत नाही असे पाहून तुकारामने जबरदस्ती करायचे ठरवले. त्याने आपल्या नोकरांकरवी तिचे सामान झोपडीतून

'चान्दोबा' त पंचवीस वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेली गोष्ट

बाहेर फेकले अन् शेवटी झोपडीही उखडून टाकली.

मंगला बिचारी हमसून हमसून रडत राहिली. तिने आपले दुःख सांगून गावप्रमुखाकडे तक्रार नोंदली. गावप्रमुखाने पंचायत बोलावली अन् तुकारामला जाब विचारला.

''या म्हातारीचा मुलगा जिवन्त असताना त्यानं माझ्या कडून शंभर रुपये कर्जाऊ घेतले अन् तसा कागद ही लिहून दिला. ते पत्र आज ही माझ्याजवळ सुरक्षित ठेवलेलं आहे. हिच्या नवऱ्यानं किंवा मुलानं कर्ज चुकवणं तर दूरच, पण कधी एका पैचं व्याजही दिलं नाही. मी तरी किती दिवस गप्प रहावं? मला जी मुद्दल अन् व्याज मिळून रक्कम यायला हवी, तिच्या बदल्यात मी झोपडी ताब्यात घेतली तर काय चुकलं?'' जरा ही संकोच न करता तुकाराम सारं खोटं बोलला अन् त्यानं एक पत्र ही दाखवलं. त्यावर कुणाचासा अंगठा उठवलेला होता.

गावप्रमुखाने त्या कागदावर विश्वास ठेवून तुकारामच्या बाजूनेच न्याय जाहीर केला. मंगला बिचारी काय करणार? तुकारामच्या विरुद्ध आणखी कारवाई करायची तिची ऐपत नव्हती. अगदीच असहाय्य होती बिचारी!

मोठ्या कष्टाने मंगलाने आणखी एका जागी झोपडी बनवली. तिथेही तिने तऱ्हेतऱ्हेची फुलझाडे लावली. अन् आपले उदरभरण करू लागली.

काही दिवस गेले, अन् तुकाराम मंगलाच्या जागेवर एका नव्या इमारतीची पायाभरणी




करू लागला. एके दिवशी मंगला आपल्या नातवाला बरोबर घेऊन त्या ठिकाणी आली. तेथे जमीन खोदायचे काम सुरू होते. कामकऱ्यांबरोबरच तुकारामही तेथे हजर होता.

व्यंगभरल्या सुरात तुकारामने मंगलेला विचारले, ''इथे कशाला आली आहेस आता?''

''आपण तर धनवान आहात, अन् मी एक गरीब बाई. फुलं वेचून कसंबसं पोट भरते. माझ्यावर थोडी दया करा. मला फार काही नको आहे, लहानशी मदत करा मला.'' मंगला गरीबीने म्हणाली

''बोल, काय हवंय?'' तुकारामने काहीशा आढ्यतेने विचारले.

''माझा नातू रोज हट्ट करतो की, मला आपली जुनी जागा दाखव. पोराला ही जागा दाखविण्यासाठी मी आता येथे आली आहे.'' मंगला बोलली.

''मग दाखवलीस ना? चालती हो आता.'' तुकाराम म्हणाला.

''जातेच आहे. पण मला फक्त माझ्या जुन्या झोपडीची एक टोपली भर माती हवीय. चूल बनवीन मी त्या मातीची, अन् त्यावर स्वयंपाक करत जाईन.''

तिची ती वेडी इच्छा ऐकून तुकाराम जोरजोरात हसू लागला. ती म्हणाली, ''कृपा करून ही आपली स्वतःच्या हातांनी उचलून माझ्या डोक्यावर ठेवा ना; पुण्य होईल मोठं! मी आपले उपकार जन्मभर विसरणार नाही.''

तुकाराम ती टोपली उचलू लागला, पण त्याला ती उचलवेचना! त्याने पुनःपुन्हा प्रयत्न केला; घामाने तो चिंब भिजून गेला, पण टोपली मात्र जडशीळ झाल्यासारखी जागेवरच राहिली.

आता जोराने हसून मंगला म्हणाली, ''अरे तुला एवढी टोपलीभर माती उचलवेना, मग सगळीच्या सगळी झोपडी कशी रे उचललीस?''

तिच्या बोलण्याचा गर्भितार्थ ध्यानी येऊन तुकाराम लज्जित झाला. त्याला आपल्या करणीचा पश्चात्ताप वाटला अन् त्याने त्याच जागी म्हाताऱ्या मंगलेला एक घर बांधून दिले.



# आयर्लंड : शांतीच्या मार्गावर

आयर्लंडमध्ये 'सेंट पॅट्रिक दिन' एक फार महत्वाचा दिवस आहे. इसवी सनापूर्वी चौथ्या शतकात आयर्लंड सेट्ट्सची एक वसाहत होता. नऊशे वर्षांनंतर इथे ख्रिस्त धर्माचा प्रसार झाला. सेंट पॅट्रिकचा जन्म इंग्लंड मधे झाला. जहाजी लुटेऱ्यांनी त्यांना पकडले. नंतर त्यांनी ख्रिश्चन मिशनऱ्याचे प्रशिक्षण घेतले. इ.स. सुमारे ४०० च्या सुमाराम ते आयर्लंड मध्ये आले. ख्रिश्चन धर्माच्या प्रचारासाठी त्यांनी इथे अविरत परिश्रम घेत. आयरिश लोकात त्यांना फार आदर दिला जातो. १७ मार्च रोजी आयर्लंडची जनता श्रध्दापूर्वक त्यांचे स्मरण करते.

या वर्षी १७ मार्च रोजी वॉशिंग्टन येथील 'व्हाइट हाऊस' मध्ये दोन आयरिश नेत्यांच्या सम्मानार्थ एक सभा आयोजित केली गेली होती. आयर्लंडचे प्रधान मंत्री जॉन ब्रूटन व सिनफिन संस्थेचे नेता जेरी ॲडम्स यांनी या समारंभात भाग घेतला. आयरिश रिपब्लिक आर्मी (ए. आर्. ए.) गेली पंचवीस वर्षे ब्रिटनशी युध्द करीत आलेली आहे. जेरी ॲडम्सच्या नेतृत्वाखाली हे युध्द चालू आहे. म्हणून अमेरिकेने प्रतिनिधि म्हणून त्यांची निवड करून त्यांचा सम्मान केला हे ब्रिटनला मुळिच आवडले नाही. आता ए. आर्. ए. ने युध्द-समाप्तीची घोषणा केली आहे आणि गेल्या सप्टेंबर पासून शांतता प्रस्थापित करण्यासाठी बोलणी चालू आहेत. म्हणून जेरी ॲडम्सना राजनैतिक प्रतिनिधी म्हणून बोलावण्यात आपण काही चूक केली असे अमेरिकेला वाटत नाही.

आयर्लंड दोन भागात वाटला गेला आहे. युनायटेड किंग्डम (ग्रेट ब्रिटन, स्कॉटलंड व वेल्स) यांच्याशी उत्तर आयर्लंडचे सख्य आहे. रिपब्लिक ऑफ आयर्लंड हा दक्षिणी भाग होय. ग्रेट ब्रिटन बद्दल सहानुभूति असलेल्या आयर्लंड मध्ये १९१६ साली बंड झाले. सन १९२१ मध्ये दक्षिणी भाग 'आयरिश फ्री स्टेट' च्या रूपात स्वतंत्र झाला. त्याने ब्रिटिश कॉमनवेल्थशी संबंध सोडले आणि त्यातून सन १९४९ मधे 'रिपब्लिक ऑफ आयर्लंड'चा जन्म झाला. १९१६ मध्ये झालेल्या बंडात भाग घेतल्यामुळे इमन डी व्हॅलेरा यांना सिनफिन जेल मधे डांबण्यात आले. जनतेने मात्र त्यांना आपला नेता मानले. १९१७ मध्ये त्यांनी ब्रिटनशी शांति स्थापण्याचा प्रयत्न केला, पण या प्रयत्नात त्यांना यश मिळाले नाही. १९३२ मध्ये ते प्रधान मंत्री बनले, व पुढे १९५९ मध्ये अध्यक्ष म्हणून त्यांची निवड झाली.

उत्तर आयर्लंड मध्ये प्राटेस्टंट्सची संख्या अधिक आहे. ब्रिटनशी आपले संबंध त्यांनी अधिक मजबूत केले. अल्पसंख्य रोमन कॅथॉलिकांना वाटू लागले की त्यांच्याकडे दुर्लक्ष होत आहे. म्हणून आयरिश रिपब्लिकशी आपले संबंध प्रस्थापित करण्याचा त्यांनी निश्चय केला. सन १९६९ मध्ये दोन्ही पक्षात हिंसात्मक संघर्ष सुरू झाला. आयर्लंडच्या एकतेसाठी प्रयत्नशील ए.आर्.ए. मैदानात उतरला, यामुळे ब्रिटिश सैन्याशी त्यांना वारंवार लढावे लागले. पंचवीस वर्षे ही लढाई सतत चालू राहिली. तीन हजार लोक मारले गेले. १९९४ च्या ऑगस्ट मध्ये ए.आर्.ए.ने आपल्या गनिमीकाव्याच्या युध्दाच्या समाप्तीची घोषणा केली. तेंव्हा पासून सिनफिन राजनैतिक सुधारणा अमलात आणण्याचा प्रयत्न करीत आहे.

अमेरिकेने पहिल्या पासूनच सिनफिनला आतंकवादी संस्था मानून तिचा बहिष्कार केला. पण ए.आर्.ए.ने जेव्हा युध्द-समाप्तीची घोषणा केली तेव्हा अमेरिकेने आपला रोख बदलला. इंग्लंड व आयर्लंड यांच्यात तडजोड होईल आणि शांति स्थापित होईल अशी अमेरिकेचे अध्यक्ष बिल क्लिंटन यांना आशा वाटते. अशा स्थितीत आयर्लंडच्या महत्त्वपूर्ण दिवशी अमेरिकेने दोन्ही पक्षांच्या नेत्यांना बोलवून त्यांचे अभिनंदन करणे योग्यच नाही का? याहून दुसरा असा मार्ग तरी कोणता?



# व्यर्थ बोलणे

सुशान्त व सुव्रतचे शिक्षण एकाच गुरुकुलात पूर्ण झाले. गुरूने सुशान्तला व्यापार करायला सुचवला अन् अध्ययन-अध्यापन करून मेहनतीने जीवन कंठायला सुव्रतला सांगितले.

गुरूच्या आदेशाप्रमाणे सुव्रत आपल्या गावी जाऊन ज्ञानाच्या सर्व शाखांच्या अध्ययनामागे लागला. सुशान्तने शहरात जाऊन व्यापार केला व लाखो रुपये मिळवले. तो धनवान बनल्यामुळे त्याचे नातेवाईक व कित्येक मित्रमंडळी त्याच्या आश्रयाने राहू लागली.

काही कालानन्तर सुशान्तकडे एक साधु आला. सुशान्तने त्याचे चांगले आगतस्वागत केले. साधूने त्याला म्हटले, "बोल बेटा, तुला काय देऊ मी?"

सुशान्त हसून उत्तरला, "स्वामीजी, अुलट आपलीच काही इच्छा असेल तर बोला; मी पुरी करीन ती."

त्याच्या या गर्वोक्तीवर हसून साधु म्हणाला, "माझी एकच इच्छा आहे, की तू ज्ञानार्जन करावंस."

"पण मी आतापर्यन्त जे काही कमवलं, ते आपल्या ज्ञानामुळेच शक्य झालंय!" सुशान्त ठेक्याने म्हणाला.

"ज्ञानी माणसं अुगाच व्यर्थ बोलत नसतात. तू एक अज्ञानी आहेस, याची तू कल्पनाही करू शकणार नाहीस. ही गोष्ट समजेपर्यन्त तू ज्ञानार्जनच करत रहावंस." साधूने आग्रह धरला.

सुशान्त साधूच्या या बोलण्याने नाराज होत म्हणाला. "व्यर्थ न बोलणारा, असा कोणी ज्ञानी आपल्या माहितीत असेल, तर सांगा. मी त्याच्याकडे जाऊन ज्ञान मिळवीन."

"हां! मग तू शंकरापुरला जा. तिथे सुव्रत नावाचा एक महाज्ञानी पुरुष आहे. तू जाऊन त्याची सेवा कर." असे म्हणून साधू तेथून निघून गेला.

सुव्रतचे नाव ऐकताच सुशान्त विचारात पडला. 'हा आपला सहाध्यायी सुव्रत तर नाही?

सुशान्तला तर खात्री होती, की आपल्या त्या गुरुकुलात शिकलेल्या सर्व शिष्यांमधे आपणच काय ते एकटे श्रेष्ठ धनवान बनलो. पण साधूचे बोलणे ऐकून त्याच्या मनात संशय अुत्पन्न झाला अन् त्याबरोबरच सुव्रतचा हेवाही वाटू लागला. मोत्यांनी सजवलेल्या पालखीत बसून व बरोबर दास-दासींचा लवाजमा मिरवत, चार दिवसांचा प्रवास करून तो शंकरापुरला पोचला.

तेथे पोचल्यावर सुशान्तने सुव्रतचा पत्ता विचारला. पण 'सुव्रतचे घर अमूक ठिकाणी आहे' असे सांगणारा कोणीही त्याला आढळेना. अचानक सुव्रतचा एक शिष्य वाटेत भेटला व त्याच्याकडून सुशान्तला पत्ता कळला.

सुव्रतचे घर तसे स्वच्छ, नीटनेटके होते; पण ते साधे छोटे से कौलारू घरच होते. पाहून सुशान्तला मनातल्या मनात संतोष वाटला. शहरात त्याची स्वतःची तर सात-सात मजली तीन घरे होती.

सुव्रत त्यावेळी घरात नव्हता. जमीनदाराचा निरोप आल्यावरून, तो एका पंडित सभेत भाग घेण्यासाठी गेलेला होता, अन् दुसऱ्या दिवशीच परतणार होता. ही बातमी सांगून सुव्रतची बायको गीता हिने मोठ्या आदराने सुशान्तचे स्वागत केले. त्या घरात सुव्रतचे चार शिष्य ही होते. त्यांच्याशी गप्पा मारता मारता सुशान्तने



सुव्रतच्या आर्थिक स्थितीचा अंदाज घ्यायचा प्रयत्न केला. ते म्हणाले, "आम्ही चांगल्या प्रकारे अध्ययन करतो, म्हणून गुरुजीच आमचे पालनपोषण करतात, अन् आम्हाला शिकवतातही. त्यांच्या जवळ किती धन आहे, वगैरे आम्हाला काहीच माहीत नाही."

सुशान्त बरोबर एकुण वीस माणसे तेथे आली होती. गीताने रुचकर पदार्थ बनवून सर्वांना भोजन दिले.

संध्याकाळी शिष्यांना बोलावून सुशान्त म्हणाला, "तुमचा गुरु हा माझा मित्र आहे. मी त्याला भेटायला आलो आहे. त्याने जर दररोज अशा प्रकारचं जेवण दिलं, तर तो कर्ज-बाजारी होईल बिचारा! त्याचं असं नुकसान व्हावं, असं

सुचित्रा गायकवाड



मला वाटत नाहीय. तेव्हा सारं वाणसामान वगैरे तुम्ही कोणत्या दुकानातून अुधारीनं आणता ते सांगा, म्हणजे मी सारी उधारी भागवून टाकीन.''

''त्याबद्दल आम्हाला काहीच माहीत नाही. गुरुजी परत आले की त्यांनाच विचारा ना!'' शिष्य म्हणाले.

सुव्रत दुसऱ्या दिवशी परत आला. त्याने मोठ्या प्रेमाने आपल्या मित्राला मिठी मारली अन् त्याची नीट वास्तपुस्त केली. मित्र सुशान्त खूप संपन्न व धनवान आहे, हे जाणून त्याला फार आनन्द वाटला.

पण असन्तुष्ट असलेला सुशान्त म्हणाला, ''हे बघ सुव्रत:, केवळ स्वत:च्या मोठेपणावर मी संतुष्ट नाहीय. तूही जेंव्हा माझ्या आर्थिक पातळीवर पोचशील, तेंव्हाच मला खरा आनंद वाटेल. तुझं जीवनमान मला बरं वाटत नाहीय. इथे तू कसलीही प्रसिद्धी नसलेलं आयुष्य कंठत आहेस. किती लहानशा घरात रहातो आहेस तू! आपल्या बायकोसाठी चार दागिनेही घडवू शकला नाहीयेस. अन् वर आपल्या चार शिष्यांच्या उदर-निर्वाहाची जबाबदारी आपल्या डोक्यावर घेतली आहेस. तू ज्ञानी आहेस की मूर्ख, हेच कळत नाहीय मला! माझं ऐक, माझ्या बरोबर माझ्या शहरात चल तू. मी तुला तिथे व्यापार करायला शिकवीन.''

खरे तर सुशान्तला सुव्रतबद्दल काडीभरही सहानुभूती नव्हती. केवळ आपला मोठेपणा दाखवण्यासाठीच तो बढाया मारत होता. पण सुव्रतने आपल्या मित्राची बडबड शान्तपणे ऐकून घेतली अन् तो उत्तरला, ''गाव सोडून जायचं असेल तर मला अगोदर इथली सगती कर्ज चुकवायला हवीत. तसं केलं नाही, तर ते सगळेजण मला इथून जाऊ देणार नाहीत.''

सुशान्तने मग सर्व कर्जदारांना बोलावून आणायला सांगितले. शिष्यांनी त्या सर्वांना बोलावून आणले. ते एकूण पाचजण होते. त्यातला एक होता व्याजाने पैसे देणारा सावकार. दुसऱ्याचे स्वत:चे किराणा दुकान होते. तिसरा होता मिस्त्री, तर चौथा पत्रावळी विकत असे. पाचवा होता गाडीवाला. सर्वांचे मिळून सुव्रत चार हजार रुपये देणे लागत होता.

''मी तुम्हा सर्वांचं देणं देऊन टाकतो. पण सुव्रतला आता शहरात रहायला जाताना अडवू नका.'' सुशान्त आपली ऐट दाखवत म्हणाला.

यावर सावकार दु:खी स्वरात म्हणाला, ''पण महाराज, आमचा यांच्यावर पूर्ण विश्वास आहे. जुनं कर्ज परत येण्या पूर्वीही नवं द्यायला आम्ही तयार आहोत, कारण आमची खात्री आहे की गाव सोडून गेल्यावरही सुव्रत गुरुजी आमचं देणं केंव्हा ना केंव्हा देऊन टाकतील. त्यामुळे जाताना त्यांना अडवायचा प्रश्नच कुठे येतो?''

तरी ही सुशान्त पुन्हा म्हणाला - ''मीच तुमचे सारे पैसे देऊन टाकतो.'' तेंव्हा ते पाचजण सुव्रतला म्हणाले, ''गुरुजी, आम्ही कधी आमचं कर्ज चुकवण्याबाबत तुम्हाला तगादा केला का? कधी कसला दबाव वगैरे आणायचा प्रयत्न केला? मग आताच दुसऱ्या कोणी कर्ज फेडायची गोष्ट का केली जातेय? काही आवश्यकता आहे का असं करायची? अशी काही तजवीज करायची कल्पना तुमच्या डोक्यात का बरं आली?''

तेव्हा त्यांचे सान्त्वन करत सुव्रत म्हणाला, ''माझ्या मित्रांचं माझ्यावर किती प्रेम आहे हे पहायचं होतं मला. म्हणूनच फक्त मी ही परीक्षा घेतली त्यांची. मी आपलं कर्ज दुसऱ्या कोणाला नक्कीच फेडू देणार नाही; तुम्ही सगळेजण निश्चिन्त असा याबाबत.''

हे ऐकून चकित होत सुशान्त म्हणाला, ''तू परीक्षा घेतलीस माझी? का बरं?''

''कारण असं, की तू प्रथमच आला आहेस





न माझ्याकडे ? तेंव्हा तुझं इतकं प्रेम आहे माझ्यावर, हे शाबित झाल्यावर तुझी इच्छा पूर्ण करणं हा धर्म बनतो ना माझा ?'' सुव्रत उत्तरला.

सुशान्त अधिकच आश्चर्याने म्हणाला, ''तू माझी इच्छा पूर्ण करणार ? मी मागेन ते देशील मला ? नीट विचार करून बोलतो आहेस ना तू ?''

''विचार न करता कधीच काही बोलत नसतो मी! तेंव्हा अगदी निःसंकोच पणे बोल काय हवंय ते.'' सुव्रत म्हणाला.

सुशान्तला एकदम साधूच्या बोलण्याची आठवण झाली. साधूने सुव्रतचा 'महाज्ञानी' असा उल्लेख केला होता. ज्ञानी माणसं व्यर्थ बोलत नाहीत, असंही तो म्हणाला होता. आता सुव्रत हे सारं व्यर्थच बोलत आहे असे आपण सिध्द केलं तर त्याचा आपोआप असा अर्थ होईल की-सुव्रत ज्ञानी वगैरे मुळीच नाहीय. अन् आता हा सुव्रत व्यर्थच काहीतरी बोलत आहे हे सिध्द करणे, म्हणजे आपल्या हातचा मळ आहे.

असा विचार करून सुशान्त म्हणाला, ''माझा बराचसा पैसा व्यापारात अडकलाय: मला आता ताबडतोब वीस लाख रुपये मिळाले, तर मी दोन कोटी रुपये मिळवू शकेन. तू माझी मागणीं पुरी करायचा वायदा केला आहेस ना ? मग दे तर मला वीस लाख रुपये कर्जाऊ!''

त्याची ही मागणी ऐकून सर्वजण आश्चर्यचकित झाले. पण त्याची मागणी ऐकून सुव्रत मात्र जरा ही विचलित झाला नाही. तो सुशान्तला म्हणाला - ''मला तुझ्याशी एकांतात काही बोलायचंय. आत चल जरा.''

पण नकारात्मक मान हलवत सुशान्त म्हणाला, 'माझ्या मैत्रीची परीक्षा तू या सर्वासमोरच घेतलीस ना ? तू तर मोठा 'ज्ञानी' आहेस. ज्ञानी माणसं व्यर्थ बडबडत नसतात. मग आता सर्वासमक्षच उत्तर दिलंस, तर आनन्द होईल मला.''

सुव्रतने त्याला समजावण्याचा खूप प्रयत्न केला; पण सुशान्त आपलाच हेका धरून बसला. शेवटी सुव्रतचे शिष्य मधे पडून म्हणाले, ''गुरुजी, आपल्या अध्यापनापुढे जगात कोणतीच गोष्ट आम्हाला महत्त्वाची नाही. आपल्या मित्राच्या मागणीइतके पैसे आम्ही आपापल्या घरून आणून द्यावे का ?''

शिष्यांचे बोलणे ऐकून नाराज झालेला सुशान्त म्हणाला, ''हुंः! आले मोठे पैसे देणारे! घरात एक वेळच्या अन्नाची ही भ्रान्त असलेले तुम्ही, वीस लाख रुपये कुठून रे आणून देणार ?''

आता सुव्रत हसून म्हणाला, ''अरे, त्यांना भिकारी नको समजूस. ही तर करोडपतींची मुलं आहेत. केवळ ज्ञानार्जनासाठीच हे माझ्याजवळ रहात आहेत. धनामुळे मनुष्याला लोकांकडून बनावट आदर मिळू शकतो. आपण किती धनवान आहोत, हे इतरांना समजू द्यायची यांची इच्छा नाहीय, म्हणूनच आम्ही ही गोष्ट गुप्त ठेवली आजपर्यन्त. अन् माझ्या बाबतीत म्हणशील, तर माझी स्थितीही अगदी अशीच आहे. मी जेव्हा जेंव्हा पंडित सभांसाठी जातो, तेंव्हा तेंव्हा कित्येक राजे, जमीनदार अन् करोडपती लोक मला भेटीदाखल अमोल मोती, हिरे अन् दागदागिने वगैरे देत असतात. ते सारं काही आजही माझ्या घरात सुरक्षित ठेवलेलं आहे. हे रहस्य रहस्यच रहावं अशी माझी धडपड असते. पण आज तुझ्या हट्टीपणामुळे अन् मूर्खपणामुळे मला सगळं जाहीर करावं लागलं. तुझ्या वीस लाखांची मागणी पुरी करायला माझ्याजवळचा एक हिराही पुरेसा आहे.'' असे म्हणून सुव्रत घरांत जाऊन एक हिरा हातात घेऊन आला.

हिरा पाहिल्यावरोबर सुशान्त एकदम गडबडलाच! तो हळू आवाजात म्हणाला, ''तू व्यर्थ गप्पा मारतोस, असं सिध्द करायचा माझा विचार होता. पण आता माझंच जिणं वसं व्यर्थ आहे हे मी समजून चुकलोय. पंडित अन् ज्ञानी माणसं कधी आपलं अवडंबर माजवीत नसतात. पण हे सत्य लक्षात न घेताच मी तुला खाली पहायला लावायचा प्रयत्न केला. मला क्षमा कर अन् ज्ञानभिक्षा घाल.''

यानन्तर काही दिवसपर्यन्त सुव्रतने सुशान्तला उपनिषदांचे सार सांगून त्याचा अहंकार दूर केला, अन् त्याला नम्र बनवले. सुशान्तचे दुर्गुण हळूहळू कमी होत गेले. त्याला धनाची गरज नसणारा शाश्वत असा गौरव प्राप्त झाला.



# सासू तशी सून

सागर नावात सखू नावाची एक श्रीमंत बाई रहात असे. पण तिच्या कंजूषपणाच्या खूप विचित्र गोष्टी गावात प्रसिध्द होत्या. या गोष्टी एकदा स्वत: सखूच्याच कानावर आल्या. तेंव्हा 'आपण कंजूष नसून काटकसरी आहोत' असे समर्थन ती करू लागली.

तिचा नवरा तर बऱ्याच वर्षापूर्वी कैलासवासी झाला होता. त्यामुळे आपला एकुलता एक मुलगा शाम याला सखूने खूप लाडात वाढवले होते. आता शाम लग्नायोग्य वयाचा झाल्यामुळे सखू सुयोग्य सुनेच्या शोधात राहू लागली.

सखू जरी महाकंजूष असली, तरी तिच्याजवळ खूपसे धन असल्यामुळे बरचे लोक आपल्या मुलीसाठी तिच्याकडे येऊ लागले. सखू अशा लोकांना म्हणे ''मी आधी तुमच्या मुलीची परीक्षा घेईन. ती त्यात उत्तीर्ण झाली, तरच मी तिला आपली सून बनवीन.''

सखूने घेतलेल्या परीक्षेत अनेक मार्थी नापास झाल्या.

तिला एकदा असे कळले की जवळच्या एका गावात एक चांगली मुलगी आहे. मग सखू आपण होऊनच तिच्या घरी गेली. सुरुवातीला काही इकडच्या-तिकडच्या गप्पा झाल्या नंतर तिने तेथे भोजनही केले. नंतर तिने मुलीला म्हटले, ''ये. नंतर मी तुझी परीक्षा घेईन.''

रुक्मिणी म्हणाली, ''आमच्या जरी रोजच्या खर्चापेक्षा एखाद्या दिवशी जास्त खर्च झाला तर तो भरून काढण्यासाठी आम्ही काही ना काही उपाय करतो. आज तेवढ्यासाठीच मी जेवणार नाही.''

हे उत्तर ऐकून सखू प्रसन्न होऊन म्हणाली, ''काटकसरीत तर तू माझ्यापेक्षाही सरस आहेस. तुझ्यासारखी सून मिळाली, मी भाग्य समजते.''

**- अरविन्द तावसे**






(ट्रॉय नगरला ग्रीकांनी दहा वर्षे वेढा घातला होता. या काळात दोन्ही पक्षांचे अनेक योध्दे मृत्यु पावले. अन् हे सर्व घडले फक्त भुवनसुंदरीमुळे. ग्रीक पक्ष वज्रकाय व भुधव या प्रबल योद्ध्यांना मुकला; तर ट्रोजन पक्षाचे वीरसिंह व मोहन हे महायोध्दे कामी आले. मोहनच्या निधनानन्तर अरिभयंकरने तावडतोब भुवनसुंदरीशी जबरदस्तीने विवाह केला. रूपधरने ट्रॉयचा नाश करायचा विडा उचलला होता. त्याला खुद्द भुवनसुंदरी व तिची सासू यांचीही मदत प्राप्त झाली.)

ट्रॉयच्या पतनापूर्वीच वर्धनच्या पुत्रांमधे तीव्र कलह सुरू झालेला होता.

ही परिस्थिती सुधारण्यासाठी ग्रीकांशी तह करायचा निश्चय वर्धनने केला. त्याने गुप्तपणे तसा प्रयत्नही केला. त्यासाठी त्याने आपला मेहुणा प्रत्याम्नायडू याला सम्राटाकडे पाठवले. प्रत्याम्नायडूला अरिभयंकर मुळीच आवडत नसे, तो त्याचा द्वेष करी. त्यामुळे त्याने हा प्रयत्न केवळ तहापुरताच मर्यादित न ठेवता रूपधरला गाठून एक कारस्थानही रचले. या योजनेनुसार ट्रॉयचे राजसिंहासन व राज्याच्या खजिन्याचा अर्धा हिस्सा प्रत्याम्नायडूला मिळायचा व त्या बदल्यात त्याने ट्रॉय रूपधरच्या हवाली करायचे असे ठरले. प्रत्याम्नायडूने रूपधरला वचन दिले की या कामात प्रशंसनही आपल्याला मदत करील.

ट्रॉय नगरातही ग्रीकांना मदत करायला तयार असणाऱ्या काही व्यक्ती होत्या. या



नगरातून बुध्दिमतीच्या मूर्तीचे अपहरण झालेले होते. ट्रॉयच्या पतनासाठी आवश्यक अशी परिस्थिति तयार झालेली होती. आता केवळ ग्रीकांनी नगरात प्रवेश करणेच बाकी होते. त्यासाठी त्यांनी एक अद्‌भुत अन् विशालकाय असा लाकडी घोडा बनवायला सुरुवात केली.

ग्रीकांकडून लढण्यसाठी दीर्घंड नावाचा एक अुत्तम शिल्पकार बरोबर तीस नौकर घेअून आला होता. मल्लयुध्दातही हा चांगला प्रवीण होता. पण स्वभावत: तो मोठा भित्रा होता. यानेच हा लाकडी घोडा बनवला. या घोड्याला एका बाजूला, बाहेरून सहज न दिसेल, असा दरवाजा बनवलेला होता. त्याच्या बरोबर विरुध्द बाजूला असे लिहिले होते की, ग्रीकांचा परतीचा प्रवास सुखकर व्हावा यासाठी बुध्दिमती देवीला ही सप्रेम भेट. घोड्याच्या पोटात जाण्यायेण्यासाठी एका दोरीच्या शिडीचीही व्यवस्था करण्यात आली होती.

ग्रीकांकडे जे साहसी वीर होते त्या सर्वांना घोड्याच्या पोटात अुतरल्यावर त्यांनी दोराची शिडीही आत ओढून घेतली व दरवाजा बन्द केला.

अुरलेला सारा कार्यक्रम रूपधरच्या आज्ञेप्रमाणे पार पडला. त्या रात्री अंधार पडल्यावर ग्रीकांनी आपल्या शिबिरांना आग लावली आणि घोड्याच्या पोटात लपलेल्या ग्रीक वीरांशिवाय बाकी सर्वजण सम्राटासह जहाजांवर चढून तेथून निघून गेले. रेनेडोस द्वीपापासून थोड्या अंतरावर पोचल्यानंतर त्यांनी नांगर टाकले. पण एक ग्रीक योध्दा मात्र घोड्याबरोबर ट्रायच्या किनाऱ्यावर राहिला. हा योध्दा म्हणजे रूपधरचा पुत्रच होता. त्याचे नाव होते चौर्यनाथ. ग्रीक वीरांनी परत केंव्हा यावे याचा पेटत्या मशालीने संदेश देण्याच्या कामासाठी तो किनाऱ्यावर लपून राहिला.

सकाळ झाल्यावर ट्रोजन गुप्तहेर ग्रीकांच्या शिबिरांकडे, तेथे काय चालले आहे हे पहाण्यासाठी आले. त्यांनी परत नगरात जाअून सांगितले की ग्रीकांची सर्वची सर्व शिबिरे जळून खाक झाली असून तेथे फक्त एक खूप अवाढव्य असा लाकडी घोडाच फक्त आहे. वर्धन स्वत:च आपल्या पुत्रांसह तो घोडा पहाण्यासाठी तेथे गेला.

जेंव्हा सर्वजण त्या विराट घोड्यापाशी पोचले व त्याकडे आश्चर्याने पाहू लागले, तेंव्हा त्यांच्यातला एक म्हणाला, ''हा जर बुध्दिमती देवीला अर्पण केला गेला आहे, तर तो नगरात घेअून जाअून देवीच्या मंदिरासमोर अुभा करून ठेवायला काय हरकत आहे ?''

पण दूसरा एकजण म्हणाला, ''पण बुध्दिमती देवीने तर या युध्दात आपल्यापेक्षा शत्रुपक्षालाच जास्त साथ दिली आहे. आपण तर हा घोडा इथेच जाळून टाकू या किंवा हा मोडून त्याच्या पोटात काय आहे, ते तरी पाहू या.''

राजा वर्धनने मात्र या बोलण्याचे खंडन करत म्हटले, ''देवीला अर्पण केलेल्या वस्तूचा असा नाश करणं महापाप होईल. आपण हा घोडा चाकांवर चढवून नगरात घेअून जाअू या.''

वर्धनच्या इच्छेनुसार घोडा चाकाच्या गाडीवर ठेवून त्याला किल्ल्याच्या दारापर्यन्त नेण्यात आले. पण दार लहान पडल्यामुळे दाराच्या एका बाजूची भिंत पुरेशी पाडून टाकून तो विशाल घोडा नगरात नेला. घोडा आत आल्याबरोबर भिंत यथावत् बांधून टाकली अन् घोडा नगरमध्यापर्यन्त नेण्यात आला.

आता या घोड्यावरून ट्रोजनांत चर्चा सुरु



झाली, अुलट-सुलट विचार व्यक्त केले गेले, थोडी भांडणेही झाली. वर्धनची कन्या जालिनी हिला दिव्य दृष्टि प्राप्त झालेली होती. घोडा पाहून ती ओरडली, ''यात हत्यारबन्द वीर बसलेले आहेत.''

प्रत्याम्नायद्रूचा पुत्र तीक्ष्णदृष्टी याने जालिनीला दुजोरा दिला. तो म्हणाला, ''तुम्ही अगदी मूर्ख माणसं आहात ?'' असे बोलतानाच त्याने आपला भाला घोड्यावर जोराने फेकला. त्याच वेळी घोड्याच्या पोटातून हत्यारांचा खणखणाट ऐकू आला.




घोड्याला चारही बाजुनी वेढलेल्या लोकांनी आरडाओरडा सुरू केला. ''अरे जाळून टाका हा घोडा! अरे फेकून द्या तो किल्ल्याच्या तटाबाहेर!'' परन्तु, तरीही वर्धनच्या बाजूचे लोक म्हणतच राहिले की ''या लाकडी घोड्याचं काही नुकसान करू नका!''

या विषयावर ट्रोजन जनता आपसात चर्चा करत होती. इतक्यात दोन ट्रोजन सैनिक एका ग्रीक वीराला कैद करुन तेथे घेअून आले. हा ग्रीक सैनिक चौर्यनाथच होता. त्याला सर्वांनीच तऱ्हेतऱ्हेचे प्रश्न विचारले. त्याला रूपधरने अुत्तम प्रशिक्षण दिलेले असल्याने तो या लोकांना समजावत बोलू लागला.

तो म्हणाला, ''प्रबोधच्या हत्येचं रहस्य मला अगदी बरोबर माहित आहे. मला ते माहीत असल्याने रूपधरचा माझ्यावर फार राग आहे. ग्रीक आता युद्धातून मागे हटले आहेत. यापुढे लढत राहण्याची त्यांची काडीभरही इच्छा नाहीय. वातावरण अनुकूल असतं, तर ते केव्हाच परत फिरले असते. ट्रॉय वर हल्ला करायला ते निघाले तेंव्हाचा वेळ त्यांना अनुकूल नसल्याने त्यांनी बळी वगैरे देअून वायुदेवाला संतुष्ट करून ठेवले. त्यावेळी रूपधरने कांशुकला विचारले, ''आता बोल, यानन्तर कसला बळी द्यायचा ?'' तेंव्हा कांशुकने त्याच्याजवळ दहा दिवसांची मुदत मागितली. माझी खात्री आहे की, या दहा दिवसांच्या काळात रूपधरनं कांशुकला बक्षिसी दिली असली पाहिजे. दहा दिवसां नंतर कांशुकने सभेत

येऊन माझ्याकडे बोट दाखवले. मला ताबडतोब पकडण्यात आले. ते माझा बळी देणार इतक्यात हवा योग्य दिशेने वाहू लागली. वातावरणात फरक पडला. मला विसरून जाऊन सर्वजण आपल्या प्रवासाच्या कामात मग्न झाले. त्या गड्बडीत मी आपला जीव वाचवून पळून आलो.''

चौर्यनाथच्या या बोलण्यावर वर्धनचा पूर्ण विश्वास बसला. त्याने चौर्यनाथला विचारले, ''घोड्याबाबत तुला काय वाटतंय ?''

''ही गोष्ट खरीच की, बुध्दिमती देवी आम्हाला अनुकूल होती. पण रूपधर व देवसय यांनी जेंव्हा त्या मूर्तीची चोरी केली, तेंव्हापासून मात्र ती आमच्यावर नाराज आहे. ती मूर्ती जेंव्हा आमच्या शिबिरात नेण्यात आली, तेंव्हा तिच्यातून तीन वेळा अग्निज्वाला बाहेर पडल्या. मूर्तीचे पाय घामाने भिजून गेले. यावरून स्पष्ट झाले की देवी क्रोधित आहे. ग्रीकांनी ठरवले की आता आपण युध्द समाप्त करून स्वदेशी परत जाणेच श्रेयस्कर आहे. पण निघताना देवीला एकादी वस्तु अर्पण करून मगच निघावे. कांशुकने सम्राटाला सल्ला दिला की आपण आता ताबडतोब युध्द समाप्त करून परत फिरावं अन् पुढे केंव्हातरी नीट मुहूर्त पाहून पुन्हा युध्दाला निघावं.'' चौर्यनाथ मोठ्या चतुराईने हे सर्व बोलला. अन् स्वत: बद्दल विश्वास निर्माण करायचा प्रयत्न त्याने केला. आपल्या बुध्दिसामर्थ्याने त्याने ही एक कहाणी बनवून सांगितली.

''पण इतका मोठा घोडा कशासाठी बनवला त्यांनी ?'' वर्धनने विचारले.

''घोडा फार विशाल असल्याने तुम्ही तो शहरात नेणार नाही अशी ग्रीकांची कल्पना होती. त्यांना वाटले की आपल्याला अर्पण केलेली वस्तु तुम्ही लोकांनी तिच्या देवळापर्यन्त नेली नाही, की देवी बुध्दिमती नक्कीच तुमच्यावर नाराज होईल. पण त्यांची ही कल्पना आता चुकीची ठरलीय. घोडा तर तुम्ही शहरात आणलातही. आता तुमचा पराजय होण्याचा प्रश्नच येत नाही. तुमचं साम्राज्य आता चारही दिशांना विस्तारेल. असं काही न घडावं म्हणूनच ग्रीकांनी इतका मोठा घोडा घडवला.'' चौर्यनाथ उत्तरला.

''हे सारं अगदी धादांत खोटं आहे. रूपधरचं यात नक्कीच काही कारस्थान आहे. याच्या बोलण्यावर विश्वास ठेऊन तुम्ही स्वत:च्या पायावर धोंडा पाडून घेऊ नका.'' तीक्ष्णदृष्टी मोठ्याने ओरडला. तो पुढे असे ही म्हणाला की, ''मी आताच आपली इष्टदेवता कुबुलि हिला प्रकट व्हायला लावतो अन् हा घोडा कसा जाळून टाकावा याबद्दल सल्ला घेतो.''

पण तीक्ष्णदृष्टी असे काही करून नगर वाचवू शकला नाही. कारण तो आपल्या घरी पोचताच त्याच्या दोन मुलांना डसून, दोन महासर्पांनी मारून टाकले. आपल्या मुलांना वाचवण्याच्या प्रयत्नात तो स्वत:ही सर्पदंशाने मरून गेला. लाकडी घोडा नष्ट करण्याचा त्याचा प्रयत्नही यामुळे विफल झाला.

या अपशकुनामुळे चौर्यनाथने सांगितलेल्या खोट्या गोष्टीवर ट्रोजन लोकांचा विश्वास जास्त वाढलाच. वर्धनला तर असे वाटले की बुध्दिमतीदेवीवर भाला फेकण्याच्या त्याच्या अपराधासाठीच तिने त्याला योग्य शिक्षा केलीय. नंतर योग्य मन्त्रोच्चारण करवून त्याने तो घोडा देवीला अर्पण केला. ट्रोजन स्त्रिया स्नान वगैरे करून आल्या व त्यांनी घोड्याला फुलांच्या माळांनी सजवले; त्याच्या चारी पायांवर फुले ओतली. ट्रोजनांनी युध्दाच्या विजयोत्सवाची तयारी सुरू केली. घाबरलेला प्रभंजन मात्र चुपचाप आपल्या सैनिकांसह ऐडा पर्वतावर निघून गेला.

**क्रमशः**





## चान्दोबाच्या बातम्या

### पोहोण्यात अग्रगण्य

मद्रासचा कुट्रालीश्वरन व त्याचे समवयस्क बालक-बालिका पाण्यात खूप दूरवर पोहोणे म्हणजे अगदी हातचा मळ आहे, हे सिध्द करत आहेत. परन्तु फ्रान्सचा जी. डिलीज या जलतरणपटूने अटलांटिक समुद्र एकट्याने पोहून ओलांडायचा निश्चय केला व गेल्या १६ डिसेंबरला आफ्रिकेच्या वेर्डी नावाच्या टोकापासून पोहत निघून दोन महिन्यांनी तो बार्बडोसच्या ब्रिजटाअुन येथे पोचला. पोहत असताना तो फ्लीपर्सचा अुपयोग करी व चार मीटर लांबीच्या ओंडक्यांच्या तराफ्यावर झोपत असे. थामस व क्लेमंट ही त्याची दोन मुले आपली आई कैथरीन हिच्यासह अगोदरच ब्रिजटाअुनला पोचली; व त्यांनी आपल्या पित्याचे मोठ्या आनन्दाने स्वागत केले.

### डोळ्यांची विक्री

नेत्रदानाबाबत आपल्या सर्वांना माहीत आहेच. मानवतेच्या कल्याणासाठी केल्या जाणाऱ्या अुत्तम अशा कार्यात नेत्रदानाची गणना केली जाते. परन्तु मूत्रपिण्डा प्रमाणे डोळ्यांची विक्री होत नाही. आम्ही आता ज्या डोळ्यांच्या विक्रीबाबत लिहीत आहोत ते डोळे सर्वसामान्य माणसाचे नव्हेत. डॉ. हेन्री अब्राहम्स यांच्याजवळ सुप्रसिध्द भौतिकशास्त्रज्ञ आइन्स्टाईन यांचे डोळे सुरक्षित ठेवलेले आहेत. ते



कोणत्याही किंमतीला विकत घेण्याची लोकांची अहमहमिका चालू आहे. सुप्रसिद्ध गायक मायकेल जैक्सन हाही अशा इच्छुकांपैकी एक आहे. १९४४ मध्ये आइन्स्टाईन मृत्यु पावल्यावर त्यांच्या शरीराचे काही भाग 'अॅटॉप्सी' द्वारा काढून घेण्यात आले. हे काम डॉ. थॉमस हार्वे यांनी केले होते. आजही त्यांच्याजवळ आइन्स्टाईन यांचा मेन्दू सुरक्षित आहे. डॉ० हार्वे यांचे म्हणणे असे की, जेंव्हा 'अॅटॉप्सी' केली, तेंव्हा डोळे काढून घेतले गेले नव्हते. सध्या या विषयावर मतभेद चालू आहेत. अजून तरी काही निष्कर्ष निघालेला नाही.

### सर्वांत म्हातारी स्त्री कोण ?



गिनीज बुक ऑफ वर्ल्ड रेकॉर्डच्या आधारे जगातील सर्वांत म्हातारी स्त्री म्हणजे फ्रान्समधील ल्यूसी क्लेमंट. नुकताच तिने आपला १२१ वा वाढदिवस साजरा केला. परन्तु ब्राझील जेरोनिमा नावाच्या एका म्हाताऱ्या स्त्रीचा असा दावा आहे की, ती ल्यूसी क्लेमंट पेक्षाही अधिक वयस्क आहे! हे सिध्द करण्यासाठी तिच्याजवळ कसला पुरावा तर नाही. परंतु असे कळते की तिचा जन्म २१ मार्च १८७१ रोजी एका गुलाम कुटुम्बात झाला. जन्मानंतर सतराव्या दिवशी एका चर्चमध्ये तिचे नामकरण झाले. १८८८ मध्ये ब्राझील मधून गुलामगिरीचे अुच्चाटन झाले. डॉक्टरांचे म्हणणे असे की चार फूट अुंची असलेल्या या जेरोनिमाला म्हातारपण अुशीरा आले. आता गिनीज बुकचे अधिकारी आपली नोन्द बदलतील काय हे पहायचे आहे.



## तीन त्यागी

दृढनिश्चयी विक्रमादित्य पुन्हा झाडापाशी आला. त्याने झाडावरून प्रेत खाली उतरवले आणि ते खांद्यावर घेतले. नेहमीप्रमाणे तो श्मशानाची वाट चालू लागला. तेव्हा प्रेतात वसत असलेला वेताळ बोलू लागला. "हे राजा, आपल्या राज्यात काम करीत असलेल्या सर्व लोकांवर विश्वास ठेवून राजा स्वस्थ बसून राहिला, तर तो राजाचा मूर्खपणाच ठरेल. राजा अविवेकी आहे हेच त्यामुळे सिध्द होईल. राजनीतीचे हे प्रमुख सूत्र चंद्रसेन नावाचा राजा विसरला. त्याने आपल्या एका हेरासाठी आपले प्राण पणाला लावले. त्या राजाची गोष्ट मी तुला सांगतो.

फार वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. शरश्चन्द्रिका नावाच्या राज्याचा राजा चंद्रसेन याच्या दरबारात शिवदत्त नावाचा एक तरुण गुप्तचराचे काम करीत असे. राजाचं त्याच्यावर खूप प्रेम होतं. शिवदत्ताची राजभक्ति वाखाणण्यासारखी

वेताळ कथा



होती. चन्द्रसेनचा शिवदत्तवर पूर्ण विश्वास होता.

शरश्चन्द्रिका राज्याच्या शेजारी एक राज्य होते- मणिपूर. मणिपूरच्या राजाचे नाव होते प्रचंड. गेले काही दिवस प्रचंड शरश्चन्द्रिका राज्य हडपण्याचा विचार करीत होता. चंद्रसेनच्या हे लक्षात आले. आपण स्वत: मणिपूरवर आक्रमण करावे असा त्याने निश्चय केला. प्रचंडने युध्दाची कितपत तयारी केलेली आहे, त्याच्या किल्ल्यात प्रवेश करण्यासाठी कोणता मार्ग सुगम आहे हे ही त्याला माहित करून घ्यायचे होते. ही सर्व कामगिरी राजाने शिवदत्तकडे सोपविली.

शिवदत्त एका सामान्य नागरिकाच्या वेषात मणिपूर राज्यात शिरला. मोठ्या चतुराईने त्याने माहिती मिळविली की मणिपूरच्या राजाकडे सैन्यबल किती आहे, त्याच्याकडे कोणकोणती शस्त्रास्त्रे आहेत व किल्ल्यात प्रवेश करण्याचा सर्वात सोपा मार्ग कोणता?

ही सर्व रहस्ये राजा चन्द्रसेनला सांगण्यासाठी तो मोठ्या उत्साहाने जंगलातील वाटेने शरश्चन्द्रिका राजधानीकडे जलद गतीने जाऊ लागला.

अकस्मात् शिवदत्तला एका झाडाखाली एक राक्षस पहुडलेला दिसला. तो डुकल्या घेत होता. त्याला पाहून शिवदत्तला मोठे आश्चर्य वाटले. जरा ही न डगमगता तो तेथून सटकणार, इतक्यात राक्षसाने आपले लाल डोळे उघडले. तो ओरडून म्हणाला- ''आहेस तेथे थांब! माझा डोळा चुकवून तू जाऊ शकणार नाहीस. माझ्या तावडीत सापडणारा तू पहिलाच माणूस आहेस''. असे म्हणत तो उभा राहिला आणि त्याने शिवदत्तला आपल्या हाताने पकडून वर उचलले.

शिवदत्त भयाने थरथरत त्याला म्हणाला- ''हे राक्षसा, एक क्षण भर थांब, मी काय म्हणतो ते ऐक - माझं नाव शिवदत्त. राजा चंद्रसेनच्या दरबारी मी गुप्तचराचे काम करतो. शत्रूशी संबंधित एक विशेष समाचार महाराजांना सांगायला चाललोय. ही वार्ता महाराजांना शक्य तितक्या लवकर कळविणे माझे कर्तव्य आहे. मी आपले काम करून येतो, मग तू मला खुशाल



खा.''

त्याच्या बोलण्यावर राक्षस हसून म्हणाला- ''आता तुला सोडलं तर पुन्हा तू थोडाच या हाती लागणार आहेस? तू राजाला जी वार्ता देणार आहेस ती मला पण सांग की!''

शिवदत्त दृढपणे म्हणाला- ''नाही, महाराज सोडून दुसऱ्या कुणाला ती मी सांगू शकणार नाही!''

राक्षसाने हट्ट धरला. तो म्हणाला- ''मला ती वार्ता सांगितलीस तरच मी तुला सोडीन. नाहीतर आताच मी तुला खाऊन टाकतो.

''तुझी मर्जी! जे वाटेल ते कर.'' शिवदत्त निर्धाराने म्हणाला.

त्याच्या या उत्तरावर आश्चर्यचकित होऊन राक्षस म्हणाला- ''तू मला फार आवडलास. मी तुझ्यावर खुश आहे. राजाकडे जाऊन तुला काय सांगायचंय ते सांग आणि झटपट परत ये. जा.''

शिवदत्ताने कृतज्ञतापूर्वक राक्षसाकडे पाहिले. तो राजाकडे गेला. राजाला पाहिजे ती सर्व माहिती त्याने सांगितली. शिवदत्त कुठे तरी जाण्याच्या गडबडीत आहे हे राजाने ओळखले. राजाने विचारले- ''एवढ्या गडबडीने कुठे निघाला आहेस?''

राक्षसाबाबत सांगून शिवदत्त म्हणाला- ''महाराज, माझी आपणास एक विनंती आहे. माझ्या मृत्यूनंतर माझ्या कुटुंबाची देखरेख आपण करावी.'' असं म्हणून तो जंगलाकडे



जायला निघाला.

सत्यपरायण व राजभक्त शिवदत्तबद्दल राजाच्या मनातील प्रेम व आत्मीयता उफाळून आली. त्याची अपूर्व निष्ठा पाहून राजाचे अंत:करण दाटून आले. त्याने आपल्या सर्व मंत्र्यांना बोलावले आणि शासनाबाबत काही विषयांवर चर्चा केली. मंत्र्यांना आवश्यक त्या सूचना देऊन शिवदत्तच्या लक्षात न येईल अशा बेताने राजा त्याच्या मागे चालत राहिला.

दिलेल्या वचनानुसार शिवदत्त परत आलेला पाहून राक्षसाला मोठा आनंद झाला. तो काही बोलणार त्यापूर्वीच राजा चंद्रसेन त्याच्या पुढ्यात जाऊन उभा राहिला नि म्हणाला- ''हे राक्षसोत्तम, सत्यव्रती शिवदत्ताला तू पहिलंस



ना? तो जेव्हा माझ्या कामावर होता तेव्हा तू त्याला प्रथम भेटलास. म्हणून त्याच्या संरक्षणाची जबाबदारी माझी आहे. आता तू त्याला सोडून दे आणि मला खाऊन टाक.''

शिवदत्त म्हणाला- ''महाराज, हे आपण काय बोलता आहात? आपल्या सारखा राजा मरण पावला, तर सर्व प्रजा दुःखसागरात बुडून जाईल.''

''शिवदत्त, राज्याची मला काही चिंता नाही. तू राजधानीत गेलास की मंत्रीगण तुला राज्याभिषेक करतील. यासाठी मी योग्य ती सर्व व्यवस्था करून आलो आहे. तुझ्यासारख्या राजाच्या शासनाखाली प्रजा सुखी व शांत राहील याबद्दल मला काही संशय नाही.'' राजा चन्द्रसेनने शिवदत्तला समजावले.

राजा व शिवदत्त यांच्यातील हा संवाद ऐकून राक्षस आनंदाने म्हणाला- ''मला पाहताच पळून जाणारी माणसेच मी आजपर्यंत पाहिली आहेत. मृत्यूच्या स्वागतासाठी तयार असलेली तुमच्यासारखी माणसे विरळाच! आता तुम्ही दोघे मिळून मला एक गोष्ट सांगा. तुम्हाला अशी शंका येत नाही का की एकाद्या वेळी मी तुम्हा दोघांना ही खाऊन टाकीन?''

यावर हसून राजा म्हणाला- ''शिवदत्तावर विश्वासून तू त्याला सोडून दिलंस. यावरून न्याय व अन्यायाची जाण तुला आहे हे मला चांगलं समजलं. म्हणून मी एकटाच तुला सामोरा आलो. अन्यथा मी आपली असंख्य सेना बरोबर आणली असती नि तुझ्याशी लढलो असतो.''

''मी कोणाला खावं हे तुम्हीच ठरवा आता. मला तर खूप भूक लागली आहे.'' राजाची प्रशंसा करीत राक्षस म्हणाला.

शिवदत्त ताबडतोब राजाला म्हणाला- ''महाराज, राज्य-कारभार संभाळण्याची माझी योग्यता नाही. कृपा करून आपण राजधानीत परत जावे.''

क्षणभर विचार करून राजा राक्षसाला म्हणाला- ''आमच्यापैकी कोणाला तू खायचं याचा निर्णय मी घेईन. पण यासाठी तुला थोडा धीर धरला पाहिजे.''

''ठीक आहे, मी थांबतो थोडा वेळ. पण तुझी अडचण काय आहे तें तर सांग.'' राक्षसाने विचारले.

''तर मग ऐक. शिवदत्त राजधानीत जाईल. त्याच्या नेतृत्वाखाली सेना प्रचंडवर आक्रमण करील. जर शिवदत्तने प्रचंडला पराभूत केलं तर तोच माझ्या राज्याचा राजा बनेल. मग तू मला खाऊन टाक. पण जर प्रचंडचा जय झाला तर तू शिवदत्तला खायचं!'' राजाने आपली योजना सांगितली.

राक्षस शिवदत्तला म्हणाला- ''शिवदत्त, तू लगेच इथून नीघ. तू परत येईपर्यंत राजा माझा कैदी बनून राहील.''

राजाच्या आदेशानुसार शिवदत्त राजधानीत परतला. आपले सर्व सैन्य एकवटून त्याने प्रचंडवर आक्रमण केले. एक आठवडा भर घनघोर युध्द झाले, आणि शेवटी त्याने प्रचंडला पराभूत केले.

यानंतर शिवदत्त राक्षसाकडे आला. त्याच्या बरोबर एक सुंदरी होती. तिच्याकडे पहात राक्षसाने विचारले- ''ही सुंदर कन्या कोण?''

''लढाईत मी प्रचंडला हारवले. ही त्याची सुकन्या मंदाकिनी! हिचे आमच्या महाराजांवर प्रेम आहे. विवाह करीन तर शरश्चन्द्रिका राज्याच्या राजाशीच करीन अशी हिने प्रतिज्ञा केली आहे.'' शिवदत्तने निवेदन केले.

आश्चर्यचकित होऊन राक्षस शिवदत्तला म्हणाला- ''आता या परिस्थितीत मी काय बरे करू?''

''या सुंदरीचे आपल्या महाराजांवर अतिशय



प्रेम आहे. हिला दुःखी बनवणं न्यायसंगत होणार नाही. म्हणून तू महाराजांना सोडून दे नि मला आपले भक्ष्य बनव.'' शिवदत्तने प्रार्थना केली.

''राजा, आता तूच सांग, शिवदत्तच्या या प्रस्तावावर तुझं काय म्हणणं आहे?'' राक्षसाने चन्द्रसेनला विचारले.

चन्द्रसेन अनिच्छेने म्हणाला- ''या सुंदरीचं माझ्यावर प्रेम आहे हे ठीक खरं. पण मी हिच्यावर प्रेम करतो की नाही याचा तर विचार कर. मी तर हिला कधी पाहिलं सुध्दा नाही. शिवदत्तने ज्या क्षणी प्रचंडचा पराजय केला, त्या क्षणी तोच शरश्चन्द्रिका राज्याचा राजा झाला. लग्न करायचं तर शरश्चान्द्रिका राज्याच्या राजाशीच अशी मंदाकिनीची प्रतिज्ञा आहे.



म्हणून हिने शिवदत्तशी लग्न केले की सर्व समस्या आपोआप सुटेल!''

मंदाकिनी तावडतोब राक्षसाला म्हणाली- ''राक्षसवर, मला शरश्चन्द्रिकाच्या राजाशी विवाह करायचा नाहीय, मला विवाह करायचाय शरश्चन्द्रिकेचा राजा चन्द्रसेनशी. माझी प्रतिज्ञा पण तशीच होती. महाराज तुला दिलेले वचन कधी ही मोडणार नाहीत. ते सांगत आहेत, त्यानुसार तू शिवदत्तला सोडून दे आणि आम्हा दोघांना खाऊन टाक. महाराजां बरोबर मी जिवंत राहू शकले नाही, तर निदान मरू तरी शकेन निश्चित! तेच माझे अहोभाग्य!''

राजकुमारी मंदाकिनीचे बोलणे ऐकून राक्षस आश्चर्यचकित झाला. तिघांकडे एकदा बारकाईने पहात तो म्हणाला- ''मनुष्य केवळ शरीरानेच नव्हे, तर मनाने ही दुबळा असतो, असे मी आजतागायत समजत होतो. मनुष्य स्वार्थी असतो, दुसऱ्यांना दुःख देण्यात त्याला सुख वाटते, त्याच्या मनात ईर्ष्या असते, तो अल्पजीवी व तुच्छ असतो असे मला वाटत असे. पण माणसात अद्भुत सद्गुण असतात हे तुम्हा तिघांकडे पाहून माझ्या लक्षात आले. मनुष्यात राजनिष्ठा असते, आपल्या सेवकांबद्दल आदर, श्रध्दा व प्रेम असते. हे गुण त्याला उन्नतीच्या शिखरावर चढवतात. मनुष्यात दैवी अंश असतो. हे सत्य जाणल्यावर आता तुमच्यापैकी कोणाला मी कसा बरे खाऊ? ज्याने आपल्या राजासाठी आत्मसमर्पण केले त्या शिवदत्ताला खाऊ? किंवा आपल्या सेवकासाठी प्राण पणाला लावणाऱ्या या राजाला खाऊ? की आपल्या प्रियकरासाठी जिवंत राहण्यापेक्षा मरण पसंत करणाऱ्या या कन्येला खाऊ? तुम्हा तिघांपैकी कोणा ही एकाला मी खाल्लं तर ते एक निंद्य व तुच्छ काम होईल. मी मोठ्या आनंदाने तुम्हाला तिघांना ही सोडून देऊ इच्छितो. आणि मी जंगल सोडून दूर कोठे तरी निघून जातो.'' असे म्हणत राक्षस उडाला नि क्षणार्धात अदृश्य झाला.

एवढी गोष्ट ऐकवून वेताळाने विक्रमादित्याला विचारले- ''राजा, शिवदत्ताच्या एकूण व्यवहाराबाबत माझ्या मनात काही शंका आहेत. जर खरोखरीच तो राजभक्त असेल, तर प्रचंडशी केलेल्या लढाईत त्याने पराजित



व्हायला हवं होतं. मग तो राजा चन्द्रसेनच्या अटीनुसार राक्षसाचे भक्ष्य बनू शकला असता. पण त्याने असे केले नाही. आपले सर्व युध्द - कौशल्य पणाला लावून त्याने प्रचंडला युध्दात पराभूत केले. या परिस्थितीत राजालाच राक्षसाचे भक्ष्य बनण्यावाचून गत्यंतर राहिले नाही. या घटनेत मंदाकिनीचा प्रवेश न होता, तर शिवदत्त राजा झाला असता आणि राक्षसाने राजाला खाऊन टाकले असते. माहीत असून ही माझ्या या शंकांचे निवारण तू केले नाहीस, तर तुझे शिर धडावर राहणार नाही हे तू जाणतोसच.''

विक्रमादित्याने निवेदन केले - ''खरे शूर-वीर, राजभक्त कधी ही स्वार्थ-परायण नसतात, त्यांचे लक्ष नेहमी राज्याच्या क्षेमकल्याणाकडे असते. प्रचंडशी केलेल्या लढाईत जर शिवदत्त हारला असता, तर राज्याची प्रतिष्ठा धुळीस मिळाली असती. आपल्या राजाची अशी मानहानी होणे त्याला कधीच आवडले नसते. म्हणून शिवदत्तने आपली सर्व शक्ति पणाला लावून लढाईत प्रचंडला पराभूत केले. यामध्ये एक शक्यता होती. राक्षस राजाला खाऊन टाकणार अशी भीति होती. परंतु आतापर्यंतचा राक्षसाचा सद्व्यवहार पाहून शिवदत्तला पूर्ण विश्वास होता की राक्षस दयाळू आहे. उचित व अनुचित यातील फरक तो जाणतो. तो स्वभावाने क्रूर नाही. अशा स्वभावाचा राक्षस केवळ आपली भूक भागविण्यासाठी काही पैशाचिक कार्य निश्चित करणार नाही. म्हणून शिवदत्तने प्रचंडशी लढण्यात आपली सर्व शक्ति पणाला लावली. शिवदत्तला स्वतःसाठी राज्य मिळवण्याचा मोह नक्कीच नाही. तो खरा स्वामीनिष्ठ आहे. त्याच्या बद्दल शंका घेणेच गैर आहे. या सर्व गोष्टी लक्षात ठेवल्या तर सहज सिध्द होते की राजा चन्द्रसेन आपल्या एकनिष्ठ सेवकाशी कसला ही दुर्व्यवहार करणार नाही.''

अशा रीतीने राजाचा मौन-भंग झाल्यावर बेताल शवासह अदृश्य झाला व पुन्हा झाडावर जाऊन बसला.

**आधार - भवानी प्रसाद यांची एक कथा**



# लाकडी व चामड्याच्या चपला

हेलापूरच्या एका इस्पितळात आपला एक नातेवाईक अुपचारासाठी दाखल झालेला असल्याने केशव त्याला भेटायला तेथे गेला. त्या इस्पितळात बुध्दिभ्रंश झालेल्या रोग्यांवर ही अुपचार केला जाई.

तेथे पोचल्यावर केशवला समजले की आपल्या एक नातेवाईकाला भेटण्यासाठी अजून त्या तास तेथे प्रतीक्षा करणे आवश्यक आहे. त्यामुळे तो तेथील एका बाकावर बसला. शेजारीच बसलेल्या माणसाशी गप्पा मारता मारता केशवने आपल्या नातेवाईकाचे डोके कसे फिरले वगैरे सांगून त्या माणसाला विचारले, ''तुम्ही इथे कोणासाठी आला आहात?''

तो माणूस म्हणाला, ''मी स्वत:च्याच अुपचारासाठी गेले चार-पाच महिने येथे येत असतो. डॉक्टरांचं म्हणणं आहे की माझंही डोकं फिरलं असल्याची लक्षणं आहेत.''

केशवला फार आश्चर्य वाटले, कारण आतापर्यंत तो माणूस मोठ्या विनयाने आणि अगदी व्यवस्थित बोलत होता. त्याला तर त्या माणसात वेडेपणाचे जराही लक्षण आढळले नाही. केशव त्याला म्हणाला, 'तुम्ही तर अगदी सर्वसाधारण माणसांप्रमाणेच वाटतायं. तुमचं बोलणंही अगदी ठीकठाकच आहे की! मग या इस्पितळात औषधोपचार का घेताय?''

केशवच्या या बोलण्यावर तो माणूस जरासा हसला अन् म्हणाला, ''इथले डॉक्टर बऱ्याच काळापासून वेड्या लोकांवर अुपचार करत आहेत. मला तर वाटायला लागलंय की या डॉक्टरांच डोकं तर फिरलेलं नाही ना ? मला आपल्या लाकडी चपलां पेक्षा कातडी चपलाच जास्त आवडतात. तुम्हाला कोणत्या आवडतात ?''

केशव अुत्तरला, ''मलाही कातडी चपलाच आवडतात.''

''मग तुम्ही त्या अुकडून खाता की तळून ?'' त्या माणसाच्या या प्रश्नात एक प्रकारचा अुतावळेपणा होता. त्याच्या प्रश्नामुळे केशवला चक्रावल्यासारखे वाटले अन् तो तेथून बाहेर सटकला.

- सुरेंद्र यादव



## आपल्या देशातील किल्ले -४



जैसलमेर किल्ला

# रजपुतांचे किल्ले - २

लेखिका : मीरा अुग्रा, चित्रकार : सुलभा ठाकुर

भोवतालच्या वाळवंटातील चमकत्या वाळूतूनच वर आल्यासारखा दिसणाऱ्या जैसलमेर किल्ल्याच्या पिवळ्या चुनखडी दगडांच्या भिंतीवर अुगवत्या सूर्याचे किरण पडतात तेव्हा तो किल्लाच सोन्यासारखा झळाळून अुठतो!

११५६ मध्ये भाटी राजा रावळ जैसलदेवने हा किल्ला बांधला. या किल्ल्याचे वैशिष्ट्य म्हणजे दुहेरी भिंतीचा तट. घडी करून लोंबत ठेवलेल्या एखाद्या वस्त्राचा एक पदर अर्ध्यावर अुघडून रहावा अशी या दुहेरी भिंतींची रचना आहे. आतील तट बाहेरील भिंतीच्या दुप्पट अुंचीचा आहे. स्थानिक लोक या तटाला 'कमरकोट' किंवा 'पादा' असे म्हणतात.

या किल्ल्याने अनेक लढाया पाहिलेल्या आहेत. सर्वात जास्त काळ टिकून राहिलेला वेढा म्हणजे १२७६ ते १२८३ या प्रदीर्घ काळातील दिल्लीच्या सुलतान बल्बनने दिलेला वेढा.

जैसलमेर हे एक भरभराटीला आलेले व्यापारी केन्द्र होते. अफगाणिस्तान, सीरिया, इराक, पर्शिया, इजिप्त वगैरे देशांकडे जा-ये करणारे व्यापारी ताफे जैसलमेरमधूनच जात. १५७० मध्ये भाटी राजांनी अकबराशी मैत्रीसंबंध जोडल्यापासून येथील व्यापार जास्तच भरभराटीस आला. स्थानिक जैन व्यापाऱ्यांनी येथे अनेक मन्दिरे व

जैसलमेरमधील जाळीदार खिडक्या व सज्जे



हवेल्या येथे बांधल्या. यातील जाळीदार दगडी खिडक्या, उत्तम नक्षीकामाचे सज्जे व भित्तिचित्रे प्रसिध्द होती.

राजस्तानच्या इतर किल्ल्यांच्या तुलनेत १५९४ मधे बांधला गेलेला बिकानेरचा 'जुनागड' हा किल्ला नवाच म्हणाला लागेल. याचा सांभाळ चांगल्या प्रकारे केला गेलेला आहे. बिकानेरच्या महालांच्या जाळीदार खिडक्या व भित्तिचित्रे अवर्णनीय आहेत. बाहेरील वाळवंटी गरम वाऱ्यांपासून रक्षण करून आतील हवा थंड ठेवण्याचे काम



जुनागड किल्ला



बिकानेर महालाचे अंतरंग

या दगडी जाळीच्या खिडक्या उत्तम प्रकारे करतात.

जयपूरजवळचा अंबरगड किल्ला हा त्यात कच्छवाहा राजांनी बांधलेल्या महालांसाठी प्रसिध्द आहे. अंबरगडच्या संरक्षणासाठी 'टेहळणी बुरूज' म्हणून जयगड व नाहरगड या दोन लहान किल्ल्यांची निर्मिती केली गेली आहे. परन्तु या तीन्ही किल्ल्यांना कधीही एकाद्या लढाईला किंवा वेढ्याला तोंड द्यावे लागले नाही.

'चील्ह' टेकडीवर बांधण्यात आलेल्या जयगड किल्ल्यात शस्त्रागार, शस्त्रे बनवण्याचा कारखाना, व तोफा ओतण्याचा तोफखानाही होता. येथील तळघरात राजघराण्याचे धन सुरक्षित ठेवलेले असे. येथील 'मीन' या पहाडी जातीचे प्रमुख या धनाचे रक्षण करीत. फक्त आणीबाणीच्या प्रसंगीच राजा यातील धनाचा उपयोग करू शकत असे; व तो ही अगदी आवश्यक इतक्या धनाचाच! मीना जातीचा रक्षक, राजाला डोळ्यांवर पट्टी बांधून तळघरातील त्या विशिष्ट भागात धन आणण्यासाठी घेऊन जात असे.



जयगडचा टेहळणी बुरूज



जैवान तोफ

जयगडमधे असलेली 'जैवान' ही तोफ भारतातील सर्वांत जड असणारी तोफ म्हणून गणली जाते. बनल्यानन्तर तिची परीक्षा करण्यासाठी केवळ एकदाच ती डागली गेली.

जाट राजा सूरजमल याने १७३२ मधे लोहगड किल्ला बांधला. हा किल्ला भरतपूरच्या जुन्या किल्ल्यावरच बांधला गेला आहे. किल्ल्याचा तट फक्त मातीनेच बांधलेला असला, तरी तो तोफेच्या माऱ्यापुढेही टिकू शकला होता.

१८२५ च्या नोव्हेंबर मधे ईस्ट इंडिया कंपनीच्या २७,००० सैनिकांनी या किल्ल्याला वेढा दिला. ६४,४४६ तोफगोळे मुध्दा जेंव्हा निरुपयोगी सिध्द झाले, तेंव्हा २०,००० पौंड प्रस्फोटकाचा उपयोग करण्यात आला. या स्फोटाचा आवाज आग्र्यापर्यन्त ऐकू आला होता.



लोहगड किल्ला

शेवटी जानेवारी १८२६ मधे भरतपूरचे पतन झाले.

१२४१ मधे देवसिंग नामक हाडा नायकाने मीना जातीचा प्रधान बुंदु याला हारवले. त्याने हाडौती राज्याची स्थापना केली. या राज्याची राजधानी होती बूंदी. देवसिंगचा पणतू रावबारसिंग याने १३५२ मधे 'तारागड' नावाच्या किल्ल्याची निर्मिती केली. त्याच्या वंशजांनी महाशे वर्ष या राज्यावर निष्कंटक राज्य केले.


लुटुपुटीचा किल्ला

हाडा सैनिकांच्या वीरतेबद्दल अगणित गोष्टी प्रसिध्द आहेत. एकदा अुदेपुरचा राणा लाखा याने, 'आपण बुंदी जिंकेपर्यन्त काहीही खाणार वा पिणार नाही', अशी शपथ घेतली. राजाच्या खालावत जाणाऱ्या तब्येतीची काळजी वाटून त्याच्या अुपदेशकांनी एक लुटूपुटीचा 'किल्ला' बनवला अन् राणाला तो जिंकायला सांगितले.

कुंभ हाडा नावाच्या एका सैनिकाला या किल्ल्याचा किल्लेदार बनवून, त्याला 'राणाने हल्ला केल्याबरोबर शरण येण्याबद्दल' सांगून ठेवले. ठरलेल्या वेळी एका टहानशा पथकाने 'हल्ला' ही केला. पण आश्चर्य म्हणजे या लुटूपुटीच्या किल्ल्यातून त्यांच्यावर बाणांचा वर्षाव करण्यात आला! आश्चर्यचकित झालेले व झाल्या प्रकाराने रागावलेले सैनिक आत घुसले, पण कुंभ हाडा त्यांच्यासमोर युध्दाला ठाकला. अुपसलेली तलवार हातात धरून तो म्हणाला, "हॉं, किल्ला लुटूपुटीचा असेलही. पण हाडा तर खरोखरचाच आहे ना? मी बुंदीचा पाडाव होऊ देणार नाही!" या घटनेने राणा लाखा याचे मन बदलले अन् त्याने बुंदी जिंकायचा विचार सोडून दिला.

रागमाला, बारहमासा आणि अन्य नमुनेदार चित्रांमुळे प्रसिध्दीस आलेला बुंदीचा किल्ला हा म्हणजे अुदयास येणाऱ्या कलाकारांची कार्यशाळाच होती.


तारागड किल्ला



# प्रीतम आणि भुतं

भद्रपुरचा प्रीतम एक प्रसिध्द मान्त्रिक होता. लोकांचा असा विश्वास होता की, प्रीतमच्या नुसत्या नावानेच भुतंखेतं गावाच्या सरहद्दीपासून दूर पळून जातात. त्याची बायको अन्नपूर्णा मोठी प्रामाणिक अन् सरळ स्वभावाची बाई होती. परन्तु प्रीतमचा स्वभावमात्र अगदी तिच्या विरुध्द होता. त्यांच्या घरी जेंव्हा चांगली पक्वान्नं बनवली जात, तेंव्हा त्यांचा बाहेर कोणाला वास तर येत नाही ना; अशी त्याला भीती वाटे. तसं घडलं तर ती अन्नपूर्णाला खूप रागावे.

एक दिवशी संध्याकाळी चार लोक त्याच्या घरी आले. ते सर्वजण अन्नपूर्णाचे दूरचे नातेवाईक होते. ते म्हणाले, "अन्नपूर्णा, आम्ही खूप दूरवरून चालत आलोय अन् अजून आम्हाला खूप दूर जायचंय. अगदी थकून गेलोय आम्ही. आजच्या रात्रीच्या जेवणाची आमची सोय केलीस तर मोठा अुपकार होईल बघ."

अन्नपूर्णा त्यांना म्हणाली, "अवश्य. तुम्ही लोक थोडा वेळ त्या कट्ट्यावर आराम करा. मी पटकन स्वयंपाक करते."

यावेळी तिचा पती प्रीतम चार कोसावरच्या गावात कुणा माणसाचं भूत अुतरवायला गेलेला होता. तो परत येण्यापूर्वीच पाहुण्यांना जेवावला घालून पाठवून द्यायचा तिचा विचार होता. तिला माहीत होतं की प्रीतम लवकर आला अन् चार माणसांना आपल्या घरात जेवताना त्यानं पाहिलं, तर पाहुण्यांना चांगला चोप देअून तो हाकलून लावील.

यामुळेच तिने भराभर स्वयंपाक अुरकला अन् पाहुण्यांना जेवायला वाढलं. दरवाजाही तिनं आतून बन्द करून घेतला. तरीही नवरा अचानक येअून टपकेल अशी भीती तिला होतीच, म्हणून ती खिडकीशी अुभी राहून डोळे ताणताणून रस्ता न्याहाळू लागली.

शंकर घाणेकर



पाहुणे फार भुकेले असल्यामुळे ते जेवणावर तुटून पडले होते.

इतक्यात गल्लीतली कुत्री भुंकायला लागली. गल्लीत पोचल्याबरोबर प्रीतमने आपल्या हातातल्या छडीनं एका कुत्र्याला जोराने मारलं, अन् तो ओरडला, ''या प्रीतमची भुतांवरची मन्त्र-शक्ती गावच्या या कुत्र्यांना काय माहीत!''

इकडे पाहुण्यांचं जेवण संपत आलं होतं. खिडक्या भराभर बन्द करून अन्नपूर्णा त्यांना म्हणाली, तुम्ही लोक लवकर लवकर खाऊन घ्या. माझा नवरा पोचेलच इथे इतक्यात. तो कसल्या स्वभावाचा आहे, हे मला, त्याच्या गाववाल्यांना अन् भुतांना माहीतच आहे. तुम्हाला जेवताना त्यानं पाहिलं, तर तुमची अन् माझीही खैर नाही. मी आता परसदारी जाते. माझ्या नवऱ्यानं दरवाजा ठोठावला, तरी उघडू नका मुळीच! तुमचं जेवण संपेपर्यन्त ओरडू दे त्याला. नंतर हा दिवा विझवून टाका अन् दरवाजा उघडून एकदम मुसंडी मारून अंधारात नाहिसे व्हा!'' आणि ती परसात निघून गेली.

प्रीतम दरवाजा ठोठावत राहिला तरीही कोणी तो उघडेना. शेवटी तो ओरडला, ''अन्नपूर्णा! ए अन्नपूर्णा! दरवाजा उघड ना!'' अन् पुन्हा तो ठोकत राहिला.

एक मिनिटातच अचानक दरवाजा उघडला. घरात मिट्ट काळोख होता. त्या अंधारातूनच चार आकृत्या पुढे आल्या अन् प्रीतमला खाली पाडून त्यालाच पायांखाली तुडवत बाहेर पळून गेल्या.

''अरे मेलो मेलो!'' म्हणत प्रीतम ओरडत राहिला अन् स्वत:शीच बडबडू लागला, ''ही माणसं आहेत की भुतं?'' वेदनांमुळे त्याला चटकन उठताही येत नव्हतं. आपल्या पायाचं हाडबीड मोडलं तर नाही ना अशी शंकाही त्याला येऊ लागली. पुन्हा तो ओरडू लागला, ''अन्नपूर्णा! अग बायको आहेस की कोण? कुठे मेलीयस?''

''आले, आलेऽ!'' म्हणत अन्नपूर्णा परसातून घरात आली. तिने घरात दिवा लावला आणि प्रीतमजवळ येत म्हणाली, ''अरे अरे! काय झालं? असा काय अवतार करून घेतला आहात आपला? कपड्यावर भाजीचे डाग? डोक्यावर पत्रावळही दिसतेय? अरे हांऽ! हे नक्कीत त्याचंच काम दिसंतय!

वेदनेनं कण्हत प्रीतम कसाबसा घरात आला. येता येता तो विचारू लागला, ''कुणाचं काम? काय म्हणते आहेस तू?'' अन् घरात खाली इकडे-तिकडे सांडलेलं अन्न पाहून गुरगुरत तो म्हणाला, ''हं! माझ्या अनुपस्थितीत कोणा सोम्या-गोम्यांना जेवायला घालत होतीस होय?''

अन्नपूर्णा आपल्या हातातला दिवा ठाणवईवर ठेवत म्हणाली, ''तोंडाला येईल ते बोलत सुटलात! सकाळी कुणा भल्या माणसाचं तोंड पाहिलं, म्हणूनच माझं कुंकू सहीसलामत राहिलं पहा!''

''काय बडबड लावलीयस? मी काय विचारतोय, अन् तू काय बोलतेयस!'' रागानं तो बोलला खरा, पण त्याला एकदम काही संशय येऊन त्यानं आपला आवाज खाली आणला.

डोळ्यातलं पाणी पदरानं टिपत अन्नपूर्णा म्हणाली, ''आता पश्चाताप करून काय होणार? तुम्ही ही भूतविद्या न शिकता शेती किंवा काही व्यापार वगैरे केला असतात, तर चांगलं नसतं का झालं?''

तिला मध्येच थांबवत प्रीतम म्हणाला, ''काय बडबड लावलीयस ही? कोणी भूत



बीत तर नाही संचारलं ना अंगात?'' अन् अन्नपूर्णाकडे तो संशयी नजरेनं पाहू लागला.

''असं तर एक ना एक दिवस होणारच होतं. पण आज काय घडलं ते ऐका ना! तुम्ही भूत उतरवायला शेजारच्या गावी गेलात. तुम्ही तिथं त्या भुतांना पळवून लावलंत. पण ती सरळ इथं आली. त्यांनी मला खूपशा शिव्या दिल्या अन् म्हटलं, 'ए भुतांचा राजा प्रीतमची बायको! आम्ही आपल्या अपुऱ्या इच्छा पुऱ्या करायला एकाद्याच्या अंगात संचार करतो. कधी पोटभर खाण्यासाठीही असं करतो आम्ही. पण तुझा नवरा? तो आमच्यावर मन्त्रप्रयोग करतो, अन् आम्हाला पळवून लावतो, आमच्या इच्छा पुऱ्या करून

घेण्यात तो विघ्न आणतो. आता तूही पहात रहा, सडक्या पत्रावळी अन् किड्यांनी भरलेली कडूलिंबाची पानं त्यानं खाली ठेवली, की आम्ही ओरबाडून खाऊन टाकू त्यांनी आपल्या घरातच ठाण मांडलं.''

प्रीतमनं आपली छडी अुचलली अन् तो म्हणू लागला, ''कुठं आहेत ती सांग बरं!''

अन्नपूर्णा म्हणाली, ''थांबा, थांबा! मला पुरतं सगळं सांगू द्या. त्या भुतांकडे पाहूनच मला असं वाटलं की, ती भुकेनंच तडफडत आहेत. मी एक तपेलंभर भात अन् टोपलीभर भाज्या शिजवल्या अन् त्यांच्या समोर ओतलं सारं अन्न. तेंव्हा ती भुतं त्यावर तुटून पडून आधाशासारखी खाऊ लागली. मी त्यांना विनवलं की आता तरी माझ्या नवऱ्याला क्षमा करा. सर्वांनी खाता खाताच डोकी हलवून कबूली तर दिली, पण त्यांच्यातलं एक लंगडं आणि तिरळं भूत म्हणालं ? ''तुझ्या नवऱ्याला मी तरी मुळीच सोडणार नाही. त्याला आगीत भाजूनच तुकडे तुकडे करून टाकणार आहे मी! असं न केलं तर रंगापुरचा रंगा नव्हेच मी! असं म्हणत तो एकाच पायावर अुभा राहिला अन् रागानं थयथयाट करू लागला. ते पाहून मी तर भीतीनं कापू लागले, अन् मनातल्या मनात तुमच्या सुरक्षिततेसाठी प्रार्थना करायला लागले. इतक्यात तुम्ही आलातच. त्यांना कदाचित् माझी दया आली असावी, किंवा त्यांना तुमचं भय तरी वाटलं असावं. बस, पळून गेली ती.''

प्रीतमही आता थरथर कापत म्हणाला, ''असं ? त्या भुतांच्यात रंगाही होता होय? म्हणजे तर मी थोडक्यात वाचलो म्हणायचं! मी त्याच्या तावडीत सापडलो असतो, तर खरंच त्यानं मला तुकडे तुकडे करून खाल्लं असतं.'' असं बोलत तो मन्त्रोच्चार करू लागला; त्याने देवघरात जाऊन दार बन्द करून घेतलं.

नवरा देवघरात शिरताच अन्नपूर्णानं समाधानाचा श्वास सोडला अन् त्या भुतांची मनोमन क्षमा मागितली. थोड्या वेळापूर्वी त्यांना तिनं अुगीचच शिव्या दिल्या होत्या!





# नोकराची अक्कल

इस्लामपुरच्या भैरवला एका नोकराची गरज होती. याबद्दल तो आपला मित्र केशव याच्याजवळ बोलला.

केशव म्हणाला, ''माझ्याजवळ दोन माणसं आहेत; चांगली विश्वासपात्रही आहेत. त्यातला एक चांगला बुध्दिमान आहे; पण तो काम तितकं मन लावून करत नाही, अन् पगार मात्र भरपूर हवाय त्याला. दुसरा जो आहे, तो अगदी बुध्दू आहे. पण मन लावून काम करतो अन् जास्त पगाराचीही अपेक्षा नाहीय त्याची. आता यांच्यापैकी कुणाला तुझ्याकडे पाठवू, ते तूच सांग.''

''मालक बुद्धिमान असेल तर बुध्दु नोकराकडूनही तो काम करून घेऊन शकतो. तू त्या दुसऱ्या माणसालाच पाठव माझ्याकडे.'' भैरव म्हणाला.

अशा प्रकारे शंकर नोकर म्हणून भैरवकडे काम करू लागला. त्याच्याकडून महिनाभर काम करून घेतल्यावर भैरव त्याच्यावर खुश झाला. भैरवची मुलगी जवळच्या शहरात रहात असे. तिने एकदा आपल्या पित्याकडे चिठ्ठी पाठवली ''माझ्या नणदेचं लग्न ठरलं आहे. वराकडल्यांना आमच्याकडून आपल्या गावी मिळतात तशा दोन बैंगणी रंगाच्या साड्या हव्या आहेत. येत्या शनिवारपर्यन्त मला त्या मिळायला हव्यात.''

चिठ्ठी आणणारा माणूस भैरवला म्हणाला, ''मी आजच संध्याकाळी शहरात परतणार आहे. त्यापूर्वी आपण साड्या आणून ठेवल्यात तर मीच घेऊन जाईन.''

भैरवने लगेच रंगोबाला निरोप पाठवला. कळले की बैंगणी रंगाच्या साड्या त्याच्याजवळ तयार तर नाहीत, पण दोन दिवसात रंगवून मिळू शकतील. त्या दिवशी बुधवार होता. भैरवने चिठ्ठी आणणाऱ्या बरोबर निरोप दिला की, शनिवारपर्यन्त साड्या पोचवायची व्यवस्था होईल. नंतर शंकरला बोलावून त्याला

प्रफुल्ल गोपुजकार



सगळी हकिकत सांगून भैरव म्हणाला, ''शनिवारी शहरात जाऊन तुला माझ्या मुलीला भेटायचं आहे. नीट लक्षात ठेव.''

''मग शुक्रवारी रात्रीच मला इथून निघायला हवं. आपण काही काळजी करू नका. मी शनिवारी नक्की पोचेन तिथे.'' शंकर उत्तरला.

शुक्रवारी पाऊस पडायला लागला. सकाळपासून संध्याकाळपर्यन्त अगदी मुसळधार पाऊस पडला. पाऊस थांबल्यावर रंगोबाने भैरवकडे साड्या आणून दिल्या, अन् तो म्हणाला, ''रंग अजून पक्का झालेला नाही. मोठ्या काळजीपूर्वक मी त्या बांधल्या आहेत. आणखी एक दिवस यांच्यावर पाणी पडायला नकोय,'' नंतर रंगोबा निघून गेला.

भैरव ताबडतोब शंकरला हाक मारून म्हणाला, ''या साड्यांवर पाणी पडू देऊ नकोस. पाणी पडलं तर रंग बिघडून जाईल.''

साड्या हाती घेत शंकर म्हणाला, ''मी थेंबभर सुद्धा पाणी पडू देणार नाही यांच्यावर. मी वचनाचा पक्का आहे. जेवण करून लागलीच निघतोच मी.''

नंतर भैरव अन् त्याची बायको आपसात बोलू लागली. बायको भैरवला म्हणाली, ''नणंदेच्या सासरकडच्यांनी मागितल्या तशाच साड्या आपली मुलगी त्यांना देत आहे. त्यामुळे तिच्या सासरची माणसं आपल्या मुलीचं खूप कौतुक करतील.''

''बरं झालं, योग्य वेळी आपल्याला शंकर सारखा विश्वासू नोकर मिळाला. तो नसता तर मलाच शनिवारी सकाळी निघावं लागलं असतं. हल्ली प्रवास करणं फार जिकिरीचं वाटतं मला. वैताग नुसता!'' भैरव बोलला.

इतक्यात शेजारच्या घरातून काही गडबड ऐकू आल्याने ते दोघेही तेथे गेले. भैरवचा मित्र राजाराम याच्या वडिलांना अचानक हृदयविकाराचा झटका आला होता. वैद्याने तपासून असे सांगितले की, ''माझ्याजवळ इथे योग्य ती औषधं नाहीत. तुम्ही ती ताबडतोब शहरातून मागवा, किंवा यांनाच जमलं तर बरोबर घेऊन जा. मी तात्पुरतं औषध दिलंय.''

शहरात भैरवच्या ओळखीची बरीच माणसं होती. शिवाय त्याची मुलगीही तिथेच होती,



म्हणून मदतीसाठी तोही या लोकांबरोबर जायला तयार झाला. ताबडतोब गाडीची व्यवस्था करण्यात आली. राजारामच्या परिवारातली इतर माणसेही निघाली. भैरव त्यांच्या गाडीतून निघाला. जाताना वाटेत त्याने शंकरच्या घराशी गाडी थांबवली. त्याला असे कळले की, शंकर अगोदरच शहराकडे रवाना झालेला आहे. त्याने मनात विचार केला; ''आपण स्वत: तर शहराकडे निघालो आहोतच. शंकरला निघायला अजून जरा उशीर झाला असता तर बरं झालं असतं.''

पण आता शंकर वाटेतही भेटण्याची काही शक्यता नव्हती, कारण शहराकडे जाणारी पायवाट निराळी होती. भैरवने राजारामच्या वडिलांची एका उत्तम डॉक्टरकडे तपासणी करवली. डॉक्टर म्हणाले की, ''तसं घाबरण्यासारखं काही नाहीय. पण निरीक्षणासाठी यांना दोन दिवस इथे दवाखान्यात ठेवलंत तर बरं होईल.'' मग ती सर्व व्यवस्था करून भैरव मुलीच्या घरी गेला.

आपल्या वडिलांना पाहून खुश होत मुलीने विचारले, ''बाबा, प्रवास झेपत नाही, तर इतके कष्ट कशाला घेतलेत? साड्यांसाठी एकादा नोकरही पाठवता आला असता ना!''

इतक्यात सासरे म्हणाले, ''अग सूनबाई, असं काय बोलतेस आपल्या बाबांना? इतक्या शुभमुहूर्तावर ते आलेत हे भाग्यच नव्हे का आपलं? आले, ते चांगलंच झालं की!''



भैरवने मुलीला सर्व हकिकत सांगितली अन् म्हटले, ''म्हणजे शंकर अजूनही इथं पोचला नाही तर! चालत निघालाय ना, येईल थोड्या वेळात. आता आलोच आहे, तर लग्नालाही हजर राहीन म्हणतो.''

थोड्या वेळाने शंकर आलाच. तो पावसात खूप भिजलेला होता. भैरव त्याला म्हणाला, ''पाऊस पडत होता ना, थोडा वेळ थांबला असतास, तर साड्या मी स्वत:च घेऊन आलो असतो.''

''मालक, पण मी म्हटलं नव्हतं का, की मी वचनाचा अगदी पक्का आहे. आपल्या आज्ञेनुसार शनिवारी शहरात पोचून छोट्या मालकिणीला भेटायचं होतं ना? मग पाऊस पडो नाहीतर

वादळ होवो; मी आल्याशिवाय कसा राहीन?'' शंकर अभिमानाने म्हणाला.

संशयभरल्या आवाजात भैरवने त्याला विचारले, ''आलास ते चांगलं झालं रे! पण रंगोबानं साड्या भिजू देऊ नको, असं बजावलेलं आठवणीत आहे नं ?''

''आपण सांगिलंत, अन् मी ऐकणार नाही ते ? मी बरा साड्या भिजू देईन ? एक थेंबभरही पाणी पडलं नाहीय त्यांच्यावर. मोठी सावधानी बाळगलीय मी!'' शंकर बोलला.

आश्चर्य प्रकट करत भैरवने विचारले, ''ते कसं शक्य आहे ?''

''हाँ, अक्कल असेल डोक्यात, तर का नाही शक्य होणार ? मी निघालो, तेंव्हा पाऊस टपटपत होताच. मी दोन्ही साड्या एका लहान ट्रंकेत ठेवल्या.'' शंकर बोलला.

''मग आहे कुठे ती ट्रंक ?'' भैरवने ताबडतोब विचारले.

''पत्र्याच्या ट्रंकेत एकाद्या भोकातून पावसाचं पाणी शिरेल म्हणून ती मी घरीच पलंगाखाली ठेवून आलोय!'' आपली बुध्दिमानी दाखवत शंकर म्हणाला.

त्याचे बोलणे ऐकून घरातली सर्व माणसे एकदम हसू लागली. भैरवला खूप संकोचल्यासारखे वाटले. तो ताबडतोब गाडीने गावाकडे गेला अन् साड्या घेऊन कसाबसा लग्न मुहूर्ताच्या अगोदर परत आला.

गावाला परत पोचल्याबरोबर केशवला बोलावून घेऊन भैरव म्हणाला, ''तू तर मला प्रथमच सावध केलं होतंस, की शंकर मन लावून, प्रमाणिकपणे काम करतो. पण तो अगदीच बुध्दू आहे, तरीही त्याला कामावरून काढून टाकायची इच्छा नाहीय माझी. त्याला आता मी अशी कामं देईन की, ज्यात बुध्दीची फारशी गरज नसेल. गुरांची देखरेख करणं, झाडांना पाणी देणं, वगैरे कामं सोपवीन मी त्याच्यावर. पण तू आता त्या बुध्दिमान नोकराला पाठव. त्यानं पगार जास्त मागितला तरी चालेल. पण असली बुध्दिमान माणसं काम चांगलं समजून अन् वेळेवर करतात.''

केशवने नंतर भैरवने सांगितल्याप्रमाणे तो दूसरा नोकर पाठवून दिला.





# महाभारत

**ब्राह्मण** आपल्या बायकोला म्हणत होता- ''या जगात आपल्या बायकोमुलांसह सुखानं दिवस चालवण्याच्या मार्गच खुंटला आहे. आता आपण करणार तरी काय? तुमच्यापैकी कुणाला मी राक्षसाच्या हवाली करू? तुझ्यासारख्या साध्वीला काय मी राक्षसाच्या तोंडी देऊ? की अपला वंश पुढे चालवू शकणाऱ्या या अश्राप पोराचा बळी देऊ ? की विवाह करून द्यायची जबाबदारी माझ्यावर आहे त्या आपल्या मुलीला राक्षसाच्या हवाली करू ? आता मला एकच मार्ग दिसतोय; मी स्वत:लाच राक्षसाचं भक्ष्य बनवतो.''

परन्तु ब्राह्मणपत्नी या गोष्टीला संमती देईना. ती म्हणाली, ''तुमच्या मृत्यूमुळे माझं अन् मुलांचं रक्षण करणारं कोणी उरणार नाही. माझ्यात इतकी ही योग्यता नाही, की मी एकटी मुलाचं पालनपोषण करीन, त्यांचं भविष्य नीट घडवीन. तेंव्हा मीच राक्षसाचं खाद्य बनावं हेच ठीक होईल.

हे बोलणे ऐकून ब्राह्मणाने बायकोला मिठी मारली व ते दोघे ही रडू लागले. त्यांना शांत करायचा प्रयत्न करत मुलगी म्हणू लागली, ''तुम्ही दोघं उगीचच का रडत आहात? मला पाठवा ना राक्षसाकडे! शेवटी एक दिवस मला हे घर सोडून तुमच्यापासून दूर व्हावंच लागणार.

त्यांचा चार-पाच वर्षाचा मुलगा त्यावेळी मजेने इकडे- तिकडे बागडत होता. आपल्या बोबड्या भाषेत तो बोलू लागला, ''मीं लाक्षशाला मालून ताकीन. तुम्ही कोनी आता ललू नका.'' त्याचे हे बोलणे ऐकून तशा स्थिती



तही सर्वांना हसू आले.

कुन्ती त्यांची ही दु:खभरली हकिकत जवळच बसून ऐकत होती. ती आणखी जवळ सरकून म्हणाली, "ब्राह्मणदेवता, तुमच्यावर कसलं संकट कोसळलंय ते सांगा तरी. मला नीट सविस्तर सांगितलंत, तर माझ्याकडून होईल ती मदत करीन मी तुम्हाला."

ब्राह्मण कुन्तीला म्हणाला, "देवी, तुम्ही फार दयाळू आहात, म्हणूनच असं बोलत आहात. पण आमच्यावर कोसळलेलं संकट दूर करणं कोणत्याही मानवी व्यक्तीला अशक्यच आहे. या नगरा जवळच बकासुर नावाचा राक्षस रहातो. तो नरभक्षक असून, तो नरमांस खातो. अत्यन्त बलवान आहे तो. तो नगररक्षक असल्याने, त्याच्या अटीप्रमाणे रोज वीस पोती तांदुळाचा भात, दोन बैल आणि एक माणूस असा आहार गाववाल्यांनी आळीपाळीने त्याला पोचवायचा असतो. त्याबाबत कोणी दुर्लक्ष केलं किंवा बेपर्वाई दाखवली तर तो गावावर हल्ला करून गावकऱ्यांना हर तऱ्हेनं सतावेल. इथला राजा नेत्रकीय नगर नावाच्या ठिकाणी रहातो. गावाचं या संकटांपासून रक्षण करायचा तो जराही प्रयत्न करत नाही; कारण तो असमर्थ अन् शक्तिहीन आहे. असल्या अयोग्य राजाच्या प्रजेला अशी संकटं झेलावीच लागतात. आज आमच्यावर ती पाळी आली आहे. आम्ही राजाचे आश्रित असतो, किंवा धनवान असतो, तर आम्ही एकादा माणूस खरेदी केला असता. अन् त्याला राक्षसाच्या भोजनासाठी पाठवलं असतं. आमची स्थिती तर तुम्ही पहातच आहात. या संकटातून वाचण्याचा काही मार्गच नाहीय. एकमेकांना सोडून आम्ही राहूच शकणार नाही; म्हणून आम्ही असा निर्णय घेतला आहे की, आज आम्ही सर्वजण बरोबरच तिथे जाऊन राक्षसाचं भक्ष्य बनू."

कुन्ती एकदम म्हणाली, "मग तर तुम्ही अगदी निश्चिन्त रहा. आज माझा मुलगा राक्षसाचं भक्ष्य म्हणून जाईल. राक्षस त्याला मारूच शकणार नाही; उलट तोच राक्षसाचा वध करील. माझा हा मुलगा महाबली आहे. त्याला काही मन्त्र तन्त्र शक्तीही अवगत आहेत; म्हणूनच मी असलं साहस करायला धजावत आहे. नाहीतर शंभर पुत्र असूनही कोणती आई आपल्या मुलाला मृत्युमुखात लोटेल का? तेव्हा माझं म्हणणं ऐका अन् माझ्या या योजनेचा स्वीकार करा. पण एक मात्र लक्षात ठेवा. यातलं एक अक्षरही गाववाल्यांच्या कानी जाता उपयोगाचं नाही. त्याच्या गुरुजींना हे कळलं अन् त्यांनी परवानगी दिली नाही तर राक्षसाच्या वधाची संधी हातची जाईल. सगळंच मुसळ केरात जाईल."

कुन्तीच्या बोलण्यावर ब्राह्मणाचा विश्वास बसला. आपण सहकुटुम्ब वाचू शकतोय, या गोष्टीचा त्याला फारच आनंद वाटला. कुन्तीच्या उपकाराबद्दल त्याने तिचे आभार मानले. कुन्तीने नन्तर भीमाला सारी हकिकत सांगितली. काहीतरी पराक्रम करायला मिळणार व आपल्याला आश्रय देणाऱ्या कुटुम्बाला मदत ही होणार या कुन्तीच्या योजनमुळे त्याला फारच हर्ष झाला.

इतक्यात बाकीचे चार पांडव भिक्षा घेऊन परत आले. भीमाला विशेष आनन्दात पाहून धर्मराजने कुंती मातेला त्याचे कारण विचारले. तिने त्याला सगळी कहाणी सांगून म्हटले, "इतक्या दिवसांनी का होईना, पण आपल्या आश्रयदात्या ब्राह्मण कुटुम्बाला मदत करायचं भाग्य लाभलं की नाही आपल्याला?"

कुन्तीचे बोलणे ऐकून धर्मराजला दु:ख वाटले. त्याला असे वाटले, 'कुन्तीने हा निर्णय घेण्यात घाई केली आहे. तिला तर माहीत आहे की आपणा पांडवांच्या सर्व आशा भीमाच्या



भुजबळावरच अवलंबून आहेत. भविष्यात कौरवांवर विजय मिळवून आपलं राज्य परत मिळवायचं असेल, तर भीमाशिवाय ते कसं शक्य होईल ? दुर्योधनानं आपल्या सर्वांना लाक्षागृहात जाळून मारायचं कारस्थान केलं, तेव्हा भीमाच्या बळामुळेच आपण वाचलो. ते अभूतपूर्व कार्य केवळ भीमामुळेच शक्य झालं.'' त्याने आपले भय कुन्तीजवळ व्यक्त व्यक्त केले. परन्तु कुन्तीने आपल्या निर्णयाचेच समर्थन करून म्हटले, "या संकटात ब्राह्मण कुटुम्बाला मदत न करणं हे घोर पाप होईल. कृतघ्नता होईल ती एक प्रकारे. नक्की सांगते की भीमावर कसलंही संकट येणार नाही. त्याच्याबद्दल काळजी करायचं कारण नाही. तो कोणत्याही

राक्षसाला सहजपणे मारू शकेल. सदुद्देशानंच मी हा निर्णय घेतला आहे. ब्राह्मण कुटुम्बाला वाचवण्याचं पुण्य भविष्यात आपलं रक्षण करील. अुलट शक्य असूनही आपण त्यांना वाचवलं नाही, तर मात्र आपण पापाचे धनी होऊ.''

धर्मराजाला आता मातेचे हे बोलणे पटले अन् त्याने भीमाला राक्षसवधासाठी जाण्याची सम्मती दिली.

सूर्योदयाच्या सुमारास भीम ब्राह्मणाला म्हणाला, ''ब्राह्मणदेवता, मला तर रात्रभर जराही झोप आली नाही. मला खूप भूकही लागली आहे. चांगले पौष्टिक पदार्थ मला खाअू घातलेत, तर मी राक्षसाशी खूप अुत्साहाने लढेन.'' ब्राह्मणाने मोठ्या संतोषाने त्याची मागणी पुरी केली.

भीमाने नन्तर गाडीला दोन बैल जोडले, ती अन्नाने भरली आणी बकासुर रहात असलेल्या नगराच्या दक्षिण दिशेकडे तो निघाला. राक्षसाच्या ठिकाणापासून बऱ्याच दूर, यमुना किनारी त्याने गाडी थांबवली, अन् तेथूनच तो जोरजोराने बकासुराला हाका मारू लागला. पण तो जवळ येईपर्यन्त भीमाला दम निघेना गाडीत भरलेले पदार्थ तेथेच बसून त्याने खायला सुरुवात केली.

एका सर्वसामान्य माणसाने आपले नाव घेअून आपल्या हाका माराव्या, ही गोष्ट बकासुराला मुळीच आवडली नाही. खूप चिडून धावतच तो भीमाजवळ आला. एकचक्रपुरहून लोकांनी आपल्यासाठी पाठवलेले अन्न एक माणूस मजेने खात बसलेला त्याने पाहिला. त्याने विचारले, ''आहेस तरी कोण तू ? मृत्यूच्या तोंडात अुभा आहेस, अन् तरीही मजेनं खात बसला आहेस?''



बकासुराकडे पाहून भीम एक वार हसला अन् पुन्हा पहिल्या सारखाच खाण्यात मग्न झाला. हे पाहून बकासुर दोन्ही हात अुचलून त्याला मारायला सरसावला. तरीही भीमाने त्याची काही पर्वा केली नाही. त्याने बकासुराकडे नुसते पाहिलेही नाही. तो आपला फक्त खात राहिला. भीमाच्या या बेपर्वाईचे अन् निश्चिंततेचे आश्चर्यही वाटले अन् त्याला रागही आला. त्याने दोन्ही हातांनी भीमाच्या पाठीत गुद्दे मारले. भीमाने याकडेही दुर्लक्ष केले. त्याने शान्तपणे आपले खाणे संपवले अन् हात धुवायला तो नदीवर गेला. आता मात्र बकासुराला रहावेना. खूप चिडून त्याने जवळचेच एक मोठे झाड अुपटले अन् तो बकासुराशी लढायला सिध्द होअून परत फिरला. बकासुराने त्याच्यावर फेकलेले झाड आता त्याच्या हातात होते! त्याने पुन्हा एक झाड अुपटून भीमावर फेकले; पण भीमाने हातातल्या झाडाचा ढालीसारखा अुपयोग करून ते अडवले. आसपास एकही बरेसे झाड न अुरेपर्यन्त दोघांनी झाडांनीच एकमेकांशी युध्द केले. नन्तर बकासुराने भीमाला आपल्या हातांनी पकडले व दोघांच्यात मल्लयुध्द सुरू झाले. दोघेही एकमेकांना काही वेळ दूर दूर



फेकत राहिले, तर काही वेळा खेचत राहिले. शेवटी भीमाने जोराने बकासुराला जमिनीवर आपटले, अन् स्वत: त्याच्या छातीवर बसून त्याला आपल्या गुडघ्यांनी व हातांनी बुकलून काढू लागला. त्याची मान, कंबर व पाठही त्याने आपल्या हातांनी व गुडघ्यांनी जखमी केली; काही हाडेही मोडून काढली. शेवटी रक्त ओकत बकासुराने प्राण सोडला.

त्याच्या ओरडण्याने व हाहा:काराने त्याचे बांधव तेथे धावतच अुपस्थित झाले. भीमाने त्यांनाही दरडावून सांगितले की ''इत:पर तुम्हापैकी कोणी माणसाला मारून खायचा प्रयत्न केला, तर तुमचीही गय केली जाणार नाही. तुमचीही या बकासुरा सारखीच

परिस्थिति होईल हे लक्षात ठेवा नीट!''

ते सारे राक्षस बिचारे भयाने कापतच तेथून नाहिसे झाले. भीमाने नंतर बकासुराचे अचेतन शरीर खेचून आणून गावच्या वेशीजवळ टाकले व स्वत: नदीत स्नान करून घरी परतला. त्याने सारा वृत्तान्त धर्मराज व आपल्या बंधूंना कथन केला.

नगरातील लोकांनी बकासुराचे मृत शरीर पाहिले अन् ती बातमी साऱ्या शहरभर पसरली. आपल्यावरील संकट कोणी दूर केले हे कोणालाच कळले नाही, पण त्यांनी त्या अज्ञात पुण्यात्म्याची खूप प्रशंसा केली व आपल्या इष्टदेवतांची पूजाही केली. ज्या कोणा ब्राह्मणाची त्या दिवशी पाळी होती त्याला शोधून लोक त्याच्या घरी आले व राक्षसाला कोणी मारले याविषयी त्यांनी चौकशी केली.

कुन्तीची अट ब्राह्मणाला आठवली अन् ते रहस्य गुप्तच ठेवणे हे आपले कर्तव्य मानले. लोकांना तो म्हणाला, ''होय, काल आमच्या घराची पाळी होती खरी! मी फार काळजीत होतो. इतक्यात कोणी एक सिध्दपुरुष माझ्या घरी आला. त्या पुण्यात्म्यानंच बहुधा बकासुराचा वध केला असावा.''

नगराच्या लोकांनी गावावरचे संकट टळल्याबद्दल मोठा अुत्सव साजरा केला. कुन्ती आणि पांडवही त्या अुत्सवात सामिल झाले. पुढेही त्या ब्राह्मणाच्याच घरात राहून व गावात भिक्षा मागून ते आपले दिवस व्यतीत करीत राहिले.

एके दिवशी या ब्राह्मणाकडे देशभर भ्रमण करीत रहाणारा दुसरा एक ब्राह्मण आला. या ब्राह्मणाचे आतिथ्य स्वीकारून त्याने आपल्या भ्रमन्तीचा वृत्तान्त सांगितला. अनेक राजे व त्यांच्या कार्यकलापांबद्दलची बरीच माहितीही त्याने कथन केली. त्याच ओघात त्याने पांचाल देशचा राजा द्रुपद याचा अुल्लेख करून सांगितले की शिखंडी, धृष्टद्युम्न व द्रौपदी ही त्याची अपत्ये आहेत. द्रौपदी स्वयंवराच्या योजनेबद्दलही त्याने संक्षेपात सांगितले. कुन्ती व पांडवांनी याबद्दल सविस्तर जाणायची अुत्सुकता व्यक्त केल्यावरून तो ब्राह्मण सांगू लागला-

क्रमशः



# एकी

**ज**वळच्याच गावी रहाणाऱ्या आपल्या मित्राला-रामेशला-भेटायला जगदीश आपल्या गावाहून निघाला. वाटेत रस्त्यावर लागलेल्या एका बाजारात त्याने दोन चित्रे खरेदी केली. एक होते शिवाचे अन् दुसरे होते विष्णूचे.

मित्राच्या घरी पोचल्याबरोबर जगदीशने ''अरे रामेश, तुला भेट द्यायला ही दोन चित्रं आणलीत बघ मी!'' असे म्हणत दोन्ही चित्रे रामेशच्या हाती दिली.

रामेशने ती मोठ्या आनन्दाने स्वीकारली. खिडकीतले दोन खिळे हातात उचलून तो आपल्या दहा वर्षाच्या मुलाला हाक मारून म्हणाला, ''अरे सतीश, शेजारच्या घरी जाऊन हातोडी घेऊन ये बरं! आपण भिंतीवर ही चित्रं टांगू या.''

सतीश लागलीच गेला खरा, पण 'त्यांच्याकडे हातोडी नाहीय' असे म्हणत परत आला.

रामेश त्याला म्हणाला, ''मग असं कर; समोर नारायणच्या घरी जाऊन त्यांना विचारून घेऊन ये.''

सतीश पुन्हा रिकाम्या हातानेच परत येऊन, त्यांच्या घरीही हातोडी नसल्याचे सांगू लागला. पण रामेशने निराश न होता मुलाला आणखी दोन-तीन ठिकाणी पाठवले. पण प्रत्येकाने नकारघंटाच वाजवली.

आता मात्र नाराज होत रामेश जगदीशला म्हणाला, ''पाहिलीस आमच्या गाववाल्यांची नियत? या सर्वांकडे हातोडी नक्की असेलच. पण देणार नाही त ते! अशी माणसं ज्या गावात असतील, तिथे एकी कशी नान्देल?''

जगदीश यावर डोके हलवून गप्प राहिला. नंतर रामेश सतीशला म्हणाला, ''कोणी द्यायला तयार नाही, मग काय करणार? शेजारच्या खोलीतल्या पेटीतली आपली हातोडी आण काढून.''

हे ऐकून जगदीशचा चेहरा मात्र पाहण्यासारखा झाला!

**कस्तूरी**



'चांदोबा'
परिशिष्ट - ७९

आपल्या देशाची
वृक्ष संपदा

# वडाचे झाड (वटवृक्ष)

**व**डाचे झाड नाही, असे भारतात एकही गाव नाही, असे आपण खात्रीने म्हणू शकू. गावाच्या बाहेर असलेल्या वटवृक्षाच्या छायेत माणसे व गुरेही आपला थकवा दूर करण्यासाठी बसून विश्रान्ति घेतात. झाडाच्या फांद्यांना फुटणाऱ्या मुळ्या केसांसारख्या लटकत असतात. पर्शियन समुद्रापाशी जो विशाल वृक्ष आहे, त्याच्या छायेत पूर्वी इथून जाणारे व्यापारी (बनीये)बरेच दिवस मुक्काम करीत. म्हणूनच पार्शी भाषेत या झाडाचे नावच 'बनियान' असे पडले. हिन्दीत याला 'बरगद', तमिलमध्ये 'आल', मल्याळीत 'पेरल' व तेलगूत 'मर्रि' असे म्हणतात. इंग्रजीत या झाडाला 'इंडियन फिन' असे म्हणतात.

पूर्वीच्या काळी अपत्यहीन दाम्पत्ये ज्येष्ठ महिन्याच्या अमावास्येला वटवृक्षाची पूजा करत असत. असे म्हणतात की आपला पती सत्यवान याच्या प्राणरक्षणासाठी सती सावित्रीनेही वडाची पूजा केली होती. या सृष्टीच्या अंती जेंव्हा जलप्रलय होईल तेंव्हा श्री विष्णु शिशुरूपात वडाच्या पानावर पडून पाण्यात तरंगत रहातील अशी भक्तांची एक समजूत आहे. आपल्या पायाचा अंगठा तोंडात घालून वटपत्रावर शयन करणाऱ्या बालकृष्णाच्या चित्राची बाजारात खूप विक्री होते.

कलकत्याच्या 'शिवपूर बोटॅनिकल गार्डन' मधील वट, मद्रासच्या अड्यार येथील थिऑसॉफिकल सोसायटीच्या आवारातील वट व बिहार राज्यातील गोपीपुरचा छत्रीसारखा दिसणारा वट हे सुप्रसिध्द वटवृक्ष होत. याच राज्यातील काम्प्टो येथील अनेक एकर भूमी व्यापणारा वटवृक्षही खूप प्रसिध्द आहे.

वडाच्या झाडाची अंडाकार पाने मोठी व जाड असतात. फेब्रुवारी व मार्च महिन्यात अंकुर फुटून झाडाला छोटी-छोटी फळे येतात. थोडी मोठी झाल्यावर जेंव्हा ती पिकून लाल होतात, तेंव्हा ती खाण्यासाठी अनेक प्रकारचे पक्षी या झाडाकडे आकृष्ट होतात.



वटवृक्ष शेकडो वर्षे जिवन्त रहातो.

## आपल्या देशातील ऋषि-मुनि : ३

# नारद



ऋषिपुंगव नारद यांना भगवन्त व त्यांनी निर्माण केलेल्या सृष्टीचे भारी प्रेम वाटे. नारद हे ब्रह्मदेवाचे पुत्र असून महाविष्णूंचे मोठे भक्त होते. 'महति' नामक आपली वीणा झंकृत करत व 'नारायण, नारायण' नाव ओठी खेळवत हे ऋषिश्रेष्ठ नारद सर्वत्र संचार करीत.

माणसाच्या सद्व्यवहाराचे समर्थन करणाऱ्यांत ते अग्रगण्य होते. विष्णूकडून त्यांना जी विद्या मिळाली, तिचा ते मृत्युलोकात प्रसार करीत. 'नारायण' नामाचा जप करीत ते तिन्ही लोकी संचार करून तेथील सर्वांवर यथाशक्ति अुपकार करत.

एकदा वाल्मीकींनी तमसेच्या तीरावर बसून 'रामायण' नावाचे महाकाव्य रचले.

पांडवांनी जेंव्हा एक नवीन नगर निर्माण करायचे ठरवले, तेंव्हा नारदांनी त्यांचासमोर दिव्य नगरी इन्द्रपुरी, कुबेरपुरी आदि सुरचित सुंदर नगरांचे वर्णन केले. ते वर्णन त्यांनी इतक्या सुंदर शैलीत केले, की जणू काही आपण ती नगरे प्रत्यक्षच हिंडून पहात आहोत! यावरून बोध घेअूनच पांडवांनी आपली राजधानी इन्द्रप्रस्थ अतिसुंदर बनवली.

असे म्हणतात की नारद कलहप्रिय होते. त्यांना 'कळीचा नारद' असे म्हणत. नारद बाहेरून 'कळलावे' वाटले तरी त्यांत त्यांचा काही अुत्तम अंतस्थ हेतु असे, त्यामुळे लोककल्याण साधे. 'वाईटा'वर 'चांगल्या'चा जय व्हावा, 'अधर्मा'वर 'धर्मा'चा जय व्हावा, हेच त्यांचे अुद्दिष्ट असे. याच कार्यात त्यांच्या कळलावेपणाने मदत केली. अुदाहरण म्हणून कंसाचीच गोष्ट घेअू - बालकृष्ण कोठे वाढतो आहे, हे त्याला ठाअूक नव्हते. ते जाणून घेण्यासाठी कंस धडपडत होता. नारदाने ती गुप्त गोष्ट त्याला सांगून टाकल्यावर कंसाने त्याला विविध अुपायांनी मारून टाकायचा प्रयत्न केला. पण शेवटी तो स्वतःच कृष्णाच्या हातून मारला गेला व त्याच्या अत्याचारांनी व पापांनी त्रस्त झालेल्या भूमीने सुटकेचा श्वास सोडला! अशा प्रकारे नारदांच्या कलहप्रियतेनेच वध घडून आला.

रावणवधासही एक प्रकारे नारदच कारणीभूत झाले. एकदा रावणाने नारदाला विचारले की, ओंकार शब्दाचा अर्थ काय. रावणाला तो कळावा अशी त्याची योग्यता नाही, हे जाणून नारदाने त्याला नकार दिला. अतिक्रोधाने रावणाने नारदाची जीभच कापून टाकायचा प्रयत्न केला. तेंव्हा नारदानेच त्याला शाप दिला की, ''भविष्यात तुझ्या साऱ्या जिभांसह तुझी दहाही मस्तके अुडवून दिली जातील.''

नारदांच्यात ज्ञानपिपासा खूपच अधिक होती. त्यांनी एके दिवशी महाविष्णूंना विचारले, ''विश्वाच्या सृष्टीचा आधार मायाच आहे, असे म्हटले जाते. ही 'माया' काय आहे?'' विष्णु अुत्तरले की, ''ते तुझं तुलाच एक दिवस कळेल.''

एके दिवशी नारद नेहमीप्रमाणे भूलोकात संचार करत एका गावातून जात असता, अकस्मात् जोरदार पाऊस कोसळू लागला. स्वतःच्या रक्षणासाठी त्यांनी एक दरवाजा ठोठावला. एका सुंदर तरुणीने दरवाजा अुघडून त्यांना आत घेतले. त्या युवतीच्या आईबापांच्या विनंतीवरून नारदांनी तिच्याशी विवाह केला व ते तेथेच राहू लागले. त्यांना काही मुलेही झाली. सारी सांसारिक सुखे त्यांनी अुपभोगली. एक दिवस अचानक महापूर आला आणि त्या प्रवाहात नारदांची पत्नी व मुले वाहून गेली. हा विरह सहन होअून शोक करत ते जमिनीवर गडाबडा लोळू लागले. तोंडाने बायको व मुलांची नावे घेत रडू लागले; आता आपले कसे होणार असेही म्हणत राहिले. विलाप करत ते, ''नारायण, आता तूच माझं रक्षण कर.'' असे ते म्हणाले.

दुसऱ्याच क्षणी नारायण प्रकट होअून नारदाला म्हणाले, ''तू तर त्रिलोक-संचारी आहेस. ही बायको-मुलं मुळात आलीच कोठून?''

आता नारद समजून चुकले की, 'माया' यालाच म्हणतात. नंतर अुठून दोन्ही हात जोडून त्यांनी श्रीविष्णूंना नमस्कार केला व त्यांची स्तुति गाइली.

सावित्री व तिचा पिता अश्वपति यांना नारदांनीच सांगितले होते की, ''विवाहानंतर बरोबर एका वर्षाने सत्यवान मृत्यु पावणार आहे! नारदाच्या या कथनामुळेच सावित्रीने यमाला मोठ्या धीटपणे तोंड दिले अन् आपल्या पतीचे प्राण वाचवले. नारदामुळेच सावित्रीचे मनोबल वाढले होते.

अशा प्रकारे आपल्या कित्येक पुराणकथांचा नारदांशी संबंध आहे. आपल्या भक्ति-साहित्यात नारदांच्या भक्तिसूत्रांचे स्थान बरेच श्रेष्ठ आहे.



## तुम्हाला माहित आहे काय?

१. जगातील कोणत्या देशात सर्वात अधिक तेल अुत्पादन होते ?
२. 'इंडियाज शेक्सपियर' नावाने प्रसिध्द नाटककार कोण ?
३. 'ग्रीन लॅण्ड' हा कोणत्या देशाचा भाग आहे ?
४. तिबेट मध्ये अुगम पावून, हिमालयातून वहात शेवटी समुद्राला मिळण्यापूर्वी गंगेला मिळणारी नदी कोणती ?
५. 'गवत' जातीचे सर्वात मोठे रोप कोणते ?
६. आपल्या देशातील कोणते शहर 'सात बेटांचे शहर' म्हणून ओळखले जाते ?
७. रेडियोचे संशोधक कोण ?
८. 'रामचरित मानस'चे रचनाकार कोण ?
९. 'अर्थशास्त्राचे पिता' कोणाला म्हटले जाते ?
१०. कोणत्या राजपूत राजकुमारीशी अकबराचा विवाह झाला ?
११. मलेरियावर औषध म्हणून अुपयोगात येणारे क्विनाइन कोणत्या झाडाच्या सालापासून बनवले जाते ?
१२. दक्षिण भारतातील एका नगरात पूर्वी 'ब्रिटिश आर्मी प्रधान कार्यालय' होते. त्या नगराचे नाव काय ?
१३. इण्डोनेशियाचे एक बेट आहे सुमात्रा. त्याचे प्रसिध्द स्थानीय नाव काय ?
१४. क्रिकेट टेस्ट मॅचमधे भाग घेणाऱ्या सर्वात अधिक वयस्कर खेळाडूचे नाव काय ?
१५. केप ऑफ गुडहोपला वळसा घालून १४९२ मध्ये भारताचा मार्ग शोधून काढणाऱ्या कप्तानाचे नाव काय ?
१६. रामायणातील लक्ष्मणाच्या पत्नीचे नाव काय ?
१७. 'बर्लिन' कोणत्या नदीतटावर वसले आहे ?
१८. जगातला पहिला संशोधक इजिप्तवासी होता. त्याचे नाव काय ?

### उत्तरे

१. रशिया
२. कालिदास
३. डेन्मार्क
४. ब्रह्मपुत्रा
५. बांबू
६. मुंबई
७. बी.मार्कोनी
८. तुलसीदास
९. ॲडम स्मिथ
१०. जोधाबाई
११. सिंकोना
१२. बंगलोर
१३. जावा मैनर
१४. इंग्लंडचा डब्ल्यू. रोड्स (५२ वर्षे)
१५. वास्को द गामा
१६. अुर्मिला
१७. स्प्री नदी
१८. हेश्रा



# भरतची चिंता

भरत एक फार चांगला माणूस होता. शेजाऱ्या पाजाऱ्यांना मदत करण्यात त्याला आनंद वाटे. पण ते कोणी ही त्याच्याशी सद्व्यवहार करीत नसत. म्हणून भरत नेहमी चिंतेत असे.

भरतची बायको वाणी सुस्वभावी स्त्री होती. ती नेहमी भरतला सांगे - "लोकांना मदत करून तुम्हाला जो आनंद मिळतो, त्याहून अधिक चिंताच तुमच्या पदरात पडते. आता येथून पुढे तरी आपल्या पुरतं पहात चला."

वारंवार बायकोचा उपदेश ऐकून आता भरतने निर्णय केला की इथून पुढे दुसऱ्या कोणाला मदत करायची नाही. भरतच्या समोरच्या घरात शिव रहात असे. गाव सोडून तो जेव्हा शहरात रहायला जायला निघाला, तेव्हा आपल्या घराचा सौदा करण्याची जबाबदारी त्याने भरतवर सोपवली.

तेव्हा भरतने त्याला सांगितले- "मी ज्या कोणाला मदत करतो, शेवटी माझे व त्याचे भांडण होते. ही जबाबदारी तू दुसऱ्या कोणावर तरी सोपव."

हसत शिव म्हणाला - "ठीक आहे, मी घराला कुलूप लावून जातो. माझ्या घराचा सौदा करायला कोणी आलं तर माझा पत्ता त्याला दे. तूज्याच्याबद्दल पत्र लिहिशील त्यालाच मी आपले घर विकीन."

भीम भरतचा मेहुणा होता. शिवचे घर खरेदी करण्याचा त्याचा विचार होता. परंतु भीमसाठी पत्र लिहिण्यास भरतने नकार दिला. आपल्या नातेवाईकाबद्दल शिफारस केली तर शिव गैरसमज करून घेईल अशी त्याला भीति होती.

पत्र लिहायला नकार देत भरत म्हणाला - "तू माझ्या बायकोचा सख्खा भाऊ आहेस. माझं घर इतकं मोठं आहे की यात एका वेळी चार कुटुंबे राहू शकतील. तुला निराळं राहण्याची जरूरच मुळि काय? मी तुला वेगळं

राजाराम पेंडसे



राहू देणार नाही. माझ्याच घरात माझ्या बरोबर रहा झालं!''

भीमला आपल्या मेहुण्याचा स्वभाव चांगला माहीत होता. भरतचे बोलणे ऐकून तो मनातल्या-मनात नाराज झाला. या गावी रहायला येण्याचा विचारच त्याने सोडून दिला.

एके दिवशी गोपी नावाचा एक माणूस भरतकडे येऊन म्हणाला - ''मी एक गरीब माणूस आहे हे आपण जाणताच. घराची किंमत एका हप्त्यात मी देऊ शकणार नाही. आपण ज्याच्या साठी पत्र लिहून द्याल, त्यालाच शिव आपले घर विकणार हे मला माहीत आहे. एक पत्र लिहून आपण माझ्यावर दया करा. आमरण मी आपले उपकार विसरणार नाही.''

एकरकमी सारी किंमत देऊन कोणी घर खरीदलं तर ती गोष्ट वेगळी. हा गोपी तर हप्त्या-हप्त्याने पैसे देणार! मी शिफारस केली तर याला घर मिळू शकेल. अशा द्विधा अवस्थेत भरत विचार करीत राहिला. ''येईन पुन्हा एकदा'' असे म्हणून गोपी निघून गेला.

काही वेळाने गोपीची बायको रुक्मिणी आली. भरतची बायको वाणीला भेटली नि म्हणाली - ''माझा नवरा हृदय-विकाराने आजारी आहे, समोरचं घर खरेदी करण्याची त्याची फार इच्छा आहे. घराबद्दलच्या विचारांनीच आजकाल त्याला खाऊन टाकलंय. हृदय-विकाराचा झटका केव्हा येईल आणि कोणत्या क्षणी काय होईल याची मला काळजी वाटते. सध्या आम्ही भाड्याच्या घरात रहात आहोत. घरमालकाने आम्हाला घर सोडायला सांगितलंय. तुमच्या नवऱ्याने मदत केली तर गावात आमचं एक स्वतःचं घर होईल. या घरात आम्ही सुखाने नांदू. माझ्या नवऱ्याचे प्राण तुमच्या नवऱ्याच्या हाती आहेत.''

वाणीला रुक्मिणीची दया आली. तिने नवऱ्याला आग्रहपूर्वक सांगितले की त्याने शिवला पत्र लिहावे. शेवटी भरतने गोपीला पत्र लिहून दिले. दोन दिवसात गोपी शहरात जाऊन परत आला आणि भरतकडे येऊन म्हणाला - ''तू फार चांगला माणूस आहेस, पण तुझा मित्र पैशांमागे लागला आहे. घराची सर्व रक्कम दोन हप्त्यातच त्याला पाहिजे. त्याचे बोलणे ही मला अति तिरसटपणाचे वाटले. कसा तरीच तो वागला माझ्याशी. भाड्याचं घर नाही मिळालं, तर झाडाखाली राहीन, मरून जाईन, पण कोणत्याही स्थितीत ते घर खरेदी करणार नाही. मी त्याला ही तसं सांगून टाकलं.''

गोपीला हृदय-विकाराची बाधा होती म्हणून भरतला त्याच्याबाबत चिंता वाटत होती. चांगले घर हातचे सोडू नये असे त्याने गोपीला समजाऊन सांगण्याचा प्रयत्न केला. त्याने गोपीला अशी ही भीति दाखवली की जर त्याने हे घर खरीदले नाही तर त्याचा मेहुणा अधिक किंमत देऊन ते घर खरेदी करायला तयार आहे.

या सगळ्याचा गोपीवर चांगला परिणाम झाला. भरतने शिवला पुन्हा पत्र लिहिले आणि गोपीच्या आर्थिक परिस्थितीचा विचार करण्याची विनंती केली. गोपी पत्र घेऊन पुन्हा शहरात गेला. पुढे काय झालं ते काही गोपीने भरतला सांगितलं नाही. काही दिवसां-नंतर गावातील लोकांकडून भरतला कळलं की गोपीने शिवचे घर खरेदी केलं आहे. काही लोकांनी भरतने केलेल्या मदतीबद्दल त्याची प्रशंसा केली.

पण आपण घर खरेदी केल्याची वार्ता गोपीने आपल्याला का सांगितली नाही याचे भरतला आश्चर्य वाटले. आपण काय चूक केली हे जाणून घेण्याची त्याची इच्छा होती. सर्व काही जाणून घेण्यासाठी त्याने एक दिवस गोपीला



सपरिवार आपल्याकडे भोजनाचे आमंत्रण दिले. गोपी बायको-मुलांसह आला, भरतकडे सर्वांनी भोजन केले, पण घराच्या सौद्याबाबत कोणी तोंडावाटे ब्र काढला नाही. बिचारा भरत मनातल्या मनात निराश झाला.

गोपीने घर खरेदी केलं ही गोष्ट मात्र खरी होती. लवकरच गृह-प्रवेशाची तयारी जोरात सुरू झाली. आता मात्र भरतची चिंता अधिक वाढली. तेव्हा बायको त्याला म्हणाली- ''या वेळी मी तुम्हाला उगाच भरीस पाडलं. मी आपली चूक कबूल करते. माझ्या मुळेच आपण सध्या चिंता करीत आहात. आपणच अडाणी नि मूर्ख आहोत. म्हणून आपण त्यांना मदत केली, ते आपल्याला दुःख देत आहेत. गोपीने



आपली मदत घेतली आणि आता आपल्याशी शत्रूसारखा वागतो आहे. अकारण आपणास दु:ख होत आहे. गरज पडली म्हणजे लोक दहा वेळा आपल्याकडे येतात, नि काम झालं की बोलायचं ही टाळतात, उलट आपल्याबद्दलच तक्रार करतात. अशा विश्वासघाती लोकांशी कसं वागावं, त्यांना कसा धडा शिकवावा हे माझा भाऊ भीम चांगलं जाणतो. आपण त्याला काही दिवस आपल्याकडे रहायला बोलवू या!''

''मी तर पूर्वीच त्याला आपल्याकडे राहण्यासाठी बोलविले होते. त्याने ऐकलं न ऐकल्यासारखं केलं.'' भरत म्हणाला.

''आपण त्याच्यावर दया करून त्याला बोलवलं तर तो थोडाच येणार आहे? आपली अडचण सांगून त्याला आदराने विनवलं तर तो जरूर येईल.'' वाणीने सल्ला दिला.

भरतने हे मान्य केले. नवरा बायको दोघांच्या विनंतीनुसार भीम आपल्या कुटुंबासह भरतकडे रहायला आला. घराची सर्व जबाबदारी त्याने आपल्यावर घेतली. भीमच्या देखरेखीखाली घरातील सर्व कामे होऊ लागली. एक दिवशी गोपी भरतकडे आला. भीमने त्याला दरवाजावरच अडवलं आणि येण्याचे कारण विचारले. गोपी म्हणाला - ''उद्या गृह-प्रवेश आहे. मी भरतला निमंत्रण द्यायला आलो आहे.''

भीम म्हणाला- ''त्यांची तब्येत ठीक नाही. मी त्यांना तुमचा निरोप सांगेन.'' आणि गोपी निघून गेला.

दुसऱ्या दिवशी भरतच्या घरी गृह-प्रवेशानिमित्त लोकांची खूप गर्दी जमली. गावातले खूप लोक आले. भरतच्या घरचे मात्र त्यात कोणी नव्हते. याबाबत लोक आपापसात कुजबुजत होते. दुसऱ्या दिवशी घरावरून जाताना कोणी तरी भीमला विचारले - ''गोपीच्या गृह-प्रवेशाच्या समारंभात भरतकडील कोणी कसे दिसले नाही?'' भीम म्हणाला - ''गोपीने भरतला निमंत्रणच दिले नाही.''

तिकडून चाललेल्या गोपीने हे बोलणे ऐकले. तो जोरात ओरडला - ''खोटारड्या! मी निमंत्रण देण्यासाठी तुझ्या घरी आलो होतो, तेव्हा तूच तर सांगितलंस ना कि भरतची तब्येत ठीक नाही म्हणून? आणि मी भरतला सांगेन असे तूच नव्हता म्हणालास?''

भीम म्हणाला - ''माझ्या मेहुण्यांची तब्येत ठीक नसल्याचे मी जरूर सांगितले होते. मला वाटलं तू आत येऊन त्यांच्या प्रकृती बद्दल चौकशी करशील. पण तसं काही न करता तू परत गेलास. मला वाटलं तू भरतच्या विशेष सलगीतला नसावास. फार प्रेमाने तुला निमंत्रण द्यायचं होतं असं मला दिसलं नाही. दुसऱ्या दिवशी ही मेहुण्यांची तब्येत ठीक नव्हतीच.

''मेहुण्यांच्या बदली तू येऊ शकला असतास की!'' गोपीने विचारले.

जोरजोरात हसत भीम म्हणाला - ''तू तर भरतला निमंत्रण द्यायला आला होतास. मला तू थोडंच बोलवलं होतंस?''

गोपी निरुत्तर होऊन मान खाली घालून निघून गेला.

घरी आल्यावर भीमने भरतला सर्व वार्ता समजाऊन सांगितली. चिंतित होऊन भरत म्हणाला - ''उगाच कशाला त्याच्या मागे लागलास? जर त्याने चूक केली असेल तर त्याचं फळ त्याला भोगायलाच लागेल.''

भीम म्हणाला - ''मी कशाला त्याच्या मागे पडू? त्याचा आणि माझा संबंधच काय मुळि? अडचणीच्या वेळी आपल्या मित्रांना मदत केली पाहिजे. सुखाचे दिवस असतील तर गुण्या-गोविंदाने बरोबर रहावं. शत्रूंना दोन हात दूरच ठेवावं. गोपी आपला मित्र ही नाही नि शत्रू ही नाही. काही मदत मागितली तर जमेल तेवढी करावी. अधिक कोणाच्या फंदात पडायचं कारण नाही. सूज्ञ लोक असंच सांगत आले आहेत नि मी पण तेच तर केलं.''

आता आपली चूक भरतच्या लक्षात आली. जी माणसं मदत मागण्यासाठी त्याच्याकडे आली, त्या सर्वांना तो आपली समजत राहिला. त्यांच्या सुख-दु:खात भागीदार होऊ लागला आणि त्यामुळेच त्याच्या चिंता वाढत गेल्या, अकारण दु:खी-कष्टी होत राहिला. भीमच्या सल्ल्यानुसार वागणूक ठेवली तर विनाकारण चिंतांचा भार वहावा लागणार नाही.





# कोल्हा आणि ससा

जंगलातल्या सर्व जनावरांनी कोरड्या जमिनीवर नांगर फिरवायचे ठरवले. तेथे त्यांचा शेती करायचा विचार होता. बरेच दिवस त्यांचे हे काम चालू होते. बरीच जमीन नांगरून झाली. एके दिवशी अन्य जनावरांबरोबर कोल्हा व ससाही कुदळ फावडी घेऊन कामाला लागले.

खूप कडक ऊन्ह होते. त्यामुळे थोड्याच वेळात ससा दमून गेला. तरीही विश्रान्ती घ्यायला तो घाबरत होता, कारण त्याला भीती वाटत होती, की इतर जनावरे आपल्याला रागावतील. त्यामुळे त्याने आणखी काही वेळ काम केले.

परन्तु त्याच्याने अगदीच काम करवेनासे झाले. 'आता काहीवेळ एकाद्या झाडाखाली थोडा वेळ आराम केला नाही, तर आपला जीव जाईल' असे त्याला वाटू लागले; म्हणून पायात काटा घुसला असल्याचे नाटक करीत, लंगडत तो हळूच तेथून निसटला अन् झुडुपांमधून वाट काढत विहिरीजवळ पोचला.

ती विहिर एका झाडाखाली होती. फांदीवर एक कप्पी (पुली) बसवलेली असून त्यावरून एक जाड व लांब दोर टाकलेला होता. दोराच्या दोन्ही टोकांना दोन बादल्या बांधलेल्या होत्या.

विहीर व झाडाची सावली पाहून ससा फारच खुश झाला. एक अुडी मारून तो पटकन एका बादलीत बसला. दुसऱ्याच क्षणी वजनामुळे ती बादली विहिरीत जाअू लागली. भयाने सशाचा थरकाप झाला. पण 'आता होईल ते होईल' या विचाराने ससा जराशीही हालचाल न करता बसून राहिला. पाण्याचा स्पर्श होताच बादली आणखी खाली जायची थांबली. घाबरून सशाने हालचाल केली असती, तर तो नक्कीच बुडाला असता.

इकडे कोल्हा सशाच्या हालचाली लक्षपूर्वक न्याहाळत होता. काही बहाणा करून ससा पळून गेलेला दिसताच कोल्हाही त्याच्या मागावर राहिला. लांबून सशाला बादलीत बसता नाही त्याने पाहिले. त्याने विचार केला, ''सशाची या प्रकारात नक्कीच काहीतरी चाल असली पाहिजे. खाण्याचा पदार्थ त्याने आत लपवला असावा.'' हळूच कोल्हा विहिरीजवळ आला अन् आत डोकावून पाहू लागला.

विहिर खोल असल्याने त्याला आतील काहीच दिसेना. कोल्ह्याने मोठ्या गोड आवाजात हाक मारली, ''ससाभाऊ! अरे तिथे बसून काय करतोयस ?'' कोल्हयाने विचारले.

''मासे पकडतोय मासे! इथे खूपच मासे आहेत. तुम्हाला हवे असतील तर त्या दुसऱ्या बादलीत बसून या खाली! असले मासे दुसरीकडे कोठे मिळायचे नाहीत.'' ससा अुत्तरला.

यावर कोल्ह्याने लगेच बादलीत अुडी मारली. कोल्हा सशापेक्षा जड असल्याने आता त्याची बादली खाली जाअू लागून सशाची वर येऊ लागली.

वाटेत जेंव्हा दोघे समोरासमोर आले, तेंव्हा ससा म्हणाला, ''तुम्ही मासे पकडत रहा. मी येतोच लगेच. एकट्यानेच सगळे मासे खाऊन टाकायचे नाही हं. मी आल्यावर आपण दोघे मिळून सहभोजन करू.''

ससा पटकन वर आला अन् ताबडतोब बादलीबाहेर अुडी मारून आपल्या घरी पळाला.

त्या दिवशीचे काम पुरे करून सारी जनावरे जेंव्हा विहिरीवर हातपाय धुवायला आली, तेंव्हा आत कोल्हा आरडाओरड करत असलेला त्यांना आढळला. त्या सर्वांनी कोल्ह्याला बाहेर काढले, तेंव्हा कुठे त्याच्या जिवात जीव आला.

सशाची चाल त्याला बरोबर समजून चुकली!



चान्दोबात पंचवीस वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेली गोष्ट

विश्व-समाचार

# फ्रान्सचे नवे अध्यक्ष

मार्च १७ रोजी जॅक चिराक फ्रान्सचे नवे अध्यक्ष म्हणून निवडले गेले. दहा दिवसांपूर्वी निवडणूक झाली. या निवडणुकीत चिराक कॉन्झर्वेटिव्ह गालिस्ट दलाचे उमेदवार होते. त्यांनी विरोधी सोशलिस्ट लयोनिल जॉन्सन यांना शेकडा ५२-४८ मतांनी पराभूत केले. चौदा वर्षे सोशलिस्ट पार्टीचे सदस्यच शासन करीत आले. चिराकच्या विजयाने त्यांना पदच्युत व्हावे लागले. फ्राकोनि मिट्टेरांड हे दीर्घ काळ पर्यंत फ्रान्सचे अध्यक्ष राहिले. सन १९८१ व ८८ च्या निवडणुकीत त्यांनी चिराकला हारविलले होते. शारीरिक अस्वास्थ्यामुळे या वेळी त्यानी निवडणुकीत भाग घेतला नाही.

दुसऱ्या महायुद्धानंतर (१९३९-१९४५) जनरल चार्ल्स डिगाल फ्रान्सचे अध्यक्ष बनले. त्यांनी फ्रान्स मध्ये सुस्थिरता स्थापन करण्याचा खूप प्रयत्न केला. परंतु फ्रान्सच्या वसाहती (इंडोचीन म्हणजे आजचा व्हिएटनाम, कंबोडिया, लाओस) मुळे त्यांना अनेक समस्यांना तोंड द्यावे लागले. त्यांनी सर्वप्रथम या वसाहतीतील फ्रेंच सेना काढून घेतली. आणि त्यांना स्वातंत्र्य बहाल केले. सन १९६८ मध्ये त्यांनी अध्यक्ष-पदाचा राजिनामा दिला, तरी ही नंतर आलेल्या अध्यक्षांनी त्यांच्याच सिद्धांतांची अंमलबजावणी केली.

समाजवादी नेता मिट्टेरांड १९८१ मध्ये फ्रान्सचे अध्यक्ष निवडले गेले. त्यावेळी फ्रान्सची आर्थिक स्थिति फार खालावलेली होती. बेकारीच्या समस्येने गंभीर रूप धारण केले होते. अशा परिस्थितीत एकाद्या समाजवादी नेत्याला अध्यक्ष म्हणून निवडणे देशाच्या हिताचे होते. आता फ्रान्सचे भविष्य उजळेल असे लोकांना वाटले. मिट्टेरांड यांनी चौदा वर्षे शासन केल्यानंतर आता लोकांनी चिराक यांच्या हाती सत्ता सोपवली.

१९९३ मध्ये झालेल्या पार्लमेंटच्या निवडणुकीत कॉन्झर्वेटिव्ह पक्षाला अधिक मते मिळाली. गालिस्ट दलाचे नेता एडवर्ड बल्लादुर हे प्रधान मंत्री बनले. अल्प काळात बेकारीची समस्या सोडविण्याचा त्यांनी प्रयत्न केला असे म्हणतात. पण हे सत्य नाही असे समीक्षकांचे म्हणणे आहे. बल्लादुर हे पण अध्यक्ष पदाचे उमेदवार होते, पण पहिल्याच फेरीत ते पराभूत झाले. आता आलैन जरसे प्रधान मंत्री बनले.

जॅक चिराक हे ६२ वर्षांचे आहेत. आपल्या तीस वर्षांच्या राजनैतिक जीवनात ते दोनदा म्हणजे १९७४ ते ७६ व १९८६ ते ८८ या काळात प्रधान मंत्री झाले. यापूर्वी ते जेव्हा कृषि-मंत्री होते तेव्हा सफरचन्दांच्या निर्यातीसाठी त्यांनी खूप प्रयत्न केले. यामुळे सफरचंदांच्या निर्यातीत फ्रान्सला जगात दुसरा क्रमांक मिळाला. चिराक अध्यक्ष म्हणून निवडले गेले तेव्हा ते पॅरिसचे मेयर होते. त्यांनी सफरचंदाला आपले निवडणुकीचे चिन्ह बनविले.

१० मे रोजी निवडणुकीत यशस्वी झाल्यानंतर जो विजयोत्सव साजरा झाला, त्यात जनतेने आशा व्यक्त केली की आता फ्रान्सचे भविष्य उज्ज्वल होणार. बेकारीची समस्या नष्ट करण्याचे आमचे प्रमुख ध्येय आहे अशी चिराक यांनी घोषणा केली.





# तडफड

कसलेही कठीण काम असले तरी सुशील ते करू शकतो, असे गावच्या लोकांचे म्हणणे होते. वेळ पडली की ते सुशीलची मदत मागायला जात.

सुशील आता पन्नास वर्षांचा झाला असला तरी त्याला वाटे की, या वयातही आपला उत्साह, शक्ती व सहनशक्ती यांत काहीही फरक पडलेला नाही. परन्तु गावचे लोक मात्र हल्ली गावात नव्यानेच आलेल्या नागराजकडे जाऊन त्याची मदत मागू लागले होते.

या गोष्टीचे सुशीलला फार वाईट वाटले. त्याची बायको सूर्या सुशीलला म्हणाली, "गावच्या लोकांच्या मनात तुमच्याबद्दल फार आदर आहे. तुम्ही आता म्हातारे होत चालले असल्यामुळे ते तुम्हाला त्रास देऊ इच्छित नाहीत, म्हणूनच ते आजकाल आपल्या गरजा तरूण वयाच्या नागराजकडून भागवून घेत असावेत."

यावर काहीसा नाराज होत सुशील म्हणाला, "लायकीचा वयाशी काय संबंध? नागराज तरूण असेलही; पण तो जी कामं करतोय, ती माझ्यासारखी व्यवस्थित नाही करत."

केव्हातरी तिने आपल्या नवऱ्याच्या तक्रारी इतरांना सांगितल्या. ते लोक म्हणाले, "अरे, आश्चर्यच आहे! सुशील प्रथम कधी असल्या गोष्टीत लक्ष घालत नसे! आम्ही तर तेव्हाही सारीच कामं त्याला नव्हतो सांगत! माझ्याचकडे सगळ्या कामांसाठी लोक का येत नाहीत, या विचारानं तो पूर्वी कधी असा हैराण होत नसे. आता वय वाढतं आहे ना!"

लोकांचे हे विचार सुशीलला कळले, तेंव्हा तर त्याला जास्तच दुःख वाटले. अखेर त्याला हे शाबित करायची एक संधी मिळाली.

त्या दिवशी सुशील पाटलाच्या घरासमोरच्या कट्ट्यावर काही लोकांशी गप्पा मारत बसला होता; नागराजही तेथेच होता. त्यावेळी जवळच्या गावच्या जमीनदाराच्या खजिन्याचा एकअधिकारी तेथे येऊन पोचला. त्याला पहाताच 'रामराम' करत पाटील म्हणाला, "अरे, इकडे कसे वळताल तुम्ही?"

सर्वांवरून एकवार नजर फिरवून अधिकारी पाटलाला म्हणाला, "अलिकडल्या चारपाच महिन्यात मी जमीनदाराच्या गावची लोकसंख्या गावच्या सरहद्दी, तिथले तलाव, नाले इत्यादी परिस्थितीबद्दल नोंदी केल्या. जमीनदार नुकतेच शहरात गेले आहेत, अन् उद्याच ते परत येणार आहेत. ज्या ज्या गोष्टींवर मी काही प्रकाश टाकला आहे, त्यांचा जवळजवळ तीनशे पानी ग्रंथ झालाय. त्या संबंधात तुमच्या मदतीसाठी आलोय मी तुमच्याकडे."

पाटील आश्चर्य प्रकट करीत म्हणाला, "अॅं, सांगा बरं, काय हवंय आमच्याकडून?"

"मी ऐकलंय की तुमच्या गावात चांगली सुशिक्षित माणसं आहेत. मी ज्या ज्या विषयांबद्दल लिहिलंय, त्यात काही चुका असणं शक्य आहे. पुन्हा त्या शोधून सुधारण्यापेक्षा दुसऱ्या कोणा चांगल्या सुशिक्षित माणसानं ते काम करणं बरं होईल न? यासाठीच मला एका माणसाची गरज आहे." अधकारी म्हणाला.

"कदाचित यासाठी योग्य असा केवळ नागराजच ठरेल. नागराज, यांना कर ना मदत. जमीनदाराला कधीही गरज पडली, तर हा मदत करू शकेल." पाटील बोलला. पण आपण



जवळच असूनही पाटलाने आपल्याकडे दुर्लक्ष केले, हे पाहून सुशीलला खूपच वाईट वाटले. यापूर्वी आपण अशी खूप कामं सहज केलीयतं, पण अलिकडे लोकांना आपला विसर पडतोय, आपली मदत मागितली जात नाहीय?

नागराज पाटलाला म्हणाला, "यांनी संग्रहित केलेल्या विषयांचा अभ्यास करून त्यातल्या चुका शोधायला कमीत कमी दहा दिवस तर लागतीलच. कारण यांच्या नोंदीच तीनशे पानांच्या आहेत. इतकं मोठं काम एकाच दिवसात कसं करता येईल?"

त्याच्या या बोलण्याने पाटील काहीसा निराश झालेला पाहून सुशील म्हणाला, "तुमची हरकत नसेल न पाटीलदादा,

आशा मुंढे

तर मी हे करू शकेन.''

सुशीलच्या हाती आपला ग्रन्थ देत तो अधिकारी म्हणाला, ''मी तुमच्याबद्दल ऐकलं आहे. तुम्ही हे काम नक्कीच अुत्तम प्रकारे करू शकाल. आता वृद्ध झाला असल्यामुळे तुम्हाला हे काम सांगायला मला संकोच वाटत होता. तुम्ही ते केलंत, तर मला फारच आनन्द वाटेल.''

सुशीलने खूप मेहनत करून त्या ग्रन्थातील चुका सुधारल्या आणि एकाच दिवसात तो अधिकाऱ्याच्या हाती सोपवला.

दुसऱ्या दिवशी अधिकाऱ्याने ग्रंथ जमीनदाराला दिला. जमीनदाराने तो लक्षपूर्वक वाचला, अन् त्यात कुठेही चूक नसल्याबद्दल अधिकाऱ्याची प्रशंसाही केली. जमीनदार याबद्दल आणखीही चार दोन लोकांजवळ बोलला.

''एक दिवस ! केवळ एकाच दिवसात तो पूर्ण ग्रन्थ वाचून त्यातल्या चुका मी सुधारल्या; पण मला त्यामुळे जराही थकवा वगैरे आला नाही.'' सुशील गावच्या लोकांजवळ बोलत राहिला.

यानन्तरही आपली योग्यता शाबित करायची संधी सुशीलला तीन-चारदा मिळाली.

एकदा पाटील आजारी पडला. वैद्याला निराळ्या प्रकारच्या काष्टौषधींची आवश्यकता होती. वरुणनगरच्या व्यासानंदाशिवाय दुसऱ्या कोणाकडेही त्या नव्हत्या. वैद्याने सांगितलेली रोगलक्षणं व्यासानन्दाला सांगून त्याच्याकडून त्या औषधी आणायला हव्या होत्या. पण अडचण अशी होती की व्यासानन्दाला फक्त संस्कृत भाषाच समजे अन् तोही संस्कृतच बोलत असे. नागराजला त्याच्याकडे पाठवावे, असे वैद्याच्या मनात होते. पण वरुणनगरला जायचे, म्हणजे एका खाऱ्या पाण्याच्या नाल्यातून रस्ता ओलांडणे आवश्यक होते. नागराजच्या तब्येतीला खारे पाणी सोसत नसे. अशा पाण्यातून जायचे असेल, तर एक आठवडा अगोदरपासून त्याला औषध घेणे आवश्यक असे, पथ्य पाणी संभाळणे आवश्यक असे. पण आता तेवढा वेळही नव्हता.

सुशीलला तेथे जाण्यात कसलीच अडचण नव्हती. खारे पाणी किंवा हवेचा त्याच्या तब्येतीवर काही परिणाम होत नसे, म्हणून औषधी आणायचे काम त्याने स्वतःवर घेतले अन् ते यशस्वीपणे पूर्ण ही केले.

गावातल्या लोकांनी यावर्षीची कालीमातेची पूजा विशेष थाटामाटात करायचे ठरवले. अुत्सवाच्या दिवशी गावच्या सर्व पुरुषांनी देवीच्या मूर्तीसमोर दिवस भर नाचणे आवश्यक असे. कोणीही खाली बसायचे नाही असा नियम असे. गावकऱ्यांची अशी समजूत असे की, असे केल्याने गावचे भले होते; नियम न पाळला तर सर्व गावावर काही संकट कोसळते.

गावच्या जवळच्या जंगलात एक विशेष झाड असून त्याची पाने एकाच आकाराची नसत. काही पानांवर त्रिशुलाची आकृति असे. अशी एकशे सोळा पाने तोडून आणून त्यांची माळ







देवीच्या गळ्यात घालायची अन् अुत्सव संपल्याबरोबर, पाने तोडून आणणारानेच ती पुन्हा त्या झाडाच्या फांदीला लटकवायची असाही एक नियम होता.

जंगलाची ही सफर मोठी कष्टाची असे. इतकी लांब वाट तुडवून येअून अुत्सवात नाचणे व पुन्हा ती माळ परत घेअून जाणे हे मोठे दुष्कर कर्म होते. जंगलातले ते झाड शोधून त्यावरील फक्त त्रिशूळवालीच पानं तोडणं, माळ बनवणं वगैरे सर्वांनाच शक्य नसे. येरागबाळाचे काम नव्हते ते! 'आपण हे काम करू शकू' असे नागराज म्हणाला तर होता, पण 'इतकी मेहनत माझ्याच्याने होणार नाही' असेही तो म्हणाला. तो म्हणाला, ''अुत्सवात दिवसभर नाचायचे असेल, अुभंच रहायचं असेल तर अगोदर आठवडाभर आराम करायला हवा; अन् तो मिळणार नसेल, तर हे काम करणं मला शक्य नाही.''

सुशीलने यापूर्वी चार पाच वेळा तरी हे सर्व केले होते. तो पुन्हा ते करायला तयार झाला. तो जंगलात गेला, पाने आणली, दिवसभर नाचल्यावर माळ पुन्हा त्याने त्या झाडाला लटकावलीही. ही सारे कामे त्याने बरोबर क्रमाने व्यवस्थित पूर्ण केली. सर्वजण म्हणालेही की - इतके कठोर परिश्रम करून ही सुशील जरासुध्दा दमला नाही. सूर्याही आपल्या नवऱ्याच्या एकूण सहन-शक्तीबद्दल व अुत्साहाबद्दल खूप खुश झाली.

अशा प्रकारे सुशीलने सिद्ध केले की, अनेक बाबतीत आपणच नागराजपेक्षा अधिक योग्य आहोत. तरीही अनेक लोक अजूनही प्रमुख कामांसाठी नागराजच्याच आश्रयाला जात. अन् यामुळे सुशीलच्या मनाला ठेच लागे.

एके दिवशी सूर्या सुशीलला म्हणाली, ''आरामात घरात बसून तुम्ही पौराणिक ग्रन्थ वाचत जा ना! मलाही त्यांचा अर्थ समजावून सांगत जा. दोघं मिळून सुखात राहू या. दुसरी माणसं तुम्हाला आपली कामं सांगत नाहीत, तर तुम्हाला त्रास होण्यापेक्षा आनन्द वाटायला हवा.''

''हं! सर्वजण समजतात की मी आता म्हातारा झालोय. काही लोक तर तसं मला



तोंडावर खुशाल सांगतात. मी काय खाटेवर पडून आहे का? आजारी आहे मी? अशक्त झालोय? जी कामं तरणीताठी पोरं करू शकत नाहीत, ती सुद्धा मी करतो, करून दाखवली ही आहेत. पण हे सत्य मानायला लोक तयार नाहीत!'' सुशीलने आपल्या मनचे दु:ख प्रकट केले.

एके दिवशी जवळच्या गावचा सुशीलला चांगला ओळखणारा वसुदेव त्याच्या घरी आला. त्याच्या गावी गेली दोन वर्षे पाअूस पडत नव्हता. विहिरी, तलाव वगैरे खोदावे यासाठी सर्वजण बोलत होते. पण गावचा पाटील त्यात मुळीच लक्ष घालत नव्हता. राजाकडे तक्रार करावी, तर त्यातही अनेक अडचणी होत्या.



तक्रार करायला जो कोणी राजधानीला जाईल, त्याने म्हणे राजवाड्यासमोर अुभे रहायचे व आपणाकडे लक्ष वेधून घेण्यासाठी काही अवघड काम करून दाखवायचे! मग म्हणे राजा त्याला बोलावून घेअून कारण विचारणार अन् तसे झाल्यावर आपल्या येण्याचे कारण राजाला सांगायचे.

''साधारणतः सर्वजण राजधानीतल्या त्या मैदानात येतात अन् त्याच्या मध्यावर न थांबता तीन वेळा हातांवर अुलट्या सुलट्या अुड्या मारतात. असं करून दाखवण्यासारखी माणसं आमच्या गावात बरीच आहेत. पण राजाला नीटपणे आपला हेतु सांगता तर आला पाहिजे! अशी योग्यता असणारा कोणी नाही आमच्या गावात. त्यासाठीच मी इथे आलोय या गावात. असा लायक माणूस तुझ्या ओळखीत कोणी आहे का? अशाच एकाद्या माणसाच्या शोधात आलोय मी.'' वसुदेवने सुशीलला विचारले.

सुशीलची योग्यता वसुदेवला चांगली माहीत होती. तरीही त्याने आपल्याकडे सरळ मदत न मागता मनची गोष्ट अुलट-सुलट फिरवून सांगितल्याबद्दल आता सुशीलला रागच आला, अन् त्याने अशा माणसासाठी गावपाटलाकडेच चौकशी करायला वसुदेवला सांगितले.

वसुदेव पाटलाकडे गेला. त्याला भेटून परत आल्यावर वसुदेव सुशीलला म्हणाला, ''पाटलाने नागराज नावाच्या कोणा तरुणाचं नाव सुचवलंय. त्यानं असंही सुचवलंय

की नागराजला या कामासाठी तूच तयार करू शकशील.''

या बोलण्याने सुशील जास्तच नाराज होऊन म्हणाला, ''हूं ! खजिन्याच्या अधिकाऱ्यानं लिहिलेलं तीनशे पानी पुस्तक मी एका दिवसात वाचून त्याच दिवशी त्यातल्या चुकाही सुधारून दिल्या. अचानक काष्टौषधींची पाटलाला गरज पडली, तेंव्हा मीच जाऊन एका दिवसात त्या घेऊन परतही आलो. कालीमातेच्या उत्सवात कसलाही बहाणा न करता, न थकता, ओळीनं तीन दिवस न थांबता कष्ट करत राहून गावची इज्जत मीच राखली. पण आता मी इथे समोर असताना मुद्दाम मला वगळून नागराजलाच घेऊन जायचंय नं तुला ? मग जा की घेऊन. मी त्याची मनधरणी करायलाच काय, पण नुसतं त्याच्याशी बोलायलाही मुळीच तयार नाही.''

''मग तुमचा गावपाटील बोलला ते खरंच तर!'' वसुदेव आश्चर्य प्रकट करत म्हणाला.

आता अधीर होत सुशीलने विचारले, ''बोल, काय म्हणाला गावपाटील माझ्या बाबतीत?''

''तू पूर्वी जेंव्हा एकादं खूप अवघड काम करत होतास, तेंव्हा लोक तुझी वाहवा करत असत. पण तू म्हणायचास की, अरे! हे काही विशेष कठीण थोडंच आहे? पण अलिकडे मात्र जे कोणतंही काम करशील, ते 'फार कठीण आहे, पण तरीही मी करू शकलोय, मलाच फक्त ते शक्य झालंय' असं म्हणायला लागतोस. पाटील म्हणाला की, तू आता म्हातारपणात पदार्पण केलयस, तेच बरोबर आहे. या वयात तुला विश्रान्तीच घ्यायला हवी.'' वसुदेवाने त्याला सल्ला दिला.

आत्ता कुठे सुशीलच्या लक्षात आले की, आपल्यात खरोखरच बदल झालाय. नागराज या साऱ्या गोष्टींनी त्रासत नाही. आपली शक्ती योग्यता सिद्ध करायची तडफड त्याच्या मनात नाहीय. ज्यांचे वय वाढते त्यांच्यातच ही तडफडही वाढते.

हे सत्य ओळखल्यानंतर सुशीलने आपला जीवनक्रमच बदलून टाकला, दुसऱ्यांकडून प्रशंसा व्हावी ही आशा त्याने सोडून दिली, अन् आपले जीवन सुखाने घालवू लागला.





# भुवनसुंदरी - ९

(भुवनसुंदरीसाठी ग्रीक व ट्रोजन यांच्यात युद्ध झाले, अन् आता त्याचा शेवट जवळ आला. दोन्ही पक्षांकडील मोठेयोद्धे मारले गेले. ट्रॉय हस्तगत करण्यासाठी रूपधरने एक कारस्थान रचले. त्यानुसार एका कारागिराने लाकडाचा एक प्रचंड घोडा बनवला अन् योद्धे त्याच्या पोटात घुसून बसले. सम्राटाने घोडा आणि चौर्यनाथ नावाचा एक गुप्तहेर समुद्रतटावरच राहू दिले आणि आपण जहाजातून आपल्या देशाकडे निघून जात असल्याचे नाटक केले. ट्रोजन तो घोडा नगरात घेऊन आले आणि मोठ्या उत्साहाने आपला विजयोत्सव साजरा करण्यात मग्न झाले.)

बाहेर सर्वत्र कोलाहल माजलेला होता, अन् घोड्याच्या पोटात बसलेले ग्रीक वीर मात्र भयाने कापत होते. त्यांना इतके पक्के ठाऊक होते की आपल्या इथल्या वास्तव्याचा संकेत मिळायचा अवकाश, की आपले प्राण गेलेच म्हणून समजावे. दोर्घंड शिळेसारखा गंभीरपणे बसून होता. तीक्ष्ण दृष्टीने फेकलेला खंजीर घोड्याच्या आत घुसून त्याच्या अगदी डोक्याजवळच पडला. तरीही तो जरा सुद्धा हलला नाही. तो तर बाहेर पडून शत्रूवर तुटून पडण्यासाठी अगदी अधीर झालेला होता. त्या संधीच्या प्रतीक्षेत तो तलवारीची मूठ घट्ट धरून राहून पुन्हापुन्हा रूपधरकडे पहात होता. कारण या हल्ल्याचा पुढारी रूपधरच होता, बाहेर पडायचा आदेश योग्य वेळी तोच देणार होता.

भुवनसुंदरी संध्याकाळी आपला पती अरिभयंकर याच्यासमवेत घोडा पहायला आली. नवऱ्याचे मन राखायचे नाटक करत,



घोड्याभोवती फिरत, अधून मधून त्यावर खटखट आवाज करत राहिली. आत बसलेल्या योद्धयांच्या पत्नींच्या आवाजाची नक्कल करून ती त्यांची नावे घेऊन घेऊन त्यांना हाका मारू लागली. रूपधरच्या जवळ बसलेले प्रताप व देवमय तर ताबडतोब बाहेर झेप घ्यायला आसुसले, पण रूपधरने त्यांना कसेबसे आवरून धरले.

रात्र झाली. विजयोत्सवाच्या हालचालींनी दमून गेलेले ट्रोजन नागरिक गाढ झोपेत बुडाले. एकादा कुत्रासुद्धा आता भुंकत नव्हता इतकी शान्तता झाली होती. केवळ भुवनसुंदरीच काय ती जागी होती. तिच्या खोलीबाहेर आता एक गोलाकार दिवा जळत होता. ग्रीक लोकांसाठी हा एक संकेत होता.

मध्यरात्र झाली. आता चन्द्रोदयाची वेळ झाली होती. याच वेळी चौर्यनाथ हळूच मांजरपावलांनी नगराबाहेर पडला अन् त्याने वज्रकायच्या समाधीपाशी दिवा लावला. त्याच वेळी प्रत्याम्नासही एक पेटलेली मशाल हलवत होता. समुद्रात नांगरलेल्या जहाजातील सम्राटाला तो संकेत होता.

सम्राटाच्या नौकांमधले दिवे ही आता पेटवण्यात आले अन् ग्रीक नौका समुद्रकिनाऱ्याकडे निघाल्या.

सम्राटाचा संकेत मिळताच प्रत्याम्नास लाकडी घोड्याजवळ जाऊन हळूच बोलला, "सर्व जय्यत तयारी झालेली आहे." त्याबरोबर रूपधरने दोर्घडला दरवाजा उघडण्याची आज्ञा दिली.

घोड्याचा दरवाजा उघडला व शिडी लावण्यापूर्वीच एका योध्दयाने अतिउत्साहाने बाहेर उडी मारली. त्या जागीच योद्धे चुपचाप एकेक करून बाहेर उतरले. समुद्रातून येणाऱ्या सैनिकांसाठी दरवाजा उघडायला त्यांच्यापैकी काही सिंहद्वाराकडे धावले; काही राजप्रासादाकडे पळाले व तेथील पहारेकऱ्यांना त्यांनी झोपेतच कापून काढले.

प्रताप केवळ भुवनसुंदरीचाच विचार करत होता. त्याचे सारे लक्ष तिच्याचकडे लागून राहिलेले होते. तो आता तिच्या महालाकडे वेड्यासारखा धावत सुटला.



सुरा खुपसला आणि त्याचा वध केला.

आतापर्यन्त तर प्रतापचा असा विचार होता की, भुवनसुन्दरी हाती लागताच तिला मारून टाकावे. परन्तु तिचे मनमोहक रूप पहाताच त्याने आपला विचार बदलला. हातातली तलवार फेकून देऊन त्याने भुवनसुन्दरीचा हात पकडला अन् तिला घेऊन तो आपल्या नौकांकडे गेला.

रत्न: ट्रोजन असूनही प्रत्याम्नासने ग्रीकांना सहाय्य केले. पण हे विसरून ग्रीकांनी त्याच्या एका मुलाला जखमी केले. त्याच्या दुसऱ्या मुलाला मारण्यासाठी ग्रीक सैनिक रस्त्यात त्याचा पाठलाग करत असताना रूपधरने ऐन वेळी तेथे पोचून सैनिकांना अडवले. नन्तर त्याने स्वत:च प्रत्याम्नासच्या घराच्या दरवाजावर एक व्याघ्रचर्म लटकावून ठेवले. 'या घरातील कोणावरही अत्याचार होऊ नये' या गोष्टीचा तो संकेत मानला जाई. अशाच प्रकारे प्रभंजनचे घर ही ग्रीक आक्रमणापासून वाचले.

ट्रॉयमधे हत्याकांड सुरू होताच वर्धनची मोठी मुलगी जालिनी ही बुद्धिमती देवीच्या मंदिरात जाऊन लपली होती. परन्तु ग्रीकांनी तिला पकडून आपल्याबरोबर नेले. ज्या ट्रोजन स्त्रिया वाचल्या होत्या त्या सगळ्या ग्रीक सैनिकांच्या अधीन झाल्या. सम्राटाने जालिनीवर आपला हक्क प्रस्थापित केला.

हत्याकांडाच्या समाप्तीनन्तर ग्रीकांनी ट्रॉय



नगर लुटले, भिंती पाडल्या, घरे जाळली, बळी दिले, अन् केलेली लूट आपसात वाटून घेतली.

वीरसिंहाच्या पत्नीला नवयोधने आपलीशी केली. तिचा जो एक लहान मुलगा होता, त्याला ग्रीकांनी कारस्थान करून मारून टाकले.

वज्रकायची प्रेयसी प्रमोदिनी हिच्या भविष्याबद्दल ग्रीकांच्यात बरेच वादविवाद झाले, दीर्घ चर्चा झाल्या. वज्रकायने मरताना आपल्या मित्रांना सांगितले होते की, ट्रॉयचे पतन झाल्यावर प्रमोदिनीला आपल्या समाधीवर बळी द्यावे. नुकताच तो आपला मुलगा व काही ग्रीक सैनिकांच्या स्वप्नात आला व त्याने या गोष्टीचा पुनरुच्चार केला. त्याने अशी धमकीही दिली की, 'तिचा बळी



दिला नाही तर ग्रीक सेना सुरक्षित स्वदेशी परतू शकणार नाही. मी स्वतःच अडचण अुपस्थित करून ग्रीकांचा विध्वंस करीन!'

कांशुक म्हणाला, "वज्रकायने तनमनाने प्रमोदिनीवर प्रेम केलं. पण तिनं मात्र त्याला धोका देअून त्याचा विनाश करवला. अशा स्थितीत वज्रकायची इच्छा पुरी न करणं म्हणजे अधर्म होईल." परन्तु सम्राटाने या गोष्टीला विरोध केला. तो म्हणाला, "आतापर्यन्त खूप रक्तपात झालेला आहे. शिवाय मेलेल्या माणसाच्या अधिकाराचा एका जिवन्त स्त्रीशी संबंध जोडणे अनुचित आहे. मला तर हे अगदी असंगत वाटतंय."

"जालिनी तुमच्या वाट्याला आलेली आहे. तिला खुश करण्यासाठी तुम्ही तिच्या बहिणीला वाचवायचा प्रयत्न करत आहात." असा काही ग्रीकांनी सम्राटावर आरोपही केला. वादविवादाने तीव्र रूप धारण केले. आता हा प्रकार आणखी वाढायला नको, म्हणून मधेच हस्तक्षेप करत रूपधरने आपला निर्णय दिला की, प्रमोदिनीला बळी दिले जावे. त्याने सम्राटालाही आग्रह केला की, इतरांच्या इच्छेप्रमाणेच कारवाई करायला हवी.

प्रमोदिनीला बळी द्यायचा निर्णय पक्का झाला. तिला घेअून येण्याचे काम रूपधरवर सोपवले गेले. वज्रकायचा पुत्र नवयोध स्वतःच मारेकरी बनला, आणि ग्रीक सैनिकांच्या अुपस्थितीत वज्रकायच्या समाधीजवळ प्रमोदिनीला बळी देण्यात आले. नंतर ग्रीकांनी तिचे अंतिम संस्कार शास्त्रोक्त पद्धतीने केले.

प्रमोदिनीचा मृत्यु होताच ग्रीकांच्या परतीसाठी अनुकूल वारे वाहू लागले. 'प्रमोदिनीच्या बळीमुळेच वज्रकायचा आत्मा शान्त होअून त्यानेच अनुकूल हवेची योजना करून आपल्याला मदत केलीय' अशी ग्रीकांची समजूत झाली. यानंतर जराही विलंब न करता ते आपापल्या जहाजात बसून स्वदेशी जायला निघाले.

वर्धनची पत्नी रूपधरच्या वाट्याला तर आली, परन्तु ग्रीकांचे अत्याचार, अनीति वगैरे प्रकारांमुळे रागावून ती त्यांना शिव्याशाप देत राहिली. तोंडी येईल ते बोलू लागली. तिचे तोंड बंद करण्यात असफल झालेल्या सैनिकांनी शेवटी तिला मारून समुद्रात फेकून दिले.

या एकूण युद्धयात्रेत ग्रीक प्रमुखांचे अतोनात नुकसान झाले. त्यातले कित्येक तर आपल्या राज्यात परत पोचूही शकले नाहीत. ते कोठे गेले, त्यांचे काय झाले याचा पत्ता ही कोणाला लागला नाही.

ट्रॉयहून निघण्यापूर्वी सम्राट व त्याचा भाअू प्रताप या दोघात भांडण झाले. प्रतापचे म्हणणे असे की, "आता हवा अनुकूल आहे, तर परतीची तयारी तावडतोब करावी." पण सम्राट म्हणाला, "बुद्धिमतीदेवीला भेटी अर्पण केल्यावाचून निघणे अुचित होईल का?" प्रताप म्हणाला, "बुद्धिमतीदेवीने आपल्याला अशी काय मदत केली, की तिला आपण भेटी अर्पण कराव्या ? बळी द्यावे ? तिनं तर शत्रुपक्षालाच मदत केली. जिने आपल्याला काही मदत केली नाही, तिला आपण काही भेटी देण्याची निदान मला तरी आवश्यकता वाटत नाही." या बाबीवरून खूप वादविवाद झाला, दोघेही नाराज होअून एकमेकांपासून दूर झाले. पुढे आयुष्यभर ते भेटले नाहीत.

सम्राट, नवयोध, वृद्ध नवद्योत सरळ आपापल्या घरी गेले. पण हवेने योग्य साथ न दिल्याने प्रतापची बरीचशी जहाजे बुडाली. तो स्वतः इजिप्तला पोचला. तेथून तो घरी पोचण्यापूर्वीच कोणी तरी सम्राटाची हत्या केली.

ट्रॉय युद्धाच्या शेवटच्या भागात लाकडी घोड्याची योजना करून सफलता प्राप्त करून घ्यायचे श्रेय रूपधरकडेच जाते. ट्रॉयचा पराभव करण्यात तोच प्रमुख होता. अशा या रूपधरला घरी पोचायला तब्बल दहा वर्षे लागली! त्याचा प्रवास फारच विचित्रपणे झाला.

अशा प्रकारे ट्रॉयचे पतन झाले. ग्रीकांनी विध्वंस करण्यापूर्वी ते जगातल्या सुन्दर नगरांपैकी एक होते. या नाशानन्तर कित्येक राजे व प्रशंसनच्या वंशजांनी त्याची पुनर्निमिती केली, परन्तु त्याला आपले पूर्ववैभव कधीच प्राप्त झाले नाही.

**(समाप्त)**



## चान्दोबाच्या बातम्या

### चौदा वर्षे दुचाकी भ्रमण

ताहेर मद्रासवाला हा अहमदाबादचा रहिवासी. १९८१ मधे त्याच्या आईवडलांनी त्याला सहा महिने



सायकल प्रवास करण्याची परवानगी दिली. त्यावेळी ताहेरचे वय अठरा वर्षांचे होते. पण तो सहा महिन्यांनंतर घरी परतला नाही. त्याने आपला हा प्रवास चौदा वर्षे चालूच ठेवला. ११६,००० कि.मी. इतका हा प्रवास त्याने सायकलवरच केला. या दरम्यान त्याने तीस देशांना भेटी दिल्या. त्याने केवळ सायकलप्रवासच केला असे नाही, तर या साऱ्या देशांची वैशिष्ट्ये जाणून घेतली, संग्रह केला. निरनिराळे फोटोही काढले. ज्या ज्या देशात तो गेला तेथल्या लोकांबरोबरच्या भेटींचा व्हिडिओही तयार केला. यामधे त्याचे सारे प्रवासवर्णन समाविष्ट आहे. आपले अनुभव इतरांना सांगायचे किंवा पुस्तकरूपाने प्रसिद्ध करायचे झाले, तर या व्हिडिओ चित्रांचा त्याला अुत्तम अुपयोग होअू शकेल.

### चांदीचे बायबल

स्टॉकहोम मधील अुप्साला विश्वविद्यालयाच्या संपत्तिसमान असलेल्या बायबल ग्रंथाची दोन पाने व वरील मुखपृष्ठ गेल्या पाच एप्रिलपासून नाहीशी झाली होती. एक महिन्यानन्तर ती पाने स्टॉकहोमच्या प्रमुख रेल्वे स्टेशनच्या डॉकर्समधे सुरक्षित असल्याबद्दल कोणीसे टेलिफोनवरून कळवले. बायबलची ही पाने सुप्रसिद्ध चांदीच्या बायबलमधील आहेत. सहाव्या शतकाच्या या पवित्र ग्रंथातील अक्षरे चांदीच्या शाईने लिहिलेली असून काही अक्षरे व पानांच्या कोपऱ्यासाठी सोन्याचा ही अुपयोग केला गेलेला आहे. असे म्हटले जाते की, स्वीडनच्या सैनिकांनी सत्राव्या शतकात हा ग्रन्थ प्राग (झेकोस्लोव्हाकिया) हून चोरून आणला. गोथिक भाषेत लिहिलेला हा अद्भुत् ग्रंथ आज ही स्वीडनमधेच आहे.

### चार वर्षांच्या बालकाचे साहस

मे १९ ला सनी कनोडिया याने मुंबईतील गल्ली गल्लीतून कार चालवून दाखवली. यापूर्वी त्याने कलकत्त्याला कार चालवली होती. अन् त्याही पूर्वी अहमदाबाद, गोहाटी, सुरत इत्यादी शहरांतील रस्त्यांवरून कार चालवून लोकांना अचंभित केले होते. कनोडिया अजूनही नर्सरी वर्गात शिकत असून तो केवळ चारच वर्षांचा आहे. हैद्राबादच्या जुही अग्रवालने चार वर्षांची असतानाच कार चालवली होती. ही गोष्ट सनी च्या माता-पित्यांनी त्याला सांगितली, तेंव्हा त्याने विचारले, "हे मलाही शक्य होणार नाही का?"



अन् हट्ट करून त्याने आपल्या पित्याकडून ड्रायव्हिंग शिकून घेतले. अनेक नगरांतून कार चालवून त्याने नवीन रेकॉर्ड प्रस्थापित केले. त्याचे नाव गिनीज रेकॉर्ड बुकमधे दाखल होणार आहे.

## योग्य अभिलाषा

विक्रमादित्य हट्टी होता. पुन्हा झाडावर चढून त्याने प्रेत खाली उतरवले. प्रेत आपल्या खांद्यावर टाकून विक्रमादित्य चालू लागला तेव्हा वेताळ बोलू लागला -

"राजा, एकाद्या मांत्रिकाला भेटून त्याच्याकडून अद्भुत शक्ति प्राप्त करून घेण्यासाठी जर तू हे कठोर परिश्रम करीत असशील, तर मात्र शेवटी निराशाच तुझ्या पदरी पडेल. तुला सावध करण्यासाठी मतंग नावाच्या एका मुनीची गोष्ट मी तुला सांगतो." आणि वेताळ राजाला मतंग मुनीची कथा सांगू लागला.

एका गावी एक श्रीमान् माणूस रहात होता. त्याचं नाव होतं नवनीत. हळूहळू त्याची सर्व संपत्ति संपुष्टात आली. नवनीतचा मुलगा सीताराम एकवीस वर्षांचा होईपर्यंत केवळ घर तेवढं शिल्लक राहिलं. खाटेवर पडल्या पडल्या त्याने आपल्या मुलाला जवळ



बोलवलं नि म्हणाला - ''सीताराम, आपली परिस्थिति फार बिकट झाली आहे. आज रथ-सप्तमीच्या दिवशी मी तुला एक रहस्य सांगणार आहे. जा, स्नान करून स्वच्छ होऊन माझ्यापाशी ये.''

सीताराम स्नान करायला निघाला. मध्यंतरीच्या काळात नवनीतला मृत्यु आला.

नवनीतने ज्यांच्याकडून कर्जे घेतली होती, त्या सर्वांची दुसऱ्याच दिवशी सीतारामकडे गर्दी जमली. ते म्हणाले की रथ-सप्तमीच्या दुसऱ्या दिवशी मुलगा कर्ज चुकवील असे नवनीतने त्यांना आश्वासन दिले होते. सर्वांनी सीतारामकडे आपापले मुद्दल व व्याजाच्या पैशांची जोरदार मागणी केली.

सीताराम त्या सर्वांना म्हणाला की कर्जे चुकवण्याची काही योजना वडील मला सांगणार होते, पण त्यापूर्वीच त्यांचा अंत झाला. पण कर्जदारांनी हे काही न ऐकता खूपच तमाशा केला.

कर्जदारांमध्ये एक माणूस होता रमण. नवनीतने त्याच्याकडे आपले घर गहाण ठेवले होते. त्याने सर्वांना सांगितले - ''तुमच्या रकमा फार लहान आहेत. मी आतील सामानासह या घराचा कब्जा घेईन आणि तुमच्या रकमा देऊन टाकीन.''

रमण सीतारामला म्हणाला - ''मी तुला एक दिवसाची मुदत देतो. उद्या सकाळी तुला नि तुझ्या आईला हे घर सोडायला हवं.''

सर्व लोक गेल्यावर सीतारामची आई रजनी म्हणाली - ''सध्या आपली ग्रहदशा काही ठीक नाही. घराच्या माळ्यावर आपल्या वाडवडिलांपासून मिळालेली एक जुनी लाकडी पेटी आहे. जी तेवढी आपण बरोबर घेऊन जाऊ.''

सीताराम माळ्यावर चढला. एका छोट्याशा पुस्तकाशिवाय त्या पेटीत काही सापडलं नाही.

अत्यंत छोटेखानी त्या पुस्तकात त्याच्या वंशाचा इतिहास होता. सीतारामच्या जन्मापर्यंतचं विवरण त्यात होतं. त्यानंतरच्या एका पानावर लिहिलं होतं - ''बादरायण, बादरायण, बादरायण या नाम-मंत्राचा तीन



वेळा जप केला की समोर उभा असलेला शत्रु ही मित्र बनतो. या परिवारातील प्रत्येकाला या मंत्राचा फायदा होईल.''

याशिवाय या पुस्तकात काही लिहिलेलं नव्हतं. पण एक सावधगिरीची सूचना होती की या बादरायण मंत्राबाबत मृत्यूच्या वेळे-पर्यंत कोणाला काही सांगू नये. मृत्यु समयी वडील काय सांगू इच्छित होते ते आता सीतारामला कळले. तो माळ्यावरून खाली उतरला नि मोठ्या उत्साहाने रमणच्या घरी गेला. त्याच्या जवळ जाण्यापूर्वी त्याने मनातल्या मनात तीन वेळा बादरायण मंत्राचा जप केला.

रमण मोठ्या प्रेमाने त्याला भेटला आणि म्हणाला - ''तुझे वडील खरोखरीच सत्पुरुष होते. माझ्याकडून जमेल ती मदत मी तुला करीन.''

सीतारामने विनंती केली - ''या कर्जदारांनी मला सळो की पळो करून सोडलं आहे. माझी कर्जे तेवढी फेडून टाका.''

''परमेश्वर-कृपेने माझ्यापाशी खूप धन आहे. म्हणून माझं कर्ज तुला इतक्यात देण्याची जरूर नाही. तुझी लहान-सहान कर्जे मी फेडून टाकतो.'' रमणने आश्वासन दिले.

आणि दिलेल्या शब्दाला तो जागला ही.

रजनीच्या लक्षात आले नाही की रमण मधे अकस्मात् असा बदल कसा घडून आला? सीतारामने आईला यामागील रहस्य काही



सांगितले नाही.

आता सीतारामचं घर सुरक्षित राहिलं. देणेकऱ्यांच्या ससेमिऱ्यांतून तो मुक्त झाला. सीताराम दुकानदार मदनकडे गेला. तीन वेळा त्याने बादरायण मंत्राचा जप केला. तुला पाहिजे तो सर्व माल मी फुकट पाठवीन असे मदनने त्याला वचन दिले.

आणि दिलेल्या शब्दाला तो जागला ही.

अशा रीतीने काही दिवस गेले. एक दिवशी रात्री चोरांनी सीतारामच्या घरात प्रवेश केला. त्यांची चाहूल लागताच आई नि मुलगा दोघे ही जागे झाले. चोरांनी सुऱ्या दाखवून दोघांना घाबरवून सोडलं. सीतारामने मनातल्या मनात बादरायण मंत्राचा जप



केला.

त्याच वेळी चोराने निवेदन केले - ''या जगात माझं असं कोणी नाही. आजपासून मी चोरी करण्याचं काम सोडून दिलं. काही तरी काम करून आपलं पोट भरीन.'' आणि चोर निघून गेले.

रजनीने सीतारामला विचारले - ''सगळंच काही विचित्र घडतंय नाही! सगळे लोक आपल्याला मदत कशासाठी बरं करताहेत ? तुला एकादा वशीकरण मंत्र तर सापडला नाही ना ?''

''नाही आई, माझ्याजवळ तर असा काही मंत्र-बिंत्र नाही. माझ्या स्वर्गीय पित्याचा आत्मा आपल्याला मदत करीत असावा असं मला वाटतंय.'' सीतारामने आईला समजाऊन सांगण्याचा प्रयत्न केला.

सीताराम व त्याच्या आईचे दिवस आरामात जाऊ लागले. कोणाकडून मदत पाहिजे असली की सीताराम बादरायण मंत्राचा जप करी, आणि आपले काम साधून घेई. आश्चर्य करीत सर्व लोक म्हणत की आजकाल गावच्या पाटलांपेक्षा लोक सीतारामलाच अधिक मान देतात.

एक दिवशी मतंग नावाचा एक तांत्रिक त्या गावात आला. त्याच्या जवळ मोठ्या महिमावान शक्ति होत्या. गावातील कित्येक लोकांचे रोग त्याने बरे केले. काही लोकांनी त्याच्याकडून वरदान मागितले. तांत्रिक मतंगला सर्व काही साध्य आहे, कोणते ही असे काम नाही, जे त्याला असाध्य आहे - असं गावचे लोक म्हणू लागले.

सीतारामला मतंगच्या अद्भुत शक्तींबाबत समजले. बादरायण मंत्राचा जप करून जर तांत्रिकाला वश करून घेतलं, तर मला ही असाध्य असं काही राहणार नाही असा सीतारामने विचार केला. म्हणून एक दिवशी तो मुनि मतंगला भेटला व त्याने बादरायण मंत्र जपला.

मतंगाने प्रसन्न अंतःकरणाने सीतारामकडे पाहिले आणि म्हणाला - ''तू तर मोठा भाग्यवान आहेस. माझ्या मदतीची तुला काय आवश्यकता ?''



''स्वामीजी, अनेक सामान्य माणसं मला मदत करीत आहेत. माझ्या सर्व आवश्यकतांची सहज पूर्ति होत आहे. माझ्या सामान्य इच्छा तर पूर्ण होतात. आपण माझ्यावर कृपा केली तर माझ्या असाधारण इच्छा सुद्धा पुऱ्या होतील!'' सीताराम दोन्ही हात जोडून नम्रपणे म्हणाला.

मतंग हंसत म्हणाला - ''माझी गोष्ट पण ऐकून घे बेटा.'' आणि तो आपली गोष्ट सांगू लागला.

''मी विश्व-सम्राट बनूं इच्छित होतो. हिमालय पर्वतावर जाऊन मी घोर तपस्या केली. काही वर्षांनी परमेश्वर माझ्यावर प्रसन्न झाला. मी आपली इच्छा त्याच्यापुढे व्यक्त केली.

परमेश्वर म्हणाला - ''सध्या असलेला सम्राट फार चांगला माणूस आहे. तो आपल्या पदाला निःसंशय योग्य आहे. तू सम्राट होण्याची इच्छा करणे मला न्यायोचित वाटत नाही.''

''मी पण एक चांगला माणूस आहे. सम्राट बनण्याची योग्यता माझ्यात ही आहे!'' मी आपला विचार सांगितला.

''तू चांगला माणूस आहेस हे कशावरून ? सम्राट बनण्यासाठी तू तपस्या केलीस. तप करणे हा सम्राट बनण्याचा मार्ग नाही. आपल्या शक्ति-सामर्थ्याच्या बळावरच कोणी त्या पदाला योग्य बनू शकतो. तपश्चर्या करून



सम्राट बनण्याचा तुझा मार्ग चुकीचा आहे.'' परमेश्वराने मला सावधगिरीची सूचना दिली.

तेव्हा मी विचारले - ''मग माझ्या या तपस्येचे फळ काय?''

''या तपश्चर्येमुळेच जर तुला किती तरी अद्भुत शक्ति प्राप्त झालेल्या आहेत!'' परमेश्वर म्हणाला.

''तर मग या अद्भुत शक्तींचा उपयोग करून मी सम्राट होऊ शकेन!'' मी आपला तर्क सादर केला.

''माणसाने आपल्या शक्तींचा उपयोग आपल्या आवश्यकता पूर्ण करण्या इतकाच करावा. त्याहून जास्त या शक्तींचा उपयोग केल्यास केव्हां ना केव्हां तरी त्याला एकाचे



दहा फेडावे लागतील कोणी आपल्या उपयोगी पडला तर आपण त्याला मदत अवश्य करावी. असं न केलं, तर आपल्याला जे मिळालं, त्याच्या दस पट परत द्यावे लागेल. आपलंच नुकसान होईल. मी ज्या ज्या ऋषींना वर दिले ते सर्व महान बनले. राक्षसांनी अन्याय व अत्याचार करून आपला सर्वनाश करून घेतला. तपस्या स्वार्थासाठी करायची नसते, तर परमेश्वर प्राप्तीसाठी. ही महत्त्वाची गोष्ट तू कधी ही विसरू नकोस.'' परमेश्वराने मला उपदेश केला.

परमेश्वराच्या या उपदेशामुळे माझे डोळे उघडले. परमेश्वराने मला आपल्यात सामावून घ्यावं अशी मी त्याला प्रार्थना केली.

''प्रत्येक माणसाच्या जन्माचा काही ना काही तरी उद्देश असतो. तू आतापर्यंत काहीच सत्कार्य केले नाहीस. तू जेव्हा काही सत्कार्य करशील, तुझ्या जीवनाचा उद्देश सफल करशील, तेव्हा मी तुला आपल्यात समाविष्ट करून घेईन.'' असे सांगून परमेश्वर अंतर्धान पावला.

त्या दिवसापासून मी गावो-गाव हिंडून मानव-सेवा करीत आहे.

आपण किती चुका केल्या आहेत हे मतंगची गोष्ट ऐकून आता सीतारामच्या लक्षात आले. आपल्या बादरायण मंत्राचा जप करून त्याने कित्येक लोकांकडून मदत मिळविली होती. याप्रमाणेच त्याच्या वडिलांनी ही या मंत्राच्या साहृयाने पुष्कळ काही मिळवलं होतं. अधिक लोभाला बळी पडून आवश्यकतेहून अधिक बरंच मिळ विण्याचा त्यांनी प्रयत्न केला होता. मिळवलेले सर्व परत करण्याची वेळ आली, तेव्हा वार्धक्याने त्यांना ग्रासले. जवळ असलेले सर्व संपुष्टात आले. म्हणून मरते वेळी त्यांनी मला सांगितले - ''अति लोभामुळे माझी अशी दुर्गति झाली, मी लोकांकडून आवश्यकतेहून अधिक मदत घेतली.'' सीताराम विचार करू लागला - ''मी असेच करीत राहिलो, तर माझी ही परिस्थिति वडिलांसारखी व्हायला वेळ लागणार नाही. मरण्याच्या वेळी मी आपल्या





मुलाला 'बादरायण' मंत्र देऊ शकणार नाही आणि त्याला सावध ही करू शकणार नाही.'' विचारात पडलेल्या सीतारामकडे मतंगने तीव्र दृष्टीने पाहिले नि म्हणाला - ''बेटा, तुझ्यात वशीकरणाची शक्ति आहे. माझ्याकडून काही मदत माग. तुला काही तरी दिल्याशिवाय मी इथून जाऊ शकणार नाही. तुझी काही इच्छा असली तर सांग, मी ती पूर्ण करीन.''

मनातल्या मनात सीतारामने विचार केला आणि म्हणाला - ''मुनिवर, सम्राट बनण्याची इच्छा मनात ठेवून आपण तपस्या केलीत. त्या तपस्येच्या बळावर आपल्याला काही अद्‌भुत शक्ति मिळाल्या व त्यांच्या साहृयाने आपण मानव-सेवा करीत आहात. आपण जी सेवा करीत आलात, त्यामुळे आपणास सम्राट बनण्याची योग्यता प्राप्त झाली. आणि आता आपली सम्राट बनण्याची इच्छा नाहीशी झाली.''

मतंग म्हणाला - ''होय!''

''मुनिवर, माझी सम्राट बनण्याची महत्त्वाकांक्षा नाही. मला फक्त या देशाचा राजा बनवा, बस!'' सीतारामने आपली इच्छा प्रदर्शित केली.

''परमेश्वराने तुला सावधगिरीची सूचना दिली होती. ती विसरलास वाटतं?'' मतंगने विचारले.

''नाही स्वामी, राजाला पदच्युत



करण्याची माझी इच्छा नाही. राजाला मुलगा नाही. राजाला एकुलती एक मुलगी आहे. राजा तिच्यासाठी सुयोग्य वर शोधत आहे. राजकुमाराशी विवाह करण्याची पात्रता माझ्यात यावी आणि स्वयंवरात तिने मला पसंत करावे असा मला वर द्या.'' सीतारामने निवेदन केले.

''तथास्तु ! आता तुझे एकच ध्येय आहे. राजा बनण्याचे ! तुझ्या इच्छा पूर्ण करून मी आता परमेश्वरात लीन होऊ शकतो.'' मतंग म्हणाला.

विक्रमादित्याला एवढी गोष्ट ऐकवून आता वेताळ म्हणाला - ''राजा, मतंग मुनीने तपस्या करून ज्या अद्‌भुत शक्ति मिळविल्या,

त्यांचा उपयोग करून सीतारामला राजा बनण्याचा वर दिला. मला वाटते हा मतंगचा निर्णय अयोग्य व विवेकशून्य होय. सीताराम आपल्या बादरायण मंत्राच्या साह्याने आपल्या सर्व इच्छा पुऱ्या करीत आहे. असा स्वार्थी माणूस राजा बनून देशाचे काय कल्याण करणार? राज्यात बजबजपुरी माजणार, जनता दुःख सामरात बडून जाणार! तपोधन मुनि मतंगच्या लक्षात ही गोष्ट कशी आली नाही? परमेश्वरात लीन व्हायला निघालेल्या मुनि मतंगला मनुष्याच्या स्वार्थी स्वभावाचा कसा विसर पडला? सीतारामचं जीवन दुसऱ्या लोकांच्या दयेवर अवलंबून होतं, तो स्वतः काही परिश्रम करीत नव्हता. तो आळशी होता, स्वार्थी होता. तरी सुद्धा मुनीने त्याला वर देण्याची चूक कशी केली? याचे कारण काय असूं शकेल? माहीत असून ही माझ्या या शंकेचे निवारण तू केले नाहीस तर तुझे शिर धडावर राहणार नाही हे तू जाणतोसच!''

राजा विक्रमादित्याने निवेदन केले -

''सीताराम स्वतः काही काम करीत नाही, तो मंत्राच्या बळावर लोकांकडून साहय मिळवतो हे मतंगला माहीत होतं. असं करणं हे पाप आहे हे सीतारामला समजावं म्हणूनच त्याने त्याला आपली कथा ऐकवली. मृत्यु-समयी आपल्या वडिलांची दुरवस्था का झाली, तसेच मतंगच्या अनुभवांचे सार जाणून सीताराम मध्ये योग्य तो बदल झाला. आता पर्यंत ज्या ज्या लोकांकडून त्याने मदत घेतली होती, जी सर्व परत करण्यासाठी जवळ पुरेसे धन असणे आवश्यक होते. सीताराम राजा झाला तरच हे सहज जमणार होते. म्हणूनच त्याची राजा बनण्याची इच्छा होती. मतंगने सीतारामची ही इच्छा जाणूनच त्याला वरदान दिले. म्हणून मी असे निश्चितपणे म्हणतो की मतंगने दिलेले वरदान योग्यच आहे. यात अविवेक नाही.''

अशा रीतीने राजाचा मौन-भंग झाल्यावर वेताळ अदृश्य झाला व पुनः झाडावर जाऊन बसला.

**आधार- सत्यभामा ताईंची एक कथा**



## आपल्या देशातील किल्ले - ८

# मध्यभारतीय किल्ले

लेखिका : मीरा उबा ◆ चित्रकार : अरिद्रा



मंडू

मध्यप्रदेशात नैऋत्येकडे असलेल्या मंडू किल्ल्याला पूर्वी मांडवगड असे म्हटले जाई. बाराव्या शतकात परमार राजांनी हा किल्ला पुन्हा बांधून काढला.

या भागावर १५५० च्या आसपास सुलतान बाज बहादुर याचे आधिपत्य होते. तो मोठा संगीतप्रेमी असून शिल्पकलेची ही त्याला खूप आवड होती. सुप्रसिद्ध गायिका राणी रूपमती हिच्यासाठी त्याने बांधलेला महाल अतिसुंदर होता. या महालाजवळूनच नर्मदा नदी वहाते.



एकदा बादशहा जहांगीर येथे सात महिने राहिला होता. त्याने येथे आपली बेगम नूरजहाँ हिच्यासाठी १७८ पायऱ्या असलेला महाल बनवला अन् महाल-प्रवेशाच्या वेळी ती जसजशा पायऱ्या चढत गेली, तसतशा प्रत्येक पुढल्या पायरीवर दोन दोन अशर्फ्या ठेवण्यात आल्या.

सन् ५२५ मध्ये सूरजसेनने ग्वालीपमुनीच्या नावाने ग्वाल्हेर किल्ला बांधला. एका बाजूने सरळ उभा कडा व वरून समतल असलेल्या एका टेकडीवर हा किल्ला बांधलेला आहे. तोमर राजांच्या शासनकालात (१३८८-१५१८) याचे वैभव वर्णनातीत होते.

तोमर राजांपैकी प्रसिद्ध राजा मानसिंग याने येथे मानमंदिर बांधले. या



मानमंदिर, ग्वाल्हेर

किल्ल्याच्या चार मजल्यांपैकी दोन तळघरासारखे जमिनीखाली बांधलेले आहेत. याच्या आश्रयाने संगीत व अन्य कलांना खूपच अुत्तेजन मिळाले. महम्मद घौस व त्याचा सुप्रसिद्ध शिष्य तानसेन ग्वाल्हेरलाच रहात असत. येथेच तयार



▲ स्व. तानसेनची समाधी

▲ आदिनाथ मूर्ति

होअून विकसित झालेल्या गायकीला 'ग्वाल्हेर घराणे' असे संबोधले जाते.

अुर्वही द्वारा जवळच जैन तीर्थंकराच्या विराट मूर्ती कोरलेल्या आहेत. त्यातील आदिनाथ मूर्ति १८ फूट अुंचीची आहे.

१८५७ मधे झालेल्या स्वातंत्र्य युद्धात ग्वाल्हेरच्या शिपायांनीही महत्त्वाचे कार्य केले. बंड करून ते झाशी राणी लक्ष्मीबाई व तात्या टोपे यांना मिळाले. मे १८५८ मधे या दोघांनी ग्वाल्हेर जिंकले आणि सिंधिया राजाला बाहेर हाकलले. तो इंग्रजांना मिळालेला होता. परंतु नंतर सर ह्यू रोज आपले सैन्य घेअून त्यांच्यावर तुटून पडला. सन १८५८ मधे हे युद्ध झाले आणि त्यात १७ जून रोजी राणी लक्ष्मीबाईचे निधन झाले. तिच्या शरीरावर जेथे अग्निसंस्कार झाला, त्या जागी आजही तिची समाधी आहे.



मध्यभारतातील चुनारगड, रोहतासगड, कालिंजर किल्ला हे अजेय व अभेद्य मानले जात. परन्तु शेरखान (शेरशहा सूर) याने तीन निरनिराळ्या पद्धतींनी हे तीन गड जिंकले.



चुनारगड

अुत्तर प्रदेशातील पूर्वभागातला चुनारगड विंध्य पर्वतातील एका अुंच सरळ खडकावर बांधलेला असून या टेकाडाचा एक भाग गंगा नदीतून बाहेर आल्यासारखा आणि अुंच आहे. त्यामुळे तो शत्रूला अभेद्यच आहे. १५३१ मधे शेरशहाने सुभेदार ताजखान याची विधवा बेगम लाड मलिका हिच्याशी विवाह, केला अन् मग त्याने तो किल्ला ताब्यात घेतला.

चुनारगड अगोदर शेरशहाच्या वंशजांच्या ताब्यात होता. १५३८ मधे हुमायूनने तो आपल्या ताब्यात घेतला. त्यामुळे शेरशहा स्वत:ला रहाण्यासाठी जागेच्या शोधात होता. त्यासाठी त्याने एक अुपाय योजला. नीट योजना बनवून त्याने रोहतासगडात आश्रय मागितला. राजपूत राजाने त्यासाठी मान्यता दिली. सातशे पालख्या वाहून गडात आणल्या गेल्या. रखवालदारांनी पहिल्या पन्नास पालख्या तपासून पाहिल्या. त्यांत फक्त म्हाताऱ्या बायकाच आढळल्यामुळे बाकीच्या पालख्या त्यांनी न तपासताच आत येअू दिल्या. आणि हाय रे दैवा, थोड्याच वेळात त्या पालख्यांतून हत्यारबंद सैनिक बाहेर पडले. जो राजा त्यांना आश्रय द्यायला तयार होता, त्यालाच त्यांनी किल्ल्याबाहेर काढले ! अशा प्रकारे कैमूर पर्वतावरील अभेद्य असा रोहतासगड शेरशहाच्या हाती आला.

देवकीनन्दन खत्री ने 'चन्द्रकान्ता', 'भूतनाथ', 'कुसुमकुमारी' नावाच्या



रोहतासगड



कलिंजर किल्ला

साहसपूर्ण, रोमांचकारी कादंबऱ्या लिहिल्या. चुनार व रोहतासगडात घडलेल्या घटनांनीच या लेखनासाठी त्याला स्फूर्ती व प्रेरणा दिली.

विन्ध्यपर्वतावरील कलिंजर किल्ला आपल्या देशातील प्राचीन किल्ल्यां पैकी एक होय. ग्रीक इतिहासकार टॉलेमी याने या किल्ल्याचा 'कांगोर' असा उल्लेख केलेला आहे.

१५४५ मधे शेरशहाने या किल्ल्यावर हल्ला केला, तेंव्हा कीर्तिसिंह चंदेला त्यावर शासन करत होता. वेढ्यानंतर एक वर्ष पर्यन्त किल्ला ताब्यांत येण्याचे चिन्ह न दिसल्याने स्वत: या कामावर देखरेख करण्यासाठी तेथे आला.

मे २१, १५४५ रोजी अफगाणी सैन्याने डागलेला एक गोळा किल्ल्याच्या दरवाजावर आपटून परत आला, व मोकळ्या मैदानात जेथे तोफगोळे व्यवस्थित रचून ठेवलेले होते, तेथेच येऊन आदळला. त्यामुळे स्फोट होऊन आग लागली व स्वत: शेरशहाच जबर जखमी झाला. यामुळे सूडभावनेने पेटून त्याच्या सैन्याने किल्ल्याची भिंत फोडून त्यावर ताबा मिळवला. कीर्तिसिंहला कैद करुन त्यांनी मारून टाकले, परन्तु जखमी शेरशहा स्वत:ही मरुन गेला व त्याचा हा जय वायाच गेला!

अलाहाबादचा किल्ला प्रयागच्या गंगा यमुनेच्या संगमाजवळ आहे. मोगल बादशहा अकबर याने तो बांधला. १५८३ मधे तीनशे नौका घेऊन अकबर तेथे पोचला. नोव्हें ४ रोजी 'इल्लहाबास' (इल्लहा-आवास) 'देवनिलय' नावाच्या या किल्ल्याची पायाभरणी त्याने केली. खूपच खालून वहाणारी यमुना व गंगेच्या पाण्याचा वेगवान प्रवाह यामुळे किल्ला बांधायला अतिशय त्रास झाला. किल्ला बांधायला चांगला दहा वर्षाहूनही अधिक काळ लागला, खर्चही सहा कोटींपेक्षा जास्त झाला.

१३८० पासून देखरेखी अभावी पडून असलेला कौशांबीचा अशोकस्तंभ ब्रिटिशांनी १८३८ मधे या किल्ल्यात आणला व येथेच त्यांनी त्याची प्रतिष्ठापना केली.

अलाहाबाद किल्ला







# राज-सम्मान

भास्कर कवि होता. त्याची फार इच्छा होती की राजाने एकदा आपला सन्मान करावा. म्हणून त्याने आपल्या देशाचा राजा चन्द्रभानु याच्यावर प्रशंसात्मक एका महाकाव्याची रचना केली. पण राजाला हे काव्य कसं ऐकवावं हे काही त्याच्या लक्षात येईना. म्हणून तो आपल्या गावाच्या ग्रामाधिकाऱ्याकडे सल्ला-मसलतीसाठी गेला.

ग्रामाधिकारी म्हणाला - ''मी तेव्हा काही कामासाठी राजधानीत जातो, तेव्हा खुद्द राजाला भेटायची कधी वेळच येत नाही. दरबारातील एकाद्या कवीच्या मदतीने तुझे काम होऊ शकेल.''

भास्कर आपले काव्य घेऊन तावडतोब राजधानीकडे निघाला. जंगलात एका लुटारूने त्याला थांबवलं आणि दरडावलं - ''तुझ्यापाशी जे काही आहे, ते सगळं मला देऊन टाक.''

भास्कर गयावया करीत म्हणाला - ''माझ्या जवळ तर आता काहीच नाही. माझं काव्य ऐकून राजा प्रसन्न झाला व खुशीने मला काही धन दिलं, तर त्यातला काही भाग मी तुला जरूर देईन !''

आश्चर्यचकित होकर चोर म्हणाला - ''तू कवि आहेस ? मग तर आमच्या गुरूला तुला भेटलंच पाहिजे. ते कवींवर फार प्रेम करतात. चल.'' असं म्हणत त्याने भास्करच्या डोळ्यांवर एक पट्टी बांधली. एका ठिकाणी पोचल्यावर त्याने पट्टी सोडून टाकली.

डोळे उघडताच भास्करच्या लक्षात आलें की आपण पर्वताने वेढलेल्या एका महालात आहोत. कित्येक चोर आणि कसाई आपल्या कामात तिथे मग्न होते. त्यांच्या गुरुने सफेद रेशमी कपडे परिधान केलेले होते. चोराने त्यांना भास्कर बाबत सांगितले.

गुरुजी भास्करला म्हणाले - ''माझं नाव

सुभाष दळवी



विद्याधर. मला कविता फार आवडते. कविता करण्यासाठी या जंगलातील वातावरण फार अनुकूल आहे. येथील निसर्गरम्य वातावरणात तू रमून जाशील, येथील निसर्गाच्या सान्निध्यात स्फुरलेली कविता सहजच प्रभावशाली बनते. म्हणून मी म्हणतो तू इथेच रहा माझ्याजवळ !''

''राजाने माझा सन्मान करावा अशी माझी महत्त्वाकांक्षा आहे.'' भास्कर म्हणाला.

विद्याधर गंभीर होऊन म्हणाला - ''राजाकडून सन्मान ? कवीला असली इच्छा शोभत नाही. राजे लोक कवींकडून कोण जाणे कोणकोणती कामे करून घेतात !''

''आपण स्वतः तर चोर-लुटेऱ्यांमध्ये राहाता आणि राजांची आलोचना करता ! हे तर अगदीच हास्यास्पद आहे.'' भास्करने आपला विचार निर्भयपणे सांगितला.

विद्याधर म्हणाला - ''माझ्या बरोबर जे लोक राहतात, त्यांच्याबद्दल तुला काही माहीत नाही, असं दिसतय. लवकरच वस्तु-स्थिति तुझ्या लक्षात येईल.''

अंधार पडल्यावर विद्याधरने तेथील सर्व लोकांना भागवताचा काही भाग वाचून दाखवला. मधून मधून त्याने भाष्य ही केले. ज्यांनी काही शंका विचारल्या, त्यांचे समाधान केले.

भास्कर हे सर्व पहात राहिला. तेथील लोकात 'विशेष' असे त्याला काही दिसले नाही. त्यांच्यात विद्याधर म्हणजे वासरात लंगडी गाय ! म्हणूनच तिथे त्याचा दबदबा होता. म्हणूनच तो आपल्या निवास-स्थानाला स्वर्ग समजत होता.

त्या रात्री भास्कर खूप झोपला आणि दुसऱ्या दिवशी राजधानीकडे निघाला. विद्याधर समजावणीच्या सुरात म्हणाला - ''मी तुला पुन्हा सांगतो - असे श्रोते तुला अन्यत्र मिळणार नाहीत. राजाकडे जाऊन शेवटी तुला काय मिळणार आहे?''

काही असलं तरी विद्याधरच्या घरी राहण्याची भास्करची इच्छा नव्हती. तेव्हा विद्याधरने त्याला सांगितले - ''या जंगला-



पलीकडे एक नादपुर नावाचं गाव आहे. तिथे माझा शिष्य वल्लभ राहतो. तो महाकवि आहे. त्याला भेटलास तर तो तुला काही सुचवील.''

भास्कर नादपुरला पोचला. बऱ्याच लोकांना त्याने वल्लभ बद्दल विचारले. शेवटी त्याने एका धनगराला वल्लभ बाबत विचारले.

''माझंच नाव वल्लभ ! तुझें माझ्याशी काय काम?'' धनगराने विचारले.

''विद्याधरने तुम्हाला पाठवलंय? ते कसे काय आहेत? त्यांनी अलीकडे कुठल्या नवीन काव्याची रचना केलीय?'' वल्लभने आतुरतेने विचारले.

''विद्याधर काव्य-रचना करतात की नाही हे मला माहीत नाही. अडाणी लोकांना ते प्राचीन काव्य वाचून दाखवतात. तू त्यांचा शिष्य कसा झालास ? केव्हा झालास? तू त्यांच्यापासून काय मिळवलंस?'' भास्करने वल्लभला प्रश्न विचारले.

तेव्हा वल्लभ स्वतःबद्दल सांगू लागला - ''एका गरीब शेतकऱ्याच्या कुटुंबात माझा जन्म झाला. लहानपणापासून मला कविता खूप आवडे. जे मनात येईल ते लिहून मी पशु-पक्षांना ऐकवी. एकदा विद्याधर आमच्या गावी आले. रात्री मंदिरात जमलेल्या लोकांना त्यांनी व्यास-रचित महाभारताचा काही भाग ऐकवला व त्यावर सुरस भाष्य केले. श्रोत्यांच्या शंकांचे समाधान केले. त्यांचे ज्ञान व वक्तृत्व यावर मी मुग्ध होऊन गेलो. जेव्हा



मी त्यांना विचारले - ''गुरुजी, सौंदर्य आणि चांगुलपणा पाहिला की मला कविता स्फुरते. मग मी गीतांची रचना करतो. पण माझ्या गीतांचा अर्थ मलाच समजत नाही. आपण माझ्या काही कविता ऐका नि मला आपला अभिप्राय सांगा.'' असे म्हणून मी आपली काही गीतं त्यांना ऐकवली.

माझी कविता ऐकून विद्याधर म्हणाले - ''बेटा, तू सहज कवि आहेस. एक वर्ष भरात मी तुला महाकवि बनवीन.''

मी त्यांच्या बरोबर गेलो. भाषेचं अध्ययन केलं. एक नवरचित कविता मी गुरुजींना ऐकवली, तेव्हा त्यांनी माझी खूप प्रशंसा केली आणि म्हणाले - ''जर नित्य अशी



काव्यरचना करण्याची तुझी इच्छा असेल तर राजाच्या आश्रयाला कधी जाऊ नकोस !''

मी गरीब होतो. काही काळ गुरूची सेवा-सुश्रूषा करून मी जेव्हा घरी परतलो, जेव्हा वडील आजारी असल्याचे पाहिले. घरातील सर्व जबाबदारी माझ्यावर येऊन पडली. आता मला कविता करायला वेळच मिळणार नाही अशी मला भीति वाटली. मी राजधानीत गेलो. पण तेथील निराशाजनक परिस्थिति पाहून परत गावाकडे आलो. त्याच वेळी माझ्या गावातील एक श्रीमंत गृहस्थ रत्नाकर यांनी मला बोलविले. ते मला म्हणाले - ''माझा घरजावई बनून तू माझ्याच घरी राहिलास तर तुझ्या वडिलांची सर्व व्यवस्था मी करीन. तू कुठल्या ही व्यापात न पडता कविता करीत बस.''

मी रत्नाकरजींचा प्रस्ताव मान्य केला आणि त्यांची मुलगी मंजरी हिच्याशी लग्न केले. मंजरी मोठी हट्टी स्वभावाची बाई होती. माझ्या कडून निरनिराळी व्यर्थ कामें करून घेई. जनावरांना चरायला घेऊन जायचं काम ही ती मला सांगे.

सहानुभूति दाखवीत भास्कर म्हणाला - ''अरेरे, तुझं जीवन तर मोठं कष्टप्रद आहे.''

''आता तर मी अगदी निश्चिंत आहे. कविता करायला मला भरपूर वेळ मिळतो. याहून अधिक मला काय पाहिजे?'' वल्लभ संतोषपूर्वक म्हणाला.

भास्करला वल्लभचं बोलणं रुचलं नाही. त्याला वाटलं याच्या कवितेत काव्यगुण नसतील, म्हणूनच राजाने याला आश्रय दिला नसावा. तो राजधानीकडे निघाला.

तेव्हा वल्लभ त्याला म्हणाला - ''राजधानीत वेदाचार्य नावाचे एक महान् कवि आहेत. तू त्यांना भेटलास तर ते तुला मदत करतील.''

भास्कर राजधानीत ...चला. तेथे वेदाचार्यांबाबत चौकशी करता समजले की गावाबाहेर एका आश्रमात ते रोग्यांची सेवा करीत असतात. त्याला मोठे आश्चर्य वाटले. त्याच्या दृष्टीने एका कवीला रोग्यांची सेवा करण्याची काय आवश्यकता ? तरी पण त्याने आश्रम शोधून काढला नि तो वेदाचार्यांना भेटला.

भास्कर विषयी सर्व माहिती मिळाल्यावर वेदाचार्य त्याला म्हणाले - ''बेटा, राजाश्रय मिळाला की कवीला थोड्याच काळात प्रसिद्धि मिळते. पण राजाची सेवा म्हणजे एक प्रकारचा नरकवास असतो. हे सत्य जाणूनच विद्याधर गुरुजी जंगलात रहायला गेले. वल्लभ रत्नाकरचा जावई बनला. मी इथे रोग्यांची सेवा-सुश्रूषा करीत बसलोय. बरं, ते सगळं जाऊ दे. तुझं काव्य तर जरा बघू दे.''

भास्करने वेदाचार्यांना आपले काव्य दाखवले. थोडेसे काव्य वाचून वेदाचार्य म्हणाले - ''आता मला थोडा ही संशय राहिला नाही. आपल्या आश्रयाला आलेल्या कवींकडून राजा काय करून घेतो याचे उत्तम उदाहरण म्हणजे ही तुझी कविता बघ. तू तर आता पासून ते काम सुरू केलं आहेस. तुला राजाश्रय अवश्य प्राप्त होईल.''

वेदाचार्यांच्या बोलण्याचा भास्करला खूप राग आला. त्याने विचारले - ''मी काय बरे चूक केली माझ्या काव्यात?''

वेदाचार्य नि:संकोचपणे म्हणाले - ''आपल्या काव्यात तू राजा चन्द्रभानूची वारेमाप स्तुति केली आहेस. ते या प्रशंसेला मुळिच योग्य नाहीत. आपली योग्यता नसताना राजे कवींकडून आपली प्रशंसा करून घेतात, आपल्या अयोग्यतेवर पांघरूण घालतात. ही त्यांची कार्यपद्धति मला मुळिच आवडत नाही. अशी खोटी स्तुति करणारा आणि करवणारा दोघे ही माझ्या दृष्टीने नीच आहेत.''

आता भास्करचे डोळे उघडले. तो दोन दिवस राजधानीत राहिला. तेथील ग्रंथालयात विद्याधर, वल्लभ आणि वेदाचार्य यांच्या सारख्या कवींच्या काव्याचे त्याने अध्ययन केले.

यानंतर राजाला न भेटताच तो आपल्या गावी परत आला. शांतपणे जीवन घालवीत त्याने नवनवीत काव्याची रचना केली. राजाकडून आपला सन्मान व्हावा असा त्याने कधी प्रयत्नच केला नाही.





# शंकरचे वैराग्य

शंकरला गृहस्थ-जीवन नकोसे वाटू लागले. वृद्ध आई आणि बायको यांना सोडून तो देशभर संचार करायला निघाला. हिंडत हिंडत तो सकलपुर नावाच्या एका गावी पोचला. येथील वातावरणाने शंकरला भुरळ पाडली. गावाबाहेर विद्यानंदस्वामींचा आश्रम आहे असे त्याला समजले. स्वामीजींच्या दर्शनासाठी शंकर आश्रमात गेला.

त्याला पाहून विद्यानंदस्वामींनी मोठ्या प्रेमाने विचारले - ''बेटा, इकडे कसा आलास ? काय हवंय तुला ?''

''आपला शिष्य म्हणून माझा स्वीकार कराल स्वामीजी? आपली सेवा करीत इथंच राहीन मी.'' शंकरने निवेदन केले.

स्वामीजींनी शंकरकडे आपादमस्तक पाहिले आणि म्हणाले - ''विद्यार्जन करण्यासाठी जे ब्रह्मचारी इथे येतात, त्यांना मी आपले शिष्य बनवतो. पण तू ब्रह्मचारी वाटत नाहीस. तू विद्यार्जनासाठी आला आहेस असे दिसत नाही.''

नम्रतापूर्वक शंकर म्हणाला - ''स्वामीजी, आपण तर सर्वज्ञ आहात. आपणापासून मी काही लपवू इच्छित नाही. मी ब्रह्मचारी नाही हे आपले अनुमान बरोबर आहे. मला बायको आहे, तीन मुले आहेत, घरात म्हातारी आई आहे. माझी बायको मोठी कजाग आणि भांडखोर आहे. माझ्या आईशी सतत भांडत असते. दोघी जणी कधी शांतपणे बसत नाहीत. सासू नि सून यांच्या भांडणात मला जीव नकोसा झाला. माझी परिस्थिति मोठी केविलवाणी झाली. दोघींच्या पैकी कुणालाच मी म्हणू शकत नाही - 'चूक तुझी आहे !' कधी चुकून मी असं म्हणालो तर माझी धडगत नाही मग. घरात राहणं मला मुश्किल झालं. माझी मन:शांति नष्ट होऊन गेली. म्हणून कुटुंबाच्या बंधनातून मुक्त होऊन शांतीच्या शोधात मी आपणाकडे आलो आहे. कृपा करून आपण मला आपला शिष्य बनवा. मानसिक शांति मिळवण्याचा उपाय मला सांगा.''

विद्यानंदांनी शंकरला स्पष्ट सांगितले की या आश्रमात गृहस्थांना स्थान नाही. तरी पण शंकर हट्ट धरून बसला, हाता पाया पडला नि गयावया करू लागला. तेव्हा स्वामीजी म्हणाले - ''काही दिवस इथं रहायची परवानगी मी तुला देतो. मग गंभीरपणे विचार करून आपला निर्णय मी तुला सांगेन.''

एक आठवड्यातच शंकरला आश्रमीय जीवनाचा कंटाळा आला. आश्रमातील कठोर नियमांचे पालन करणे आपल्याला शक्य नाही असे त्याला वाटू लागले. आश्रमातील सात्त्विक आहार त्याला आवडेनासा झाला. त्याला वाटलं यापेक्षा भ्रमंति चांगली.

एक दिवशी रात्री शंकर अंगणात झोपला होता. स्वामीजींनी त्याला उठवलं. घाबरत शंकरने प्रश्न केला - ''काय झालं स्वामीजी, मला कशासाठी आपण उठवलं?''

''तसं काही विशेष नाही शंकर ! मला जप करण्याची इच्छा झाली. खूप शोधली, पण जपमाला सापडत नाही बघ. ऊठ, आणि ती शोधायला मला मदत कर पाहू.'' असे म्हणत स्वामीजी त्याला आश्रमाच्या बाहेर घेऊन गेले.

शंकरने विचारले - ''स्वामीजी, झोपण्यापूर्वी आपण जपमाला कुठे ठेवली हे आठवतंय का आपल्याला?''



**कीर्तिकारेकर**

“खोलीच्या कोपऱ्यातील पाटावर ठेवली असावी असं वाटतंय. आत तर सर्वत्र अंधारी अंधार आहे, पण बाहेर कसं पिठासारखं चांदणं पसरलंय!” स्वामीजी म्हणाले.

शंकरला हंसू आले. पण वरवर ते न दाखवता तो म्हणला - “स्वामीजी, जिथे वस्तु हरवली तिथेच ती शोधायला नको का ? बाहेर शोधून ती कशी सापडेल ?”

त्याच्या प्रश्नावर विद्यानंद स्वामी अमळ हंसले आणि म्हणाले - “तू योग्यच म्हणालास. पण तू सुद्धा तेच करत आहेस. कुटुंबात जी सुख-शांति गमावलीस, ती देशभर भटकून शोधीत बसला आहेस. घर सोडून इतक्या दूर पर्यंत आलास ! तुझ्याच प्रमाणे मला वाटलं खोलीत ठेवलेली वस्तु, शोधली तर बाहेर ही सापडेल कदाचित् !”

स्वामीजींच्या या बोलण्यामागील गूढार्थ आता शंकरच्या लक्षात आला. स्वामीजींच्या पायांवर डोके ठेवून तो म्हणाला - “आपण माझे डोळे उघडलेत. मी आता आपल्या कुटुंबाबरोबर राहीन आणि जे आहे त्यात संतुष्ट राहण्याचा प्रयत्न करीन.”

शंकरला आशीर्वाद देऊन विद्यानंद स्वामी म्हणाले - “अरे, एवढी घाई कशाला करतोस ? रात्री इथे आरामात झोप. सकाळी आपल्या बायकोला बरोबर घेऊन घरी जा.”

स्वामीजींच्या या बोलण्याचे शंकरला मोठे आश्चर्य वाटले. आपली बायको आश्रमात आलेली आहे हे त्याला माहीतच नव्हतं. खरी गोष्ट अशी होती - आपला नवरा विद्यानंदांच्या आश्रमात आहे हे बायकोला समजलं, ती रात्री आश्रमात आली. ती स्वामीजींच्या पाया पडली आणि तिने शपथ घेतली की इथून पुढे ती कधी ही सासूशी भांडणार नाही. ती स्वामीजींना म्हणाली - “आता मी सासूशी प्रेमाने वागेन. शंकरला दुःख होणार नाही असा प्रयत्न करीन. आपण शंकरला उपदेश करा नि त्याला माझ्या बरोबर घरी पाठवा.”

सकाळ उजडताच नवरा-बायकोने स्वामीजींची अनुमति घेतली आणि आपल्या गावाकडे जायला निघाले.





# महाभारत

**फि**रत फिरत एकचक्रनगरीत आलेला ब्राह्मण आपली भ्रमण-गाथा सांगत होता, व आपल्या आश्रयदात्या ब्राह्मणकुटुंबासह पांडव ते वर्णन लक्षपूर्वक ऐकत होते. पांचाल देश व राजा द्रुपद यांच्याबद्दल बोलता बोलता ब्राह्मण सांगत होता.

“संतानप्राप्तीच्या इच्छेने द्रुपदाने कित्येक आश्रमात जाऊन अनेक ऋषिमुनींची सेवा केली. आपल्याला एक पुत्र व एक कन्या असावी अशी त्याची तीव्र इच्छा होती. पुत्राच्या हस्ते द्रोण-वध करायची त्याची आकांक्षा होती आणि कन्या अर्जुनाची पत्नी व्हावी, अशी आशा घेऊन तो सर्वत्र संचार करत राहिला; निरनिराळ्या ऋषि-मुनींना भेटत राहिला. फिरता फिरता गंगाकिनारीच्या एका आश्रमात तो पोचला. तेथे याज व उपयाज या नावांचे दोन भाऊ वेदपारायण व सूर्योपासना करत असत. ते काश्यप गोत्रीय होते. द्रुपदाला वाटले की त्यातला उपयाज हा अधिक तपोबलसंपन्न आहे, त्यामुळे तो त्याच्याजवळ राहून खूप श्रद्धा व भक्तीने त्याची सेवा करू लागला.

एके दिवशी एकान्तात उपयाजचे पाय दाबत असताना द्रुपद त्याला म्हणाला, “मुनिवर, द्रोणाने माझा घोर अपमान केलाय. आपण प्रिय शिष्य अर्जुन याच्याकरवी युद्धात माझा पराभव करवून त्याने मला बांधून स्वतःसमोर आणवले. नंतर त्याने स्वतःच्या पसंतीने माझ्या राज्याचे दोन भाग करून, मोठा उदारपणा दाखवत त्यातला एक भाग मला परत दिला. तेंव्हापासून मी अपमानाने आतल्या आत जळतोय, पण

**द्रुपदाची अपत्ये**



ठाशीवपणे अुपयाज हे बोलला होता.

द्रुपद या बोलण्याने जराही निराश झाला नाही. अुलट तो जास्त श्रद्धापूर्वक अुपयाजच्या सेवेला लागला. एके दिवशी तो द्रुपदाला म्हणाला, ''राजा, तू मोठ्या श्रद्धेनं माझी सेवा करतो आहेस. पण तुझी इच्छा मुळातच अनुचित आहे. ती मी कोणत्याही स्थितीत पूर्ण करणार नाही. तरीही मी तुला एक अुपाय सांगतो. तू माझा ज्येष्ठ बंधू याज याच्या आश्रयाला जा. आपल्या सेवेन तू त्याला संतुष्ट कर. त्याला गायी वगैरे देण्याची लालूच दाखव; तुझी इच्छा पुरी होण्याची शक्यता आहे. तो पहिल्या पासूनच लोभी आहे. एकदा त्यानं घाणीत पडलेलं फळ अुचलून खाल्लं. आम्ही दोघं गुरुकुलात विद्याभ्यास करत असतानाही तो शुद्धता अन् स्वच्छता पाळत नसे; जिभेला रुचकर लागेल ते खात असे, मग ते कुठे ही मिळालेलं असो. यावरून स्पष्टच दिसतं, की तो ऐहिक सुखांना प्राधान्य देतो.''

अुपयाजने सुचवल्याप्रमाणे द्रुपद याजच्या आश्रमात गेला. त्याला सविनय प्रणाम करून ऐंशी हजार गायीं अर्पण केल्या आणि नन्तर आपली इच्छा प्रकट केली.

याजने द्रुपदाची इच्छा पूर्ण करण्याचे कबूल केले. अुपयाजला त्याने आपला सहायक बनवला अन् आवश्यक सामग्री गोळा करून पुत्रकामेष्टी यज्ञ सुरू केला. होमानन्तर आहुती आपल्या हाती घेअून याजने द्रुपदपत्नी कोकिलादेवी हिला बोलावून घेतले. तो तिला म्हणाला, ''राणी, ही आहुती दे. यामुळे तुझ्या पोटी एक पुत्र व एक कन्या जन्म घेईल.''

कोकिलादेवी म्हणाली, ''मुनिवर, मी आता शुद्ध नाहीय. थोडा वेळ थांबा. मी स्नान करून येअून आहुती स्वीकारते.''

''कठोर दीक्षा घेअून मी जी आहुती प्राप्त केली, तिच्या योगाने तुझी इच्छा पूर्ण होणार नाही, अशी शंका तुझ्या मनात आलीच कशी ? तुला हवी तर घे, नाही तर दे सोडून.'' असे रागाने म्हणून त्याने ती आहुती अग्नीत फेकून दिली.

तत्क्षण त्या अग्निकुंडातून एक रथारूढ तरुण वीर बाहेर आला. त्याच्या एका हातात चमकती तलवार व दुसऱ्यात धनुष्य असून डोक्यावर हिरेजडित मुकुटही होता. सिंहनाद करत तो तेथून निघून गेला. त्या अग्निकुंडातून यानन्तर एक पुत्र व एक कन्या असा अपत्यलाभ झाला. सारी पांचाल-जनता यामुळे आनन्दित झाली.

इतक्यात कोकिलादेवी सुस्नात होअून तेथे येअून पोचली. ''अग्निकुंडातून अुत्पन्न झालेल्या या दोन्ही अपत्यांची आपण माता बनावे.'' असा वर तिने याज व अुपयाज यांच्या कडून मिळवला.

ब्राह्मणांनी द्रुपदपुत्राचे नाव धृष्टद्युम्न असे ठेवले. कन्या रंगाने सावळी असल्याने तिचे नाव ठेवले कृष्णा. द्रुपदाने नंतर याजला असंख्य गायी व ब्राह्मणांना विपुल धन दान दिले. आपली ध्येयसिद्धी करून तो कांपिल्य नगरात परत आला.

काही दिवसांनी द्रुपदाने धृष्टद्युम्नाला

माझ्यात किंवा अन्य कोणत्याही राजात त्याचा वध करण्याची शक्ती नाहीय. तेंव्हा एकाद्या यज्ञाद्वारे असा एक पुत्र अुत्पन्न करून द्या, की जो या द्रोणाला मारण्या इतका बलसंपन्न असेल. त्यासाठी मी तुम्हाला असंख्य पशुधन अन् अगणित अुपहार देईन. तुम्ही मागाल ते द्यायची माझी तयारी आहे. माझ्यावर इतकी कृपा कराच. माझा जन्म सार्थक होईल. आपलं ध्येय पूर्ण करून मी कृतकृत्य होईन.''

आपले मस्तक नकारात्मक हलवत अुपयाज म्हणाला, ''या कामात मी तुला मदत करू शकणार नाही. असल्या कामात मी कोणालाच सहाय्य देणार नाही.'' या विषयावर द्रुपदाने अधिक काहीच बोलू नये, असे सुचवण्याइतके





द्रोणाकडे धनुर्विद्या शिकण्यासाठी पाठवले. आपली कोणत्याही प्रकारे बदनामी होऊ नये म्हणून द्रोणानेही त्याचा शिष्य म्हणून स्वीकार केला. गुरु द्रोणांनी या तरुणाला संपूर्ण धनुर्विद्या शिकवली.

द्रुपद्राची कन्याही आता विवाहयोग्य झाली होती. प्रथम पासूनच द्रौपदीचा विवाह अर्जुनाशी व्हावा अशी द्रुपदाची इच्छा होती. परन्तु पांडव लाक्षागृहात जळून गेल्याची बातमी कळल्यावर तो फार निराश झाला. आता काय करावे याबद्दल त्याने आपल्या मन्त्र्यांचा सल्ला मागितला.

तेव्हा द्रुपदाचा शुभचिंतक एक पुरोहित म्हणाला, ''महाराज, मला तर असं वाटतंय की पांडव मेले नाहीत. अनेक शुभशकुनांवरून असं वाटतं की ते जिवन्तच आहेत, अन् सुखात आहेत. त्यांच्या बाबत आपण निश्चिन्त असावं. आपण आपल्या कन्येच्या स्वयंवराची घोषणा करावी. माझी खात्री आहे की त्यावेळी पांडव नक्की इथे येतील. तसं तर एकाद्या राजकन्येचं स्वयंवर मांडणं, हे परंपरेला धरूनच आहे.''

स्वयंवरासाठी तीन महिन्यांनंतरचा मुहूर्त निश्चित केला गेला. त्यासाठी एक असे धनुष्य मुद्दाम बनवण्यात आले, की ज्याला प्रत्यंचा लावणेच कुणालाही अशक्य असावे. मोकळ्यावर एका जागी चक्राकार फिरणारे सुवर्णाचे मत्स्ययन्त्र लटकावण्यात आले.

एकचक्रापुरातल्या ब्राह्मणाला व पांडवांना वरीलप्रमाणे सर्व विवरण देत अतिथि ब्राह्मण म्हणाला, ''अनेक राज्यांचे राजे व राजकुमार या स्वयंवरासाठी कांपिल्य नगरीकडे रवाना झाले आहेत.''

आपले गुरु द्रोणाचार्य यांचा वध करणारा कोणी युवक जन्माला आलेला आहे, हे कळल्यावर पांडवांना फार वाईट वाटले. पण 'जे व्हायचे असेल ते होईल' असा विचार करून ते शान्त राहिले. त्यांना ही द्रौपदी-स्वयंवराला जावेसे वाटू लागले.

त्यांची इच्छा कुन्तीने ओळखली व ती धर्मराजाला म्हणाली, ''पुत्रा, आपण फार दिवस या एकचक्रापुरात रहात आहोत. इथेच आणखी काही दिवस राह्यलो, तर कदाचित् आपल्याला इथे भिक्षा मिळणं बन्द होईल. मला वाटतं, की आता आपण पांचाल राज्यात जावं. तो मोठा सुसंपन्न देश असून, असे म्हणतात की राजधानी कांपिल्य ही मोठी सुन्दर नगरी आहे. राजा द्रुपदाची ब्राह्मणांवर मोठी कृपादृष्टी असते, असंही ऐकिवात आहे.''

धर्मराजाने आपल्या बंधूंशी सल्लामसलत केली अन् मातेच्या प्रस्तावाला मान्यता देत त्यांनी आपला हर्ष प्रकट केला. घरमालक ब्राह्मणाचा निरोप घेऊन ते तेथून बाहेर पडले.

रात्रंदिवस प्रवास करत एके दिवशी मध्यरात्री ते गंगातटाकी पोचले. तेथे असलेल्या सोमश्रव नावाच्या तीर्थस्थानावर ते गेले. अंधार दाटलेला होता, अर्जुन हाती पेटती मशाल घेऊन पुढे चालू लागला. नदीच्या पात्रात स्नान करून आपला थकवा घालवायचा त्यांचा मानस होता. ते पात्राकडे चालू लागले. त्याच वेळी अंगारपर्ण नामक एक गंधर्व आपल्या पत्नी-परिवारासह जलक्रीडेसाठी तेथे आलेला होता. माणसांची चाहूल लागून तो पाण्याबाहेर येऊन ओरडला, ''कोण आहात तुम्ही ? इथून दूर निघून जा कसे ! इथलं आसपासचं सारं वन माझ्या मालकीचं आहे. मी अंगारपर्ण नावाचा गंधर्व असून ही यक्ष आणि गंधर्वांची संचारवेला आहे. मानवांच्या संचार यावेळी निषिद्ध आहे.''

त्याच्या बोलण्याने नाराज होत अर्जुन म्हणाला, ''अरे दुष्टा, हिमालय आणि गंगा नदी ही काही कोणाची पैतृक संपत्ति नव्हे ! या दोन्ही वस्तु सर्वांच्याच आहेत. मध्यरात्र असो वा भोजनोपरांत समय असो, गंगा नदी दिसली की त्यात लगेच स्नान करणं अत्यावश्यक असतं,



ते एक पुण्यकर्म आहे. तेव्हा आता स्नान न करता परत फिरण्याचा प्रश्नच नाही.''

अंगारपर्ण फारच रागावला आणि बाणांचा वर्षाव करू लागला. ते बाण हातच्या मशालीने अडवत अर्जुन म्हणाला, ''अरे गंधर्वा, आपल्या या कुचकामी बाणांनी आम्हाला धमकावायला, तू आम्हाला समजलायस कोण? तुझे मन्त्र तन्त्र आमचं काहीही वाकडं करू शकणार नाहीत.'' अन् असे बोलत असतानाच त्याने अग्नेयास्त्राचा प्रयोग केला. त्याबरोबर गंधर्वाचा रथ पूर्णत: जळून भस्मसात् झाला. गंधर्व खाली पडून मूर्च्छित झाला.

अशा परिस्थितीत गंधर्व पत्नी कुंभीवसी धर्मराजाकडे जाऊन पतिप्राणांची भिक्षा मागू लागली.

धर्मराज अर्जुनाला म्हणाला, ''ही आपल्याला शरण आलेली आहे. तिच्या पतीला मारणं हा अधर्म होईल. तू गंधर्वाला सोडून देणंच योग्य!''

ज्येष्ठ बंधूचे बोलणे मानून अर्जुनाने गंधर्वाला सोडून दिले. तेव्हां गंधर्व अर्जुनाला म्हणाला, ''मी तुझ्या हातून पराजित झालो आहे. इथून पुढे माझं नाव अंगारपर्ण रहाणार नाही. तू जाळलेल्या रथाच्या जागी एक नवा रथ निर्माण करून मी चित्ररथ असे नाव धारण करीन. तू महान वीर आहेस. मी तुला प्रसाद म्हणून चाक्षुषी नावाची विद्या देतो. तिच्या साह्याने तीन्ही लोकात चाललेल्या घटना तू



पाहू शकशील आमच्या जवळ ही विद्या असल्यामुळे प्रत्यक्ष देव ही आमचं काहीही नुकसान करू शकत नाहीत. चाक्षुषी विद्येबरोबरच मी तुला काही दिव्य अश्व प्रदान करीन अन् तुझ्या बंधूंनाही प्रत्येकी शंभर शंभर अश्व देईन.''

अर्जुन त्याला म्हणाला, ''मी तर अगदी जवळच्या मित्राकडूनही कधी कशाचा स्वीकार करत नाही.''

यावर गंधर्व म्हणाला, ''ठीक आहे; तर तू आपली एकादी वस्तु मला देऊन बदल्यात याचा स्वीकार कर.''

गंधर्वाला अग्नेयास्त्र देऊन अर्जुनाने त्याच्या भेटींचा स्वीकार केला.

गंधर्व अर्जुनाला म्हणाला, ''तू क्षत्रिय आहेस. तेंव्हा एकाद्या योग्य अशा पुरोहिताची निवड कर. त्याच्या सल्ल्याप्रमाणे चालण्यानेच तुझे कल्याण होईल. तसं न केलंस, तर तुझं शुभ होणार नाही.''

अग्नेयास्त्राचा प्रयोग समंत्र समजावून देऊन अर्जुन गंधर्वाला म्हणाला, ''आपले हे अश्व तात्पुरते स्वत:जवळच ठेव. आवश्यकता पडेल, तेंव्हा ते मी मागवून घेईन.'' आणि त्याचा निरोप घेऊन कुन्तीसह पांडव पुन: आपल्या प्रवासाला निघाले.

गंगातटावरून निघून पांडव अुत्कोच तीर्थावर पोचले. धौम्य ऋषी इथेच तपस्या करत होते. पांडवांनी त्यांना सविनय प्रणाम केला. त्यांनी मुनींना आपले पुरोहित बनण्याबद्दल प्रार्थना केली. पांडवांची वीरता, साहस, अुत्साह व प्रज्ञा हे गुण आपल्या दिव्य दृष्टीने जाणून ते आपल्या पौरोहित्याला योग्य असल्याचे त्यांनी ओळखले. अतिथि सत्कार करून धौम्य ऋषींनी पांडवांचे पुरोहित बनायला आपली सहर्ष स्वीकृती दिली. त्यांची स्वीकृती मिळताच पांडवांना असे वाटले की, आपण आता संपूर्ण भूमंडळाचे राजेच बनलो आहोत ! त्यांना अत्यानन्द झाला.

त्याच वेळी द्रौपदी स्वयंवरासाठी निघालेले काही लोक धौम्य ऋषींच्या आश्रमात आले. ते भेटताच पांडवांनीही आपली माता व पुरोहित धौम्य त्यांच्याबरोबर जाण्याची इच्छा प्रकट केली. ब्राह्मणवेषातल्या पांडवांना पाहून एका ब्राह्मणाने त्यांना ते कोण व कोठून आले असल्याबद्दल विचारले.

''आम्ही एकचक्रापुरीहून कांपिल्य नगरा कडे जात आहोत.'' धर्मराज अुत्तरला.

''आम्हीही तिकडेच निघालो आहोत. तिथे द्रुपदपुत्री द्रौपदीचं स्वयंवर होणार आहे. ती अद्भुत सुंदर आहे असं ऐकलंय. बरेच राजे आपलं भाग्य आजमावायला अुत्सुक आहेत. जे ब्राह्मण तिथे हजेरी लावतील त्यांना राजा गोदान, सुवर्णदान देणार आहे. आम्हीही जात आहोत तिकडे.'' ब्राह्मण म्हणाले.

सर्व मिळून दक्षिण पांचाल मध्ये असलेल्या कांपिल्यनगरीकडे निघाले.



**'चान्दोबा' पुरवणी - ८०**

**आपल्या देशाची वृक्षसंपदा**

## क्षीर चाफा

**आ**पण इकडे तिकडे जात असताना काही विशेष लक्ष न देता ही आपल्या रंगीबेरंगी फुलांनी काही झाडे आपले लक्ष वेधून घेतात. अशातीलच एक झाड म्हणजे खैर चाफा. ही झाडे अधिकतर मंदिरांतून आढळतात; म्हणून यांना मंदिरवृक्ष ही म्हणतात. हिन्दू ही फुले पूजेसाठी वापरतात. ही झाडे सर्वत्र वाढतात, आढळतात, म्हणून बौद्ध लोक याला अमर मानतात. ते अविनाशाचे चिन्ह समजतात, ही झाडे स्मशानातही लावली जातात.

ही झाडे फारशी अुंच वाढत नाहीत, यांच्या फांद्या जमिनीकडे झुकलेल्या असून मुख्य खोडही वाकडेच असते. झाडाचे पान किंवा फांदीला छोटीशी चीर पाडली तर लगेच त्यातून दाट, दुधासारखा चीक बाहेर येतो. या झाड़ाला वृक्षशास्त्रात वनस्पतीशास्त्रात 'फ्रोंगी पानी' म्हणतात. याचे असे नाव का पडले याबद्दल निरनिराळ्या गोष्टी सांगितल्या जातात. या झाडातून दूध निघत रहात असल्यामुळे फ्रेंच लोकांनी झाडाला हे नाव दिले असे म्हणतात. असे ही म्हणतात की इटलीतील एका माणसाने या फुलाच्या सुवासापासून सुगंधी तेल बनवले, म्हणून त्याच माणसाचे नाव या झाडाला देण्यात आले. हिन्दीत याला 'दाम्ली' किंवा 'गुलचिन', असामीमधे 'गोलंबी', तमिळमधे 'कळ्ळिमंदारै', कानडीत 'काडुसंपंग', अुरिया भाषेत 'गोलुची', बंगालीत 'गोरूर चंपा', तेलगूत 'पालसंपेंग' व संस्कृतमधे याला 'क्षीर चंपा' असे म्हणतात.

याची पाने रुंद असून दोन्ही टोकांना निमुळती व टोकदार असतात, झाडांना फुले येतात तेव्हा ती फार शोभिवन्त दिसतात.

या झाडाची पाने, फुले व फांद्यांमधून निघणाऱ्या चिकाचा निरनिराळ्या औषधांसाठी व तेलांसाठी वापर केला जातो. याच्या सालीमुळे काही त्वचारोग बरे होतात.

शोभेसाठीही ही झाडे लावली जातात.



### आपल्या देशातील ऋषि-मुनि - ४

# अुद्दालक



वेदमंत्र आपल्या शिष्यांना सुयोग्य स्पष्टीकरणांसह शिकवणाऱ्या ऋषिपुंगवांमधे प्रमुख होते अुद्दालक मुनी. अरुणाचे पुत्र असल्यामुळे त्यांना अरुणी असेही म्हणत.

अरुणीला बाल्यावस्थेतच विद्येची गोडी होती, गुरुजनांबद्दल मनात श्रद्धा-भक्ती होती. विद्याभ्यासासाठी ते धौम्य ऋषींच्या आश्रमात जाअून राहिले, त्यांचे शिष्य बनले. आश्रमाजवळ एक तलाव असून एक शेत ही होते. धौम्यांजवळ राहून ते अुत्तम शिष्यांपैकी एक गणले गेले. गुरूची सेवा त्यांनी खूप श्रद्धेने केली. सदासर्वदा ते वेदवेदांगे संपूर्ण रूपात शिकावी, जाणावी या प्रयत्नात असत.

एक दिवशी रात्री जोराचा पाअूस पडत होता. तलावाजवळच आश्रमाचे शेत असून त्यात हिरवेगार पीक डोलत होते. पावसाने गंभीर रूप धारण केले, तर तलावाचा बांध फुटून शेतातल्या अुभ्या पिकाची नासाडी होईल या भयाने धौम्य गुरुजी काळजीत होते. अरुणी त्यांना म्हणाला, "गुरुजी, मला जाअू द्या ना तिथे ! मी तिथे जाअून जरूर ती सोय करीन अन् शेत वाचवीन."

पाअूस जरा कमी होत होता, म्हणून गुरुजींनी अरुणीला शेताकडे जायला परवानगी दिली.

अरुणी शेतात पोचला. तलावाच्या बांधाला भेग पडलेली त्याला दिसली. त्यातून थोडे थोडे पाणी शेतात झिरपत होते. भेग लक्षपूर्वक पाहून त्याने ती चिखलाने लिंपून बंद करायचा प्रयत्न केला. परंतु सतत बाहेर येत रहाणाऱ्या पाण्यामुळे तेथे माती टिकेना. हळूहळू त्यातून जास्तजास्त पाणी बाहेर येअू लागले. अरुणीच्या लक्षात आले की परिस्थिती जास्तच गंभीर व कठीण होअू लागली आहे. तो स्वतः ताबडतोब त्या भेगेवरील भागावर आडवा पडला. त्याच्या शरीराच्या दाबामुळे बांधातून पाणी येणे बंद झाले. परंतु नंतर हवेतील गारवा वाढला आणि पाअूसही अधिक जोराने पडू लागला. तरीही अरुणी जागच्या जागी, अजिबात हालचाल न करता पडून राहिला. थोड्याच वेळात तो बेशुद्ध झाला.

इकडे अरुणीला परतायला अुशीर झाल्याने धौम्य ऋषी काळजीत पडले. मोठ्या आतुरतेने ते आपल्या इतर शिष्यांना बरोबर घेअून शेताकडे निघाले.

पहाट होता होता ते बांधाजवळ पोचले. भेगेच्या वरील भागावर बेशुद्धावस्थेत असलेला अरुणी त्यांना दिसला. अन् ते आश्चर्यचकित झाले. बाकी शिष्य ती भेग बुजवायच्या कामाला लागले अन् धौम्य अरुणीला आपल्या हातात उचलून आश्रमात घेऊन आले. त्याला त्यांनी अग्नीच्या जवळ ठेवले. थोड्या वेळाने त्या अुष्णतेमुळे अरुणी शुद्धीवर आला.

मोठ्या प्रेमाने गुरुजी त्याला म्हणाले, "अरुणी, आज तुझा विद्याभ्यास पूर्ण झाल्याचं तू सिद्ध केलं आहेस."

अरुणी वेदवेदांगांचा प्रकांड पंडित असूनही वेळ पडल्यास शारीरिक श्रम करायलाही कचरत नसत. इतरांच्या कल्याणासाठी त्यांनी देहत्यागाचीही तयारी दाखवली. पण त्यांना याबद्दल जराही गर्व न वाटता, अुलट ती आपली जबाबदारीच वाटली. आपल्या शिष्याच्या कर्तव्य परायणतेबद्दल गुरुजींना धन्यता वाटली.

पुढे अरुणी अुद्दालक नावाने प्रसिद्ध झाले व ते सर्वश्रेष्ठ गुरु बनले. शिष्यांच्या प्रेमादराचा विषय बनले. त्याचा कीर्तिध्वज फडकत राहिला.



# तुम्हाला माहीत आहे काय?

१. खजुराहो मंदिर आपल्या देशाच्या कोणत्या भागात आहे?
२. पाणबुडीचा शोध प्रथम कोणी लावला?
३. मलई व दूध यात जास्त वजनदार काय?
४. शिखांच्या पवित्र ग्रन्थाचे नाव काय?
५. नोबेल पारितोषिक मिळवणाऱ्या व्यक्तींमधे सर्वात कमी वयाचे कोण?
६. 'सॉल्ट लेक' नावाने ओळखला जाणारा स्टेडियम कोठे आहे?
७. पिसाळलेला कुत्रा चावल्यावर इलाजासाठी लागणारी लस कोणी शोधली?
८. मार्जार कुटुंबातील पशूंना आपली नखे लपवण्याची सोय अुपलब्ध असते. पण त्यातील केवळ एकाच प्राण्याला ती अुपलब्ध नाही. तो प्राणी कोण?
९. कॅलेण्डर पध्दत प्रथम कोणत्या देशात सुरू झाली?
१०. आपल्या देशातील कोणत्या प्रान्तात दर वर्षी 'नावांच्या स्पर्धा' होतात ?
११. एका नगराची निर्मिती १३ बेटांवर झालेली आहे, ते नगर कोणते ?
१२. पहिल्या पेशव्याचे नाव काय ?
१३. रोम नगर कोणत्या नदीतीरावर वसले आहे ?
१४. पहिल्या अंतरिक्षयानाचे नाव काय ? त्याचा प्रयोग केंव्हा केला गेला ?
१५. दहा वर्षांपूर्वी बुद्धिबळातील विश्वविजेता कोण होता?
१६. वटवाघूळ किती वेगाने अुडू शकते?
१७. 'थायलंड' चे प्राचीन नाव काय?
१८. मादी 'ब्लॅकबर्ड'चा रंग निराळा असतो तो कोणता?
१९. हवेसाठी पृष्ठभागावर न येता देवमासा पाण्याच्या आत किती वेळ राहू शकतो ?
२०. 'चीन' ची करन्सी कोणती ?

## अुत्तरे

१. मध्यप्रदेश.
२. कर्नेलिअस व्हॅन ड्रेबेल.
३. दूध.
४. आदिग्रंथ, ग्रंथ साहेब.
५. विल्यम लॉरेन्स ब्रॅग.
६. कलकत्ता.
७. लुई पाश्चर.
८. चित्ता.
९. इजिप्त.
१०. केरळ, अलेप्पी जवळ.
११. स्टॉकहोम.
१२. बाळाजी विश्वनाथ भट (१७१३ ते १८२०).
१३. टायबर नदी.
१४. स्पुटनिक, १९५७ मधे.
१५. ॲन्टनी कार्पोव्ह.
१६. ताशी ६० कि.मी.
१७. सयाम.
१८. गव्हाळ रंग.
१९. वीस मिनिटे.
२०. युआन.



# सभ्य माणसांचा विनोद

गर्भश्रीमन्त प्रफुल्ल वक्रबुद्धीचा अन् विचित्र मनाचा होता. सुखी-समाधानी माणसांना विनाकारण त्रास देऊन त्यांना दु:खी करण्यात त्याला आनन्द वाटे. त्याच्या या वाईट सवयीमुळे त्याची बायको अुर्मिला नेहमीच दु:खी-कष्टी असे.

अुर्मिलाचा भाअू भूषण याला ही हकीकत समजली आणि त्याने आपल्या मेहुण्याला वठणीवर आणायचे ठरवले. नंतर एक दिवस तो प्रफुल्लच्या घरी आला. प्रफुल्लने त्याचे स्वागत केले आणि नंतर आपण कोणाकोणाला अन् कसकसे सतावले याबद्दलच्या गोष्टी सांगितल्या. त्या सांगताना तो स्वत: जोरजोरात हसतही होता.

भूषण त्याला म्हणाला, "तुम्ही जे काही मला सांगत होता, ते ऐकून मला हसू तर मुळीच आलं नाही; अुलट दु:खच वाटलं! तुम्हाला इतकं कशाचं हसू येत कळत नाहीय मला !"

"विनोद करणे ही एक कला आहे. प्रत्येकालाच नाही जमत ते ! तू अुद्या आमच्या बैठकीत ये, अन् बघ. मी तुला आता सांगितलेल्या सगळ्या गोष्टी ऐकून ते कसे पोट धरधरून हसतील ते पहाच." प्रफुल्ल म्हणाला.

दुसऱ्या दिवशी खरोखरच बैठकीतले लोक प्रफुल्लच्या बोलण्यावर हसत राहिले.

घरी आल्यावर भूषणने अुर्मिलेला कारण विचारले. ती म्हणाली, "हसतील नाहीतर काय करतील? न हसतील त्यांना चाबकाचा मार खावा लागेल."

"आँ? तुझा नवरा काय कोणी राजा लागून गेलाय की काय? चाबकानं मारलं तर सभासद गप्प रहातील होय?" आश्चर्य प्रकट करत भूषणने विचारले.

"गरीब आहेत ते बिचारे ! शिव्या खाण्यासाठी, काहीही सहन करण्यासाठी तुझे

शीला भागवत



मेहुणे त्यांना पैसे देतात. म्हणूनच ते जे काही सांगतील ते त्यांना ऐकावंच लागतं. त्यांना हे मान्य असेल, त्यांनाच फक्त बैठकीत प्रवेश मिळतो. पैसा बोलतोय बरं !''

प्रफुल्लला एकान्तात गाठून भूषण म्हणाला, ''विनोद काय असतो, हेच बहुधा तुम्हाला माहीत नसावं. तुमच्यासारख्या माणसा बरोबर रहावं लागल्यामुळेच तुमची बायको आणि नोकर बहुधा दु:खी दिसतात.''

''सोड त्यांचा विषय ! त्यांचे चेहरेच तसे रडके आहेत ! तू तर स्वत:च बैठकीत येऊन माझा विनोद सभासदांना कसा हसवतो, हे पाहिलं आहेस.'' भूषण बोलला.

''विनोदाचा असा अर्थ नव्हे, की पैसे देऊन इतरांना हसवावं! विनोद तर असा असावा की जो ऐकून लोकांनी आपली दु:खंही विसरुन हसायला लागावं.'' भूषण बोलला.

हे ऐकून प्रफुल्लचा चेहराच पडला ! तो म्हणाला, ''अच्छा, तुला कळली होय खरी बात? पण काय रे, तू धन देऊन तरी हसवू शकशील लोकांना?'' प्रफुल्लचे हे आव्हानच होते.

''अंहं! पण आमच्या गावात चतुर नावाचा एक तरुण आहे. तो बोलू लागतो, तेंव्हा कोणाच्याही डोळ्यातून आनन्दाश्रू झरू लागतात.'' भूषण म्हणाला.

''मग बोलाव तर त्याला लवकर.'' प्रफुल्ल म्हणाला.

भूषणचा निरोप मिळाल्यावर दुसऱ्याच दिवशी चतुर तेथे हजर झाला. प्रफुल्ल त्याला म्हणाला, ''माझ्या मेव्हण्याचं म्हणणं आहे, की लोकांना हसवण्यात तुझा हात धरणारा कोणी नाहीय. तुझी परीक्षा घेण्यासाठीच मी तुला इथं बोलवलंय. हाँ, पण परीक्षा मात्र थोडीफार कठोर आहे. सहन करू शकशील?''

चतुर एकदम हसला, अन् हसतच राहिला.

''का? हसत का राहिलास ?'' प्रफुल्लने चिडून विचारले.

''भूषणनं सांगितलं होतं की आपल्या प्रत्येक बोलण्यात हसू फुटतं. मला वाटलं की हाही विनोद असेल, म्हणून हसलो मी.'' चतुरने सांगितले.

'''असेल' म्हणून हसतोस होय? विनोद ही काय तुझ्या आकलनाबाहेरची गोष्ट आहे ?'' प्रफुल्लने विचारले.

''आकलनाबाहेर थोडाच आहे? पण जो परीक्षा घेणार असतो, त्याच्याकडून चांगलं नावही मिळवायला हवं ना? म्हणून हसलो मी.'' चतुर अुत्तरला.

चिडून प्रफुल्ल म्हणाला, ''निरर्थक गोष्टींवर हसलास तर चाबूक बसेल पाठीवर.''

भूषण म्हणाला, ''मेहुणेमहाराज, तुमची बैठक बोलवा अन् जाहीर करा की भूषणच्या बोलण्याने जे जे हसणार नाहीत, त्यांना रोख रक्कम दिली जाईल. अन् हे ही सांगा की, जे हसतील त्यांच्या पाठीवर चाबूक ओढला जाईल.''

प्रफुल्लने हे मान्य केले. मग चतुर म्हणाला, ''पण महाराज, हसवण्यासाठी मी तिथे काहीही बडबडेन. मी काहीही बोललो, तरी तुम्ही आपलं तोंड अुघडायचं नाही.''

प्रफुल्लने अट कबूल केली. दुसऱ्या दिवशी सभा भरवण्यात आली. अट माहीत झाल्यामुळे लोक नेहमीपेक्षा खूप अधिक संख्येने अुपस्थित झाले होते.

सभासदांसमोर अुभा राहून चतुर त्यांना म्हणाला, ''बंधूंनो ! देवानं मला इतरांना हसवायची शक्ती दिलेली आहे. आनंदामुळे हसू येतं म्हणे. पण असंही म्हटलं जातं की हसण्यामुळे कधी संकटं कोसळतात, नुकसान होतं. मी तुम्हाला हसवल्यामुळे तुम्हा सर्वांचा दोन तऱ्हेचा तोटा होणार आहे. एक म्हणजे,





# व्यर्थ गेलेले वर

**जं**गला जवळील एका गावात एक लाकुडतोड्या झोपडीत आपल्या बायको बरोबर रहात असे. तो गरीब होता, खूप कष्ट करून आपलं पोट भरायचा. तरी पण सुखा-समाधानाने तो जीवन जगत असे.

काही श्रीमंत लोकांनी त्याच्या झोपडीजवळ आपली घरं बांधली. त्यांचे ऐष-आरामी जीवन पाहून लाकुडतोड्या आणि त्याच्या बायकोला त्यांचा हेवा वाटू लागला.

एक दिवशी घरात बसून नवरा-बायको यासंबंधीच बोलत बसले होते. बायको म्हणाली- ''आपलं नशीबच फुटकं ! जर आपल्या जवळ पुष्कळ पैसा असता, तर आपण ही असेच आरामात राहिलो असतो.''

नवरा म्हणाला - ''मी म्हणेन की हे लोक काही सुखी नाहीत. जर माझ्या पाशी धन असतं, तर मी यांच्यापेक्षा सुखाने राहिलो असतो.''

''एकाद्या देवाने आपल्याला ही काही वर दिला तर काय छान होईल नाही !'' बायको म्हणाली.

तिचं बोलणं संपतच होतं एवढ्यात झोपडीत अकस्मात् एक स्त्री प्रकट झाली. तिच्याकडे पाहताच दोघांना वाटले की ही कोणी सामान्य स्त्री नाही, तर एक देवी आहे.

''मी एक देवता आहे. मला माहीत आहे की तुम्ही एकादा वर प्राप्त करण्यासाठी फार आतुर आहात. मी तुम्हाला तीन वर देते. याहून अधिक कशाची माझ्याकडून अपेक्षा करु नका. जे मिळाले त्यात संतुष्ट रहा.'' असे म्हणून देवी अंतर्धान पावली.

या अकस्मात् घटनेचे दोघांना ही फार आश्चर्य वाटले. काय वर मागावा हे दोघांना ही समजेना.

बायको उत्साहाने म्हणाली - ''आपण असा एक वर मागू या की आपण ही श्रीमंत लोकांसारखे आयुष्य घालवू शकू.''

**‘चांदोबा’ त पंचवीस वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेली गोष्ट**

''जवळ पैसा असला म्हणजे काय होईल माहीत आहे? चोर आपल्या घरात शिरतील आणि आपली सर्व संपत्ति लुटून नेतील. मला वाटतं आपल्याला दीर्घायुष्य मिळावं असा वर आपण मागू या.''

''दीर्घायुष्य मिळालं तर त्यापासून काय फायदा? दारिद्र्यात खितपत पडायचं दिवसें दिवस !'' बायको नाराजीने म्हणाली.

नवरा म्हणाला - ''तुझं म्हणणं पटलं मला. घिसाडघाईत काही निर्णय घेणे बरे नव्हे.''

बायको स्वयंपाक करायला निघाली. चूल पेटवीत असता म्हणाली - ''आज जेवणात मासे मिळाले तर काय मजा येईल नाही !'' तिने असे म्हणताच मासे खाली टपकले.

तीन वरांपैकी एक मिळाला हे नवऱ्याच्या लक्षात आलं. तो बायकोला म्हणाला - ''अग बावळटे, तू हे काय केलंस? एक वर तर तू फुकटच घालवलास. नुसते मासे मागण्याच्या ऐवजी 'माशांचा एक हार आपल्या गळ्यात पडावा' असा वर का नाही मागितलास ?''

दुसऱ्याच क्षणी ते सर्व मासे एका हारांत गुंफले गेले. आता बायकोच्या गळ्यात माशांचा हार चमकू लागला.

''बघा, दुसरा वर तुम्ही व्यर्थ घालवलात. आपण दोघांनी दोन वर फुकट घालवले. दोघे ही आपण चुकलो.'' असे म्हणत ती आपल्या गळ्यातूत माशांचा हार काढू लागली. पण हार अंगाला चांगलाच चिकटून बसलेला होता. तो गळ्यातून निघतच नव्हता. नवऱ्याने खूप प्रयत्न केला, पण व्यर्थ !

बायको रडत रडत म्हणाली - '' छी:, हे काय झालं ! आपल्याला तर काहीच मिळाले नाही. आता हे मासे शिजवता ही येणार नाहीत. हा हार जर गळ्यातून निघाला नाही, तर मी आत्महत्या करीन. काय हा अपमान !''

आता लाकुडतोड्या काय करणार? एकच उपाय दिसत होता. तिसरा एक वर जो शिल्लक होता तो मागून हार गळ्यातून बाहेर काढायचा ! त्याने तिसरा वर मागितला. आता हार सहजपणे गळ्यातून बाहेर पडला. नवरा-बायकोच्या मूर्खपणामुळे मिळालेले तिन्ही वर व्यर्थ गेले !



विश्व-समाचार

# अटलांटिक महासागरातील छोटासा भारत

**भा**रताचे अध्यक्ष डॉ. शंकरदयाळ शर्मा नुकतेच कॅरिबियन देशातील ट्रिनिदाद व टोबॅगो या बेटांवर प्रमुख पाहुणे म्हणून जाऊन आले. भारतीय लोकांना तिथे जाऊन एकशे पन्नास वर्षे पूर्ण झाल्याच्या निमित्ताने साजऱ्या केल्या गेलेल्या समारंभात भाग घेण्यासाठी भारताच्या अध्यक्षांना निमन्त्रण दिले गेले होते. अगदी प्रथम जे भारतीय तेथे पोचले, त्यांनी ३० मे १८४५ रोजी त्या भूमीवर पाऊल ठेवले होते.

इतिहास असे सांगतो की ख्रिस्तोफर कोलंबस याने अमेरिकेचा शोध लावला. अमेरिकेच्या पूर्व किनाऱ्यावरील ट्रिनिदाद या बेटावर याच कोलंबसाने १४९८ मधे प्रवेश केला होता. यानंतर तो प्रदेश स्पेनची वसाहत बनला होता. १८०२ मधे तो ब्रिटिशांच्या ताब्यात आला. ट्रिनिदादच्या जवळच असणारे टोबॅगो हे बेटही नंतर आपल्या ताब्यात घेतले. १८०९ मधे त्यांनी या बेटांना आपली एक वसाहत बनवले.

या दोन्ही द्वीपांत ऊसाचे उत्पादन चांगले होत असे. तेथे काम करण्यासाठी ब्रिटिशांना मजुरांची गरज भासू लागली. त्यावेळी भारतावर ब्रिटिशांचेच आधिपत्य होते. त्यामुळे त्यांनी कलकत्ता, छोटा नागपूर वगैरे भागातून २३० भारतीय मजूर 'फीटलरोजक' नावाच्या जहाजावरून तिकडे पाठवले.सध्याची राजधानी पोर्ट आफ स्पेनपासून काही अंतरावर असलेल्या नेल्सन बेटावर त्यांना उतरवण्यात आले. यानंतरही सत्तर वर्षे पर्यन्त उत्तर प्रदेश, बिहार व दक्षिण भारतातून सतत मजूर तिकडे पाठवले जात राहिले. त्याचप्रमाणे ते ब्रिटिश आफ्रिकेतील आपल्या वसाहतीतूनही मजूर पाठवत राहिले.

ट्रिनिदाद व टोबॅगो यातील एकूण जनसंख्या २०,००,००० इतकी आहे. त्यात भारतीय व आफ्रिकन लोकांची संख्या जवळजवळ सारखीच आहे.

तेथील भारतीय आपल्या पूर्वजांची जन्मभूमी अजून विसरलेले नाहीत; कारण तेथे जातानाच ते केवळ आपली पोशाखपद्धतच नव्हे, तर भाषा, आहारपद्धति अन् धर्मसंप्रदायही बरोबर घेऊन गेले. तेथे हिन्दी, बंगाली, पंजाबी व दक्षिणेकडील चार ही भाषा बोलणारे भारतीय आहेत. याशिवाय भोजपुरी, मैथिली, संथाली व नेपाळी भाषिक ही तेथे आहेत. तेथील काही भागांची नावे ही त्यांनी मथुरा, लखनऊ, कानपुर, चंदरनागूर, मद्रास, मलबार लॅड्स, दिल्लीरोड, गोलकुंडा ठेवली आहेत.

नूर हसन अली हे प्रथमत: तेथून येथे आलेले भारतीय होत. ते असे म्हणतात की, ''समुद्रांनी आम्हाला एकमेकांपासून तोडले असले, तरी आमची हृदये एकमेकांशी जुळलेली आहेत.'' अध्यक्ष डॉ. शंकरदयाळ शर्माही असे म्हणाले की, ''ट्रिनिदाद - टोबॅगोशी भारताचे संबंध फार निकटचे आहेत; कारण यांची मने जुळलेली आहेत.''





# शान्त सासू

गौरीपुरचा काशीराम चांगला धनवान होता. त्याला केशव व माधव नावाचे दोन मुलगे होते. दोघेही चांगले मेहनती आणि बुद्धिमान होते. तरीही काशीरामच्या मनाला शान्ती लाभत नव्हती, बिचारा सदैव बेचैन असे; अन् याला कारण होता त्याच्या बायकोचा भांडखोर स्वभाव ! तिचे नाव 'शांति' असले तरी प्रकार अगदी उलट होता. तिचा स्वभाव फार लहरी असून तिची बडबडही फार मर्यादेबाहेर चाले.

आपल्या तीक्ष्ण वाक्‌बाणांनी इतरांच्या मनाला घायाळ करत राही ती. आपल्या बायकोचा हा स्वभाव चांगला माहीत असल्यामुळे काशीरामने केशवचे लग्न आपला लांबचा नातेवाईक धर्मा याच्या मुलीशी - कमलाशी लावून दिले. असे करण्याचे असे ही एक कारण होते की, त्याला वाटले दोन्ही कुटुम्बे एकमेकांना ओळखत असल्याने कमलालाही आपल्या सासूचा स्वभाव अगोदरपासूनच नीट माहीत असेल, परन्तु प्रत्यक्षात घडले मात्र अगदी उलट ! शान्ता शब्दाशब्दावर कमलावर नाराज होऊन तिला खूप टाकून बोले. कमलाही मुळीच चुप राहू शकत नसे. तिने आपल्या नवऱ्याला केशवला स्पष्टच सांगून टाकले की, "मी आता माहेरी परत जाते. आपलं निराळं बिऱ्हाड करायची व्यवस्था केलीत, म्हणजे मगच मी परत येईन."

यानन्तर थोड्या दिवसांनी दोन व्याह्यांनी आपसात चर्चा करून ठरवले की, केशव-कमलाचे निराळे बिऱ्हाड करून देण्यातच सर्वांना सुख लाभेल. अशा प्रकारे थोरल्या मुलाने गावातच आपले निराळे बिऱ्हाड थाटले अन् नंतर त्याला आता एक वर्षाचा मुलगाही होता.

अशा परिस्थितीत आता आपल्या दुसऱ्या मुलाचे - माधवचे लग्न करून द्यायलाही त्याला भय वाटू लागले.

मनीषा रणनवरे

एकदा काशीराम शेजारच्या गावात असलेल्या नारायण नावाच्या आपल्या मित्राला भेटायला गेला.

बऱ्याच दिवसांनी आपल्या मित्राला पाहून नारायण फारच खुश झाला. दोघे झोपाळ्यावर बसून मंद झोके घेत मजेने गप्पा मारू लागले.

थोड्या वेळाने खांद्यावर एक मोठेसे गाठोडे घेतलेला एक माणूस तेथे आला. आल्याबरोबर तो नारायणला म्हणाला, "रामराम रावजी, आपल्या विमलाबेटीने जरीच्या साड्या आणायला सांगितल्या होत्या मागच्या वेळी. आत्ता तिच्यासाठीच खास सुंदर कलाकुसरीच्या रंगीत साड्या घेऊन आलोय पहा."

नारायणने आपल्या मुलीला हाक मारली.

विमला घरातून बाहेर आल्याबरोबर व्यापारी म्हणाला, "छोटी मालकीणबाई ! मागच्या वेळी वितभर रुंद जरीकाठाच्या साड्यांबद्दल बोलला होतात ना ! बघा कशा सुरेख साड्या आणल्या आहेत तुमच्यासाठी !" अन् तो नोकराला गाठोडे सोडायला सांगू लागला.

इतक्यात व्यापाऱ्याला "उघडू नका गाठोडं मोतीरामजी ! आलेच मी." असे म्हणत विमला लगबगीने पुन्हा घरात गेली.

काही मिनिटातच एक विरलेली, जुनी दिसणारी साडी आणून ती मोतीरामसमोर टाकत म्हणाली, "जरा ही साडी नीट पहा बरं."



साडी पाहिल्याबरोबर मोतीरामचा चेहरा पडला. तरी क्षण भरात स्वतःला सावरत तो म्हणाला, "हुं ! कुणाकडून घेतली होती ?"

विमला हसत म्हणाली, "तुमच्याकडूनच तर घेतली होती. का ? विश्वास नाही बसत ?"

पण तिचे बोलणे उडवून लावल्यासारखे करत तो म्हणाला, "हा मोतीराम असल्या हलक्यासलक्या साड्या विकत नसतो कधी."

तरीही विमला पुन्हा गंभीरपणे म्हणाली, "मोतीरामजी, मागल्या वेळी अगदी आग्रह करकरून 'चांगली साडी' म्हणत तुम्हीच तर माझ्या गळ्यात मारली होती ही साडी ! अन् चांगली भक्कम किंमतही वसूल केलीत बाबांकडून. पण पहिल्यानंच पाण्यात टाकली,



तर रंग पार विटून गेला. लक्षात ठेवा तुम्ही, माणसाला फसवण्यात एकदाच यश मिळू शकतं, पण प्रामाणिकपणा मात्र कायम अुपयोगी पडतो! आता जाअू शकता तुम्ही!''

तिच्या या अकस्मात वाक्‌ताडनाने घाबरलेला मोतीराम काही बोलणार, इतक्यात त्याला थोपवत विमला पुन्हा म्हणाली, ''मोतीरामजी, देवानं माणसाला बोलण्याची शक्ती दिलेली आहे, ती आपल्या बोलण्याद्वारे चांगल्या गोष्टी व्यक्त करण्यासाठी! अुगीचच जास्त बकबक करून जिभेच्या जिवावर आपला मतलब साध्य करण्यासाठी नव्हे; समजलं? जा आता तुम्ही!''

मोतीराम तेथून मुकाट्याने निघून गेला.

काशीराम हा सारा प्रकार लक्षपूर्वक पहात होता. त्याने विमलाला विचारले, ''एका मोठ्या माणसाशी कसलाही संकोच न बाळगता असं धडाधडा बोलताना कसली भीति नाही वाटली तुला?''

विमला हसतच अुत्तरली, ''आपण जर कसली चूक केली नसेल, तर संकोच किंवा भीतीचा प्रश्नच कुठे येतो काका? निर्दोष माणसं अशी अुगीच घाबरायला लागली, तर दोषी माणूस त्याचा फायदा घेअून आपल्या मर्यादा जास्तच ओलांडू लागेल की नाही?''

तिचे हे बोलणे ऐकता ऐकता काशीनाथच्या मनात काही निराळाच विचार येअू लागला. नंतर संध्याकाळपर्यन्त तो नारायणशी गप्पा तर मारत होता, पण त्याचे मन पुन:पुन्हा आपल्याच विचाराभोवती रुंजी घालत होते.

शेवटी आपल्या गावी परत निघण्यापूर्वी मनात काही निर्णय घेअून तो आपल्या मित्राला म्हणाला, ''हे बघ नारायण, मला तुझ्याकडे काही मागायचंय.''

आश्चर्याने नारायण म्हणाला, ''अरे माग न नि:संकोचपणे.''

''अं! तुझ्या मुलीला आपली सून बनवावी, असं वाटतंय मला.'' काशीनाथने मनातली गोष्ट सांगून टाकली.

मागणी ऐकताच काशीरामला आनंदाने मिठी मारत नारायण म्हणाला, ''अरे, हे तर वरदानच झालं की मला! तू म्हणतोयस काही



मागायचंय मला? माझी विमला तुझी सून बनणं यासारखी भाग्याची गोष्ट दुसरी कोणती असणार तिच्यासाठी? माझ्या पोरीचं भाग्यच फळफळलं की!''

काशीराम नंतर म्हणाला, ''बरं तर, आता घरी पोचताच मी आपल्या बायको अन् मुलाशी बोलेन याबाबत. नंतर मुहूर्तही पाहून ठेवीन. त्यापूर्वी तूही आपल्या बायको व मुलीशी बोलून ठेव.''

घरी पोचल्याबरोबर काशीरामने आपला धाकटा मुलगा माधव याला सारी हकिकत सांगून म्हटले, ''माधव, तुझी वहिनी जरा मअू स्वभावाची असल्यामुळे घरात तुझ्या आईचं वर्चस्व राहिलं. शेवटी सुनबाईनं आपलं निराळं बिऱ्हाड थाटलं. पण आता तुझी होणारी बायको मोठी चुणचुणीत अन् हुशार आहे. मला आशा आहे की ती तुझ्या आईला सुधारेल. विमलाच्या वागणुकीनं माझ्या या आशारूपी रोपाला छानच खतपाणी घातलंय. मला तर वाटतंय की तुझा दादा अन् वहिनीही पुन्हा इथेच रहायला येतील.''

नंतर सर्वजण जेंव्हा 'मुलगी पहायला' नारायणच्या घरी गेले, तेंव्हा हुंडा म्हणून आपण कायकाय आणि किती देणार वगैरे सर्वकाही त्याने आपण होअूनच सांगून टाकले. शांतीही कबूल झाली. त्यामुळे लग्नसमारंभ लवकरच पार पडून विमला सासरी रहायला आली सुद्धा.



विमला सासरी आल्यानन्तर घरच्या कुत्र्यामांजरावर ही बरसणाऱ्या सासूचा स्वभाव तिला चांगलाच कळून चुकला. परन्तु आपली काही चूक नसतानाही आपणावर तिच्याकडून सुटणारे वाग्बाण ही मुकाट्याने सहन करीत राहिली, तोंडातून तिने कधी 'ब्र' ही काढला नाही. इतकेच नव्हे, तर तिने आपल्या वागणुकीत कसला बदलही केला नाही. काशीरामला विमलाच्या या वर्तणुकीचे मोठेच आश्चर्य वाटले. त्याला वाटले, की सून नवीनच आलेली आहे, जुनी झाली की मग दाखवील आपली चुणूक! तो यासाठी वर्षभर वाट पहात राहिला. पण शान्ती गरजतच राहिली अन् विमला ओठ घट्ट मिटून राहिली! एकदा बायको



देवळात गेल्याची संधी साधून काशीरामने विमलाशी या बाबतीत बोलणे काढले.

तो आपल्या सुनेला म्हणाला, ''सुनबाई, तू इथे आल्या दिवसापासून मी पहातो आहे. तुझी सासू तुला अुगीचच त्रास देत असते. तरीही तू कसं आपलं तोंड शिवून बसली आहेस? मला तर शंका यायला लागली आहे की, त्या दिवशी साड्यांच्या व्यापाऱ्याला रोखठोक बोलणारी मुलगी तूच की आणखी कोणी !''

सासऱ्याच्या या बोलण्यावर हसत हसत विमला म्हणाली, ''त्या दिवशी त्या व्यापाऱ्याला मी कसलाही संकोच न बाळगता अशासाठी बोलले की, त्याचं आमचं काही नातं नव्हतं ; आमच्या कुटुम्बाचा तो कोणी मित्र ही नव्हता. पण इथे माझ्यावर अधिकार गाजवणारी बाई ही माझ्या नवऱ्याची प्रत्यक्ष आई आहे; सासू आहे माझी ! त्यांच्याशी असणारं मासं हे नातं शाश्वत आहे. त्यांना काही अुलटसुलट बोलायला हे नातंच मला अडवत आहे. आपल्याला जिथे प्रेमाची अपेक्षा असते, आपले संबंध सुरळित रहावे असं वाटतं, तिथे शान्तता अन् सहनशक्ती असणं आवश्यक आहे. भांडणतंटा कदापीही नसावा.''

सुनेचे सद्‌गुण पाहून काशीरामचे डोळे भरून आले. मोठ्या प्रेमाने तो म्हणाला, ''मुली, तुझं वय तर खूपच लहान आहे, पण भल्याभल्या मोठ्या माणसांनाही लाजवेल असं बोललीस तू ! तुझं बोलणं म्हणजे त्यांना एक आदर्श अुदाहरण आहे. पण मला अशी भीती पडलीय की तुझा चांगुलपणा, हा तुझ्या सासूच्या दृष्टीने तुझा भित्रेपणा असावा. यामुळे तिला जास्तच प्रोत्साहन मिळून ती तुला बेपर्वाई दाखवेल, अन् मग कदाचित तुझ्या सहनशक्तीचा अंत होईल. मला वाटलं होतं की तू आपल्या सासूला चांगला धडा शिकवशील, तिला नीट ताळ्यावर आणशील. पण आता कळून चुकलंय की मूर्खपणा इतरांना सहजपणे त्रास देअू शकेल, पण विवेक शिकवू शकणार नाही. जे व्हायचं, ते तर होअूनच राहील. आम्ही आपल्या भाग्यालाच दोष देतोय. इतक्या सुशील सुनेचे हाल पाहून मन दुखतं आमचं. आम्हाला गप्प बसावं लागतं.''

त्याला पुढे बोलवेनासे होअून तो बाहेर निघून गेला.

बाहेर पडत असतानाच देवळातून परत आलेली शान्ती त्याला आपल्या पुढ्यातच दिसली. पण काशीरामने एक शब्द ही अुच्चारला नाही, जणू त्याला तिचा चेहराही पहाणे नको वाटत होते.

त्या दिवशी रात्रीच्या जेवणाचे वेळी शान्ती अतिशय शान्त होती. नेहमीप्रमाणे ती सुनेशी एक ही रागाचा शब्द बोलली नाही. काशीरामला ती म्हणाली, ''अुद्या चांगला दिवस आहे. तुम्हाला वेळ आहे का थोडा?''

काशीरामने धुश्यानच विचारले, ''का?''

मान खाली घालत शान्ती अुत्तरली, ''अुद्या आपण दोघेही जाअून आपला थोरला मुलगा, सून आणि नातवाला इथे आपल्या घरी घेअून येअू.''

बायकोच्या या बोलण्याचे आश्चर्य वाटून काशीराम एकदम ओरडला, ''काय म्हणालीस? पुन्हा एकदा बोल बरं !''

रडत रडत शान्ती म्हणाली, ''आज देवळात भजन नव्हतंच म्हणून मी लवकर परत आले. तुमचं दोघांचं सगळं बोलणं मी ऐकलं. आजपर्यन्त आपला मूर्खपणा न जाणून, तुम्हा सर्वांना मी किती त्रास दिला ते माझ्या लक्षात आलं. माझ्या बद्दल तुमच्या मनात किती कटुता अुत्पन्न झालीय हे अुमगलं मला. प्रेम अन् बंधन हवंसं वाटत असेल, तर माणसाचं वागणं आत्मीयतेचं हवं - हे विमलाचं बोलणं अगदी सोळा आणे पटलं.''

आपल्या बायकोत अचानक इतका फरक पडेल अशी काशीरामला कल्पनाच नव्हती. आनन्दाने तो म्हणाला, ''इतक्या काळानंतर शान्त जीवनाचं मुख्य सूत्र तुझ्या लक्षात आलं. सासूचा शान्त स्वभाव हाच तर कुटुम्बाच्या सुखशान्तीचा पाया आहे. देवानं दिलेलं ते एक वरदानच आहे.''

''इतकी छोटीसी गोष्ट तुम्ही आपली थोरली सून घरात आली, तेंव्हाच सांगितली असतीत, तर मी स्वत:ला सुधारलं नसतं का? आत्तापर्यन्त गप्प का राहिलात?'' शान्ती हसत बोलली.



# हुश्......हुश्

भयानक वादळ झाले. त्यांची नाव बुडत होती. त्यातले तिघेही प्रवासी एका एका लाकडी फळीचा आधार घेऊन कसे तरीएका निर्जन बेटावर पोचले. या तिघांशिवाय कोणीही प्राणी नव्हता तेथे. फळांनी लवलेले खूपसे वृक्ष तेथे होते. एक लहानशी नदी होती अन् त्या पाण्यात अगणित मासे होते. फळे व मासे खाऊन बाकीचा दिवस जुगार खेळत ते आपले दिवस घालवू लागले.

त्या तिघातला एक होता गावपाटील, दुसरा शेतकरी अन् तिसरा होता एक रिकामटेकडेपणाने दिवस घालवणारा भटक्या माणूस.

एक दिवस समुद्रकिनाऱ्यावर हिंडत असताना पाटीलबुवांना रेतीत एक बाटली दिसली. शेतकऱ्याने अुचलून हातात घेतली आणि रिकामटेकड्याने तिचे झाकण काढले. खूप काळापासून बाटलीत बंद असलेले एक भूत ताबडतोब जोर-जोरात हसत अुडी मारून बाहेर आले.

भूत पाहून तिघेही पळून जाऊ लागले. पण त्यांना थांबायला सांगून भूत म्हणाले, ''अरे, फारा वर्षांनी तुम्ही मला मुक्त केलंय, तेंव्हा मी तुम्हा तिघांचीही एकएक इच्छा पुरी करीन. नीट विचार करून काय मागायचं ते ठरवा नीट.''

गावपाटील विचार करू लागला, ''गावच्या लोकांचे तंटे मिटवण्यासाठी मला ताबडतोब आपल्या गावी जायचंय.''

भुताने ताबडतोब आपल्या तोंडाने 'हुश्' असा आवाज केला, अन् पाटील महाशय दुसऱ्याच क्षणी अदृश्य झाले.

शेतकऱ्याने विचार केला, ''पीक काढायची वेळ झालीय, मला तर आत्ता आपल्या शेतात असायला हवं.''

भुताने पुन्हा 'हुश्' केले अन् शेतकरी नाहीसा झाला.

रिकामटेकड्याने विचार केला ''जुगार खेळायला ते दोघे इथे असले तर माझा वेळ कसा छान जाईल!'' झाले! भुताने दोन वेळा 'हुश् हुश्' केले अन् ते दोघे पुन्हा बेटावर हजर झाले! आता भूतच गायब झाले होते!






(मोहन हा ट्रॉयराजा वर्धन याचा पुत्र. ग्रीक राजा प्रताप याच्या पत्नीचे - भुवनसुंदरीचे - अपहरण झाले. तिला परत आणण्यासाठी ग्रीक सैन्य जहाजातून निघाले. त्यांनी ट्रॉयला वेढा दिला. दहा वर्षे युद्ध होत राहिले. शेवटी एका विशाल लाकडी घोड्यात लपून ग्रीकांनी ट्रॉय नगरात प्रवेश केला, आणि त्यावर विजय मिळवला. नंतर त्यांनी नगर जाळून टाकले. 'भुवनसुंदरी' नावाच्या ग्रीक पौराणिक दीर्घकथेत हे सर्व आपण वाचलेच आहे.

ट्रॉयवर आक्रमण करणाऱ्या ग्रीक योध्द्यात रूपधरही एक होता. युद्धाला निघण्यापूर्वी ज्योतिष्यांनी त्याला सांगितले होते की, ''तुला वीस वर्षेपर्यन्त स्वदेशी परतण्याचा योग नाहीय.'' त्या विसांपैकी दहा वर्षे तर प्रत्यक्ष युद्धातच खर्च झाली. अुरलेल्या दहा वर्षांत रूपधरच्या जीवनात फारच विचित्र घटना घडल्या. त्या घटनाच या महिन्यापासून चित्रित करीत आहोत.)

ग्रीकांनी ट्रॉय नगर जिंकले. मिळालेली संपत्ती व बायकाही त्यांनी वाटून घेतल्या. प्रत्यक्ष राजा वर्धन याची बायको रूपधरच्या वाट्याला आली. पण ती त्याला लाभली नाही. तिने केलेल्या अतिबडबडीमुळे व शिव्याशापांमुळे कंटाळून तिला मारून समुद्रात फेकून दिले.

नगर जिंकल्यानन्तर तेथील प्रमुख देवी बुद्धिमती देवी हिलाही त्यांनी पुरेसा आदर दिला नाही. त्याचा परिणाम म्हणून की काय, परतीच्या वाटेवर सर्वत्र ग्रीक योद्धयांना अनेक संकटांना तोंड द्यावे लागले.

रूपधरच्या नौका ट्रॉयचा किनारा सोडून निघाल्यापासूनच अुलटे वारे वाहू लागले होते. वास्तविक त्यांना दक्षिणेकडे जायचे होते. परन्तु



नौका मात्र उत्तरेकडे ढकलल्या जात राहिल्या. शेवटी त्या सिपरोस किनाऱ्याला लागल्या. ही किकोनियनांच्या रहाण्याची जागा होती.

रूपधरच्या सेना त्या नगरावर तुटून पडल्या अन् त्यांनी नगराचा विध्वंस केला. सैनिकांनी सापडलेल्या स्त्रिया, पशुधन व अन्य संपत्ती आपसात वाटून घेतली. रूपधर त्यांना म्हणाला, "आपल्याला जमेल तितक्या लवकर इथून निघायला हवं." पण सैनिक त्याचे म्हणणे ऐकून त्यावर विचार करण्याच्या मनस्थितीत नव्हते. नगरात त्यांना एक विचित्र व स्वादिष्ट पेय मिळाले. सर्वजण ते पेय खूप प्यायले आणि जनावरांना समुद्रतटावर भाजून खायला त्यांनी सुरुवात केली. यातच ते मग्न राहू लागले. या अवधीत नगरातून पळून गेलेले किकोनियन दुसऱ्या गावांत गेले. त्या गावातील सर्व पुरुष युद्धकला उत्तम जाणत, त्यांच्या जवळ उत्तम शस्त्रास्त्रे होती. अनेक जण धनुर्विद्येत प्रवीण होते, तर काही भालाफेकीत. काही उत्तम तलवारबहाद्दर होते. नगरातून पळून गेलेल्या लोकांना या गावातल्या लोकांनी त्यांच्यावर हल्ला करणाऱ्या लोकांबद्दलची सर्व माहिती विचारली. हल्ला करणारे लोक शूर आहेत हे कळल्यावर ते फारच खूश झाले. आज बऱ्याच काळानन्तर आपल्या शस्त्रांचा योग्य उपयोग करायची संधी त्यांना प्राप्त झाली होती. या साऱ्या योध्द्यांनी किकोनियन लोकांना मदत करायचे आनन्दाने मान्य केले. किकोनियन तेथून असंख्य योध्द्यांना घेऊन आले. त्यांच्यात रथारूढ होऊन लढणारेही अनेकजण होते. वेळ पडल्यास जमिनीवर उभे राहूनही ते युद्ध करू शकत.

अगदी सकाळी सकाळीच हे किकोनियन योद्धे टोळधाडी सारखे येऊन रूपधरच्या लोकांवर तुटून पडले. घनघोर युद्ध झाले. किकोनियनांची संख्या अधिक होती अन् जसजसा वेळ जात राहिला, तशी रूपधरची सैनिक संख्या कमी होऊ लागली. बरेच जण मारले गेले. बाकीचे विनाविलंब शेंड्या मारून आपापल्या नौकांवर चढले अन् तेथून पळून गेले.

समुद्रात थोडे दूर गेल्यावर पूर्वेकडून जोरदार वारे वाहू लागले. समुद्र व आकाश दोन्ही एक होऊन धूसर दिसू लागले. अंधार पडला. वाऱ्याच्या वेगामुळे जहाजांच्या शिडात हवा भरली जाऊन ती वेगाने भरकटत जाऊ लागली.

पहाता पहाता त्या हवेमुळे जहाजांची शिडे फाटू लागली.

'आता आपल्या प्राणांची खैर नाही', असे रूपधरला वाटू लागले. त्याने शिडे खाली करण्याची आज्ञा आपल्या सैनिकांना दिली. तसे करून मोठ्या कष्टानेच ते आपली जहाजे किनाऱ्याला लावू शकले. दोन दिवस त्यांनी वादळ थांबायची प्रतीक्षा केली. दोन्ही दिवस त्यांना सूर्यदर्शनही घडले नाही.

तिसऱ्या दिवशी सकाळी त्यांना जेंव्हा अरुणोदय दिसला, तेंव्हाच त्यांच्या जिवात जीव आला. त्यांनी पुन्हा खांबांना शिडे बांधली अन् जराही प्रयत्न न करता जहाजे योग्य दिशेने झरझर जाऊ लागली.

चार दिवसांच्या प्रवासानन्तर नौका पोचल्या तेथून उत्तरेकडे गेल्यावर रूपधर स्वदेशी इथाकाला पोचू शकणार होता.

हवेचा जोर कमी झाला अन् रूपधरने नावा पुढे नेण्याची आज्ञा दिली. पण इतक्यात पुन्हा वादळी वारे वाहू लागले अन् त्या नावाड्यांच्या ताब्यात राहीनाशा झाल्या. त्या किनाऱ्याकडे जाऊ लागल्या. यापेक्षा 'मागच्या वेळचे वादळ बरे' असे म्हणायची वेळ आली. कारण यावेळी समुद्रात प्रचंड उंचीच्या लाटा उसळत होत्या. जहाज एका क्षणी लाटेवर उंच उचलले जाई, तर दुसऱ्या क्षणी कडेलोट झाल्यासारखे एकदम खोल जाई. भरीत भर म्हणून आसपास अक्राळविक्राळ आकाराचे मासे व मगरी सुसरी दिसू लागल्या. परंतु सुदैवाने या प्राण्यांना वादळामुळे आपल्याच जीवनाची चिंता पडल्याने त्यांनी रूपधरच्या लोकांना जरासुद्धा त्रास दिला नाही. पुरे नऊ दिवस व नऊ रात्री वारा त्याच्या नौकांना चेंडूसारखा इकडून तिकडे टोलवत राहिला. दहाव्या दिवशी सर्वजण एका किनाऱ्याला लागले. परन्तु तेथे ते जास्त दिवस राहू शकले नाहीत.



या किनाऱ्यावर रहाणारे लोक एक प्रकारची गोड फळे खात असत. ती अगदी मधासारखी



गोड असत. त्यांच्यात बिया किंवा कोयी वगैरेही नसत. पण ती खाल्ल्यामुळे माणसे आपला भूतकाळ विसरून जात. अफू सेवन केलेल्या माणसासारखी ती गुंगीत रहात.

ही गोष्ट रूपधरला माहीत नव्हती. त्याने व अनुयायांनी मिळून तेथेच तटावर स्वयंपाक करून भोजन केले आणि नंतर त्याने तीन सैनिकांना बोलावून तेथील स्थानिक लोकांसंबंधी माहिती काढून आणायला सांगितले.

स्थानिक लोकांनी या ग्रीकांना कसलाही त्रास दिला नाही; उलट त्यांनी या सैनिकांना फळे खायला दिली. ती खाल्ल्यावर 'आपण कोणत्या कामासाठी इथे आलो' हेच ते विसरून गेले अन् फळेच खात राहिले.

बराच वेळ गेला तरी सैनिक परत न आल्याचे पाहून रूपधर स्वतःच काही सैनिक बरोबर घेऊन त्यांना शोधत गावात पोचला, तेंव्हाच खरी गोष्ट त्यांच्या ध्यानी आली. त्या लोकांनी रूपधरलाही फळे देऊ केली पण त्याने ती खाल्ली नाहीत. त्याला शंका आली की या फळांमुळेच आपले सैनिक गुंगले आहेत. त्याला जबरदस्तीनेच त्या सैनिकांना आपल्या नौकांपर्यंत खेचून आणावे लागले. वाटभर ते ओरडत होते की, ''आम्हाला तुमच्याबरोबर यायचं नाही. सोडून द्या आम्हाला, इथेच छान वाटतंय.''

दोऱ्यांनी बांधूनच रूपधरने या सैनिकांना जहाजांवर चढवले. येथे जास्त रहाणे धोक्याचे आहे, हे तो समजून चुकला अन् आपल्या सैनिकांसह त्याने तेथून कूच केले. थोडे दिवस प्रवास केल्यानन्तर जहाजे आणखी एका किनाऱ्याला लागली. आपण कोठे आलो आहोत हे त्या ग्रीकांना ठाऊक नव्हते कारण त्यावेळी, रात्र असून आकाशात चन्द्र असला तरी तो ढगांनी झाकोळलेला होता. स्पष्टपणे काहीच दिसत नव्हते. तरीही 'उद्या काय ते पाहू' असे ठरवून किनाऱ्यावरील रेतीतच ते आरामात झोपून गेले.

सकाळी उठल्यावर आपण एका बेटावर आहोत, असे त्यांना आढळले. तेथील सौन्दर्याचा आस्वाद घेत ते खूप फिरत राहिले.

या बेटावर तऱ्हतऱ्हेची फळझाडे असून द्राक्षांचे वेलही सर्वत्र अमर्याद वाढलेले होते. तेथील जमीन चांगलीच सुपीक होती. पण कोठेही कोणी शेती करत असल्याचे आढळले नाही. पाणीही मुबलक असल्याने नांगर न चालवताच हरतऱ्हेचे धान्य उत्पन्न होऊ शकले असते.

आपल्या नौका सोडून खूप दूर जाण्यापूर्वीच या ग्रीकांना जंगली बकऱ्या आढळल्या. ताबडतोब आपल्या नौकांवर चढून सैनिक आपले धनुष्यबाण, भाले वगैरे आयुधे घेऊन आले. काही बकऱ्या मारून त्या शिजवून ते दिवसभर खात राहिले. रूपधरबरोबर एकूण बारा नौका होत्या. प्रत्येक नौकेला नऊ-नऊच्या हिशोबाने बकऱ्या त्यांच्या वाट्याला आल्या.

त्या दिवशी ते आपल्या नौका सोडून कोठेही गेले नाहीत. त्यांना तेथूनच दिसले की, दूरवर माणसांची वस्ती आहे. संध्याकाळी तेथील घरांच्या स्वयंपाकघरातून धूर बाहेर पडत असल्याचेही त्यांना दिसले. शेळ्या-मेंढ्यांचे आवाजही त्यांना स्पष्ट ऐकू येत होते.

सकाळ होताच रूपधर आपल्या माणसांना बोलावून म्हणाला, ''मी स्वतः या नौकेत बसून बेटावर जातो, अन् इथली माणसं जंगली आहेत की सभ्य आहेत हे पाहून घेतो. त्यानन्तरच पुढे काय करायचं हे ठरवू आपण. मी परत येईपर्यन्त तुम्ही आपल्या नौका सोडून कुठे जाऊ नका. नीट रक्षण करा आपल्या नौकांचं.''

थोडे दूर गेल्यावर रूपधरला बऱ्याच लांबवरच्या एका टेकडीवर एक गुहा दिसली.





त्यावर वेली पसरलेल्या होत्या. गुहेला घेरून कुंपणासारखी एक भिंत होती. भिंतीत मोठमोठे खडक व झाडांची खोडेही मधून मधून दिसत होती.

रूपधर आपल्या नौकेतून थेट गुहेपर्यन्त गेला व त्याने नौका तेथे समोर थांबवली. चामड्याच्या थैलीत विचित्र पेय भरून घेअून व नौकेतील बारा साहसी वीर बरोबर घेअून तो गुहेकडे निघाला.

रूपधरने जेव्हा इस्मरोजवर हल्ला केला होता, तेव्हा त्याने तेथील एक पुजारी, त्याची बायको व मुलेयांना न मारता सोडून दिले होते. त्यावेळी पुजाऱ्याने ज्या अद्‌भुत पेयाच्या बऱ्याचशा थैल्या रूपधरला भेट दिल्या होत्या, त्यापैकीच एक ही थैली होती. त्याने रूपधरला त्यावेळी सोने-चांदीही दिली होती. पुजाऱ्याने त्याला सांगितले होते की, त्या पेयात वीसपट पाणी मिसळले म्हणजेच त्या पेयाचा सुगंध व माधुरी चाखता येते.

रूपधर व त्याचे साथी लवकरच गुहेजवळ पोचले. परन्तु गुहेत कोणीच नव्हते. ती एक खूपच विशाल गुहा होती. तेथेही बऱ्याच शेळ्या होत्या. खूप मोठमोठी भांडी दुधाने भरून ठेवलेली होती. रूपधरची माणसे म्हणाली, ''आपण हे दूध अन् मलई घेअून जाअू.'' दुसरा एकजण म्हणाला, ''अरे आपल्याला अडवणारा तरी कोण आहे इथे? आपण तर या शेळ्याही नेअू या बरोबर.''

पण रूपधर तयार नव्हता. त्याने असे करायला मनाई केली. त्यांनी सर्वांनी तेथेच पोटभर मलई खाल्ली, अन् नंतर ते गुहेतल्या लोकांची वाट पाहू लागले.

शेवटी त्या गुहेत रहाणारा माणूस तेथे आलाच. ग्रीक सैनिकांना प्रथम तो दिसलाच नाही. मोठा आवाज करत कसलीशी वस्तु अगोदर गुहेत येअून पडली. ती होती वाळलेल्या लाकडांची एक मोळी. नंतर तो माणूस वाकून गुहेत शिरला. मांजराला पाहून अुंदीर पळावेत, तसे ते सैनिक सैरावैरा धावू लागले.

जो माणूस आत आला होता, तो ताडामाडासारखा अुंच असून त्याच्या कपाळावर एकच डोळा होता. तो डोळा अग्नीसारखा चमकत होता.

त्या माणसाने शेळ्यांचा एक मोठा कळप गुहेत हाकून आणला. नंतर गुहेचे तोंड एका मोठ्या दगडाने झाकून घेतले. तो पथ्थर इतका मोठा होता की चाळीस बैल मिळूनही तो ढकलू शकले नसते. नंतर त्या माणसाने बकऱ्यांचे दूध काढले.

हा माणूस फाललोचन जातीचा होता. या जातीचे बरेच लोक त्या भागात होते. त्या लोकांना समाजजीवन असे नसेच. त्यांची सुख दुःखे आपापल्यापुरतीच मर्यादित असत. इतरांचा विचारही ते कधी करत नसत.

ही फाललोचन माणसे शेती करत नसत. जमीन फार सुपीक असल्याने कष्ट न करताच खूपसे पदार्थ त्यांना मिळत.

ही राक्षसी माणसे वर्षातून एकदाच पीक कापून आणत असत व बाकी वेळात शेळ्या मेंढ्यांना चरायला मैदानात घेअून जात. तेथील पौष्टिक गवत खाअून ती जनावरे चांगली धष्टपुष्ट होत, अन् भरपूर दूध देत असत. त्यांना चरायला नेण्यावाचून या लोकांना अन्य कोणतेच काम येत नसे.

ही राक्षसी माणसे पिढ्यान् पिढ्या समुद्रकिनारी रहात असूनही त्यांना बारीक-सारीक होड्याही बनवायला येत नसत. आपले निवासस्थान सोडून समुद्री यात्रा करणे त्यांना माहीतच नव्हते. त्यामुळे नागरिकता कशी ती त्यांना ठाअूकच नव्हती. अन् अशा तऱ्हेचे विचित्र जीवन ते जगत असत.

ग्रीकांनी ज्या गुहेत प्रवेश केला होता, त्यातल्या फाललोचन माणसाने धार काढलेल्या दुधापैकी निम्म्याची मलई काढली अन् एका टोपल्यासारख्या भांड्यात ठेवली. बाकीचे दूध त्याने बहुधा पिण्यासाठीच भांड्यांतून ओतून ठेवले.

यानन्तर त्याने चूल पेटवली. त्या अुजेडात त्याला गुहेतले ग्रीक सैनिक दिसले.

आपला एकच डोळा इकडून तिकडे गरगर फिरवत तो राक्षस मागे वळून ओरडला, ''कोण आहात तुम्ही लोक?'' त्याच्या आवाजाचे प्रतिध्वनी त्या गुहेत अुमटले.

(क्रमशः)



## चान्दोबाच्या बातम्या

### तिळ्या मुलांचा पराक्रम

केरळ प्रान्तातील एर्नाकुलममधे एका कुटुम्बात एकाच वेळी तीन मुले (तिळी) जन्माला आली. त्यांची नावे आहेत - महिषी, मनोज व माया. या वर्षी ज्या एस्.एस्.एल्.सी. च्या परीक्षा झाल्या,



त्यात तीन्ही मुले पहिल्या श्रेणीत अुत्तीर्ण झाली. दोन मुलांना विशेष योग्यताही मिळाली. मुलांची आई प्रोफेसर आहे, तर वडील ऑडिट ऑफिसर.

### अंतराळातले अमेरिकेचे रेकॉर्ड

८५ दिवस अंतरिक्षात राहून अंतरिक्षयात्री नॉर्मन थागार्ड याने ६ जून रोजी एक नवा अुच्चांक प्रस्थापित केला. या अगोदर जो अंतरिक्ष प्रवासी अंतरिक्षात राहिला होता, तो ८४ दिवस, १ तास, व सोळा मिनिटेपर्यन्त राहिला होता. ज्यांना असे अंतरिक्षात रहायचे असते, त्यांना तेथे रशियाने स्थापन केलेल्या 'स्पेसस्टेशन' मधेच रहावे लागते. नॉर्मन थागार्ड तेथे जुलैपर्यन्त राहील. जेंव्हा दुसरा अंतरिक्ष यात्री तेथे पोचेल, तेंव्हा तो परत येईल. कोणीही जावो, पण रशियाच्या व्हॅलेरी पोलियाचा अुच्चांक मोडणे कठीणच वाटते. तो तेथे ४३८ दिवस राहून मागील मार्चमधेच परत आला.

### अणकुचीदार चोच

आपल्या अणकुचीदार चोचीने झाडांच्या सालात टोचून टोचून सुतार पक्षी आळ्या किडे खातो. झाडांना अशा प्रकारे टोचत रहाण्यामुळेच त्याचे नाव 'सुतार' पडले आहे. इंग्रजीत याला 'वुड पेकर' म्हणतात. सामान्यत: हे पक्षी इतर वस्तूंना शिवत नाहीत. पण नुकतेच अमेरिकेत दोन सुतार पक्षांनी केनेडी अंतरिक्ष केन्द्रातील अंतरिक्षयानाच्या छताला १० सें.मी. व्यासाचे भोक पाडले. त्यामुळे संबंधित अधिकाऱ्यांनी यानाचे अुड्डाण तहकूब केले; नंतर नीट तपासणी केली, तेंव्हा असे आढळले की या दोन्ही सुतारांनी 'लॅण्ड पॅड' मधेच आपले घरटे बनवले आहे!

### जखमी सुपरमॅन

आपल्या 'कॉमिक्स' च्या पुस्तकात छापून येणाऱ्या सुपरमॅनच्या गोष्टी माहीत नसणारा मुलगा विरळाच ! सुपरमॅनच्या गोष्टी मुलेमुली मोठ्या अुत्साहाने वाचत असतात. अशाच अजेय सुपरमॅनचा अभिनय क्रिस्टोफर रित सिनेमात करत असतो. गेल्या मेच्या शेवटच्या आठवड्यात घोड्यावरून जात असताना अपघात होअून तो जखमी झाला. या अपघातात त्याची मान मोडली. आता तो धोक्यातून वाचला आहे. डॉक्टरांचे म्हणणे आहे की, आता तो अगदी खडखडीत बरा होईल.



# कवि चंद्रशेखर

दृढनिश्चयी विक्रमादित्याने पुन्हा झाडाकडे जाअून प्रेत खाली अुतरवून ते आपल्या खांद्यावर टाकले आणि मौन धारण करून तो यथाक्रम स्मशानाची वाट चालू लागला. तेव्हा प्रेतात वस्ती करून असणारा वेताळ बोलू लागला, ''राजा, यावेळी तर तू आपल्या अन्त:पुरात सुखोपभोग घेत आराम करत असायला हवंस, पण तू तर या विराण स्मशानात कष्ट अुपसत राहिला आहेस. याला मी तुझी महानता समजू, की अविवेक? मी तर स्वत: कोणत्याच निर्णयाप्रत पोचू शकत नाहीय. तुझी समजूत काढता काढता मी दमून गेलोय ! पण तू ? तू तर दमायचं नावच काढत नाहीयेस. सामान्य प्रजेच्या दृष्टीने महान् दिसणारा माणूसही कधीकधी अविवेकपूर्ण काम करतो; मूर्खपणाने वागतो. अुदाहरणादाखल मी तुला एक राजा आणि एक कवी यांची गोष्ट सांगतो. आपला थकवा

## वेताळ कथा



घालवत ती लक्षपूर्वक ऐक.'' आणि वेताळ गोष्ट सांगू लागला.

खूप पूर्वी कौशांबी देशाच्या एका अप्रसिद्ध गावात चन्द्रशेखर नावाचा तरुण रहात असे. त्याने सर्व शास्त्रांचा अभ्यास तर नव्हता केला; पण तो एक शीघ्रकवी असून सुंदर सुंदर कविता रचून लोकांना त्या ऐकवत असे.

चन्द्रशेखर एका गरीब ब्राह्मणाचा मुलगा होता. जे जे त्याची कविता ऐकत, ते सारे त्याला सुचवू लागले की, ''तू कौशांबी महाराज विजयभूपती यांच्याकडे जाऊन त्यांना आपल्या कविता ऐकव. फार प्रसन्न होतील ते तुझ्यावर; अन् तुला नक्की राजाश्रय देतील.''

परन्तु कौशांबी राज्यात एक रीत होती. राज्यातला प्रत्येक कलाकार प्रथम आपल्या आसपासच्या एकाद्या जमीनदाराच्या आश्रयाला जाई. या जमीनदाराच्या संस्थानात काही दिवस घालवल्यावर योग्यतेप्रमाणे जमीनदार स्वतःच त्या कलाकाराला शिफारसपत्र देऊन राजाकडे पाठवत असे.

ही परंपरागत रीत मोडायची चन्द्रशेखरची इच्छा नव्हती. म्हणून त्याने जवळच्या चक्रधरपुरच्या जमीनदाराच्या आश्रयाला जायचे ठरवले. पित्याने पंचागातून काढून दिलेल्या सुमुहूर्तावर तो जमीनदाराकडे निघाला.

जमीनदार वीरवर्धनच्या घराशी चन्द्रशेखर पोचला, तेंव्हा ते एवढे विशाल भवन अगदी शान्त-शान्त पाहून त्याने ओळखले, की इथे काही गंभीर घटना घडलेली असणार. तिथ-ल्याच एका माणसाला विचारल्यावर त्याला अशी हकीकत कळली -

वीरवर्धनच्या एकुलत्या एका कन्येचा विवाह जेमतेम एका महिन्यापूर्वीच झाला होता. मुलीची अजून सासरी पाठवणी ही झालेली नव्हती. जावईही अजून सासऱ्याचाच पाहुणचार घेत होता. त्या सकाळी बागेत फिरत असताना अचानक एक विषारी साप डसून जावयाचा मृत्यु ओढवला. या दुःखद घटनेमुळेच सर्वत्र शान्तता होती.

चन्द्रशेखर शुभमुहूर्त पाहून निघाला होता,





पण तोच मुहूर्त जमीनदाराच्या जावयाला मात्र अशुभ ठरला होता. चन्द्रशेखरला यामुळे विषाद वाटला अन् तो आपल्या गावी परतला.

वडील म्हणाले, ''मी काढलेला मुहूर्त तुला लाभकारक ठरला नाही. आता यावेळी तू समीरपुरचे जमीनदार वल्लभ यांच्याकडे जा. मी आपला मित्र सुनीत शर्मा याच्याकडून मुहूर्त काढून आणतो.''

चन्द्रशेखर समीरपुरला गेला. तेथे त्याला कळले की जमीनदार कसल्याशा तीव्र रोगाने ग्रस्त झालेले आहेत. रोग कसला आहे, हे ही वैद्यांना अजून कळलेलं नाही. ते सारे गोंधळांत पडलेले आहेत.

याही वेळी प्रयत्न विफल झाल्यामुळे चन्द्रशेखर फार निराश झाला. त्याला कसलाच उत्साह वाटेना. तो तसाच घराकडे परत निघाला. वाटेत त्याने एका तलावाचं पाणी पिऊन तहान भागवली अन् थकवा घालवण्यासाठी किनाऱ्यावरच्या एका वटवृक्षाखाली बसला. थोड्या वेळाने त्याच रस्त्याने येणारा एक प्रवासीही तेथे आला. त्याने तलावाचे पाणी प्यायले व तोही झाडाखाली आला. पण आपल्याच विचारात गढलेल्या चन्द्रशेखरचे त्याच्याकडे लक्ष ही गेले नाही.

चिन्तित व दुःखी दिसणाऱ्या चन्द्रशेखरला पाहून प्रवाशाने आपण होऊनच त्याला विचारले, ''महाशय, आपण कोण आहात हे कळेल का मला?'' त्याच्या आवाजात मार्दव होते.

विचारात गढलेल्या चन्द्रशेखरने एकदम दचकून म्हटले, ''माझी माहिती जाणून घ्यावी, असा कोणी मोठा माणूस नव्हे. मी आपला एक साधासुधा अभागी जीव आहे.''

प्रवाशाला चन्द्रशेखरच्या बोलण्याचे आश्चर्य वाटले. पुन्हा एकदा त्याने चन्द्रशेखरकडे न्याहाळून पाहिले अन् तो म्हणाला, ''अरे, तुम्ही तर सरस्वतीचे मानसपुत्र आहात! तुमच्या भाग्याला कोणत्याही परिस्थितीत दुर्भाग्य नाही म्हणता येणार. जरा तुमचा उजवा हात दाखवा बरं.'' असे म्हणत जवळ बसून प्रवाशाने चंद्रशेखरचा



अुजवा हात आपल्या हातात घेतला व तो त्याच्या हस्तरेषा निरखून पाहू लागला.

हात पहात असताना प्रवाशाने मधून मधून चन्द्रशेखरला काही प्रश्नही विचारले. शेवटी मोठ्या प्रेमाने तो म्हणाला, ''अजून तीन महिने कुठेही न जाता तुम्ही आपल्या गावीच रहा. येत्या माघ शुद्ध पंचमीला तुम्ही आपल्या गावाच्या पूर्वेकडे प्रवास सुरू करा अन् पहिल्या प्रथम जो जमीनदार आढळेल त्याचाच आश्रय घ्या. यानन्तर तुमचं सगळं काही शुभच शुभ होईल !'' इतके बोलून प्रवासी आपल्या वाटेने निघून गेला. आश्चर्यात बुडालेला चन्द्रशेखर हळूच तेथून अुठला आणि प्रवाशाने सांगितलेल्या ज्योतिषाबाबत विचार करत

करत आपली वाट चालू लागला.

शेखरच्या गावच्या पूर्वेकडे गावाजवळचा जमीनदार होता नरसिंहवर्मा. शेखरचा गावही त्याच्याच जमीनदारीत येत असे. नरसिंहवर्मा म्हातारा असून त्याला पाच बायका होत्या. त्याच्या वक्रबुद्धीबद्दल निरनिराळ्या कथा प्रसिद्ध होत्या. कवि लोक त्याला ज्या कविता ऐकवत, त्यांचा आनन्द तर तो लुटत असे, पण पळभरातच त्याची वृत्ती बदले अन् त्या कवीला फक्त एक दमडी देअून तो परत पाठवी. शेखरनेही या घटना ऐकल्या होत्याच. नरसिंहवर्मा कुटिल बुद्धीचा होताच, पण त्याबरोबर त्याचे शास्त्रांचे ज्ञानही फार मर्यादित होते.

घरी पोचल्यावर चन्द्रशेखरने आपल्या पित्याला ज्योतिषाने दिलेला सल्ला सांगितला. त्याच्या म्हणण्यानुसार तीन महिने तो घराबाहेर कुठे गेला नाही. नंतर परमेश्वरावर भार टाकून तो ज्योतिषाच्या म्हणण्यानुसार नरसिंहवर्मालाच भेटायला गेला.

शेखरच्या येण्याचे कारण जाणून घेतल्यावर दिवाण त्याला म्हणाला, ''आज नरसिंहवर्मांच्या वडिलांचं श्राद्ध आहे. श्राद्धकर्मात गुंतलेले असल्यामुळे संध्याकाळ-पर्यन्त तरी ते तुला भेटू शकणार नाहीत.''

हे ऐकून शेखर निराश तर झालाच, पण त्याबरोबरच 'काहीही झालं, तरी जमीनदाराला भेटायचा' त्याचा निग्रहही दृढ



झाला.

तो दिवाणाला म्हणाला, ''मग मी संध्याकाळपर्यन्त थांबायला तयार आहे. पण आपण कृपा करून इतकी व्यवस्था करा की संध्याकाळी ते माझी कविता ऐकतील.''

शेखरच्या चेहऱ्यावरचा दीन भाव दिवाणाने पाहिला अन् त्याच्या हे ही लक्षात आले की राखेत लपलेल्या एकाद्या हिऱ्यासारखा हा चेहरा प्रकाशमान आहे !''मी नक्की जरूर ती सोय करीन'', असे वचन दिवाणाने तावडतोब देअून टाकले; अन् त्याची अतिथिगृहात रहायची व्यवस्था ही करून दिली.



पण संध्याकाळ झाली, तरी शेखरची जमीनदाराशी भेट होअू शकली नाही. सर्वत्र अंधार झाल्यावर शेवटी दिवाण तेथे घाईघाईने येअून म्हणू लागला, ''हे पहा, मी तुमच्याबद्दल मालकांशी बोललो. आज त्याच्या वडिलांचा श्राद्धदिवस अन् वडिलांना काव्य फार आवडे, म्हणून ते मला म्हणाले की, - आज स्वत:ला 'कवि' म्हणवत जो कोणी माझ्या आश्रयाला आला आहे, तो कोणी अगदी नालायक कवि असला तरी त्याला असं सांगा की, आजपासून तो माझ्या संस्थानचा कवि आहे. तेंव्हा एक हजार एकशे एक मोहोरा, रेशमी वस्त्र असा संरजाम त्याला देअून, घोडागाडीतून त्याला इकडे घेअून या. त्याला असंही सांगा की त्यानं रोज संध्याकाळी हजेरी लावून आपल्याला काव्यानन्दाचा लाभ करून द्यावा. या सगळ्याची व्यवस्था करता करता अुशीर झाला. हे घ्या धन, ही वस्त्रं. तुम्हाला घेअून जाण्यासाठी बाहेर घोडा गाडी ही तयार आहे.''

हे सारे ऐकल्यावर शेखरला हसावे की रडावे हेच कळेनासे झाले! पण बिचारा करणार तरी काय? त्याने मुकाट्याने त्या भेटवस्तु स्वीकारल्या अन् दिवाणाचा निरोप घेअून तो निघाला. निघताना जमीनदाराजवळ आपली कृतज्ञता व्यक्त करायची विनंतीही त्याने दिवाणाला केली.

यानन्तर चन्द्रशेखर एक वर्षभर जमीनदाराकडे त्याचा संस्थानी-कवि म्हणून



राहिला. त्या वृद्ध जमीनदाराकडे खूपसे इतरही खोटे, नकली कवी धनलोभामुळे रहात होते. त्यांच्या संगतीमुळे शेखरची मन:शान्तीच नाहीशी झाली; अन् शेवटी कवितेवरूनही त्याचे मन अुडाले.

अशा परिस्थितीत सांगून ठेवून ही गाडीवाला न आल्यामुळे शेखर पायीच एक दिवस पद्मनाभपुराकडे निघाला. कडक अून्ह वाटसरूंना भाजून काढत होते. शेखरला खूप तहानही लागली होती. वाटेत एक तलाव दिसल्यावर तो तेथे थांबला.

किनाऱ्यावर पगडी घातलेला एक प्रवासी अगोदरच एका झाडाखाडी विश्रान्ती घेत बसलेला होता. त्याच्यापासून थोड्याच अंतरावर त्याचा पांढरा घोडा चरत होता.

तहान भागवून शेखर जेंव्हा झाडाखाली आला, तेंव्हा प्रवासी त्याच्याकडे पाहून हसला. शेखरही हसत त्याच्या जवळ जाअून बसला.

प्रवाशाने शेखरला विचारले, "तुम्ही कोण आहात हे कळेल मला?"

हा प्रश्न ऐकताच शेखरला पूर्वीच्या प्रवाशाची आठवण झाली. त्या प्रवाशाच्या यात्र प्रश्नाला, 'मी एक अभागी माणूस आहे', असे अुत्तर दिल्याचेही त्याला स्मरले.

आता यावेळी तो अुत्तरला, "मी एक माणूस आहे. भाग्यदेवी ही माझी माता असून, दुर्भाग्य हा माझा पिता."

त्याचे अुतर ऐकून प्रवाशाने आश्चर्याने विचारले, "म्हणजे काय?" शेखर हळूच म्हणाला, "माफ करा. काहीतरीच वेड्यासारखं बोललो मी. आता आपल्या अुत्तरादाखल एक कविता ऐकवतो मी. हं ऐका तर." असे म्हणून त्याने एक भावपूर्ण शीघ्रकविता प्रवाशाला ऐकवली.

कवितेचा सारांश असा होता-स्वच्छ अुमललेल्या चांदण्यात बागेतली फुलं आपला सुगन्ध पसरवीत आहेत. त्या सुगंधामुळे आकृष्ट झालेले भुंगे फुलांतला मध तृप्तीने पीत आहेत. याच वेळी एक अद्‌भुत् सुंदरी या फुलझाडांच्या मधोमध दु:खी चेहऱ्याने बसली. तिच्या स्थितीबद्दल दयार्द्र होअून फुलांनी विचारले, "अशा सुंदर अुल्हासमय वातावरणात, एकाच दिवसात सुकून जाणारी आम्ही फुलंही आनन्द लुटत आहोत. मग फुलाप्रमाणे सुंदरशा तुझ्या मुखकमलावर मात्र हा विषाद का?"

ती युवती अुत्तरली, "होय, मी काही सुकणारं फूल नव्हे; पण मला ज्या भुंग्यांनी वेढलं आहे, ते मला आनन्द देणारे प्राणी नव्हेत, तर हवेत डोलत असता बोचणारे काटे आहेत काटे!"

पुढे शेखर प्रवाशाला म्हणाला, "ही युवती म्हणजे माझ्या हृदयातली कवितारूपी कन्या आहे. आपलं दुर्भाग्य स्वत:पुरतंच मर्यादित ठेवून आपल्या परिवाराचा सांभाळ करू शकणारा भाग्यवान माणूस आहे मी! आता कृपा करून आणखी काही विचारू नका मला. फार अुशीर झालाय, निरोप द्या मला." असे म्हणून तो निघून गेला.

यानंतर एका आठवड्यातच दोन घोडे जोडलेली एक गाडी शेखरच्या घरासमोर येअून थांबली. गाडीबरोबर आलेले दोन घोडेस्वारही आपापल्या घोड्यांवरून अुतरून शेखरला भेटले. त्यांनी विजय भूपतीचे आज्ञापत्र त्याला दाखवले. आज्ञापत्रात राजमर्यादेसह शेखरला घेअून येण्याची सूचना होती.

चन्द्रशेखरला ताबडतोब कळून चुकले की तलावापाशी आपल्याला भेटलेला प्रवासी म्हणजे खुद्द महाराजच होते.

राजप्रासादात पोचल्याबरोबर राजाने



शेखरला प्रेमाने आलिंगन दिले व म्हटले, "युवकवी, आजपासून दररोज आम्हाला आपल्या मधुर कविता ऐकवण्याची जबाबदारी आहे आपणावर!"

"यापेक्षा माझं आणखी सद्‌भाग्य ते काय प्रभु! पण माझं एक म्हणणं ऐकावं महाराजांनी! मी नरसिंहवर्माचा संस्थानी-कवी आहे. त्यांनी मला जीवन दिलंय. तेंव्हा त्यांची परवानगी घेअूनच मी आपल्या सेवेत हजर होअू शकेन."

शेखरचे बोलणे ऐकून अपार हर्षाने विजभूपती म्हणाले, "मधुर कविता चातुर्याबरोबरच तुमच्याजवळ जन्मजात मृदु संस्कार ही आहेत. मी त्याच दिवशी तुमचं सामर्थ्य जाणलं होतं."

आपल्या इच्छेनुसारच काय ते करा ! महाराजांनी दाखवलेल्या आदरामुळे शेखरचे डोळे भरून आले. - इतकी गोष्ट सांगून वेताळ विक्रमराजाला म्हणाला, ''समर्थ कवी चन्द्रशेखर याला सुखी शान्त जीवन विजयभूपतीने प्रदान केले. नरसिंहवर्माजवळ यात्रे जीवन काटेभरल्या गुलाबाप्रमाणे व्यतीत होत होते. तेंव्हा त्याचा जीवनदाता तर राजा विजयभूपतीच ना ! त्याने प्रशंसा राजाची करायला हवी.

पण शेखरचं वागणं तर अुलटंच वाटतंय. अन् त्याच्या या अविवेकीपणाचं अन् मूर्खपणाचं 'तुझे जन्मजात संस्कार अुत्तम आहेत' असं म्हणत महाराजांनी कौतुक केलं. मला त्यांच्या या बोलण्यात खोट्या स्तुतीचा वास येतोय ! बोलणं न्यायहीन वाटतंय. माहीत असूनही तू या शंकाचं अुत्तर द्यायचं टाळलंस तर तुझ्या मस्तकाच्या चिंध्या होतील.''

राजा विक्रम बोलला, ''माणसाचं जीवन कवितेपेक्षाही युक्तीशी जोडलेलं आहे. त्यामुळेच शेखरच्या परिवाराचा पहिला अन्नदाता नरसिंहवर्माच आहे. हां, तो शेखरचा रक्षक नव्हता, काव्यरसात त्याला पुरेशी रुचि नव्हती, पण त्याच्या या दोषांवर बोट ठेवणं चूक आहे. शेखरने तसली चूक केली नाही, कारण तो चांगल्या संस्कारात वाढलेला आहे. आपल्या मनचं दुःख त्यानं कवितेद्वारे व्यक्त केलं, पण नरसिंहवर्माचे नाव मात्र त्याने कुठेही, कधीही अुच्चारले नाही. म्हणूनच 'तुझ्यावर चांगले संस्कार घडलेले आहेत' अशी महाराजांनी त्याची स्तुती केली. महाराजांनी त्याला आदर दाखवला, तेंव्हा शेखरचे डोळे भरून आले. त्या भरल्या डोळ्यांनीच तो आपली कृतज्ञता इतक्या अुत्तम प्रकारे व्यक्त करू शकला नसता. यावरून सिद्ध होतं की, चन्द्रशेखर अन् विजयभूपति हे दोघेही चांगले बुद्धिमान आहेत, अुत्तम व्यक्ती आहेत. ते मूर्ख तर नक्कीच नाहीत.''

राजाचे मौन भंग करण्यात अशा प्रकारे विजयी झालेला वेताळ पुन्हा शवासह अदृश्य झाला अन् झाडावर लटकू लागला.

**आधार : सुरिणाची एक कथा**





# शिवाजीचे किल्ले

लेखिका : मीरा गुप्ता ◆ चित्रकार : अरित्रा

नेऋत्य भारतातील सारे किल्ले म्हणजे महाराष्ट्राचे श्रेष्ठ वीर शिवाजीमहाराज यांच्या चरित्राचे अविभाज्य अंग होत.

सातवाहनांचा एक जुना किल्ला शिवनेरी येथे त्यांचा जन्म १९ फेब्रुआरी, १६३० रोजी झाला.

त्यांनी जिंकलेला पहिला किल्ला म्हणजे तोरणा. १६४६ मधे हा किल्ला कोणाचे जरासेही रक्त न सांडता त्यांनी जिंकला; कारण यावेळी पावसाळ्यामुळे विजापूरची संरक्षक सेना किल्ला तसाच सोडून स्वदेशी निघून गेली होती. या किल्ल्यात शिवाजी महाराजांना जमिनीत गाडून ठेवलेला मोठा खजिना सापडला असे म्हणतात. तोरण्या-पासून केवळ नऊ कि.मी. अंतरावर असलेला राजगड हा किल्ला त्यांनी याच धनातून बांधला. यानंतरची वीस वर्षे त्यांनी येथूनच राज्यकारभार संभाळला. १६४७ मधे त्यांनी कोंडाणा किल्ला जिंकून घेतला, पण पुरंदरच्या तहाच्या अटीनुसार त्यांना तो मोगलांच्या ताब्यात द्यावा लागला.



तोरणा किल्ला



रायगडावरील बुरुज

१६७० मधे त्यांनी तानाजी मालुसरे अन् त्याचा भाऊ सूर्याजी यांच्या नेतृत्वाखाली ६०० मावळे सैनिक पाठवून तो किल्ला परत घेतला. यशवन्ती नावाच्या घोरपडीला दोर बांधून किल्ल्याच्या पश्चिमेकडील खड्या कड्यावरून वर पाठवून तिच्या साह्याने हा किल्ला ताब्यात घेतला गेला असे म्हणतात. घोरपड आपल्या नख्यां जमिनीत घट्ट रोवून धरू शकते. या दोराच्या साह्याने हलक्या वजनाचा एक मावळा वर चढून गेला. त्याने बांधलेल्या भक्कम दोरावरून तानाजींसकट ते जवळजवळ ६०० मावळे कडा चढून गडात पोचले. किल्ला सर झाला. पण एकूणात हजारापेक्षा जास्त माणसे लढाईत कामी आली. तानाजीही त्यातच एक होता. शिवाजीला जेव्हा ही वार्ता कळली, तेव्हा तो उद्गारला, ''गड आला, पण माझा सिंह गेला !'' आणि कोंडाण्याला नवीन नाव प्राप्त झाले – 'सिंहगड'.


तानाजी मालुसरे

राज्याचा पसारा वाढल्यावर शिवाजीमहाराजांना नव्या मोठ्या राजधानीची जरुरी भासू लागली, अन् त्यांनी त्यासाठी 'राजगिरी' किल्ल्याची निवड केली. बाराव्या शतकातला हा जुना किल्ला डोंगरावर असणाऱ्या समतल भागावर बांधलेला असून त्याची लांबी रुंदी २.४ x १.६ कि.मी. इतकी आहे. डागडुजी केल्यानंतर त्याला 'रायगड' असे नवे नाव देण्यात आले. याच किल्ल्यात ६ जून, १६७४ रोजी शिवाजी महाराजांना राज्याभिषेक करण्यात आला.


शिवाजीमहाराजांचा राज्याभिषेक

कोणाला नकळत किल्ल्यात शिरण्यासारख्या काही वाटा असल्यास त्या शोधून बन्द करण्यासाठी महाराजांनी असे करून दाखवणाऱ्यास भले मोठे बक्षिस जाहीर केले. महाड नावाच्या खेड्यातला एक तरुण या कामात सफल झाला. तो आलेली वाट त्या जागी एक भक्कम दरवाजा बांधून नीट बन्द करण्यात आली. दरवाजाला नाव दिले – 'चोर दरवाजा'. नंतर एकदा जवळच्या गावातली हिरकणी नावाची गवळण उशीर झाल्याने रात्री किल्ल्यातच अडकली. महाराजांच्या आज्ञेने ठरीव वेळी बंद करण्यात येणारा दरवाजा उघडायला रखवालदाराने नकार दिला. आपल्या घरी असणाऱ्या लहान मुलाजवळ पोचण्यासाठी हिरकणीने किल्ल्याची एक सोयिस्कर भिंत ओलांडली अन् त्या जागी एकदम खोल होत जाणारा डोंगर अंधारातच ती उतरून गेली. ज्या ठिकाणी तिने हे साहस केले, त्या जागी महाराजांनी एक बुरूज बांधला व त्याला नाव दिले 'हिरकणी बुरूज'.


हीराकणींचे साहस

शिवाजीमहाराजांची समाधी या रायगड किल्ल्यातच बांधलेली आहे. त्यांच्या चितेत उडी मारून जीव देणाऱ्या त्यांच्या स्वामी भक्त 'वाघ्या' नावाच्या कुत्र्याची समाधीही समोरच आहे.


किल्ले रायगड


शिवाजी महाराजांची समाधी



जंजिरा किल्ला

आपल्या आयुष्यात अनेकदा प्रयत्न करूनही शिवाजी महाराज जिंकू न शकलेला किल्ला म्हणजे १५११ मधे मलिक अंबरने बांधलेला जंजिरा 'किल्ले सिंधुदुर्ग'. पोर्तुगीज व इंग्रजांना ही हा किल्ला सर करता आला नाही. या किल्ल्यामुळेच प्रोत्साहन घेऊन शिवाजीमहाराजांनी असे काही जंजिरे बांधले. समुद्रकिनाऱ्यावरील 'सिंधुदुर्ग' बांधायला जवळजवळ तीन वर्षे लागली आणि एक कोटी होन खर्च झाले. हा जंजिरा बांधायच्या कामावर महाराजांनी शंभरएक पोर्तुगीज कामगारांचीही नेमणूक केली होती. त्यांनी असाच एक 'पद्मगड' नावाचा जंजिरा बांधून त्याचा जहाजे बांधण्यासाठी अुपयोग केला.

जंजिऱ्यापासून नैऋत्येकडे जेमतेम ५६ कि.मी. दूर असणारा एक किल्ला घेऊन महाराजांनी जिंकला. त्याची डागडुजी करून त्याला नाव दिले 'सुवर्णदुर्ग'. या ठिकाणाहूनच त्यांनी सिद्दीच्या हालचालीवर कायम नजर ठेवायची व्यवस्था केली.

१६८० साली मृत्युसमयी शिवाजी महाराजांच्या ताब्यात २४० किल्ले होते.

सुवर्ण दुर्ग







# इन्दुमतीचा विवाह

धर्मपाल हा भद्रावती राज्याचा युवराज होता. गुरुकुलात विद्याभ्यास करून तो राजधानीत परत आला होता. आता आपल्या पित्याबरोबर राहून त्याने राजनीती व शासन-पद्धती नीट जाणून घेअून त्यात प्राविण्य संपादणे आवश्यक होते. पण त्याला शिकारीचाच फार नाद होता. तो आपला सारा वेळ डोंगरअुतरणीवरील जंगले तुडवणे आणि नदीतटाकी आराम करणे यातच घालवी. स्वभावत: तो चंचल होता; अविवेकाने गडबड-घाईत तो आपले निर्णय घेई.

आपल्या पुत्राच्या या वागणुकीने राजा चिंतित असे. त्याला राजनीती व शासन-प्रणालीचे धडे कसे द्यावेत हे राजाला कळेनासे झाले. अशातच अचानक त्याचा मृत्यु ओढवला आणि धर्मपाल राजा बनला. आता त्याचे वय एकवीस वर्षांचे होते. अल्प वयातच ही मोठी जबाबदारी त्याच्यावर येऊन पडली. ती पेलण्याची खरे म्हणजे त्याची योग्यता नव्हती.

राजा बनल्यावरही धर्मपालच्या स्वभावात कसला बदल घडला नाही. पूर्वी प्रमाणेच तो अेकटा शिकारीला जाई. तरीही राज्यकारभार सुरळीत चालू होता, कारण मन्त्री सुबुद्धी अनुभवी, विश्वासू अन् समर्थ होता. सेनापती वीरवर्मा अुत्तम देशभक्तही असल्याने ते दोघे मिळून शासनाचा गाडा व्यवस्थित हाकत.

एके दिवशी सूर्योदय होताच धर्मपाल एकटाच शिकारीला निघाला. जंगलात तो बराच वेळ शिकार करत राहिला आणि दुपार होता होता दमून गेला. तहान लागल्यामुळे तो पाण्याच्या शोधात निघाला. शेवटी घनदाट झाडींने वेढलेले एक सरोवर त्याला दिसले.

घोड्यावरून अुतरून धर्मपालने आपली

शिवाजीराव काळे



तहान भागवली. घोड्याने ही पाणी पिऊन घेतले. त्याचा लगाम पकडून धर्मपाल तेथून निघाला अन् सरोवरा पलिकडील दृश्य पाहून चकित झाला, अन् क्षणभर जागीच उभा राहिला.

पलिकडे एक कुटीर असून तिच्या भोवती तऱ्हेतऱ्हेची फळझाडे अन् रंगीबेरंगी फुलांचे ताटवे असलेली ती झोपडी कसली, कोणाची वगैरे जाणण्यासाठी तो पुढे झाला. झोपडीजवळ पोचल्यावर त्याला दिसले की एक असामान्य सुन्दरी एका पोपटाला पेरू खायला घालत होती. अन् पोपटाचा पिंजरा झाडाला टांगलेला होता.

पोपट एकदम बोलला, ''अतिथींचे स्वागत असो !''

पोपटाच्या बोलण्याने चमकून तिने मागे वळून पाहिले. त्याला पाहून आश्चर्याने ती जागीच खिळल्यासारखी उभी राहिली.

इतके अद्‌भुत लावण्य पाहून तोही उभाचा उभाच राहिला.

स्वतःला सावरत ती युवती म्हणाली, ''दुपारच्या उन्हातून आपण आला आहात. आपणास खूपच तहान लागली असेल. थंड पाणी आणते मी.'' अन् ती झोपडीत जायला निघाली.

पण तिला थांबवत तो म्हणाला, ''हे कष्ट करायची काही आवश्यकता नाही. आत्ता सरोवराचं पाणी पिऊनच आलोय मी. तुम्ही कोण हे कळेल मला? एकट्या तर नाही रहात ना या जंगलात? आत्तापर्यंत कित्ती राजकन्या पाहिल्या आहेत मी, पण सौन्दर्याच्या दृष्टीने, तुमच्यापुढे त्या कोणीच नव्हेत.''

आपली स्तुती ऐकून ती काहीशी लाजली आणि हसत म्हणाली, ''मी एकटी नाही रहात इथे. लहानपणीच माझी आई वारली. पाच वर्षांपूर्वी सर्पदंशाने माझे पिताजीही गेले. त्यांनी मला आपल्या एका मित्राच्या हाती सोपवलं होतं. तो माझा ढालीसारखा संरक्षक एक शिकारी आहे. या झोपडीत आम्ही दोघं रहात असतो. या भागात रहाणाऱ्या पन जातीच्या लोकांना झाड-पाल्यांची औषधं देऊन त्यांच्या व्याधींवर इलाज करायचं काम करते मी. माझ्या वडिलांनी मला ही विद्या शिकवली आहे. माझं नाव इन्दुमति !''

''माझं नाव धर्मपाल. या देशचा राजा आहे मी.'' धर्मपाल बोलला. त्याचा स्वर गर्वयुक्त होता.

इन्दुमतीला त्याच्या बोलण्याचे काही आश्चर्य वाटले नाही अन् भयही नाही वाटले. ती म्हणाली. ''आपणाला पहाताच मला वाटलं होतं, की आपण कोणी राजा असणार. आपलं नाव तर ऐकलं होतंच मी, पण दर्शन प्रथमच होत आहे.''

धर्मपाल आणखी काही बोलणार, इतक्यात झोपडीकडे जात इन्दुमती म्हणाली, ''माफी असावी! या वस्तीचा प्रमुख आजारी आहे. मी त्यावर इलाज करते आहे. आत्ता ताबडतोब जाऊन त्याला काही औषधं द्यायची आहेत मला, निघते मी ! औषधोपचाराला उशीर होणं योग्य नाही.''

पण तिला थांबवत धर्मपाल म्हणाला, ''इन्दुमती, तू असामान्य सुन्दर आहेस. तुझ्यासारख्या लावण्यवतीनं जंगलात रहाणं बरं नाही वाटत. इथे क्रूर जनावरांच्या सान्निध्यात राहून या जंगली जातीच्या लोकांची सेवाशुश्रूषा करत तुझ्यासारखीनं आपलं जीवन व्यतीत करणं मलाच लाजिरवाणं वाटतंय. तू माझ्याबरोबर चल. राजधानीला पोचल्याबरोबर तुला आपली राणी बनवीन मी.''





एकवार धर्मपालकडे तिरस्काराच्या दृष्टी-ने पहात इन्दुमति तशीच आपल्या झोपडीकडे निघाली, तेंव्हा पुन्हा तिला थांबवत धर्मपाल म्हणाला, ''स्वत: होऊन मी तुला बोलवत असताना, एका राजाचा तिरस्कार करते आहेस तू? केव्हा तरी तुला याचा पश्चात्ताप झाल्याशिवाय राहणार नाही.'' अन् त्याने तिचा हात पकडून आपल्या घोड्याकडे तिला खेचून नेण्याचा प्रयत्न चालवला.

धर्मपालच्या पकडीतून आपला हात सोडवून घेण्याचा प्रयत्न करत, ''शी: ! स्पर्श करू नका !'' असे इन्दुमती ओरडली.

तरीही धर्मपाल जबरदस्तीने तिला आपल्या घोड्यावर बसवायच्या प्रयत्नाला लागला. इतक्यात एक बाण वेगाने येऊन त्याच्या दंडात घुसला.

वेदनेने विव्हळत धर्मपालने दुसऱ्याच क्षणी इन्दुमतीला सोडून दिले. बाण आल्या दिशेकडे इन्दुमतीने वळून पाहिले; तो दूर वर आपला रक्षक एका झाडाखाली उभा असलेला तिला दिसला. त्याचा चेहरा रागाने फणफणला होता, डोळे लाल होते; जणू आग ओकत होते ते.

इन्दुमतीने ताबडतोब धर्मपालला आधार देऊन त्याला आपल्या झोपडीकडे नेले. आत गेल्यावर त्याला खाटेवर बसवून दंडातला बाण उपसून काढला व ताबडतोब जखमेवर झाडपाल्याच्या रसाचा लेप लावत ती बांधून टाकली.

एवढ्यात तो रक्षकही तेथे आला. येताच त्याने विचारले, ''कोण आहे हा अधम राजा? किती अहंकार आहे याला!''

धर्मपाल त्याला म्हणाला, ''माफ करा, चूक झाली माझ्या हातून! त्यावेळी माझ्या डोळ्यांवर जशी काही चरबी चढली होती !''

त्याच्या या उत्तराने संरक्षक काहीसा शान्त झाला. संकेत करून इन्दुमतीने त्याला बाहेर जायला सांगितले.

थोड्या वेळाने झोपडीबाहेर येऊन धर्मपाल आपल्या घोड्यावरून राजधानीकडे निघून गेला.

यानन्तर बरोबर एक आठवड्याने मन्त्री सुबुद्धी बऱ्याचशा भेटवस्तु घेऊन इन्दुमतीच्या झोपडीत आला. तो म्हणाला, ''मुली, या भेटी आपल्या राजाने पाठवल्या आहेत. लहानपणापासूनच त्यांचा स्वभाव चंचल आणि उतावळा आहे. आठवड्यापूर्वी इथे जे काही घडलं, तेंव्हापासून त्यांच्या स्वभावात आमूलाग्र बदल घडला आहे. त्यांनी प्रतिज्ञा केलीय की, 'प्रायश्चित्त म्हणून आपण कधीही विवाह करणार नाही.'

मन्त्र्याचे बोलणे ऐकून इन्दुमतीचे मन दयेने विरघळले. अश्रूंवर काबू ठेवत, मन्त्र्या-जवळच उभ्या असलेल्या आपल्या संरक्षकाला ती म्हणाली, ''काका, श्रावणमास सुरू होताच महाराजांना इथे येऊन, माझ्याशी विवाह करून मला घेऊन जायला कळवा.''

एका महिन्यातच धर्मपाल-इन्दुमति विवाह मोठ्या थाटात साजरा झाला.

विवाहाच्या दुसऱ्याच दिवशी दोघेजण संध्याकाळी राजमहालाच्या गच्चीवर हिंडत थंड हवेचा आस्वाद घेत होते. तेंव्हा हसून इन्दुमती म्हणाली, ''पाहिलंत मी तुमचा प्रतिज्ञाभंग कसा केला ते?''

ताबडतोब अर्थबोध न झाल्यामुळे थोड्याच क्षणात स्वत:ला सावरत तिच्याकडे पाहून धर्मपाल म्हणाला, ''हं, केलास खरा ! पण शेवटी तू निर्णय कसा फिरवलास ते सांग. प्रथम तर तू माझा अव्हेर केला होतास; पण मग स्वत:च विवाहाचा निरोप कसा काय पाठवलास?''

''क्षमा करा महाराज, पण तुमच्या उतावळेपणामुळे अन् मर्यादा ओलांडणाऱ्या अहंकारामुळे मी तुमचा अव्हेर केला खरा; पण नंतर भेटी घेऊन आलेल्या मन्त्र्याचं बोलणं ऐकून अन् तुमची प्रतिज्ञा जाणून तुम्ही माझ्यावर मनापासून प्रेम करताय अन् तुमच्यात पूर्ण बदल झाला आहे, हे सारं जाणलं मी. यामुळेच मी स्वत: विवाहास अनुमति असल्याचा निरोप पाठवला.'' स्मितहास्य करत इन्दुमती उत्तरली.

तिच्या बोलण्याने धर्मपालही फार प्रसन्न झाला.





# शंकानिरसन

सौशिल्य देशचा राजा सर्वोत्तम हा केवळ अुत्तम शासन कर्ताच नव्हे, तर एक चांगला कलोपासकही होता. आपल्या राज्यातल्या प्रत्येक कलाकाराचा तो आदर करी. हरतऱ्हेच्या कलांमधे प्रवीण असणारांना राजाश्रय देअून त्याने आपली ही अभिरुची सिद्ध केली होती.

एकदा सर्वोत्तम आपली पट्टराणी निर्मला देवी हिच्यासह अुद्यानात हिंडत असता दरबारातील प्रमुख कवि संजय तेथे आला. काही दिवसातच राजा 'सर्वकला सम्मेलन' नावाचा अुत्सव साजरा करणार होता. या सम्मेलनात प्रतिभाशाली कलाकारांचा एक जंगी स्वागत समारंभ करायचा असे त्याने ठरवले होते. या संबंधातच चर्चा करण्यासाठी संजय तेथे आला होता.

या दोघांचे संभाषण लक्षपूर्वक ऐकून राणी निर्मलादेवी राजाला म्हणाली, "मला तर असं वाटतंय की हे सम्मेलन भरवून तुम्ही जनतेचा पैसा वाया घालवणार आहात. कारण माणसाला मुख्य आवश्यक वस्तु म्हणजे अन्न, पाणी आणि निवारा. हे सर्व जनतेला भरपूर मिळावं. या दिशेनं तुम्ही काही कराल तर छान होईल."

राणीचे बोलणे ऐकून संजयचा चेहरा विवर्ण झाला. सर्वोत्तमला वाटले की, कोणी आपले डोकेच अुडवले आहे! आणखी काहीही न बोलता राजाची अनुमती घेअून संजय तेथून निघून गेला.

राणीकडे पहात सर्वोत्तम समजावणीच्या सुरात बोलू लागला, "देवी, भगवंताच्या कृपेनं आपल्या प्रजेला कशाचीही कमतरता नाहीय." अशी सुरुवात करून नंतर ललित कलांची वैशिष्ट्ये, मानवाला त्यांची आवश्यकता वगैरे गोष्टी तिला सांगू लागला. या विषयावर दोघांचा वादही झाला. शेवटी राणी आपलाच हेका धरत म्हणाली, "तुम्ही काहीही म्हणा, पण माणसाला खरोखरी अन्न, पाणी अन् निवारा याच वस्तु आवश्यक आहेत."

"होय, तुझं म्हणणं बरोबरच आहे. जगण्यासाठी माणसाला अन्न हवंच. पण फक्त तेवढं मिळाल्याने माणूस संतुष्ट राहू शकत नाही." राजा पुन्हा म्हणाला.

इतक्यात विदुषक तेथे आला. त्याने दोघांचे म्हणणे ऐकून घेतले. ते जेंव्हा आपापल्याच निर्णयावर अडून राहू लागले, तेंव्हा त्या दोघांनी विदुषक धरहास याच्यावर आपल्या वादातला सत्य व असत्य पक्ष ठरवायची जबाबदारी सोपवली.

धरहास थोडा वेळ विचारात पडला. नन्तर त्याने जवळच काम करत असलेल्या पहारेकऱ्याला आपल्या जवळ बोलवून त्या दोघांच्या मतांबद्दल सांगितले व त्याचा अभिप्राय विचारला. तो हसत म्हणाला, "माणसाला अन्नच तर महत्त्वाचं आहे. त्यानंतरच इतर वस्तूंची पाळी."

"असं नको म्हणूस. फक्त अन्न मिळाल्यानेच माणूस जिवन्त राहू शकेल का?" धरहासने विचारले.

"का नाही रहाणार? राहील की जिवन्त!" पहारेकरी पटकन बोलला.

आता राणी निर्मलादेवीकडे पहात विदूषक तिला म्हणाला, "राणीसरकार, आपण मला पंधरा दिवसांची मुदत द्या. याच पहारेकऱ्याच्या तोंडून मी आपलं शंकानिरसन करवीन."

राणीने हसतच कबुली दिली.



सरला बोरकर

नंतर धरहासने त्या पहारेकऱ्याला कैद करून एका खोलीत कोंडून ठेवले, अन् त्याच्या खाण्यापिण्याची नीट व्यवस्था करवली. एका आठवड्यानंतर बाहेर बोलावून धरहास त्याला राजाकडे घेऊन गेला. तेथे त्याने विचारले, ''काय रे, तुझे हे सात दिवस कसे काय गेले?''

''महाराज, फार त्रास झाला मला. कधी ना कधी तरी आपण मला सोडवाल, या आशेवरच मी ते दिवस घालवले कसेतरी. ती आशा नसती, तर आत्महत्याच केली असती मी.'' पहारेकरी अुत्तरला.

धरहास महाराणीला म्हणाला, ''ऐकलंत ना महाराणी? माणसाला जगण्यासाठी अन्नाची गरज आहे, ही गोष्ट पूर्णतः मान्य आहे मला. पण केवळ अन्न मिळूनच तो सुखाने राहू शकत नाही. अन्न केवळ त्याचं प्राणरक्षण करू शकतं, पण माणसाला सुख अन् तृप्तीही हवी असतेच ना! त्यासाठी आनन्द, आह्लाद, विचार, आवेश या सगळ्यांचीच गरज असते. निसर्गातलं सुन्दर फूल पाहून आपल्याला खूप आनन्द वाटतो, त्यामुळे डोळ्यांना आनन्द मिळतो. लयबद्ध मधुर स्वर कान तृप्त करतो. अशा प्रकारे आपल्या सर्व ज्ञानेन्द्रियांना संतोष देणारे कित्येक विषय या पृथ्वीतलावर आहेत. या सर्वांशिवाय जीवन कसे रसहीन, कंटाळवाणे होईल याचा विचार करा. थोर लोकांनी, वाडवडलांनी सांगितलं आहे की जिवन्त रहाण्यासाठी अन्न हवं, पण केवळ अन्नच जगण्यासाठी पुरेसं नव्हे. थोरामोठ्यांच्या या शब्दांची मी आपणाला आठवण देअू इच्छितो.''

सर्वोत्तमने एकदम टाळ्या वाजवल्या अन् राणीकडे तिरक्या नजरेने पाहून घेतले. राणीने मान खाली घातली, जणू तिला आपली चूक पटली.

राजा राणीला म्हणाला, ''बरं झालं, तुझं शंकानिरसन झालं. पण त्यासाठी बिचाऱ्या या पहारेकऱ्याला मात्र एक आठवडा तुरुंगवास घडला!''

राणीने त्याची भरपाई करण्यासाठी तावडतोब आपल्या गळ्यातली मोत्यांची माळ काढून पहारेकऱ्याच्या स्वाधीन केली.






द्रौपदीच्या स्वयंवरासाठी कित्येक राजे कांपिल्यनगरात जमा झाले. त्या सर्वांची निरनिराळ्या ठिकाणी रहाण्याची व्यवस्था करण्यात आली होती. पांडव ब्राह्मणवेषातच तेथील एका कुंभाराच्या घरी राहून भिक्षा मागून पोट भरू लागले.

पुत्रीचा विवाह आपण अर्जुनाशी करू इच्छितो, ही गोष्ट द्रुपदाने प्रकट होअू दिली नव्हती. परन्तु त्याने एका अवजड अशा धनुष्याची योजना केली; व त्यावर बाण चढवून वर अधांतरी लोंबत चक्राकार फिरणाऱ्या मत्स्ययन्त्रातील माशाचा डोळा भेदणाऱ्या शूर व कुशल वीराच्याच गळ्यात द्रौपदी माळ घालील, असा पण जाहीर केला.

स्वयंवरात भाग घेण्यासाठी कौरव-राजकुमार व कर्ण आले होते. याशिवाय केवळ हा सभारंभ पहायला अुत्सुक असणारे इतर खूपसे राजे, ब्राह्मण, ऋषी इत्यादीही आले होते. द्रुपदराजाने त्या सर्वांचे सादर स्वागत केले.

नगराच्या पूर्व दिशेला स्वयंवर-मंडप बनवण्यात आला होता व तो अुत्तम प्रकारे सजवला होता. क्षत्रीय व ब्राह्मण आपापल्या योग्यतेप्रमाणे स्थानग्रहण करून बसले. द्रुपदाचे वैभव पाहून ते फार आनन्दित झाले होते. अुपस्थित सर्वांच्या मनोरंजनासाठी नृत्य गायनादि कार्यक्रम प्रस्तुत करण्यात आले होते. हे कार्यक्रम पाहुणे जमायला सुरुवात होण्यापूर्वीच आयोजित झाले होते.

शेवटच्या दिवशी - स्वयंवराच्या दिवशी

**द्रौपदीस्वयंवर**



- द्रौपदीने मंगल स्नान केले अन् खूपसे सुवर्ण आभूषण धारण केले. नन्तर आपल्या हातात सुवर्ण पुष्पांची स्वयंवर-माला घेऊन तिने स्वयंवर-मंडपात प्रवेश केला. द्रुपदराजाचा पुरोहित सोमक याने तेथे अगोदरच अग्निकुंड प्रज्वलित करून ठेवले होते. त्याने द्रौपदीचे स्वागत केले. ती आल्याबरोबर मंगलवाद्ये वाजू लागली.

धृष्टद्युम्न सर्व आसनस्थ लोकांसमोर आला व त्याने त्यांना पाच बाण व मत्स्य यन्त्र दाखवून त्याची माहिती दिली. तो लोकांना अुद्देशून म्हणाला, ''जो कोणी हे पाच बाण मारून मत्स्यभेद करील, त्याच्या गळ्यात माझी भगिनी कृष्णा अूर्फ द्रौपदी आपल्या हातातली सुवर्णमाला घालील. तेंव्हा आपणापैकी जे कोणी धनुर्विद्या पारंगत असतील, त्यांनी पुढे होअून आपले भाग्य आजमावून पहायला हरकत नाही.'' यानंतर त्याने द्रौपदीला सर्व अुपस्थित राजांचा परिचय करून दिला. तेथे हजर मंडळीत दुर्योधन, शल्य, विराट, शकुनी, अश्वत्थामा,अक्रूर, सांबा, प्रद्युम्न, कृष्ण, कृतवर्मा, अनिरुद्ध, सुशर्मा, शिशुपाल, चित्रांगद, भगदत्त, पौंड्रक, वासुदेव असे कित्येक प्रमुख लोक होते.

कामदेवाच्या सहाव्या बाणासारख्या अद्भुत सुन्दर दिसणाऱ्या द्रौपदीकडे सर्वजण अपलक पहातच राहिले ! अन्य ब्राह्मण लोकांच्या मेळाव्यात बसलेल्या व ब्राह्मणवेषातच असलेल्या पांडवांना कृष्णाने ओळखले व त्याने ही गोष्ट बलरामालाही सांगितली.

मत्स्ययन्त्राचा वेध घेण्याचा कार्यक्रम सुरू झाला. एकएक करून राजे व राजकुमार पुढे येत राहिले; परन्तु त्या अजस्र धनुष्याला नुसता बाण लावणेही त्यांना शक्य झाले नाही. बिचारे खाली मान घालून परत फिरले. अशा प्रकारे खूपजण पराजित झाल्यावर कर्ण पुढे आला; आणि धनुष्य अुचलून बाण लावायच्या अुद्योगाला लागला. त्याची सहजता पाहून 'आता तोच स्वयंवर जिंकणार' असे अनेकांना वाटू लागले. भाटही कर्णाची स्तुति गाअू लागले. ते ऐकून द्रौपदी अचानक दृढस्वराने



म्हणाली, ''मी एका सूतपुत्राला कदापीही वरणार नाही.'' या अचानक वक्तव्यामुळे कर्ण फार क्रोधित झाला. परन्तु सूर्यबिंबाकडे पहात, स्वतःवर ताबा ठेवत तो आपल्या आसनाकडे परतला. कर्णानन्तर शिशुपाल, जरासंध, शल्य इत्यादीही पराभूतच झाले.

आता आणखी कोणीही राजा पुढे होईना व अुपस्थितांच्यात कुजबुज सुरू झाली. इतक्यात ब्रह्मवृन्दात बसलेला अर्जुन अुठून पुढे आला. त्याने धनुष्य अुचलून आपल्या हातात घेतले. ते पाहून सारे ब्राह्मण आश्चर्यात पडले, व म्हणू लागले, ''एवढे महापराक्रमी शल्य, जरासंध, शिशुपाल यांच्यासारख्या राजांनाही जे जमले नाही, ते हा ब्राह्मण काय करू शकणार ? हा नक्कीच आम्हा ब्राह्मणांना खाली पहायला लावणार !'' काहीजण तर असेही म्हणू लागले की, ''हा बलशाली असेलच, विद्यानिपुणही असला पाहिजे. नाहीतर असलं साहस कसं करू धजेल?''

अर्जुन धनुष्याजवळ आला. त्याने सर्वांना नम्रतेने प्रणाम केला, आपल्या गुरूंचे मनोमन स्मरण केले. नंतर श्रीकृष्णाचेही स्मरण केले आणि अगदी नेहमीच्या ज्या सहजतेने तो स्वतःचे धनुष्य पेलत असे, त्याप्रमाणे ते धनुष्यही पेलून त्याने पाचही बाण त्यातून सोडून मत्स्ययंत्राचा भेद केला. काय घडतंय हे न कळून क्षणभर सर्वजण अवाक् झाले. अन् लगेच त्यांच्या हर्षध्वनी व टाळ्यांच्या आवाजाने आकाश दुमदुमले. ब्राह्मणांनी अति हर्षाने आपले हात वर उचलले. आनंद व हर्षाने गद्गद् होअून द्रुपदराजाही काही वेळ अर्जुनाकडे एकटक पहात राहिला.

स्वयंवरासाठी आलेल्या सर्व राजांना हा आपला अपमान वाटला. ते म्हणू लागले, ''या द्रुपदाने आम्हाला झाडावर चढवले, पण फळ तोडण्यापूर्वीच त्यानं आम्हाला खाली पाडलं. आपल्या कन्येचा विवाह हा एकाद्या क्षत्रियाशी न करता ब्राह्मणाशी करून देणार? ब्राह्मणांच्यात स्वयंवराची रीत तरी आहे का? एका ब्राह्मणाशी ती कशी विवाह करील? आमचा अपमान केल्याबद्दल याला शिक्षा व्हायलाच हवी. द्रौपदीनं अजूनही एकाद्या क्षत्रियाला वरलं तर ठीक आहे. नाहीतर तिला आपण या अग्नीत परत फेकून देअू. हा तरुण ब्राह्मण असल्यानं आपण याला कसली शिक्षा नाही करू शकणार.'' त्यांनी आपापल्या तलवारी म्यानाबाहेर अुपसल्या आणि द्रुपदाला घेरायचा प्रयत्न केला. द्रुपद घाबरून ब्रह्मवृन्दात जाअून लपला. भीम-अर्जुन यांनी आक्रमकांना अडवले. तेंव्हा ते या दोघांवर बाणांचा वर्षाव करू लागले. तेंव्हा जवळचा एक वृक्ष अुपटून हातात धरून भीम बाण अडवू लागला. अर्जुन त्याच्याजवळच अुभा राहिला. द्रुपदाला वाचवण्यासाठी ब्राह्मण त्या हल्लेखोरांना दगड फेकून मारू लागले. पण अर्जुनाने त्यांना तसे करण्यापासून परावृत्त केले. आणि ज्या धनुष्याने त्याने पण जिंकला होता, तेच अुचलून तो बाण सोडू लागला. शल्य व कर्ण यांनी ठरवले की, हा ब्राह्मण असला तरी आता याला मारायला काही हरकत नाही. अर्जुन व कर्ण समोरासमोर येअून युद्ध करू लागले. अर्जुनाचे कौशल्य पाहून चकित होअून कर्ण त्याला विचारू लागला, ''अरे ब्राह्मणा, तुझ्या हस्तकौशल्याचं कौतुक वाटतंय मला. माझ्याशी लढायचं सामर्थ्य फक्त अर्जुनातच होतं. तू आहेस तरी कोण?'' परन्तु त्याला काहीही अुत्तर न देता, अर्जुनाने आपले काम चालूच ठेवले. कर्णाने ओळखले की, या ब्रह्मतेजापुढे आपण फिके आहोत; म्हणून त्याने लढणे सोडून दिले.



या अवधीत शल्य व भीम यांची लढाई जुंपली होती. शल्याला मारायची इच्छा नसल्याने भीमाने त्याला अुचलून दूर फेकून दिले. हे पाहून ब्राह्मण शल्याला हसू लागले. इतर राजकुमारांमधे पुढे होअून या दोघांशी लढण्याचे धाडस नव्हते.

एव्हाना सर्वांनीच ओळखले, की हे कोणी सामान्य ब्राह्मण नव्हेत. ते कोण आहेत हे जाणायची त्यांची अुत्सुकता वाढू लागली. कृष्ण सर्व राजांना अुद्देशून बोलला, ''या ब्राह्मणाने न्यायपूर्वकच द्रौपदीला जिंकले आहे, अन् राजांशी धर्मयुद्ध केले आहे. तेंव्हा आता सर्वांनी त्याच्यापासून दूर रहावें हेच बरं!'' कृष्णाचा सल्ला मानून आता कोणत्याही राजाने



भीमार्जुनांजवळ जायचे दुस्साहस केले नाही.

इकडे कुंभाराच्या घरात कुन्ती एकटीच होती. बऱ्याच वेळापासून ती आपल्या पुत्रांची वाट पहात होती. त्यांना उशीर झाल्याने ती घाबरली होती. दुर्योधनाने त्यांच्याविरुद्ध काही नवी कारवाई तर केलेली नसेल ना, ते कुठल्या अडचणीत तर सापडले नसतील ना, असे विचार तिच्या मनात येऊ लागले. इतक्यात नकुल-सहदेवांसह युधिष्ठिर तेथे येऊन पोचला. अन् थोड्याच वेळात द्रौपदीला घेऊन भीमार्जुनही पोचले. बाहेरूनच ते कुन्तीला म्हणाले, ''आम्ही भिक्षा घेऊन परत आलोय माते !'' ''बरं मग ती आपसात सारखी सारखी वाटून घ्या !'' असे म्हणत कुन्ती बाहेर आली आणि असामान्य लावण्यवती द्रौपदीला पाहून स्तंभित झाली.

चिंतित आवाजात कुन्ती धर्मराजाला म्हणाली, ''माझ्या हातून चूक झाली रे पुत्रा ! 'भिक्षा आणलीय' असे भीमार्जुन म्हणाल्यामुळे 'आपसात वाटून घ्या' हे शब्द सहजच माझ्या तोंडून निघाले. तुला तर माहीतच आहे की तोंडचे शब्द व्यर्थ जात नाहीत. पण या कन्येचा तुम्ही सर्वांनी स्वीकार करणं हा अधर्म होईल. पण तसं न करण्यामुळे माझे शब्द असत्य ठरतील. तेव्हा धर्ममार्ग काय, तो तूच ठरव.''

थोडा विचार करून धर्मराज कुन्तीला सान्त्वना देऊन अर्जुनाला म्हणाला, ''अर्जुन, अग्नीला साक्षी ठेऊन तू या कन्येशी विवाह कर.''

अर्जुन यावर म्हणाला, ''ते कसे शक्य आहे? तुम्ही अन् भीम माझ्यापेक्षा वडील आहात. तुम्हा दोघांअगोदर मी विवाह करणं हा अनाचार होईल.''

कुन्तीमाता व बन्धू अर्जुन यांचे बोलणे लक्षात घेऊन धर्मराजाने खूप विचार केला व शेवटी आपला निर्णय सांगितला, ''या कन्येशी आपण पाचही जण विवाह करू. ही आपणा सर्वांचीच पत्नी आहे.''

इतक्यात पांडवांना शोधत श्रीकृष्ण बलरामासह तेथे आला. एकमेकांना प्रणाम केल्यावर धर्मराज कृष्णाला म्हणाला, ''आम्ही तर ब्राह्मणवेष धारण करून अज्ञात जीवन जगत आहोत. तुम्ही आम्हाला ओळखलंत तरी कसं? अन् आता इथे कसे काय आलात?''

कृष्ण हसत म्हणाला, ''राजा, अग्नी कधी लपवता येतो का? आज स्वयंवर समयी जे बलप्रदर्शन झालं ते पांडव सोडता, कोणाला शक्य तरी आहे का ? त्या कुटिल दुर्योधनाची चाल असफल झाली हे छानच झालं. तुम्ही आपलं सत्यरूप अजून काही दिवस लपवून रहावं हेच बरं !'' आणि पांडवांचा निरोप घेऊन तो तेथून निघून गेला.

या अवधीत धृष्टद्युम्नाने एक काम केले. द्रौपदीला जिंकणारा ब्राह्मण कोण अन् तो कोठे रहातो वगैरे कोणालाच माहीत नसल्याने, आता तो तिला कोठे घेऊन जात आहे, हे पहाण्यासाठी तो अन्य ब्राह्मणांबरोबर बाहेर पडला व लपूनछपून पांडवांचा पाठलाग करत राहिला. कुंभाराच्या घरापर्यंत येऊन तो एका कोपऱ्यात लपून त्यांच्या हालचाली पहात राहिला.

कृष्ण-बलराम निघून गेल्यानन्तर भीम, अर्जुन, नकुल, सहदेव यांनी गावातून भिक्षा मागून आणली. कुन्तीने त्यातला थोडा भाग अतिथींसाठी काढून ठेवला व बाकीच्या भिक्षेतला अर्धा भाग भीमासाठी काढून ठेवला. बाकीचा अर्धा द्रौपदीच्या हवाली करून तिने तो चारजणांना वाढायला सांगितले. द्रौपदीने आज्ञापालन केले.

भोजनानन्तर सहदेवाने हरिणाजिने पसरली व त्यावर ते सारे जण झोपले. नंतर द्रौपदीही पांडवांच्या पायांशी आडवी झाली.

आडवे पडल्यापडल्या पांडवांनी काही वेळ युद्धातील निनिराळ्या व्यूहरचना व विविध अस्त्रशस्त्रांचे प्रयोग याबद्दल आपसात चर्चा केली. धृष्टद्युम्न ते सर्व लपून ऐकत राहिला. सर्वजण झोपल्यावर तो परत आपल्या पित्याकडे गेला व त्याने सांगितले की, ''स्वयंवरासाठी आलेले ते पाचजण ब्राह्मण नसून क्षत्रीय आहेत, अन् माझं अनुमान आहे की ते पांडवच आहेत.''

ही वार्ता ऐकून द्रुपदाला अपार आनन्द झाला. आपली इच्छा पुरी झाली, असे त्याला वाटले. नीट सारी माहिती घेण्यासाठी त्याने आपल्या पुरोहिताला कुंभाराच्या घरी पाठवले.



# कंजूष माणसाचे समर्थन

राजपुरमधे कनक नावाचा एक व्यापारी होता. व्याजावर व्याज घेऊन त्याने खूप धन जमवले. गावचे लोक त्याला 'महाकंजूष' म्हणत. प्रण कनक त्यांच्या टीकेकडे दुर्लक्ष करी. त्याला त्याबद्दल कोणाचा रागही येत नसे. तो म्हणत असे, "ज्यांच्याजवळ काही नसतंच, त्यांच्या कंजूष असण्याचा प्रश्नच येत नाही. पण पैसेवाला असेल, त्यानं थोडंफार कंजूष असलं, तर बिघडलं कुठं? एक प्रकारे कंजूष माणसांचं अस्तित्व समाजाला आवश्यक असतं. कारण गरजवन्तांना व्याजानं का होईना, पण पैसे देऊन ते त्यांना मदतच करत असतात ना? त्यांच्या गरजा भागतात ना ?"

एकदा असाच कनक शेतातून परत येत असताना चप्पल बनवणाऱ्या चांभाराकडे गेला. चांभार नारायण त्याला एक चप्पल जोडी दाखवत म्हणाला, "पहा साहेब, कशा अुत्तम चामड्याच्या चपला आहेत या. शहरात वीस रुपयांपेक्षा कमीत नक्कीच नाही मिळायचा असला जोड. पण मी तुम्हाला दहा रुपयात देतो, घ्या."

चिडून चपलांकडे पहात कनक म्हणाला, "आहाहा ! आपल्या कधीही झिजून न जाणाऱ्या पायांवर या झिजणाऱ्या चामड्याच्या चपला चढवायच्याच कशाला? मी काही चप्पल खरेदी करायला नाही आलो इथे. वाटेत माझ्या एका दोस्तानं चिरूट दिलाय मला. त्याच्याजवळची काडेपेटी रिकामी झालेली होती. तू चिरूट ओढताना दिसलास म्हणून आलो मी इथे! दे ना जरा तुझी काडेपेटी !"





## तमन

ओलसर जमिनीवर, नद्यांच्या किनारी, झाडाझुडपांमधेच अुगवलेल्या झाडांवर अुत्तम प्रकारे फुललेली फुले आपल्याला खूपदा आढळतात. या फुलांना 'राणीची फुले' म्हणतात. स्वीडनचे वृक्ष-शास्त्रज्ञ मॅगनस ब्ही. लाजर्स्टोमने यांना प्लास-रेजिनी (राणी पुष्प) अशी संज्ञा दिलेली आहे. त्यांच्याच नावाने वनस्पती-शास्त्रात याचे नाव पडले - लाजर फ्रोमिया प्लास रेजिनी. ही फुले मोठी आकर्षक दिसतात. ही फुलतात तेंव्हा त्यांचा रंग फिका जांभळट गुलाबी असतो. फुलांचे कधीकधी दीड फूटपर्यन्त अुंचीचे झुबकेदार तुरे असून, पाकळ्या सुरकुतल्यासारख्या दिसतात. वर्षातून दोनदाच अेप्रिल-मे व जुलै -ऑगस्टच्या सुमाराला झाडांना बहर येतो. या झाडांची पाने वरील बाजूने गर्द हिरव्या रंगांची असून, खालील बाजूचा रंग काहीसा फिकट असतो. पानांच्या खालच्या बाजूला रेषांचे जाळे असते. यांची फळे हिरवी असून पिकल्यावर काळी पडतात. फळे लवकर गळून पडत नाहीत. कधी कधी पुढला बहर येअू लागला, तरी फळे झाडालाच चिकटून असतात.

मजबूतीच्या बाबतीत सागवान नंतर या लाकडाचाच नंबर मानला जातो. त्याचा अुपयोग बोटी बांधण्यासाठी व गाड्या बनवण्यासाठी करण्यात येतो. पाण्याने हे लाकूड लवकर कुजत नसल्याने बंदरे बांधताना या लाकडांचे खांब पाण्यात पुरतात. देशोदेशी या लाकडाचा अुपयोग केला जातो; म्हणूनच याला 'प्राईड ऑफ इंडिया' असे म्हणतात.



या झाडाला हिन्दीत 'जारुल', बंगालीत 'अजार', अुरियात 'पटोली', तमिळमधे 'कडली', मल्याळीत 'आटंपू', कानडीत 'चल्ला' व तेलगूत 'वरगोगू' असे म्हणतात.*

## आपल्या देशातील ऋषि मुनी - ५

# मार्कंडेय



**मृ**कुंड मुनी हिमालयात रहात असत. बरीच वर्षे अपत्यप्राप्ती न झाल्याने त्यांनी त्यासाठी शिवाजी पूजाअर्चा केली. मुनि ध्यानमग्न असताना समोर महादेव प्रकट झाले व त्यांनी विचारले, ''तुला केवळ सोळाच वर्षे जगेल असा बुद्धिमान पुत्र हवा, की निर्बुद्ध असा चिरंजीव पुत्र हवा?''

मृकुंडला विद्येचे अतिशय प्रेम होते, म्हणून त्याने अल्पायुषी, पण बुद्धिमान पुत्र मागितला.

त्यांच्या इच्छेप्रमाणे त्यांना पुत्रप्राप्ती झाली. त्याचे नाव मार्कंडेय असे ठेवण्यात आले. मार्कंडेय दहाच वर्षाचे असताना, खूप दूरवरून पंडित व जिज्ञासू लोक आपले शंकानिरसन करून घेण्यासाठी त्यांच्याकडे येत. बारा वर्षांचे असतानाच लोक त्यांना सद्गुरु अन् निष्ठावान मानू लागले.

त्यांचे वय जसजसे वाढू लागले, तसतसे त्यांचे माता-पिता काळजीने व्याकुळ होऊ लागले. परन्तु आपली चिन्ता त्यांनी पुत्राजवळ कधीही बोलून दाखवली नाही. मार्कंडेयांनी सोळाव्या वर्षात पदार्पण केल्यानंतर मात्र ते आपले अश्रू आवरू शकेनात. मार्कंडेयांना आश्चर्य वाटून त्यांनी याचे कारण विचारले. तेंव्हा पुत्राचा मृत्यु जवळ आल्याची वार्ता त्यांना त्याला सांगावीच लागली. परन्तु हां, एक दुसरा पर्याय होता. मातापिता स्वतः प्राणत्यागाला तयार झाले, तर पुत्र चिरंजीव होऊ शकत होता. मार्कंडेयांनी आपल्या शान्त वाणीने दुःखी मातापित्यांना धैर्य दिले. नंतर ते निर्जन प्रदेशात जाऊन ध्यानमग्न होऊन, शिवस्मरणात मग्न झाले. त्यांचे आयुष्य समाप्त होण्याची वेळ येऊन ठेपली, तेंव्हा यमदूत त्यांना घेऊन जाण्यासाठी तेथे पोचले. परन्तु मार्कंडेयांच्या भोवती प्रकाशवलय असलेले पाहून ते त्यांच्या जवळ जाऊ शकेनात. तेंव्हा स्वतः यमराज तेथे पोचले व त्यांनी आपला पाश मार्कंडेयांवर फेकला. पण मार्कंडेय ज्या शिवलिंगाला मिठी मारून बसले होते, त्या लिंगालाच यमपाश अडकला. त्याच क्षणी क्रोधित शिवशंकर तेथे प्रकट झाले. त्यांच्या तृतीय नेत्राच्या धगीत यमराज जळून मरून गेले. या घटनेमुळे शिवाचे 'मृत्युंजय' असे नाव पडले.

शान्त झाल्यावर शंकराने यमाला पुनर्जीवन दिले, पण या अवधीत मार्कण्डेयांची मृत्युघडी हुकली. शिवाने त्यांना वर दिला की ते चिरंजीव बनून सदा सोळा वर्षांचेच रहातील.

या पुराणकथेत एक मथितार्थही आहे. मार्कण्डेय आपले विशिष्ट असे व्यक्तित्व त्यागून ईश्वरचरणी लीन झाले. कारण हे व्यक्तित्व शाश्वत, अमर आहे. त्यामुळे काळ आला तरी ते जिवंतच राहिले अन् कायम सोळा वर्षांचेच राहिले. त्यांना भूत, भविष्य वर्तमान काहीच नाही, कालातीत आहेत ते. त्यांच्याजवळ आहे, तो केवळ अनंत काळ ! ही एक प्रकारची आध्यात्मिक अनुभूती होय.



## तुम्हाला माहीत आहे काय?

१. बुद्धाने आपला धर्मप्रसार कोणत्या ठिकाणी सुरू केला?
२. हिटलरने १९३८ मधे एक देश आपल्या देशात सामील करून घेतला व १९४५ मधे पुन्हा सोडून दिला. तो देश कोणता?
३. जमिनीवर सरपटणाऱ्या प्राण्यात सर्वात मोठा प्राणी कोणता?
४. 'अर्जुन अॅवॉर्ड' मिळवणारा पहिला भारतीय खेळाडू कोण?
५. 'घाना'चे जुने नाव काय?
६. कलकत्ता शहराची स्थापना कोणी केली?
७. हत्तीचे साधारण आयुर्मान किती?
८. इजिप्तचे अधिकसंख्यक नागरिक कोणती भाषा बोलतात?
९. 'अॅबिसिनिया' चे वर्तमान नाव काय?
१०. 'कवींचा कवी' मानला जाणारा सुप्रसिद्ध इंग्रजीचा कवी कोण?
११. इटलीत अुपयोगात येणाऱ्या करन्सीचे नाव काय?
१२. आपल्या पुराणातला 'ऐरावत' हत्ती हा कोणाचे वाहन?
१३. अंतरिक्षात प्रथम चालणाऱ्या मानवाचे नाव काय?
१४. जमिनीवर आढळणारा अुंचीने सर्वात जास्त असणारा प्राणी कोणता?
१५. पारशी लोकांच्या पवित्र ग्रन्थाचे नाव काय?
१६. 'एंजल फॉल्स' हा धबधबा कोणत्या देशात आहे?
१७. 'वॉटरलू' लढाईत नेपोलियनला हरवणारा कोण?
१८. पाकिस्तानचे पहिले अध्यक्ष कोण?
१९. कॅनडामधील सर्वात जास्त लांबीच्या नदीचे नाव काय?

### अुत्तरे

१. वाराणशीजवळील सारनाथ येथे.
२. ऑस्ट्रिया.
३. मगर.
४. सलीम दुराणी (१९६१).
५. गोल्ड कोस्ट.
६. जॉब चार्नाक.
७. ७०-८० वर्षे.
८. अरबी.
९. इथिओपिया.
१०. एडमंड स्पेन्सर्स (१५५२-१५९९).
११. लिरा.
१२. इन्द्र.
१३. अॅलेक्सी लिओनाव्ह (१९६५).
१४. जिराफ.
१५. जेंद अवेस्ता.
१६. व्हेनेझुएला.
१७. आर्थर वेलेस्ली.
१८. महमदअली जीना.
१९. मॅकेन्झा



# अनुपस्थितीत

सीतारामची अरुणा ही एकुलती एक मुलगी. खूप सुस्वभावी अन् सुन्दर होती ती. जवळच्या गावच्या वीरदासकडून बातमी मिळाली की, आपला मुलगा जयंत याच्यासाठी त्याला अरुणा पसन्त आहे. पण खुद्द तो कसा आहे, त्याची परिस्थिती कशी आहे, इत्यादी जाणण्यासाठी सीताराम वीरदासच्या गावी गेला.

वीरदास सुसंपन्न असून चांगला सुशिक्षितही असल्याचे सीतारामने जाणले. गावात त्याला चांगला मानही होता. त्याने सीतारामचे अुत्तम स्वागत केले व तो म्हणाला, ''माझ्या ओळखीतल्या बऱ्याच लोकांकडून तुमची अरुणा फार चांगली असल्याचे ऐकलं. मला हुंडाबिंडा काहीही नको. फक्त शास्त्रोक्त विवाह करून देअून सूनबाईला माझ्या घरी पाठवा म्हणजे पुरे मला.''

जयन्तही दिसायला अुमदा वाटला. सीतारामला हे स्थळ खूप आवडले. गावी परत येअून त्याने सर्व काही घरच्यांना सांगितले.

अशातच शान्ताराम नावाचा एक माणूस सांगू लागला, ''वीरदास म्हणे कोणाशी बोलताना म्हणाला की, सीतारामचं घराणं दरिद्री आहे. त्याच्या मुलीचा अुद्धार व्हावा म्हणूनच केवळ, हुंडाही न घेता मी तिला सून करून घ्यायला तयार झालोय. भिकाऱ्याकडून कधी कोणी पैसे घेतं का?'' सीतारामच्या घराण्याबद्दल बोलताना तो वारंवार त्याची टिंगलही करत होता म्हणे!

शान्तारामचे बोलणे ऐकून सीतारामला फार वाईट वाटले. त्याचे वडील रघुराम मधे पडून म्हणाले, ''अुगीच कुणाच्या बोलण्यावर विश्वास ठेवण्यापेक्षा तू स्वतः जाअून वीरदासला भेटणं योग्य होईल.''

सीतारामला त्यांचा सल्ला योग्य वाटला. जे ऐकले ते खरे निघाले तर त्याने लग्न मोडून परत येण्याचा निश्चय केला.

मयूर दळवी



वाटेत सीतारामला एक शेतकरी भेटला. त्या शेतकऱ्याने आपल्या शेताचा एक भाग वीरदासला स्वस्तात विकला होता. पण त्याला कोणीतरी म्हणाले की - ''ती शेतजमीन नापीक असूनही हा शेतकरी गरीब असल्याने आपण ती विकत घेतल्याचे वीरदास कोणाजवळ सा बोलत होता! शेतकऱ्याला दानच दिलेय अशी त्याची भावना होती म्हणे!'' या बाबत बोलण्यासाठीच तो शेतकरी वीरदासकडे निघाला होता.

सीताराम शेतकऱ्याला म्हणाला, ''बरं झालं, आपण दोघं बरोबरच जातो आहोत.''

ते दोघे थोडे पुढे जाताच आपल्या घोडा गाडीची दुरुस्ती करून घेत असलेला एक माणूस त्यांना दिसला. त्याची परिस्थिती हलाखीची असताना वीरसिंहने त्याला एक हजार रुपये कर्जाऊ दिले होते. त्या भांडवलातून याने शहरात व्यापार केला अन् पुष्कळ धन कमवले. व्यापाऱ्याने नन्तर वीरसिंहला त्याची रक्कम परत केली. अन् शिवाय दर वर्षी काही न काही मूल्यवान भेटवस्तु त्याच्याकडे पाठवत राहिला. पण आता असं ऐकिवात आले की वीरदास त्याला 'कृतघ्न' म्हणून त्याची आणखीही निन्दा करत असतो. याबाबत चौकशी करण्यासाठी तो ही वीरदासच्या गावी निघालेला होता.

व्यापाऱ्याला जेंव्हा कळले की सीताराम आणि शेतकरीही अशाच चौकशीसाठी वीरसिंहकडे निघालेले आहेत तेंव्हा तो त्यांना म्हणाला, ''थोडे थांबा ना! माझी गाडी आत्ता दुरुस्त होईल. आपण तिघंही गाडीतूनच जाऊ बरोबर.''

ते तिघे पुढे निघतात तोच त्यांना रस्त्यात एक कवि भेटला. तो सांगू लागला की, ''या वीरदासने माझा एका जमीनदाराशी परिचय करून दिला. मला त्याच्या मुळे धनलाभ झाला अन् कीर्तीही मिळाली. पण माझ्या असं ऐकिवात आलंय की, मी त्याच्या स्तुतीपर एक ही काव्य न लिहिल्यामळे तो माझ्यावर नाराज आहे. सुरुवातीला मी त्याच्याबद्दल खरं तर एक कविता लिहिली होती. पण ती ऐकून तो म्हणाला होता की - मी एक सर्वसाधारण माणूस असून माझ्याबद्दल कोणी कविता लिहावी अशी माझी योग्यता नाही. अन् आज मात्र माझी निन्दा करतो आहे! मी आता जाब विचारायलाच त्याच्याकडे निघालोय.''

आता कवीही बाकी तिघांबरोबर घोडागाडीत बसला.

त्यांना वीरदासच्या घरी पोचता पोचता संध्याकाळ झाली. त्यावेळी वीरदास बाहेर ओट्यावर बसून कोणाशीतरी बोलत होता. गाडीतून अुतरलेल्या चौघांना पाहून प्रेमाने तो त्यांचे स्वागत करत म्हणाला, ''अरे, तुम्ही एकदम बरोबर आलेले पाहून मला फारच आनन्द झालाय.'' त्यांना आपल्या घरात घेऊन गेला व नोकरांना त्याने आज्ञा दिली की, हे चौघेही मला आपल्या नातेवाइकांपेक्षा प्रिय आहेत. त्यांच्या आगतस्वागतात कुठेही काही कमी पडता कामा नये. त्याच्या चेहऱ्यावरील खरा प्रेमभाव व पावित्र्य पाहून चारही जण चुप झाले. पण मनात मात्र अजूनही राग धुमसतच होता. त्यामुळे त्यांना घरात वावरायलाही संकोच वाटला.

इतक्यात कट्ट्यावर बसलेला दुसरा माणूस वीरदासला म्हणाला, ''अरे, तुम्ही अजून माझ्या म्हणण्यावर आपला काहीच निर्णय नाही दिला?''

''निर्णय देण्याची जरूरच काय मुळी? मी एकदा जे वचन दिलं ते दिलं. मी ते कोणत्याही परिस्थितीत पाळणारच! माझा नियमच आहे तो. मी आपलं बोलणं फिरवत नसतो.'' वीरदास अुत्तरला.





तेंव्हा कट्ट्यावरून अुतरून या चार पाहुण्यांजवळ येत तो म्हणू लागला, "तुम्ही जर यांचे स्वकीय आहात, तर जरा यांना समजवा नं? अुपकार करा माझ्यावर एवढा."

खरं काय घडलंय हे जाणायला चारहीजण अुत्सुक होते. तेंव्हा तो माणूस सांगू लागला-

गावात वीरदासचं आणखी एक घर आहे. प्रथम तो त्याच घरात रहात असे. श्रीमन्ती आल्यावर आता तो या मोठ्या घरात रहायला लागलाय. खूप दिवस मंगलकार्यात वगैरे आलेल्या पाहुण्यांची अुतरायची सोय तो जुन्या घरी करत असे. पण आता त्या घराचा अुपयोग फार कमी होअू लागल्याने ते अुजाड पडल्या सारखं झालं. सूरज नावाच्या एका शेतकऱ्याला ते आपण विकत घ्यावे असे वाटले. वीरदासनेही मान्य केले की, मी ते घर स्वस्तात देईन. सूरज आता पैसे जमा करायच्या कामाला लागलाय.

त्याच गावातल्या गणनाथने सूरजच्या भाग्याबद्दल त्याची प्रशंसा केली. आणि त्याबरोबरच वीरदासच्या औदार्याचीही वाखाणणी केली. तर अुलट सूरज तिरस्काराने म्हणाला, "हो, घरात तशी भुताप्रेतांची वस्ती आहे. फुकट सुद्धा घ्यायला कोणी तयार नाही होणार. पण मीच काय तो पैसे देअून ते खरेदी करतो आहे! यात त्याचा भलेपणा तो कसला? यात माझंही कसलं मोठंसं भाग्य नव्हे, अन् वीरदासचंही औदार्य नव्हे! मला गरज होती, मी घेतलं. बस, बात खतम!"

आता गणनाथ म्हणतोय की, असल्या या कृतघ्न माणसाला कशाला स्वस्तात देता घर? त्यापेक्षा ते गणनाथला दिलं तर तो आजन्म ऋणी राहील वीरदासचा; अगदी पूजाही करील तो. पण वीरदास तर आपल्याच शब्दावर अडून राहिला आहे. तो कोणत्याही परिस्थितीत आपला दिला शब्द मोडायला तयार नाहीय.

सीताराम व बाकीचे तिघेजण काही बोलण्यापूर्वीच वीरदास म्हणाला "माणूस समोर नसला, की आपला हेतु साध्य करण्यासाठी लोक त्याच्या विरुद्ध अनेक तक्रारी करतात, तऱ्हेतऱ्हेच्या कपोलकल्पित गोष्टी रचल्या जातात अन् माणसाच्या अनुपस्थितीत त्याला वाईट ठरवायचे प्रयत्न केले जातात. मी असल्या गोष्टींवर अन् बातम्यांवर कधीही विश्वास नाही ठेवत. माझ्या दृष्टीने माणसाच्या पाठीमागे त्याच्याबद्दल बोलल्या जाणाऱ्या गोष्टींना काहीही किंमत नाही. जे समोर घडेल, तेच माझ्या दृष्टीने मुख्य होय. हाँ, अशा सांगोवांगी आलेल्या गोष्टी एकाद्या वेळी खऱ्या असतीलही; पण तिकडे लक्ष देणं अन् त्यांवर विश्वास ठेवणं ही माझी पद्धत नव्हे. ही माझी माणसं आहेत नं, ती माझ्याच म्हणण्याला दुजोरा देतील पहा. ते कधीही आपलं मत तुमच्या बाजूनं देणार नाहीत हे समजून अस. ते माझ्या पद्धतीचंच समर्थन करतील नक्की! आता जाअू शकता तुम्ही."

हे वीरदासचे बोलणे ऐकून या चौघांचेही चेहरे पहाण्यासारखे झाले! आतापर्यन्त ते केवळ वीरदासबद्दलच विचार करत होते, स्वत:बद्दल नव्हते करत! त्यांनी ओळखले की वीरदास कोणाच्या अनुपस्थितीत त्याच्याबद्दल दुसरे बोलतो यावर विश्वास ठेवणे योग्य नाही. आता तेही विचार करू लागले की आपणही इतरांच्या बोलण्यावर विश्वास ठेवून वीरदासला वाईट का ठरवला?

'काही जरूरी काम आहे' असे म्हणत सीताराम अन् बाकीचे तिघे तेथून सटकले. पण चौघं एकदम कसे व का आले अन् काही न बोलताच निघून चाललेत हे वीरदासला कळेना. इतके जर महत्वाचे काम नव्हते, तर ते इथे आलेच का मुळी? यामुळे वीरदासला फार आश्चर्यही वाटले.

सीताराम व बाकी तिघेजण खरे तर सगळी चौकशी करून सोक्षमोक्ष लावायला आले होते. पण आता त्यांना आपल्या शंकेचे अुत्तर परस्परच मिळाले. आता अुलट त्यांना वीरदाससारख्या सच्च्या, प्रामाणिक व आदर्श व्यक्तीचे आपण आप्त, स्वकीय असल्या बद्दल गर्व वाटू लागला. त्याच्या स्वभावाचा त्यांच्यावर फारच अनुकूल परिणाम घडून आला. त्यांच्या लक्षात येअून चुकले की माणसाच्या पाठीमागे त्याच्याबद्दल बोलल्या जाणाऱ्या गोष्टींवर विश्वास ठेवणे, हा शुद्ध मूर्खपणा आहे. घातक आहे ही सवय.





# धान्दरटपणामुळे

सोमशास्त्री भिक्षुक होता. पौरोहित्य हा त्याचा धन्दा. बारीक-सारीक गोष्टींनी तो घाबरून जाई आणि धान्दरटपणा करी. सवयच झाली होती त्याला तशी.

शेजारच्या गावी लग्न होते. सोमशास्त्रीलाच पुरोहित म्हणून बोलावले होते. त्याला खूप आनन्द झाला. पोचायला अुशीर होअू नये म्हणून घाबरून कोंबडा आरवण्यापूर्वीच निघता निघता तो बायकोला म्हणाला, ''मी निघालोय. अजून अन्धार आहे बाहेर. दरवाजा नीट बन्द करून घे. नाहीतर चोर येअून घर लुटतील. सावध रहा.''

झोपेतून अुठून सोमशास्त्रीच्या बायकोने दरवाजा बन्द केला अन् ती पुन्हा झोपली.

घराजवळच संधी शोधत बसलेल्या चोरांनी सर्व काही पाहून घेतले. रात्रभर त्याना कुठे डल्ला मारायचे जमले नव्हते. सोमशास्त्री निघून गेलाय, त्याची बायको घरात एकटीच असून बाहेर अुजाडायला अजून एक प्रहर लागेल, असे पाहून त्यांनी विचार केला की या घरात चोरी करण्यासारखे मौल्यवान काही नसले तरी भिक्षुकीचा तांदूळ तरी भरपूर असेल.

चोर घरात घुसले. कुठेही दिवा जळत नव्हता. सर्वत्र अन्धारच अन्धार पसरला होता. हे आपले भाग्यच समजून ते कामाला लागले.

इतक्यात धान्दरट सोमशास्त्री गडबडीने घरी परत आला अन् दरवाजा खडखडावत बायकोला हाका मारू लागला. तिने अुठून दरवाजा अुघडला.

''अग अुपरणं विसरलो'' म्हणत, ते आपल्या खांद्यावर टाकून सोमशास्त्री आला तसाच घाईघाईने परत गेला.

पुन्हा दरवाजा बन्द करून बायको झोपून गेली. चोरांना जेंव्हा ती गाढ झोपल्याची खात्री वाटली, तेंव्हा ते तांदुळाचे पीप शोधू लागले. ते जेंव्हा नजरेस पडले तेंव्हा त्यांनी जवळच एक चादर पसरली. तांदूळ चादरीत ओतून घेअून पसार व्हायचा त्यांचा विचार होता.

इतक्यात सोमशास्त्रीने पुन्हा परत येअून बायकोला अुठवले.

तिने दार अुघडून त्याला विचारले, ''आता काय विसरलात?''

''झोळी विसरलो गं ! आण लवकर.'' शास्त्री म्हणाला. झोळी तांदुळाच्या पिपाजवळच्या खुंटीला लावलेली होती.

ती जेंव्हा झोळी घ्यायला तेथे गेली तेंव्हा चोर कोपऱ्यात दुबकून बसले. खाली पसरलेली चादर पायाला लागताच वाकून तिने ती अुचलली अन् झोळी देअून झाल्यावर चादर लपेटून पुन्हा ती झोपून गेली.

ती झोपल्याची खात्री करून घेअून चोर पिपातला तांदूळ काढून जमिनीवर ओतत राहिले. अंधारात त्यांना वाटले की, आपण चादरीवरच तांदूळ काढत आहोत. पीप जवळजवळ रिकामे झाले. तेंव्हा तो अुचलण्यासाठी अंधारात चाचपत चादरीची टोके शोधू लागले. पण कोणतेच टोक हाती न लागल्याने त्यांच्या लक्षात आले, की तांदूळ तर आपण जमिनीवरच ओतलाय!

'आता काय करावे?' अशा विचारात चोर असताना पुन्हा तिसऱ्यांदा दरवाजा खडखडला !

दार अुघडून बायको म्हणाली, ''सकाळ तर झालीच. आता मीही आपल्या कामांना लागते कशी !''

हे ऐकून चोर घाबरून गेले अन् येताना आपण पाडलेल्या भगदाडातून पुन्हा बाहेर पळून गेले. या गडबडीत धांदरटपणाने स्वतःजवळची पैशांची थैली मात्र ते घरातच विसरले.

यावेळी मात्र सोमशास्त्री कोणतीही वस्तु न विसरता सर्व काही घेअून वेळेवर लग्नघरी पोचला. त्याच्या घाबरटपणाचा आणि धान्दरटपणाचा त्याला न कळत फायदाच झाला होता.

**अविनाश पुंडे**



विश्व-समाचार

# अंतरिक्षात हस्तांदोलन

**सो**विएत रशियाने अंतरिक्षात एक स्थानक निर्माण केले - 'मीर'. अमेरिकेने पाठविलेले स्पेस-शटल 'अटलांटिस' २९ जून रोजी मीरला जोडले गेले.

गेल्या २० वर्षात अशी अद्भुत जुळणी दुसऱ्यांदा झाली. जुलई १९७५ मध्ये अमेरिकेचे अंतरिक्ष-यान 'अपोलो' रशियाच्या 'सोयुज' शी जोडले गेले होते. त्या काळी दोन्ही देशात शीत-युद्ध चालू होते. त्यामुळे या घटनेला तसे राजनैतिक महत्त्व राहिले नाही. परंतु हे मिलन महत्त्वाच्या तांत्रिक ज्ञानाचे साधन बनले. सोविएट यूनियनचे विघटन झाल्यानंतर अमेरिकेचे रशियाशी वैर संपले. दोन्ही देश एकमेकांचे मित्र बनले. यामुळे अंतरिक्षात सुमारे पंधरा देश एकमेकांना भेटले. यासाठी अंतरराष्ट्रीय अंतरिक्ष-स्थानक निर्माण झाले. याबरोबरच आणखी अनेक नवीन योजना आकार घेत आहेत.

२७ जून रोजी 'अटलांटिस' यान सात अंतरिक्ष-यात्रींना घेऊन निघाले. दोन दिवस ते 'मीर' भोवती फिरत राहिले. तेव्हा कोठे 'डॉकिंग' म्हणजे जुळणी शक्य झाली. २९ जून रोजी या दोन अंतरिक्ष नौका जेव्हा एकमेकांना जोडल्या गेल्या, तेव्हा त्या एका विशाल अंतरिक्ष-यानासारख्या दिसल्या. होस्टनहून, कालिनिनग्राडहून म्हणजे आपल्या पृथ्वीवरून 'अटलांटिस'च्या अंतरिक्ष-प्रवाशांना 'मीर' मध्ये प्रवेश करण्याबाबत सूचना देण्यात आल्या. या सूचना देण्यासाठी अंतरिक्ष-वैज्ञानिकांना दोन तास लागले. यानंतर अंतरिक्ष-यात्र्यांनी एकमेकांशी हस्तांदोलन केले, त्यांनी एकमेकांना आलिंगन दिले.

मध्य आशियातील रशिया व मंगोलिया यांच्या सरहद्दीपासून २४५ मैल अंतरावर हे 'डॉकिंग' झाले. या जोडणीत खात्रीपूर्वक काही दोष राहिला नाही. त्या वेळी ही दोन्ही याने पाच मैलांच्या गतीने अंतरिक्षात चालत होती. 'अटलांटिस'ची लांबी १२२ फुट आहे, तर 'मीर' ची लांबी ११२ फुट. दोन्ही याने जोडली गेली, तेव्हा अमेरिकेचे कमांडर कॅप्टन गिब्ब हर्षोल्हासाने उद्गारले - 'शेवटी पकडलं की नाही!'

यानंतर पाच दिवस 'मीर' वर निरनिराळे प्रयोग केले गेले. 'मीर' वरील नॉर्मन थागार्ड सह अन्य तीन अंतरिक्षयात्री पृथ्वीवर परतण्यासाठी 'अटलांटिस' वर पोचले. नंतर दोन अंतरिक्षयात्री 'सोयुज' वर गेले व त्यांनी दोन याने विलग होत असतानाचे फोटो काढले. 'अटलांटिस' अंतरिक्षातून निघाले ते सात जुलईला पृथ्वीवर पोचले.

हे ऐतिहासिक 'डॉकिंग' जेव्हा टी.व्ही.वर दाखवले गेले, तेव्हा अमेरिकेचे अध्यक्ष बिल क्लिंटन म्हणाले - ''पाहिलत? आता अमेरिका नि रशिया यांमधील शत्रुत्व संपले !''





# एका बहादुराचा पराजय

**दं**डकारण्यातील एका भागात भिल्ल जातीचे काही लोक रहात असत. त्यांच्या सरदाराचे नाव होते सिंहबल. त्याच्या नेतृत्वाखाली सारे भिल्ल मोठ्या एकात्म भावनेने रहात असत. त्यांच्यात भांडण-तंटे कधी होतच नसत.

सिंहबल आता म्हातारा झाला होता. एका काळी त्याने हातात छोटासा सुरा घेऊन वाघाशी झुंज दिली होती व अगदी सहजपणे त्याला मारून टाकले होते; पण आता चालताना त्याला काठीच्या आधाराची गरज भासत असे. त्यामुळे आता आपल्या जातीच्या नेतृत्वाचा भार एकाद्या समर्थ भिल्ल तरुणाच्या खांद्यावर टाकायचा निर्णय त्याने घेतला.

खरे पाहता भिल्ल जातीत जो सर्वात बलशाली असेल त्यालाच सरदार मानले व बनवले जाई. सरदार बनण्यासाठी योजलेल्या विविध स्पर्धांमधे कोणीही भाग घेऊ शके. परंतु सिंहबलबद्दल सर्वांच्या मनात आदरभाव असल्याने, तो सरदार झाल्यानन्तर आतापर्यन्त स्पर्धाच घेतल्या गेल्या नाहीत, अन् त्याला कोणी तसे आव्हानही दिले नाही.

सिंहबलला स्वतःचे मुलगे नव्हते. एकुलती एक मुलगीच काय ती होती. तिचे नाव होते मल्लिका. दिसायला ती खूप सुन्दर होती. सरदाराला स्वतःचा मुलगा नसेल, तर पुढे सरदार बनणाऱ्या युवकाशी मुलीचे लग्न लावून देण्याचा त्यांच्या समाजाचा रिवाज होता. हे काम तसे कठीण असले, तरी अनेक भिल्ल युवकांचा ती आपल्यालाच मिळावी म्हणून तिच्यावर डोळा होता.

या भिल्ल वस्तीत रवी नावाचा एक तरूण होता. तो बलवान असून रुबाबदारही होता. मल्लिकाचे रवीवर मन जडले होते. संधी मिळाली की, एकाद्या एकान्त स्थळी बसून दोघे गप्पागोष्टीत रंगून जात.

एका शुभदिनी सरदार बनण्यासाठी लवकरच स्पर्धांचे आयोजन करण्यात येणार असल्याची घोषणा सिंहबलने केली. बलवान भिल्ल युवकांना स्पर्धेत भाग घेण्यासाठी आव्हान करण्यात आले. त्याचबरोबर सिंहबलने घोषणापत्रात असेही जाहीर केले की, 'स्पर्धेत विजयी होणाऱ्या युवा सरदाराबरोबर मल्लिकेचा विवाह लावून देण्यात येईल.'

ही घोषणा कानी आल्याबरोबर 'आता मल्लिका आपल्या हातीच आली' असे रवीला वाटले. त्याचा आपल्या शक्ती-सामर्थ्यावर संपूर्ण विश्वास होता. 'आपण अन्य सर्व स्पर्धकांना नक्कीच हरवू' अशी त्याची खात्री होती.



त्याच वस्तीत शिखीमुख नावाचा एक भिल्ल तरूण होता. त्याची माता चामुंडीच फक्त जिवन्त होती. वस्तीतल्या लोकांनी सिंहबलचा चांगुलपणाच फक्त पाहिला अन् ओळखला होता. परन्तु चामुंडी ही एकच अशी स्त्री होती की, जिने त्याचा क्रूरपणाही पाहिलेला होता.

चामुंडीच्या पतीचे नाव होते भद्रबल. महाबली, शक्तिशाली सिंहबल प्रथम जेंव्हा सरदार बनला, तेंव्हा आपल्याशी टक्कर देऊ शकेल, आपल्या नेतृत्वाला आव्हान देऊ शकेल असा कोणी युवक आपल्या जमातीत आहे की काय याचा शोध घेतला. तेंव्हा त्याला भद्रबलबद्दल माहिती मिळाली. त्याच्यासारख्या तरुणाची उपेक्षा केली, त्याच्याकडे दुर्लक्ष केले, तर तो पुढेमागे आपल्याला भारी पडू शकेल असा धोका सिंहबलने जाणला अन् मनातल्या मनात आपल्या वाटेतला हा काटा दूर करायचे त्याने ठरवले. नंतर एके दिवशी मोठ्या रहस्यपूर्ण पद्धतीने त्याने भद्रबलला मारून टाकले.

भद्रबलचा मुलगा शिखीमुख त्यावेळी अवघा पाचच वर्षांचा होता. आपल्या पतीची हत्या सिंहबलनेच करवल्याचे कळल्यावर चामुंडी एक दिवस त्याला एकटा गाठून म्हणाली, ''सिंहबल, ज्या नायकपदासाठी तू माझ्या नवऱ्याला मारून टाकलेस, ते पद पुढे एक दिवस माझा शिखीमुख नक्की हस्तगत करून दाखवील. प्रतिज्ञाच समज ही माझी.''

आपल्या मिश्यांवर ताव देत सिंहबल उत्तरला, ''हं! अगदीच अशक्य आहे हे. कोणाचाही आधार नसलेला तुझा मुलगा

विनय गुप्ते



भिल्लांचा सरदार बनेल तरी कसा? आधारा वाचून काय करू शकेल तो? त्याच्या बोलण्यात व्यंग ठासून भरल्यासारखे वाटत होते.

नंतरच्या काही दिवसात सिंहबल चामुंडीचे बोलणे विसरूनही गेला. परन्तु स्वत: चामुंडी कशी विसरणार आपली प्रतिज्ञा? शिखीमुखला भिल्लांचा सरदार होण्यालायक बनवण्यासाठी तिने आपल्या प्रयत्नांची शिकस्त केली. तिचा हट्ट अन् प्रतिज्ञा निरर्थक झाली नाही. पहाता-पहाता शिखीमुख तलवार, भाला व धनुष्यबाण यांचा वापर करण्यात निष्णात बनला. लाठी चालवणे व मल्लयुद्धातले बारकावेही त्याने शिकून घेतले. पण हे सर्व करत असताना, आपले बळ व वीरता लोकांच्या ध्यानात येऊ नये, अशी खबरदारीही तो घेत राहिला. कारण तसे झाले तर पित्याप्रमाणेच मुलगाही सिंहबलच्या क्रूरपणाला बळी पडेल या भीतीची टांगती तलवार चामुंडीच्या डोक्यावर नेहमी असे. यासाठी तिनेही खूप सावधगिरी बाळगली.

वस्तीतल्या भिल्ल जातीतले सर्व लोक कालीमातेची पूजा करीत असत. दरवर्षी तो एक अुत्सव साजरा होई. यावेळी सिंहबलने ठरवले की अुत्सवाच्या दिवशीच नव्या सरदाराची निवडणूक करावी. त्या आधीच्या दिवशी त्याने विविध स्पर्धांचे आयोजन केले.

चढाओढीत तीन प्रकारच्या स्पर्धा असत. पहिली स्पर्धा असे शरीरबळ आजमावणाऱ्या मल्लयुद्धाची. दुसरी असे साहसाची. या स्पर्धेसाठी हातात खंजीर घेअून वाघाशी लढत द्यावी लागे. आणि तिसरी स्पर्धा असे धनुर्विद्येची. देवीच्या मूर्तीसमोर हळद कुंकवाच्या थाळ्या ठेवल्या जात. बाण असा मारायचा की, थाळ्या जराही हलू न देता त्यातले हळद कुंकू मात्र अुडून देवीच्या मूर्तीवर वाहिले जाईल!

स्पर्धेसाठी आलेल्या युवकांचे सिंहबलने दोन संघ बनवले. प्रथम मल्लयुद्ध झाले. पहिल्या संघात रवी आणि दुसऱ्या संघात शिखीमुख विजयी झाले. दुसऱ्या स्पर्धेसाठी हे दोघे ही हातात खंजीर घेअून वाघाच्या पिंजऱ्यात शिरले. दोघे जखमी झाले, पण वाघ मारण्यात त्यांनी यश मिळवले.

आता तिसरी राहिली धनुर्विद्येची परीक्षा.



ही स्पर्धा दुसऱ्या दिवशी, म्हणजे अुत्सवाच्याच दिवशी घेतली जाणार असल्याचे सिंहबलने घोषित केले.



वाघाशी लढत दिल्यानन्तर रवीने शिखीमुखच्या बाबतीत चौकशी केली. त्याला शिखीमुखचे साहस, वीरता इत्यादींबद्दल सविस्तर माहिती मिळाली. धनुर्विद्येतले रवीचे कसब काही खास नव्हते, त्यामुळे तो हारण्याची बरीच शक्यता होती. तेंव्हा शिखीमुखच सरदार बनण्याची विशेष शक्यता होती. अन् मग ज्या मल्लिकेवर त्याचे प्रेम होते, तीही रवीच्या हातून सुटणार होती.

रवी मनातून फार व्याकूळ झाला. रात्री त्याने आपल्या मनातली शंका मल्लिकेला बोलून दाखवली. तो तिला म्हणाला, ''शिखीमुख-सारखा महावीर आपल्या वस्तीत आहे, हे मला आतापर्यन्त ठाअूकच नव्हते. धनुर्विद्येच्या स्पर्धेत मी त्याला जिंकू शकेन असं काही मला वाटत नाही.''

हे ऐकून मल्लिका रडायलाच लागली. ती म्हणाली, ''माझं तुझ्याशी लग्न होणार नसेल, तर मी आत्महत्त्या करीन. दुसऱ्या कुणाशी मी लग्न करणं शक्यच नाही.''

दोघांनी आपसात व्यवस्थित विचार करून ठरवले की त्याच रात्री दोघांनी जाअून शिखीमुखला प्रत्यक्ष भेटायचे. भेटीत रवीने शिखीमुखला आपल्या प्रेमाची हकिकत सांगितली अन् त्याला विनवले की, कसेही करून आपले लग्न मल्लिकेशीच करून दिले जाईन अशी व्यवस्था त्याने करावी. शिखीमुखचे पाय धरून मल्लिका त्याला म्हणाली, ''दादा, आपल्या धाकट्या बहिणीची इच्छा पुरी कर ना!'' हे सांगताना ती बिचारी अश्रू ढाळत होती.

तेंव्हा शिखीमुख रवीला म्हणाला, ''तुम्ही दोघांनी मला चांगलचं अडचणीत टाकलं आहे. ही तर माझी खूपच कठीण परीक्षा झाली की! ही स्पर्धा जिंकणं म्हणजे माझ्या साऱ्या आयुष्याचं अुद्दिष्ट आहे. माझ्या आईनं हीच एक तीव्र इच्छा मनी बाळगून मला वाढवलंय. फार कष्ट सोसलेत तिनं! पण आता अगदी प्रामाणिकपणे माझ्या एका प्रश्नाचं अुत्तर दे पाहू. भिल्लांचा सरदार बनायची तुझी इच्छा आहे, की फक्त मल्लिकाशी

लग्न करणं एवढंच तुझं अुद्दिष्ट आहे?''

रवी अुत्तरला, ''मला मनापासून फक्त मल्लिका हवी.''

''तुझा प्रामाणिकपणा आवडला मला फार.'' असे म्हणून शिखीमुखने रवीला धनुर्विद्येतले काही बारकावे समजावून दिले. रवी म्हणाला, ''तुझ्यासारखा गुरु मला अगोदर भेटला नाही, हे माझं मोठ्ठं दुर्भाग्य म्हणायला हवं.''

दुसऱ्या दिवशी शिखीमुखने सोडलेला पहिला बाण मूर्तीसमोर ठेवलेल्या थाळ्यांपासून थोड्या अंतरावर जाअून पडला. पण रवींने सोडलेल्या बाणाने थाळ्यांना जराही न हलवता त्यातले हळदीकुंकू मात्र देवीच्या मूर्तीवर अुधळले!

भिल्लांनी हर्षाने आरोळ्या ठोकल्या! मग सिंहबलने रवीला 'सरदार' म्हणून घोषित केले. आपल्या मुलीचे लग्नही त्याने रवीशी लावून दिले.

शिखीमुख हारला खरा; पण त्याच्या पराक्रमावर सिंहबल फारच खूश झाला. चौकशी केल्यावर त्याला जेंव्हा कळले, की तो चामुंडीचा मुलगा आहे, तेंव्हा तर त्याच्या आश्चर्याला पारावार राहिला नाही! चामुंडीला बोलावून घेअून तो तिला म्हणाला, ''तू तर प्रतिज्ञा केली होतीस, मोठ्या लंब्याचवड्या गोष्टी बोलली होतीस; पण अखेर काय झालं? आपल्या मुलाला सरदार नाहीच बनवू शकलीस ना? प्रतिज्ञा कुठे पूर्ण झाली तुझी?''

चामुंडी तरीही ताठ मानेने अुत्तरली, ''माझी प्रतिज्ञा? ती तर कधीच पूर्ण झाली सिंहबल! तू आंधळा झाला आहेस! समोर काय चाललंय हे ही तुला दिसत नाहीय.''

आता मल्लिकाने खरी हकीकत पित्याला सांगितली.

ती ऐकून आश्चर्याने सिंहबल म्हणाला, ''एका वीराचा नाहकच पराजय झालाय.''

प्रथेनुसार सरदाराला प्रत्येक स्पर्धकाला हरवणे भाग असे. एक महिन्यानन्तर पुन्हा घेण्यात आलेल्या स्पर्धेत शिखीमुखने रवीला सहज हरवले.

शिखीमुख सरदार बनला अन् सिंहबलने प्रेमाने त्याला मिठीत घेतले.

ते पाहून चामुंडीच्या डोळ्यांचे पारणे फिटले.





# गोविन्दचं वाचन

रलपूर गावात गोविन्द नावाचा एक लहानसा शेतकरी होता. गावातली माणसं रोज संध्याकाळी गावच्या मध्यावर असलेल्या चौथऱ्यावर गप्पा मारायला बसत. आपलं काम संपवून गोविन्दही त्यांच्यात जाअून बसे व गप्पा ऐके. पण त्यानं कधी मधेच तोंड घातलं, तर सगळे त्याची टिंगल करून हसू लागत.

असं घडलं म्हणजे बिचारा गोविन्द चेहरा पाडून तिथून अुठून निघून जाई. पण पुन्हा दुसऱ्या दिवशी मात्र पुन्हा हजेरी लावीच! एकदा असाच बसलेला असताना तिथे परमेश नावाचा त्याच गावचा माणूस आला, तेंव्हा बसलेल्यांपैकी एकानं त्याला विचारलं, ''अरे तू तर आपले डोळे दाखवायला शहरात जाणार होतास ना?'' तेंव्हा पटकन आपल्या खिशातला चष्मा काढून दाखवत परमेश म्हणाला, ''जाअून आलो सुद्धा! हा पहा वैद्यानं दिलेला चष्मा. चष्मा लावून आता छान वाचू शकतो मी सगळं! पूर्वी तर मोठी मोठी अक्षरं ही डोळ्यांना नीट वाचता येत नसत.''

एकजण म्हणाला, ''हो! चष्मा चांगला असेल तर काहीही वाचता येतं खरं.''

दुसरा एकजण म्हणाला, ''मग मलाही जायला हवं त्याच्याकडे. मलाही वाचता येईनासं झालंय हल्ली.''

त्यांचं बोलणं ऐकून गोविन्दला आश्चर्य वाटलं अन् आनन्दही झाला. दुसऱ्याच दिवशी तो शहरात जाअून त्या वैद्याची चौकशी करू लागला. एका माणसाला त्यानं विचारलं, ''आमच्या गावपाटील सूरदासच्या नंबर दोनच्या मुलाला - परमेशला - चष्मा देणाऱ्या वैद्याचा पत्ता सांगू शकाल का मला?'' बऱ्याच लोकांना त्याने हा प्रश्न विचारला; पण बहुतेकांनी, ''मला नाही ठाअूक.'' असंच अुत्तर दिलं. शेवटी एकानं गोविंदला विचारलं, ''अरे तू कोण, कुठल्या गावचा, तुझा हा

रेणुका पवार

परमेश कोण - वगैरे इथे कुणालाच काही माहिती नाही. तेंव्हा विसरून जा ते सारं. पुन्हा कुणाला विचारू नकोस असलं काही. याच गल्लीत सुंदर नावाचा एक नामांकित नेत्रवैद्य आहे. त्याच्याकडे जा मुकाट्यानं. नशीब असलं तर तुलाही ठीक करू शकेल तो.''

आता गोविन्द सुंदरचं घर शोधून त्याच्याकडे गेला. आपलं अन् गावाचं नाव सांगून तो सुंदरला म्हणाला, ''वैद्यमहाराज, आमच्या गावच्या परमेशला तुम्हीच चष्मा दिलात ना? त्याला आता छान वाचता येतंय.''

जरासा विचार करून नेत्रवैद्य म्हणाला, ''तो कोण, कुठल्या गावचा वगैरे मला नाही माहीत; पण परमेश नावाच्या एकाला मी चष्मा बनवून दिला खरा!'' त्याचं उत्तर ऐकून खुश झालेला गोविन्द लगेच म्हणाला, ''वा:! भाग्य असावं तर असं! मलाही त्याच्यासारखाच चष्मा द्या ना बनवून.''

वैद्यानं गोविन्दला खुर्चीवर बसवलं अन् त्याच्यासमोर लहानमोठ्या अक्षरांचा एक तक्ता ठेवून लहानापासून मोठ्या अक्षरांवर बोट ठेवून विचारू लागला, ''हे येतंय वाचता? हे येतंय वाचता?''

पण गोविन्द दर वेळी ''नाही, नाही;'' असंच म्हणत राहिला. शेवटी निरनिराळे चष्मे वैद्यानं गोविन्दला लावून पाहिले. पण ''मला काही वाचता येत नाहीय,'' असंच तो सांगत राहिला.

शेवटी नाराज झालेला वैद्य म्हणाला, ''तुझ्या डोळ्यात काय दोष आहे, तेच कळत नाहीय मला!''

गोविन्द म्हणाला, ''आमचा परमेश तर सर्वांना सांगतोय की, तुम्ही दिलेला चष्मा लावून आपल्याला छान वाचता येऊ लागलंय! मी निरक्षर आहे, पण मलाही वाचायची खूप हौस आहे. मला वाटलं होतं की परमेशसारखा चष्मा दिलात तर मलाही वाचता येईल. म्हणून तर आलो मी तुमच्याकडे इतकी पायपीट करून!''

आता मात्र वैद्याचेच डोळे गरगरा फिरू लागले!






(ट्रॉयच्या पतनानन्तर रूपधर मायदेशी जायला निघाला. परंतु आपल्या अनुचरांसह तो वादळात सापडला. त्याच्या नौका बरेच दिवस दिशाहीन भरकटत राहिल्या. शेवटी ते सर्व एका बेटावर पोचले. तेथील रहिवाशांची माहिती काढण्यासाठी रूपधर निघाला. बाकी सर्वांना बोटींच्या रक्षणासाठी मागे ठेवून निवडक बारा माणसांसह निघाला अन् एका गुहेत अडकला. ही गुहा एका फाललोचन जातीच्या राक्षसाची होती.) यानन्तर -

**त्या** राक्षसाचा आवाज ऐकून रूपधर उत्तरला, ''अरे, आम्ही ट्रॉयहून परत निघालेले ग्रीक सैनिक आहोत. दुर्दैवानं समुद्रात मोठं वादळ उठलं अन् आमच्या नावा भरकटल्या. आम्ही तुमचे अतिथि आहोत. योग्य असं आमचं स्वागत कर.''

रूपधरचे बोलणे ऐकून राक्षस विकटपणे हसत म्हणाला, ''बरं आता सांग, तुमची नाव आहे कुठे? जवळच आहे की दूर? बाकीच्या गप्पा सोड अन् प्रथम माझ्या प्रश्नाचं उत्तर दे.''

राक्षस असा प्रश्न का विचारत आहे, हे रूपधरच्या ताबडतोब लक्षात आले. तो म्हणाला, ''आता शिल्लक असेल, तर ना आम्ही तिचा पत्ता सांगणार? ती तर आपल्या या बेटाच्या किनाऱ्यावरच्या खडकांवर आपटून पार मोडून गेली.''

राक्षसाने आपला हात लांब पसरून दोन सैनिक पकडले अन् त्यांना जमिनीवर आपटून मारून टाकले. नंतर एकएक करून त्यांना आगीत भाजून त्यांची हाडेसुद्धा शिल्लक न ठेवता



खाऊन टाकले. भोजन संपल्यावर तो फाललोचन राक्षस चार पाच घड्यांतले दूध पाण्यासारखे घटाघटा प्यायला अन् आपल्या बकऱ्यांच्या कळपातच निश्चिन्तपणे झोपून गेला.

हृदयातच एकदम तलवार खुपसून राक्षसाला ठार करायचा रूपधरचा विचार होता; पण राक्षसाने गुहेचे दार इतक्या मोठ्या दगडाने बन्द करून घेतले होते, की ते त्यांना सर्वांना मिळूनही अुघडणे अशक्य ! राक्षसाला मारून टाकले तर शेवटी सर्वांना भुकेने तडफडून मरायचीच वेळ आली असती.

सकाळ झाली. राक्षस झोपेतून जागा झाला. शेळ्यांचे दूध काढून त्याने करडे त्यांच्या आयांकडे सोडली. नंतर पुन्हा दोन सैनिक मारून कालच्याप्रमाणेच खाअून टाकले अन् आपल्या शेळ्याबकऱ्यांचा कळप हाकलत त्यांना गुहेबाहेर घेअून गेला. ग्रीक सैनिक पळून जाअू नयेत म्हणून पुन्हा त्याने गुहेचे तोंड दगडाने झाकून टाकले.

रूपधरला एक अुपाय सुचला.

गुहेत रहाणारा राक्षस गुहेत येताना बरोबर एक काठी घेअून आला होता. ती अजून गुहेतच होती. काठी कसली, तो तर त्यांच्या डोलकाठी एवढा एक मोठा खांबच होता. तो खांब रूपधरने आपल्या साथीदारांच्या साह्याने कापला व त्याचे एक टोक चांगले तासले. तासलेले टोक त्याने गुहेतल्या आगीत तापवून कडक बनवले, आणि मग ते लाकूड त्याने गुहेत पडलेल्या लेंड्यांच्या ढिगात लपवून ठेवले. रूपधरने ठरवले होते की, रात्री जेंव्हा राक्षस झोपेल तेंव्हा आपल्या साथीदारांच्या मदतीने ते लाकडाचे धारदार बनलेले टोक त्याच्या डोळ्यात खुपसायचे अन् त्याला आंधळा बनवायचे. या कामासाठी आपल्या साथीदारांपैकी चार जणांची निवडही त्याने करून ठेवली.

संध्याकाळ झाल्याबरोबर राक्षस आपल्या शेळ्या-मेंढ्यांच्या कळपासह गुहेत परत आला. शेळ्यांची धार काढल्यावर त्याने गुहेचे दार बन्द करून घेतले. नंतर पुन्हा आणखी दोन सैनिक पकडून त्याने खाअून टाकले.



इतक्यात रूपधरने आपल्याबरोबर आणलेले पेय एका लाकडी भांड्यात भरले. ते घेअून तो राक्षसाजवळ गेला अन् नम्रपणे बोलू लागला, ''फाललोचना, हे घे. या पेयाची चव पहा तरी. तुला नरमांसाची चव ठाअूक आहे, पण या पेयाची चव कधी चाखली नसशील तू ! हे दिव्य पेय मी तुझ्यासाठीच आणलं आहे. तू तर मोठा वाईट प्राणी आहेस. आमच्याबद्दल तुझ्या मनात जराही दयाबुद्धी नाही. असा कडूपणाने वागलास तर तुझ्या मदतीला, किंवा तुला भेटायला तरी कोण येणार?''

राक्षसाने रूपधरने दिलेले भांडे हातात घेतले अन् तो ते पेय घटाघट पिअू लागला. त्याला ते मोठे चविष्ट वाटले.

''अरे, आणखी असेल तर दे ना. तुझं नावही सांग मला. आमच्या पद्धतीप्रमाणे तुझं आतिथ्य ही करीन मी. तसा आम्ही इथे द्राक्षांचा रस पितो, पण तो इतका स्वादिष्ट नसतो. या पेयाची गंमत काही निराळीच आहे.'' राक्षस म्हणाला.

राक्षस असे बोलला खरा; पण रूपधर अजून खूप सावधगिरीच बाळगून होता. तो अुत्तरला, ''माझं नाव फक्त माणूस आहे. लक्षात ठेव, आता आपल्या वचनाप्रमाणे तू माझा पाहुणचार करायला हवास.'' अन् असे बोलून त्याने आणखी तीन भांडी त्या पेयाने भरली व एक एक भांडे तो राक्षसाच्या हाती देत राहिला. राक्षस हाती आलेले भांडे पटापट रिकामे करत



राहिला.

ते पीत असतानाच राक्षसाला नशा चढू लागली व तो बडबडू लागला, ''अरे फक्त माणसा ! हे बाकीचे संपून जात नाहीत, तोपर्यन्त मी तुला खाणार नाही. आमच्यात पाहुणचार इतकाच असतो.'' हे बोलत असतानाच तो नशेत बुडून आडवा पडला. आता रूपधरने लेंड्यांच्या ढिगातली काठी बाहेर काढली अन् तिचे टोक रसरशीत लाल दिसू लागेपर्यंत ते आगीत तापवले. नन्तर आपल्या साथीदारांना प्रोत्साहन देअून सजग रहायला सांगितले. सर्वजण मनाने तयार होअून अुत्साहित झाल्यावर ती काठी घेअून राक्षसाजवळ आले अन् त्यांनी लाल झालेले ते



काठीचे टोक एकदम जोर लावून राक्षसाच्या डोळ्यात खुपसले.

राक्षसाच्या किंचाळण्याने अन् वेदना भरल्या कण्हण्याच्या आवाजाने गुहा दुमदुमली. त्या आवाजाने शेळ्यामेंढ्याही दचकून एकदम घाबरून उभ्या राहिल्या. त्यांची शरीरे भीतीने आक्रसल्यासारखी झाली. अन् थोड्याच वेळात राक्षसाच्या आक्रोशात त्यांचा बेंऽ बेंऽ आवाजही मिसळून एकच गोंधळ झाला. राक्षसाने उठून डोळ्यात खुपसले गेलेले लाकूड उपसून बाहेर काढले आणि इतर फाललोचनांनी आपल्या मदतीला यावे म्हणून तो पुन्हा ओरडू लागला. आसपासच्या गुहांतून रहाणारे अन्य फाललोचन त्याचे ओरडणे ऐकून धावतच त्याच्या गुहेजवळ आले आणि बाहेरूनच ओरडू लागले, ''अरे काय झालं? इतकं ओरडून आमची झोप का मोडलीस तू? तुझ्या बकऱ्या कोणी चोरल्या का? का तुला कोणी आपली शक्ती वापरून किंवा कशाने तरी मारत आहे?''

''हो, हो ! मला हा फक्त माणूस मारतो आहे.'' राक्षसाने ओरडून सांगितले.

''काय ? फक्त माणूस मारतोय तुला? काय वेड्यासारखा बकतो आहेस रे? आता मूर्खासारखं बोलायचं सोडून झोप मुकाट्यानं ! तब्येत बरी नसेल तर सकाळपर्यन्त झोपेत आपोआप बरी होऊन जाईल बघ.'' अन् असे बोलून ते फाललोचन तेथून निघून गेले. यापेक्षा जास्त एकमेकांची विचारपूस करायची पद्धतच त्यांच्यात नसावी.

आता गुहेतला राक्षस आंधळा झाल्याने भोवतालचे काहीच पाहू शकत नव्हता. त्यामुळे चाचपडत तो गुहेच्या दाराशी पोचला. तिथला दगड हलवल्यावर गुहेतली माणसे बाहेर जाऊ नयेत म्हणून तो तिथेच आसन जमवून बसून राहिला.

ग्रीक सैनिक बाहेर पडायचा प्रयत्न करतील, तेंव्हा त्यांना पकडायची त्याची योजना होती.

परन्तु रूपधरही कोणी 'येरा गबाळा' माणूस नव्हता ! त्याची बुद्धी मोठी तीक्ष्ण होती. गुहेतून साथीदारांसुद्धा बाहेर पडायच्या अनेक उपायांचा त्याने साधकबाधक विचार केला. त्यातली एक युक्ती त्याला खूप आवडली.

राक्षसाच्या बकऱ्या चांगल्या जाडजूड व तगड्या होत्या. आकारानेही चांगल्या मोठ्या होत्या त्या. रूपधरने तीन तीन बकऱ्या एकत्र बांधल्या अन् त्यांच्या पोटाखाली एक एक साथीदार बांधून ठेवला. अशा प्रकारे आपल्या साथीदारांसाठी अगोदर व्यवस्था केल्यावर आता तो एकटाच काय तो उरला. गुहेतली सर्वात मोठी बकरी त्याने स्वत:साठी बाजूला निवडून ठेवली होती. थोड्याच वेळात सकाळ झाली. शेळ्या-मेंढ्यांचा कळप बाहेर चरायला निघायला सिद्ध झाला. गुहेच्या द्वाराशी कण्हत बसलेला राक्षस बाहेर पडणाऱ्या शेळ्या-मेंढ्यांच्या अंगावरून हात फिरवून त्यांना बाहेर जाऊ देत राहिला.

त्या वेड्याला हे कळलेच नाही की शत्रु मेंढ्यांच्या खाली लपून बाहेर पडले सुद्धा ! सर्व साथीदार बाहेर पडल्यावर स्वत:साठी पारखून ठेवलेल्या मेंढीची दाट लोकर रूपधरने पोटाखालून घट्ट पकडली अन् तो एखाद्या माकडाच्या पिल्लासारखा लटकू लागला. ती मेंढी बाहेर पडू लागली तेंव्हा तिलाही पाठीवरून तपासत राक्षस म्हणाला, ''अग, तू तर रोज सर्वांच्या आधी बाहेर पडत असतेस. आज का मागे राहिलीस? आळशी कुठची ! त्या दुष्ट माणसानं आपल्या मालकाला खूप दारू पाजून मग आंधळा केला म्हणून वाईट वाटतंय का तुला? मी चांगला धडा शिकवीन बघ त्याला. तू पळ आता बाहेर !''

बाहेर आल्याबरोबर रूपधरने मेंढीवरची





आपली पकड सोडून दिली, आणि तो जमिनीवर अुभा राहिला. तिघी तिघींना एकत्र बांधल्यामुळे धडपडत हळूहळ पुढे सरकणाऱ्या मेंढ्या पकडून त्यांची बंधने सोडत रूपधरने आपले साथीदारही मोकळे केले. यानन्तर रूपधरच्या डोकेबाजपणामुळे वाचलेले ते सर्व भराभरा समुद्रकिनारी पोचले. आता कुठे त्यांच्या जिवात जीव आला. आपण वाचू शकू अशी जराही आशा त्यांना नव्हती. त्यामुळे आता ते रूपधरची खूप स्तुती करू लागले.

इकडे रूपधर व त्याच्याबरोबर पुढे गावात चौकशीसाठी गेलेल्या लोकांची वाट पहाता पहाता नौकेवरील इतर योद्धे खूप घाबरून गेलेले होते. त्यांना परतायला फार अुशीर झाल्याने या बोटीवरच्यांना, ते एकाद्या संकटात तर सापडले नाहीत ना, अशी शंका येअू लागली होती. त्यांच्याजवळ पोचल्यावर रूपधरने आपली सारी हकीकत सांगितली. आपल्या मेलेल्या साथीदारांसाठी ते सर्वजण विलाप करू लागले. रूपधरने त्यांचे सांत्वन करून त्यांना धीर देत म्हटले, ''आपल्याला आत्ता शोक करत बसायलाही वेळ नाहीये. जितक्या शेळ्या-बकऱ्या सापडतील तितक्या साऱ्या पकडून पटापट आपल्या जहाजावर चढवा. आपल्याला ताबडतोब किनाऱ्यापासून दूर जायला हवं.'' रूपधरच्या साथीदारांनी पाण्यातली नौका तटावर खेचून आणली. सर्वजण नौकेवर चढले.

नौका पाण्यात जरा दूर गेल्याबरोबर गुहेकडे तोंड करून रूपधर जोराने ओरडला, ''अरे ए पापी राक्षसा, तू काय समजलास की मी अन् माझे साथीदार तुझ्या स्वाधीन होअू? आम्हालाही खाअून टाकायचा तुझा विचार होता नाही का ? पाहुण्यांचं आदरातिथ्य करण्याऐवजी त्यांना खाअून टाकण्याच्या कृत्याचा तुला चांगला दंड मिळाला बघ! आता तरी निदान सुधार आपल्याला!''

राक्षसाला हा आवाज ऐकू आला. तो आता रागाने थर-थर कापू लागला. एक खूप मोठी शिळा अुचलून त्याने ती रूपधरच्या आवाजाच्या दिशेने जोरात फेकली. ती शिळा नौकेपासून फारच थोड्या अंतरावर पाण्यात पडली. अन् त्यामुळे त्या जागी एक मोठी लाट अुसळली. अन् रूपधरची नाव त्या वेगामुळे पुन्हा तटाकडे सरकू लागली. कारण त्या वेगामुळे त्यांचा नावेवरचा ताबा सुटला.

घाबरून रूपधरने महत्प्रयासाने नौका पुन्हा समुद्रात आत नेली आणि डोळा मारून आपल्या साथीदारांना इशारा दिला. यावेळी नौका जेंव्हा पहिल्यापेक्षा दुप्पट अंतरावर गेली, तेंव्हा रूपधरने राक्षसाला आणखी खिजवायचा विचार केला. त्याचे साथीदार त्याला तसे न करण्याबद्दल गयावया करून सांगू लागले. पण त्यांच्या सांगण्याकडे दुर्लक्ष करून मोठ्या अुत्साहाने तो ओरडू लागला ''अरे अधम राक्षसा, तुला कोणी आंधळं केलं असं जर कोणी विचारलं तर सांग की तो माणूस म्हणजे दुसरातिसरा कोणी नसून ट्रॉयचा विजेता योद्धा रूपधरच होता. त्यांना सांग की, रूपधर इथाकाचा रहिवासी आहे.''

यावेळी राक्षसाने पहिल्यापेक्षाही मोठी शिळा अुचलली अन् आपली सगळी शक्ती एकवटून ती नावेकडे फेकली. परन्तु यावेळी मात्र शिळा पडल्यामुळे अुसळलेल्या पाण्याने रूपधरचा फायदाच झाला. कारण त्या लाटेने नौका समुद्राकडेच आत ढकलली गेली. लवकरच रूपधरची नौका समुद्रात अुभ्या असणाऱ्या इतर नौकांजवळ पोचली. त्यात बसलेले योद्धे आपल्या साथीदारांच्या परतण्याची मोठ्या आतुरतेने वाट पहात होते. आपली माणसे परत आलेली पाहून त्यांना फारच आनन्द झाला. पण थोड्याच वेळात त्यांना राक्षसाने मारलेल्या सैनिकांबद्दल कळताच त्या आनन्दावर विरजण पडल्यासारखे झाले.

नंतर रूपधरने पकडून आणलेल्या शेळ्या-मेंढ्या सर्वांनी सारख्या वाटून घेअून खाअून टाकल्या; मोठ्या अुत्साहाने त्यानंतर दारू पिअून त्यांनी तो दिवस घालवला. रात्री तटावर येअून रेतीत सर्वजण मस्त झोपले. दुसऱ्या दिवशी सकाळीच रूपधरच्या आज्ञेने सर्वांनी नांगर अुचलून घेअून प्रवास पुढे सुरू केला. नौका झरझर पाणी कापत वेगाने जाअू लागल्या.

**क्रमशः**



## चांदोबाच्या बातम्या

### प्राण्यांची योग्यता

अमेरिकेतील ओरिगान क्रेटर नॅशनल पार्कमधे १९ जूनला फ्रॅंक मिलर आपल्या तरुण प्रेयसीबरोबर फिरत होता. त्यांच्याबरोबर ५ वर्षे वयाचा त्यांचा कुत्रा 'बेट' हाही होता. त्यानेही जरा मोकळे फिरून यावे, म्हणून तरुणीने त्याला मोकळे सोडले. बर्फाने वेढलेल्या तिथल्या तलावाच्या



किनाऱ्यावरून बेट मजेत धावत सुटला. पण मधेच घसरून तो चाळीस फूट खोल गडगडत गेला. बरीच दूरवर नजर टाकूनही तो दिसेना, तेंव्हा मिलरने कुत्र्याच्या खेळायच्या वस्तूही तलावात भिरकावून दिल्या. या वस्तूंशी बेट नेहमी खेळत असे. कुत्रा नाहीसा झाल्याने मिलर व त्याची प्रेयसी या दोघांनाही फार वाईट वाटले. परन्तु एका आठवड्यानंतर कुत्रा सुरक्षितपणे शेजारच्या गावात परत आल्याचे आढळले. इतक्या खोलवरून बाहेर निघून रस्ता शोधून या ठिकाणी पोचेपर्यन्त एकूण २९ कि.मी. इतके अंतर पार करून तो आला होता. या घटनेचा उल्लेख करून पार्कचा अधिकारी म्हणाला की. "प्राण्यांची योग्यता खरोखरच फार अपूर्व अशी असते. अशी कोणतीही गोष्ट नव्हे, की जी प्राणी करू शकत नाहीत."

### आघात

केरळमधील अलेप्पी जवळील मांघार खेड्यात सुनील रहातो. त्याला मांजरे पाळण्याची भारी हौस. त्यांच्याजवळ सात मांजरे होती. त्यातली अम्मणी नामक मांजरी साऱ्या गाववाल्यांच्या माहितीची झाली होती. ती मोठी नेमस्त होती. केवळ बिस्किटे आणि हिरवी मिरची खाऊन रहात असे ती. समोर माशांचा ढीग ठेवला, तरी एकाही माशाला ती तोंड लावत नसे. गावचे लोक तिच्याबद्दलच्या खूप विचित्र गोष्टी सांगत असत. नुकतीच तिच्याबद्दलची माहिती तिच्या फोटोसह तेथील स्थानिक वृत्तपत्रात छापून आली. अन् विशेष म्हणजे, दुसऱ्याच दिवशी 'अम्मणी' मरून गेली. नंतर दोनच दिवसांनी सुनीलचे वडीलही स्वर्गवासी झाले; अन् नंतरच्या दोन आठवड्यात एक-एक, दोन-दोन दिवसांच्या अंतराने बाकीची सर्व मांजरेही मरून गेली ! सुनीलला हा आघात सहन होईनासा झाला. त्याने 'आता यापुढे मी कधीही मांजरे पाळणार नाही' असा निश्चय केला आहे.

### कृत्रिम हृदय

टोकियो विश्वविद्यालयाच्या चिकित्सा-विभागाने नुकताच एक नवा विश्व-अङ्कांक स्थापित केला. विभागातील लोकांनी पाच वर्षांच्या एका शेळीला कृत्रिम हृदय बसवले. चारशे दिवसांनंतरही ती चांगली सुदृढ होती. यापूर्वीही १९९२ मधे अमेरिकेतील एका विश्वविद्यालयाने असा प्रयत्न केला होता. पण त्यांनी कृत्रिम हृदय बसवलेले जनावर केवळ ८८ तासच जगू शकले.

# वचन-भंग

दृढनिश्चयी विक्रमादित्य पुन्हा झाडाजवळ आला. पुन्हा प्रेत खांद्यावर टाकून तो स्मशानाची वाट चालू लागला. तेव्हा वेताळ बोलू लागला - "कोणी तरी आपली करुण कहाणी तुला ऐकवली आणि तू त्याला मदत करायला निघालेला दिसतो आहेस. जर असं नसतं तर हा सर्व खटाटोप तू कशासाठी केला असतास? पण आपलं काम झालं की दिलेली आश्वासनं हे लोक विसरून जातात. इंद्रपुरीची महाराणी इंदुमति याचं जिवंत उदाहरण आहे.

इंद्रपुरीचा राजा जयकेतनची इंदुमती पट्टराणी होती. बारा वर्षांपूर्वी त्यांचे लग्न झाले होते, पण अजून त्यांना संतान-प्राप्ती झाली नव्हती. मूल होण्यासाठी इन्दुमती दर शनिवारी उपास करी आणि संध्याकाळी राजधानीच्या सीमेवरील मंदिरात जाऊन भगवान शंकराचे दर्शन घेऊन त्याला प्रार्थना करी. मनोभावे शंकराची ती पूजा-अर्चा करी.

## वेताळ कथा



एका शनिवारी तिने मंदिरात जाऊन शंकराची पूजा केली. आणि नंतर ती तेथील पुजाऱ्याला म्हणाली - ''मी तीनशे शनिवारी शंकराची पूजा केली. पण भगवान माझ्यावर प्रसन्न झाले नाहीत. मी माता बनू शकले नाही.''

तिला सान्त्वना देत पुजारी म्हणाला - ''महाराणीजी, आपण निराश होऊ नका. आपली मनोकामना पूर्ण होईल असा एक दिवस निश्चित येईल.''

ती परत जाऊ लागली तसा एक ध्वनि तिच्या कानी पडला - ''इंदुमती, इकडे ये!'' तिने वळून मागे पाहिले, तेव्हा वडाच्या झाडापासून काही अंतरावर असलेल्या टेकडीवर तिला एक बैरागी बसलेला दिसला.

बैरागी म्हणाला - ''इंदुमती. तुझी मनोकामना पूर्ण करण्यासाठीच मी इथं आलो आहे.''

बैरागी एक असामान्य माणूस आहे हे लवकरच इंदुमतीच्या लक्षात आले. ती त्याच्या जवळ गेली नि त्याच्या पायां पडत म्हणाली - ''मुनीश्रेष्ठ, आपण कोणी साधारण मानव नाही! कृपा कराल माझ्यावर ?''

जवळच्या पिशवीकडे बोट दाखवीत बैरागी इंदुमतीला म्हणाला - ''त्या पिशवीत काही केळी आहेत. त्यातलं एकच घे आणि खाऊन टाक. तुझी इच्छा पूर्ण होईल निश्चित.''

मोठ्या आतुरतेने इंदुमतीने पिशवीत हात घातला. पिशवी केळांनी भरलेली होती. तिने पिशवीच्या तळाशी हात घातला आणि एक मोठं केळं बाहेर काढलं. केळ्याचं साल काढता-काढता तिच्या लक्षात आलं की ते एक जोड केळं होतं.

इंदुमती केळं खाऊ लागली, तसा पिशवी हातात घेऊन बैरागी हा-हा म्हणता अदृश्य झाला.

त्या दिवशी रात्री इन्दुमतीने राजाला घडलेली सर्व घटना सविस्तर सांगितली आणि म्हणाली - ''ते नक्कीच एक महापुरुष असावेत!''

पण या घटनेनंतर तीन महिन्यांनी राजवैद्यांनी इंदुमतीची तपासणी केली नि खात्रीपूर्वक सांगितले की ती गर्भवती आहे.

नऊ महिन्यांनी इंदुमतीने जुळ्या मुलांना जन्म दिला. पिशवीतून काढून खाल्लेल्या जोड-केळ्याप्रमाणे दोघांची शरीरे एकमेकांना जोडलेली होती.

दहा दिवसांनंतर राजवैद्यांनी आपला विचार सांगितला - ''सहा महिन्यात शस्त्र-क्रिया करून यांना अलग केले नाही, तर हे राजपुत्र जगण्याची आशा नाही.''

''मग तोपर्यंत वाट कशाला पहायची? लवकरच शस्त्र-क्रिया करून टाका.'' राजाने आपला विचार व्यक्त केला.

आपली असमर्थता प्रकट करीत राजवैद्य म्हणाले - ''महाराज, ही शस्त्र-क्रिया तर एकादा कुशल व अनुभवी शस्त्र-चिकित्सकच करू शकेल. आपल्या राज्यात असा कोणी चिकित्सक नाही.''

''मग कुठे आहे? शेजारच्या ? शेजारच्या राज्यात कोणी असेल तर आपण त्याचे स्वागत करू. जो कोणी ही शस्त्र-क्रिया यशस्वीपणे करील त्याला आपण मूल्यवान पारितोषिक देऊन त्याचा सत्कार करू.'' इंदुमती म्हणाली.

राजवैद्य अमळ विचार करीत राहिले आणि मग म्हणाले - ''महाराणी, आमच्या माहितीनुसार ही शस्त्र-क्रिया करायला योग्य केवळ एकच एक माणूस आहे. त्याचं नाव अश्विनी दत्त.'' अश्विनी दत्ताचे नाव ऐकताच राजा जयकेतन चिडून म्हणाला - ''आमचा कट्टर शत्रु चंद्रगिरीच्या दरबारातील राजवैद्य! काही झाले तरी त्याच्याकडून आम्ही ही शस्त्र-



क्रिया मुळिच करविणार नाही. मग राजपुत्रांचे प्राण गेले तरी चालेल. परंतु त्या वैद्यासाठी द्रोही रुद्रसेनापुढे दयेची भीक मुळिच मागणार नाही. मी जिवंत असेपर्यंत हे शक्य नाही.'' गंभीर स्वरात दृढपणे राजाने आपला विचार सांगितला.

जयकेतनला संतान-प्राप्ती झाल्याची वातमी कळल्यावर आसपासच्या राजांनी अभिनंदनपर संदेश पाठविले. चंद्रगिरीचा राजा रुद्रसेन याने मात्र आपल्या संदेशात म्हटले - ''पुत्र-प्राप्ति झाली खरी. पण दोन मुले एकमेकांना जोडलेली आहेत. अशी ती थोडीच जिवंत राहणार?''

याचा जयकेतनला खूपच राग आला. मुलांच्या स्वास्थ्यासाठी रुद्रसेनची मदत घेणं आवश्यक आहे हे राजाला समजून सांगायचा

इंदुमतीने खूप प्रयत्न केला. पण जयकेतनने याला स्पष्ट नकार दिला आणि इंदुमतीला धमकावले - ''पुन्हा अशी गोष्ट मनात सुद्धा आणू नकोस आणि यासाठी मला भरीस घालू नकोस.''

जयकेतन याबाबत काही करणार नाही, आपल्याला मदत करणार नाही हे इंदुमती समजून चुकली. तेव्हां तिने निश्चय केला की आपण स्वत:च अश्विनी दत्ताकडे जायचं आणि त्याच्याकडून ही शस्त्र-क्रिया करून घ्यायची. तिने मुलांना वैद्यांच्या ताब्यात दिले आणि माहेरी जाण्याच्या मिषाने एका दासीला घेऊन ती चंद्रगिरीला जायला निघाली. तिने आपला वेष बदलला आणि दोन दिवस व दोन रात्री प्रवास करून ती चन्द्रगिरीला पोचली.

चन्द्रगिरीला राजवैद्याचा पत्ता तिला सहज-सहज मिळाला. रात्र झाली होती. अश्विनी दत्त ब्रह्मचारी होता. तो घरात स्वयंपाक करीत होता. कुणी तरी दार खडखडवलं, म्हणून तो स्वत:च दार उघडायला आला.

नम्रपणे नमस्कार करीत इंदुमती म्हणाली - ''खूप दूर वरून मी आलेली आहे, थकून गेलेय. मला केवळ आपणच संतान-भिक्षा देऊ शकता.'' आणि तिच्या डोळ्यात अश्रु तरळले.

''रडू नका बाई. खूप दमून आलेल्या दिसत आहात. भूक लागली असेल तुम्हाला? अगोदर भोजन करा.'' असे म्हणत अश्विनी दत्ताने केळीच्या पानावर इंदुमतीला भोजन दिले.

जेवता जेवता इंदुमतीने आपल्या जुळ्या मुलांच्या शस्त्र-क्रियेबाबतचा आपला विचार अश्विनी दत्तला सांगितला.

''आपल्या मुलांबाबत काही काळजी करण्याची आवश्यकता नाही. शस्त्र-चिकित्सा करून आपल्या मुलांचे प्राण वाचविता येतील. आणि ही चिकित्सा मीच स्वत: करीन. तुमचं घर इथून किती दूर आहे ते सांगाल?'' अश्विनी दत्तने आश्वासन देत विचारले.

कसला ही संकोच न करता इंदुमतीने सांगून टाकले - ''मी इंद्रपुरीची राहणारी. मी इंद्रपुरीची महाराणी आहे, महाशय !''

अश्विनी दत्त बुचकळ्यात पडला. त्याच्या चेहऱ्यावरील रंग उडाले. तो म्हणाला - ''मी जर ही शस्त्र-चिकित्सा केली, तर दुसऱ्याच क्षणी माझं शिर चंद्रगिरीच्या किल्ल्याच्या प्रवेश-द्वारावर लटकलेलं दिसेल हे कदाचित् आपणास माहीत नसावं.''

''आपलं काही ही नुकसान होणार नाही, असं मी आपणास वचन देते. आपल्या प्राणावर बेतणार नाही असं मी पाहीन. आपण माझ्यावर विश्वास ठेवा नि मला निराश करू नका.'' इंदुमती गयावया करीत म्हणाली.

अश्विनी दत्ताने थोडा वेळ विचार केला आणि मग साहस-पूर्वक म्हणाला - ''तर मग चला !'' त्याने घराला कुलूप घातले नि तो इंदुमती बरोबर निघाला.

इंद्रपुरीला पोचताच दुसऱ्या दिवशी अश्विनी दत्ताने शस्त्र-चिकित्सा करून दोन्ही मुलांना वेगळे केले. त्याची शस्त्र-क्रिया यशस्वी झाली. दोन्ही मुले जिवंत आणि स्वस्थ आहेत.

त्याच दिवशी राजा जयकेतनच्या आज्ञेनुसार







राज्य भर मंगल घोषणा करण्यात आली - ''शस्त्र-क्रिया करून दोन्ही राजपुत्रांना अलग करण्यात आले आहे. चंद्रपुरीचे दरबारी राजवैद्य अश्विनी दत्त यांनी ही शस्त्र-क्रिया यशस्वीपणे पार पाडली. राजदंपति आणि राज्यातील प्रजा त्यांची अंतःकरणपूर्वक कृतज्ञ आहे.''

लवकरच ही बातमी आसपासच्या सर्व राज्यात ही पोचली.

महाराणी अश्विनी दत्तला बहुमोल पारितोषिक देऊ लागली. त्याचा अस्वीकार करीत अश्विनी दत्त म्हणाला - ''महाराणी, आपण माझा जो गौरव केला त्याबद्दल मी आपले आभार मानतो.''

वेताळाने राजा विक्रमादित्याला एवढी गोष्ट सांगितली आणि म्हणाला - '' राजा, इंदुमतीने अश्विनी दत्ताचा वचन-भंगच केला नाही का? कोणत्या ही परिस्थितीत अश्विनी दत्ताच्या प्राणांवर बेतणार नाही असे इंदुमतीने वचन दिलेले होते. परंतु शस्त्र-क्रिया यशस्वी झाल्यावर तिने राज्यभर घोषणा केली आणि अश्विनी दत्ताजवळ कृतज्ञता प्रकट केली. घोषणा करून केवळ आपल्याच राज्यात नव्हे तर आसपासच्या राज्यात ही तिने जाहिर केले की शस्त्र-चिकित्सा अश्विनी दत्तने केली. असे करून ती अश्विनी दत्तच्या प्राणीशीच खेळली नाही का? तिने बिचाऱ्याला संकटात टाकले नाही का? आपण जे काम करीत आहोत ते धोक्याचे आहे हे अश्विनी दत्तला माहीत असून ही त्याने संमति का दिली? इंदुमतीची केविलवाणी परिस्थिति पाहून तो का दयार्द्र झाला? महाराणीने आपला गौरव केल्याबद्दल त्याने शेवटी आभार कशासाठी मानले? माहीत असून ही माझ्या या शंकांचे समाधान तू न केलेस तर तुझा शिरच्छेद होईल हे तू जाणतोसच.''

शंकांचे निवारण करीत राजा विक्रमादित्य म्हणाला - ''आपलं संपूर्ण जीवन स्वास्थ्य-सेवेला वाहिलेला एक महापुरुष आहे अश्विनी दत्त! आपल्या सेवेत काही अडथळा येऊ नये, आपला मार्ग निष्कंटक असावा म्हणून त्याने विवाह ही केला नाही. तो ब्रह्मचारीच राहिला. आपल्या कट्टर शत्रूला रोगाने ग्रासले तर त्याला रोगमुक्त करणे हा खऱ्या वैद्याचा परम धर्म होय. म्हणूनच आपल्या प्राणाची पर्वा न करता अश्विनी दत्त इंदुमतीच्या मुलांची शस्त्र-क्रिया करायला तयार झाला. हे काम एकाद्या सामान्य वैद्याकडून होणारे नव्हते. त्यासाठी अनुभवी व कुशल वैद्याची आवश्यकता होती. अश्विनी दत्त हा एकटाच असा योग्यता-संपन्न वैद्य होता. आसपासच्या राज्यात ही त्याच्या इतका कुशल वैद्य दुसरा कोणी नव्हता. वैद्याचे नाव गुप्त ठेवले असते, तरी चंद्रगिरीच्या राजाच्या ते सहज लक्षात आले असते. आपला दरबारी वैद्य अश्विनी दत्तच ही अवघड चिकित्सा करू शकतो हे त्याला चांगले माहीत होते. शत्रूला उपयोगी पडण्याचा अपराध केल्याबद्दल आपणास कठोर शिक्षा केली जाईल हे अश्विनी दत्त ही जाणून होता. ही सर्व परिस्थिति जाणूनच इंदुमतीने सार्वत्रिक घोषणा केली आणि अश्विनी दत्ताचे नाव सर्वत्र पोचविले. आता रुद्रसेन अश्विनी दत्ताला शासन करण्याचे दुःसाहस करू शकणार नाही, कारण आपल्या सेवा-धर्माला अनुसरूनच अश्विनी दत्ताने आपल्या प्राणांची बाजी लावली होती. चंद्रगिरी सोडून अन्य राज्यात त्याला चांगलाच मान-सन्मान मिळाला. त्याने आपल्या राज्याची प्रतिष्ठा वाढवली. अशा सुशील वैद्याला शिक्षा केली असती तर रुद्रसेनचीच बदनामी झाली असती. उत्साहाच्या भरात त्याने असे केले असते, तर अन्य राज्यांनी आपला विरोध दर्शविला असता, त्याला अनेक नवे शत्रु निर्माण झाले असते. त्याच्या स्वतःच्या प्रजेने ही विद्रोह केला असता. याच भीतीने आपले वैर बाजूला ठेवून त्याला अश्विनी दत्ताचे अभिनंदन करायला लागले असेल. इंदुमतीने या संकटातून मोठ्या कुशलतेने अश्विनी दत्ताची सुटका केली. म्हणूनच तिने अश्विनी दत्ताजवळ आपली कृतज्ञता प्रकट केली. असं करून इंदुमतीने वचन-भंग केला अथवा ती कृतघ्न बनली असं म्हणणं चुकीचं होय.''

राजाच्या या स्पष्टीकरणावर संतुष्ट होऊन वेताळ प्रेतासह झाडावर जाऊन बसला.

**आधार : सुशील सिन्हा यांची एक कथा**



# राजनर्तकी

अवन्ती व कुसुमपुर राज्यांचे संबन्ध मैत्रीचे व निकटचे होते. अवन्तीची राजनर्तकी होती कौमुदी. राजाज्ञेचे पालन करण्यासाठी कौमुदी कुसुमपुरला गेली व तेथे झालेल्या विविध अुत्सवातून तिने आपल्या नृत्याचे कार्यक्रम केले. ती अवन्तीकडे परत निघाली असता वाटेतच दरोडेखोरांनी पकडून तिला कैद केले. तिच्याबरोबर सैनिकांनीही स्वतःला त्यांच्या स्वाधीन केले.

दरोडेखोर राजनर्तकी कौमुदीला आपल्या नायकाकडे घेअून गेले. कौमुदी नायकाला म्हणाली, ''तुम्ही मला समजलात कोण ? अवन्तीची राजनर्तकी आहे मी ! महाराजांना हे नक्कीच कळेल की तुम्ही मला अडकवून ठेवलं आहे. ते आपल्या सैन्यासह येतील अन् तुमची पाळं-मुळंही खणून काढतील.''

दरोडेखोरांचा तिच्या सांगण्यावर विश्वास बसला नाही. त्यांना वाटले, की ती खोटे बोलत आहे. असणार तर ही नक्कीच कोणी सामान्य बाई ! तेंव्हा त्यांच्यातला एकजण म्हणाला, ''बरं तर बरं ! आपण खुद्द महाराणीच आहोत असं नाही म्हणालीस. राजनर्तकी होय तू ?''

हे ऐकून इतर सर्वजणही हसू लागले. दरोडेखोरांचा नाईक तिला म्हणाला, ''मग इथे नाचून दाखव अन् सिद्ध कर की तू राजनर्तकीचे आहेस !''

कौमुदी एकदम चिडून म्हणाली, ''अरे चल! तुझ्यासारख्या जंगली माणसासमोर नाचू मी? मी नाचेन, तर केवळ राजदरबारातच! जीव घेतलास माझा, तरीही तुझ्यासमोर नक्कीच नाचणार नाही मी.''

तिचे बोलणे ऐकून आश्चर्यचकित झालेला नाईक म्हणाला, ''होय, ही नक्कीच राजनर्तकी आहे. आपल्या धंद्याचं मूल्य अन् की र्ति ती बरोबर जाणते; अुत्तम कलाकार आहे ही. हिला आणि हिच्या बरोबरच्या लोकांना सन्मानपूर्वक जंगलाबाहेर पोचवून या.'' अनुयायांनी आपल्या नेत्याची आज्ञा ताबडतोब अंमलात आणली.





## दक्षिणेतील मजबूत किल्ले

लेखिका : मीरा अुग्रा ◆ चित्रकार : अरित्रा

देवगिरी किल्ल्याला दक्षिण भारताचे सिंहद्वार म्हटले जाते. कारण दक्षिणपठारावरील काळ्या फत्तरावर बांधलेला हा मजबूत किल्ला खूपच रहस्यमय व गंभीर दिसतो. त्यामुळेच याला 'देवगिरी' असे नाव पडले असावे.

नगराच्या चारही बाजूंना भक्कम असा तट होता. याशिवाय नगराच्या आत पहाडाला (किल्ल्याला) घेरून मजबूत तट व तीन खंदक होते. सर्वात खालच्या बाजूच्या खंदकातील पाण्याची पातळी गरजेनुसार कमी जास्त करण्याची सोयही केलेली होती. शत्रूचे आक्रमण झाले तर पाण्याची पातळी वाढवून या खंदकावरील पूल बुडवून टाकला जाई. इतके करूनही शत्रु पुढे आला तर त्याला पुढे भुयारी मार्गातून जावे लागे.



देवगिरी किल्ल्याचा प्राचीन टेहळणी-बुरूज

किल्ल्यावरील राजप्रासादात पोचण्यासाठी भुयारी मार्ग हाच एकुलता एक मार्ग होता. इथे अगदी डोळ्यात बोट घातले तरी न दिसेल इतका अंधार असे अन् तो रस्ताही मोठा धोक्याचा होता. कारण भिंतीमागे लपलेले सैनिक शत्रूला वाटेतच गाठून मारून टाकत असत. शत्रुसैनिकांची संख्या अधिक असेल, तर भुयार धुराने भरून टाकले जाई व श्वास घेता न आल्याने ते मरून जात.

भुयारी मार्गाला मधेच तीन फाटे फुटलेले होते. त्यातल्या एकाच विशिष्ट मार्गाने सुरक्षित आत जाता येई. चुकून दुसऱ्या दोन मार्गात शिरलेले लोक खाली खाईत पडत, व त्यांना फार



दौलताबाद किल्ल्याच्या रचनेचे चित्र

वेदनामय मृत्यु येई. योग्य भुयारी रस्त्याने कोणी गेलाच, तर त्याला ही राजप्रासादापर्यन्त पोचण्यासाठी आणखीही अनेक अडचणींना तोंड द्यावे लागे.

देवगिरी किल्ला हा इसवी सनाच्या दुसऱ्या शतकातील सातवाहनांच्या काळचा आहे. यादव राजांनीही दोनशे वर्षांहून अधिक इथूनच आपले राज्यशासन चालवले होते. इ.सन १२७४ मध्ये अल्लाउद्दीन खिलजीने यादव राजाकडूनच हा किल्ला आपल्या ताब्यात घेतला. सुलतान महमद बिन तुगलकने जेव्हा हा किल्ला पाहिला, तेव्हा त्याला असे वाटले की, साऱ्या जगात अत्यन्त सुरक्षित असा हा एकच एक किल्ला आहे. यासाठीच काही काळ त्याने देवगिरी ही आपली राजधानी बनवली होती. तेव्हा या किल्ल्याला 'दौलताबाद' असे नामाभिधान प्राप्त झाले होते.

तुगलकचा एक सरदार बहामन शहा याने गुलबर्गा येथे आपली राजधानी बनवून बहामनी राज्य स्थापन केले.



चांद मिनार
दौलताबाद
किल्ला

गुलबर्गा किल्ल्यातील आवार

बिदर किल्ल्याच्या तटाच्या भिंती व खंदक



यानंतर बहामनी वंशजांनी बिदर ही आपली राजधानी बनवली. येथे तीन खंदकांनी युक्त असा एक चांगला मजबूत असा किल्ला होता.

दक्षिण भारतातील मुसलमानांच्या काही मजबूत व प्राचीन अशा इमारती बिदरमध्ये आहेत.

पंधराव्या शतकाच्या शेवटी बहामनी राज्याचा ऱ्हास होत गेला. १४९० मध्ये युसुफ आदिलखानने विजापुर सोडून आदिलशाही राज्य स्थापन केले. या वंशातील महम्मद आदिलशहा हा मोठा प्रसिद्ध बादशहा होता. त्याच्या समाधीला गोलघुमट असे म्हणतात. हा घुमट जगातील दुसऱ्या क्रमांकाचा



▲ गोलघुमट. येथे हाताने टाळी वाजवली, की तिचा दहा वेळा प्रतिध्वनी उमटतो. हातावरचे घड्याळ भिंतीला लावले तर समोरच्या भिंतीतून त्याची टिक्‌टिक् ऐकू येते.

**इब्राहिम रोजा. तत्त्वज्ञानी, कवि व संगीतज्ञ आदिलशहा-दुसरा, याने ही जोड इमारत बांधली. त्यातली एक आहे प्रार्थनामंदिर व दुसरीत सुलतानाचे थडगे आहे.** ▼





विशाल असा घुमट आहे.

या आदिलशहानेच दूरच्या नद्या व तलावातून भूमिगत पाइपातून किल्ल्यात पाणी आणून एक अद्भुत कार्य केले.

अहमदनगरचा किल्ला

बहामनी राज्यातून निराळा होणारा आणखी एक सरदार होता अहमद निजामशहा. त्याने निजामशाहीची स्थापना केली. त्याची राजधानी होती अहमदनगर.

१५७५ च्या डिसेंबरमध्ये मोगलांनी अहमहनगरला वेढा दिला. तेंव्हा आपल्या भावाच्या मुलाची प्रतिनिधी म्हणून चांदबिबी राज्यकारभार पहात होती. तिने मोठ्या धैर्याने मोगलांना तोंड दिले. किल्ल्यातील दारुगोळा संपला, तेंव्हा खजिन्यातील सोन्यापासून तिने तोफगोळे बनवून घेतले असे सांगण्यात येते. १५९६ च्या फेब्रुवारीत तह होऊन तेथे तात्कालिक शान्ति स्थापन झाली.



चांदबिबी

भारताच्या स्वातन्त्र्य चळवळीच्या वेळी या किल्ल्याचा तुरुंग म्हणून उपयोग करण्यात आला. सरदार वल्लभभाई पटेल, पंडित जवाहरलाल नेहरू, अबुलकलाम आझाद, आचार्य कृपलानी आदि सुप्रसिद्ध राजकीय नेत्यांनी याच किल्ल्यात तुरुंगवास भोगला. या किल्ल्यातील तुरुंगवासातच पं. नेहरूंनी 'डिस्कव्हरी ऑफ इंडिया' नावाच्या सुप्रसिद्ध ग्रन्थाची रचना केली.





# पिशाच्च आणि आळशी

शंकर सोळा वर्षांचा असतानाच त्याचे वडील अचानक वारले. शंकर तसा हुशार होता, पण होता एक नंबरचा आळशी.

एक दिवशी शंकरची आई त्याला म्हणाली - "बेटा, तू जर शेताकडे लक्ष दिले नाहीस, तर ते ओसाड होऊन जाईल. मग आपल्याला खायला ही काही मिळायचं नाही."

आईच्या बोलण्यावर चिडून शंकर म्हणाला - "उन्हात पावसात शेतावर जाणं मला नाही जमणार. दुसरं एकादं काम मिळालं तर पाहतो. पण काम देणार कोण या गावात? हे गाव कसलं - स्मशान आहे स्मशान !" असे म्हणत तो घरातून बाहेर पडला. जाता-जाता त्याने एका जंगलात प्रवेश केला.

चालून चालून तो थकून गेला होता. एका चिंचेच्या झाडाखाली तो बसला. आपल्या नशिबाला दोष देत तो रडू लागला. जगण्याचा त्याला अगदी कंटाळा आला होता. पिशाच्च आता इथे आलं नि त्याने आपल्याला खाऊन टाकलं तर आपण या कटकटीतून एकदाचे मुक्त होऊं असा विचार त्याच्या मनात आला.

दुसऱ्याच क्षणी एक आवाज त्याने ऐकला. "इथं फक्त मीच आहे एकटा !"

आश्चर्याने शंकरने मागे वळून पाहिले. एक पिशाच्च विकट हास्य करीत त्याच्या समोर आलं. ते म्हणालं - "तुझ्या मनात माझ्याबद्दल विचार आला आणि हा आलो मी !"

पिशाच्चाला पाहताच शंकर प्रथम घाबरला तो म्हणाला - "तू मला काही मदत करु शकतोस का?"

"तुला काय पाहिजे ते सर्व मी देईन. फक्त माझी एक अट तुला मान्य करावी लागेल. आहे कबूल?" पिशाच्चाने विचारले.

"काय तुझी अट आहे ?" शंकर म्हणाला.

"सहा वर्षे मी तुझा गुलाम बनून राहीन, तुला जे पाहिजे ते देईन. तू एकाद्या राजा

वत्सला जगदाळे



सारखा सुखोपभोग कर, पण फक्त सहा वर्षेच हं.'' पिशाच्चाने जणू एक रहस्यच सांगितले.

यात काही तरी धोका आहे असं वाटून शंकरने विचारले- ''अन् मग पुढे काय?''

''त्यानंतर मरेपर्यंत तू माझा गुलाम बनून राहणार. मी तुला आपल्या बरोबर घेऊन जाईन.

पण या सहा वर्षात तू सांगितलेलं एकादं काम मी केलं नाही तर आपली ही योजना रद्द झाली असं समजायचं. तू आपल्या वाटेने चालू लागायचं, मी आपल्या वाटेने जाईन.'' पिशाच्चाने शंकरच्या प्रश्नाचे उत्तर दिले.

शंकरने पिशाच्चाची अट मान्य केली. दुसऱ्याच क्षणी त्याचे खिसे सोन्याच्या मोहरांनी भरून गेले.

''तुला जेव्हा काही लागेल, तेव्हा माझे स्मरण कर. मी तुझी इच्छा पूर्ण करीन.'' असं सांगून पिशाच्च अदृश्य झाले.

शंकर घरी आला आणि जे घडलं ते सगळं त्याने आपल्या आईला सांगितलं. सहा वर्षांनी आपला मुलगा पिशाच्चाचा गुलाम होणार हे जाणून आईला फार वाईट वाटले. ती रडू लागली आणि शंकरने ही योजना रद्द करावी असा हट्ट धरून बसली. शंकरला हे आवडलं नाही. शंकरच्या आईने त्याला घराबाहेर काढले आणि दार बंद करून घेतले.

शंकर जंगलात गेला आणि त्याने पिशाच्चाचे स्मरण केले. जेव्हा पिशाच्च त्याच्या समोर उभे राहिले, तेव्हा शंकर त्याला म्हणाला - ''मला एक सुंदर घर, दास-दासी आणि पेटी भर सोन्याच्या मोहरा देण्याची व्यवस्था कर.''

पिशाच्चाने एका क्षणात शंकरच्या सर्व मागण्या पुऱ्या केल्या. एक महिना भर शंकर सर्व सुखोपभोग करीत राहिला. मग त्याने पुन्हा एकदा पिशाच्चाचे स्मरण केले. तो पिशाच्चाला म्हणाला - ''मला जंगलात संचार करण्यासाठी एक हत्ती आणि चार घोडे दे.''

पिशाच्चाने लगेच ही मागणी पण पूर्ण केली. आणखी एक महिन्यानंतर शंकरने पुन्हा पिशाच्चाचे स्मरण केले. यावेळी शंकर पिशाच्चाला म्हणाला - ''या जंगलात चोर,



डाकू आणि लुटारू आहेत अशी मला शंका आहे. त्यांच्यापासून बचाव करण्यासाठी मला चार वाघांची आवश्यकता आहे.''

पिशाच्चाने चार वाघ आणले आणि त्यांना घराच्या चार बाजूंना बांधले. एकदा शंकरने पिशाच्चाला सांगितले की त्याच्या घराच्या चारी बाजूंना वीस फूट उंच तट बांधून द्यावा. जवळच जी मोठमोठी झाडे होती ती उपटून टाकायला सांगितली. घराच्या पूर्वेकडे जी छोटी टेकाडे आहेत ती उखडून डोंगरावर टाकायला सांगितली. या सर्व मागण्या ऐकून पिशाच्च खूपच चिडले. ते रागाने शंकरला म्हणाले - ''तू मला असे छळशील याची मला कल्पना असती तर मी प्रथमच तुला भेटलो नसतो. तू माझ्या तावडीत सापडणार आहेस हे विसरू नकोस. त्यावेळी मी तुला गरम तेलात टाकून नंतर भडकत्या अग्नीत फेकून देईन. एका झटक्यात मी तुला खाऊन टाकणार नाही. सुरीने तुझे बारीक बारीक तुकडे करून सहा महिने तुला खात राहीन.''

खदखदा हसत शंकर म्हणाला - ''मी थोडाच तुझ्या हाती लागणार आहे?''

अशा रीतीने सहा वर्षे संपत आली. शंकर जे मागेल ते पिशाच्च देत राहिले.

सहाव्या वर्षात शंकरला काळजी वाटू लागली. आपली चूक त्याच्या लक्षात येऊ लागली. शेवटच्या दिवशी आपल्या घरासमोर उभा राहून तो विचार करीत राहिला. तो



तेथून निघाला आणि तलावाच्या जवळ पोचला. बेडकांच्या आवाजाने वातावरण दुमदुमत होते. एका बेडकाने पाण्यातून उडी मारली आणि थेट शंकरच्या डोक्यावर आला. शंकरने डोक्याकडे हात नेला, तशी बेडकाने पाण्यात उडी मारली.

हे सर्व पाहून शंकरच्या डोक्यात एक विचार चमकून गेला. एक दीर्घ श्वास घेऊन शंकर ओरडला - ''हे पिशाच्चा, लवकर ये.'' झाडाच्या फांद्यांतून पिशाच्चाने शंकर पुढे उडी मारली.

''मी तुला आता जे काम सांगणार आहे, ते तू केलंच पाहिजे.'' शंकर म्हणाला.

''आपली सहा वर्षांची मुदत ठरलेली

होती. ती संपायला अजूत अर्धा तास अवकाश आहे. सहा वर्षं तू मला जे जे करायला सांगितलंस ते ते सर्व मी केले. आता झटपट सांग, काय काम आहे बरं तुझं? मग तू माझा गुलाम बनणार आहेस. मी तुला कच्चाच खाऊन टाकणार आहे!'' पिशाच्याच्या बोलण्यात त्याचा उतावळेपणा स्पष्ट दिसत होता.

''मी बेडकांचं संगीत ऐकू इच्छितो. तलावातल्या बेडकांचं नव्हे. तू झाडावर चढ, फांदीवरून तलावातले बेडूक काढ नि त्यांना फांदीवर बसव. मग मी त्यांचं मधुर संगीत ऐकेन.'' शंकरने आज्ञा केली.

लाल लाल डोळे वटारीत शंकरकडे पहात पिशाच्च रागाने म्हणाले - ''तुला कावळ्यांचं संगीत ऐकावंस वाटलं नाही हे बरं झालं. तुझी मजल बेडकांपर्यंतच आहे. मागून मागायचं तर काय पण मागितलंस?'' असे विचारीत पिशाच्चाने तलावात उडी मारली. जे बेडूक हाती लागले त्यांना फांदीवर बसवलं. आणखी काही बेडकांना पकडण्यासाठी ते तलावात बुडी मारायला निघालं, इतक्यात फांदीवरच्या सर्व बेडकांनी तलावात उडी मारली.

पिशाच्चाला खूप राग आला. तरी पण बेडूक पकडून त्यांना फांदीवर ठेवण्याचे काम तो करीतच राहिला. आणि बेडूक फांदीवरून तलावात उड्या मारीत राहिले. अर्धा तास हे असं चालू राहिलं.

आता उत्साहाने शंकर पिशाच्चाला म्हणाला - ''दिलेल्या शब्दाप्रमाणे तू आपलं काम करू शकला नाहीस. सहा वर्षांची मुदत ही आता संपली आहे. आपण दोघे ही आपापल्या वाटेने चालू लागू. मी आता माझा आळस सोडून देतो. घरी जाऊन शेतीवाडीच्या कामात लक्ष घालीन नि आईची सेवा करीन.'' आणि शंकर आपल्या गावाकडे निघाला.

पिशाच्च बिचारे आता काय करणार? ते आपल्या मनात म्हणाले - ''अरे आळशा, किती हुशार आहेस रे तू! इथून पुढे मी आळशी माणसावर मुळिच विश्वास ठेवणार नाही.'' आणि पिशाच्च अदृश्य झाले.





# चिन्तूची बुद्धिमानी

चंचलपुरच्या चिंतूला वाटे की आपल्यासारखा बुद्धिमान गावात कोणी नाहीच. प्रत्यक्षात मात्र सर्वजण त्याला महामूर्ख समजत असत. आपली बुद्धिमानी पुराव्यासह सिद्ध करावी, अशी त्याची तीव्र इच्छा होती. एक दिवस तो गावपाटलाकडे गेला.

पाटील त्याला म्हणाला, ''तू अगदी महामूर्ख आहेस, असं सगळ्या गावकऱ्यांचं म्हणणं आहे. त्यामुळे तू काहीही म्हणालास, तरी ते विश्वास नाही ठेवणार. तेव्हा तू असं कर - आसपासच्या एखाद्या गावच्या ज्यांना आपले गावकरी बुद्धिमान मानतात, अशांपैकी एकाद्या माणसाला गाठून त्याची मान्यता मिळव. तू बुद्धिमान असल्याचं त्याला सिद्ध करून दाखव. नंतर त्याच्या सहीचं शिफारस-पत्र घेऊन ये.''

चिन्तू दुसऱ्या गावी जायला तयार झाला. पण त्याच वेळी चंचलपुरमध्ये एक सिद्ध पुरुष दाखल झाला. त्याची अुपदेशपर प्रवचने ऐकायला गावचे लोक गोळा झाले. या योग्यानेच मान्य केले, तर गावचे लोकही आपल्याला बुद्धिमान मानतील; म्हणून चिन्तूही एक दिवस तेथे जाऊन प्रवचन ऐकू लागला.

सिद्ध पुरुषाने त्या दिवशी बऱ्याच वैशिष्ट्यपूर्ण गोष्टी सांगितल्या. तो म्हणाला की, 'कावळ्यात पांढरा कावळा कधी नसतोच; तेंव्हा असा कावळा शोधू जाणं हा शुद्ध मूर्खपणा होईल.' पुढे त्याने असेही सांगितले की, सर्व प्राणी हे एकच आहेत, समान आहेत. रावण हा मोठा शक्तिशाली होता, पण शेवटी काय अुपयोग झाला? परस्त्रीच्या मोहात पडून त्याचे पतनच झाले! तेंव्हा माणसाने दुर्गुणांपासून नेहमी दूर रहावे!

चिन्तू नंतर अतिथिगृहात जाऊन सिद्ध पुरुषाला भेटला. तो म्हणाला, ''स्वामीजी, तर्कशास्त्रात माझी बरोबरी करू शकेल, असा

कावेरी देव



कोणी इथे नाहीच. आपण ज्या गोष्टी सांगितल्यात त्या तर्कशास्त्राच्या नियमात मुळिच बसत नाहीत. मी आपल्या शंकांचं निरसन करून घेण्यासाठी तुमच्याकडे आलो आहे.''

योगी म्हणाला, ''अवश्य विचार बेटा!''

चिन्तूने विचारले, ''आपण म्हणालात की, पांढरा कावळा अस्तित्वात नाही. पण याला पुरावा काय?''

योगी अुत्तरला, ''निदान माझ्या माहितीनुसार, आजपर्यन्त पांढरा कावळा कोणी पाहिलेलाच नाही.''

''मग माझ्या माहितीनुसार, आजपर्यन्त ईश्वर कोणी प्रत्यक्ष पाहिलेला नाही. मग याचा अर्थ काय असा धरायचा का, की ईश्वर अस्तित्वातच नाही?'' चिन्तूने पटकन् तार्किक प्रश्न केला.

''ईश्वराचं अस्तित्व मान्य करायला कितीतरी कारणं आहेत, अुद्देश आहेत. पण पांढऱ्या कावळ्याचं अस्तित्व मान्य करण्यात काहीच साधणार नाहीय.'' योगी शान्तपणे अुत्तरला.

यावर चिन्तू हसत म्हणाला, ''पण सत्य जाणण्यासाठी अुद्देश असायची गरज काय? तर्कशास्त्राच्या आधारे मी शाबित करू शकेन की पांढरा कावळा असू शकतो. ऐकाल माझा तर्क?''

मोठ्या कुतुहलाने योग्याने आपले डोके होकारार्थी हलवले. आपला गळा साफ करत चिन्तू बोलू लागला, ''माणसांमधे काही काळी, काही गोरी असतात; कुत्रे, गायी वगैरे सुद्धा अशाच विविध रंगांच्या असतात. बरोबर? मग कावळेच का नाही पांढरे असू शकणार?''

सिद्ध म्हणाला, ''हो, असू शकतील. वादविवाद कशासाठी बेटे? काही शंका असेल तर विचार, मी ती दूर करीन.''

चिन्तू म्हणाला, ''आपण रामायणाची कथा सांगितलीत तेंव्हा मला असं वाटलं की रावणच रामापेक्षा चांगला आहे. मला तर असंही वाटलं की राम फार वाईट व्यक्ती आहे.''

''ज्याच्या-त्याच्या बुद्धीप्रमाणेच त्याचे विचारही असतात.'' सिद्ध बोलला.

''यात बुद्धीचा काहीच संबंध नाही स्वामीजी. आपण ऐकायला तयार असाल तर तर्काच्या आधारे मी सिद्ध करीन की माझं म्हणणंच बरोबर आहे.''

सिद्ध तर त्याचा तर्क ऐकायला आतुरच होता.

चिन्तूने आपलं तर्कज्ञान पाजळायला सुरुवात केली. ''वाल्मिकी हे रामाचे भक्त होते. त्यांनी रामायण रचले. म्हणूनच त्यांनी रामाला कथानायक अन् त्याचा शत्रू रावण याला खलनायक बनवले. बरोबर?''

''मी तुझं विधान खोडून काढू शकत नाही. पण वाल्मिकी हे रामाचेच भक्त का होते? रावणाचे का नव्हते?'' सिद्धाने विचारले.

''रावणाचेही भक्त होतेच की! पण जे युद्धात जिंकतात, त्यांची लोक स्तुती करतात, त्यांनाच मोठेपणा मिळतो. श्रीरामाने तर अनेक अन्याय करूनच रावणाचा संहार केला. वाल्मिकीकडून रामायण रचून घेअून स्वतःला श्रेष्ठ म्हणवून घेतलं. आपलीच टामटाम करवून घेतली अन् त्याद्वारे आपल्या मोठेपणाचा प्रचार केला.'' चिन्तूने तार्किक विधान केले. सिद्ध हसून म्हणाला, ''फारच बुद्धिमान आहेस तू.''

त्याबरोबर चिन्तू म्हणाला, ''हां, तुम्ही हे खरं मानलंत, पण आमच्या गावचे लोक तसं मानायला तयार नाहीत. माझी आपणाला अशी विनंती आहे की, आपणच हे सत्य त्यांना सांगावं.''



''ठीक आहे. अुद्या माझं प्रवचन सुरू होण्यापूर्वी मी तुला बोलावीन. पांढरा कावळा अन् रामायण यांबद्दल तुला जी माहिती आहे, ती तू गावकऱ्यांना सांग. पाहू या कोण तुझं विधान खोडून काढायचं धाडस करतंय.'' योगी म्हणाला.

चिन्तू मोठ्या खुशीने घरी निघून गेला.

दुसऱ्या दिवशी मनातले सगळे चिन्तूने लोकांसमोर सांगितल्यावर योग्याने विचारले, ''चिन्तूनं आत्ता केलेल्या विधानांचं तार्किक आधारानं कोणी खंडन करील काय?''

कोणीही पुढे यायला तयार झाले नाही. फक्त गावपाटीलच अुठून म्हणाला, ''याच्या बोलण्याचं खंडन फक्त आपणच करू शकाल.''

पाटलाचे बोलणे ऐकून चिन्तूला 'आपण

कोणी फार बुद्धिमान आहोत' असे वाटले. 'आपले बोलणे कोणी खोडून काढू शकत नाही. योगी स्वतः तर कालच हारला आपल्यापुढे!' अशी कल्पना करून त्याला आता वाटले की, 'योगी आता नक्कीच आपल्याला सर्वांसमोर बुद्धिमान म्हणून जाहीर करेल.'

योग्याने बोलायला सुरुवात केली, "एक काळ असा होता की देवीची साथ पसरल्यावर देवाला बळी वगैरे अर्पण केले जात. पण नंतर काही बुद्धिमान लोकांनी ही समजूत चुकीची असल्याचे सिद्ध करून रोगनिवारणासाठी लस शोधून काढली. एक काळ होता की लोक समजत होते की आपली पृथ्वी सपाट आहे. पण काही बुद्धिवन्तांनी ही धारणा चुकीची असल्याचं सिद्ध केलं; आणि त्यामुळेच आपल्याला खगोलशास्त्राबद्दल माहिती मिळाली. बुद्धिमान प्रथम जे सांगतात ते सर्वांना असंच विचित्र वाटतं. पण त्यामुळे मनुष्यजातीचा नंतर फायदाच झाला आहे."

योग्याचे हे बोलणे ऐकून तर चिन्तूला आता स्वर्ग दोन बोटेच उरल्यासारखं वाटू लागलं. गावकरी योग्याचे बोलणे उत्सुकतेने ऐकत होते.

सिद्ध योगी पुढे बोलू लागला, "बुद्धिवन्तांचे विचार सामान्य लोकांसारखे नसतात. जनता त्यांना मूर्ख समजते. माझी खात्री आहे की चिन्तूही त्यांच्यापैकीच एक आहे. याच्या विचारांमुळे जगाचे भले होईल असाही एक दिवस उगवू शकेल. तोपर्यन्त मात्र याला मूर्खच समजायला हवे."

आता सर्व गावकरी हसू लागले. चिन्तू रागावून म्हणाला, "मला मूर्ख ठरवून काय होणार आहे? तुम्हाला अक्कल असेल तर माझं म्हणणं खोडून काढून दाखवा न!"

सिद्ध हसत म्हणाला, "बुद्धिमंतात एक गुण असतो, की तो मूर्ख माणसाशी कधी वाद घालत नाही. मी अन् गावकरी इतकी बुद्धिमानी तर नक्कीच दाखवू शकतो."

गावकरी जास्तच हसू लागले. चिन्तूचा मोठाच अपमान झाला. यानन्तर मात्र त्याने आपल्या अकलेचं प्रदर्शन करायचा कधीच प्रयत्न केला नाही.





# महाभारत

द्रुपदाने पाठवलेला ब्राह्मण पांडवांकडे आला व त्यांना म्हणाला, "आमच्या राजाने आपणांबद्दल पूर्ण माहिती विचारून घेण्यासाठी मला पाठवले आहे. आपण आपले कुल, गोत्र सांगण्याची कृपा करावी."

धर्मराजाने त्या ब्राह्मणाचे योग्य असे स्वागत केले. तो म्हणाला, "आपल्या महाराजांना आमच्या कुलगोत्राशी काय करायचं आहे? त्यांनी तर जाहीर केले होते की, मत्स्ययन्त्रभेद करणाराशी आपण आपल्या कन्येचा विवाह करून देऊ. आमच्या भावाने तो पण पुरा केला अन् राजकुमारीला जिंकले."

इतक्यात पांडवांना घेऊन जाण्यासाठी द्रुपदाने पाठवलेले रथ तेथे आले. सर्व पांडव निरनिराळ्या रथांवर आरूढ झाले आणि कुंती द्रौपदीसह एका निराळ्या रथात चढली. सगळे रथ राजधानीत पोचल्यावर द्रुपदाने त्यांच्यासाठी मौल्यवान अशा अगणित भेटवस्तु पाठवल्या. त्यातील केवळ क्षत्रियोचित अशा वस्तूंचाच स्वीकार करून बाकीच्या वस्तु पांडवांनी परत केल्या. हे पाहिल्यावर द्रुपदाची खात्री झाली की, हे सर्वजण क्षत्रीयच आहेत.

नंतर ते सर्वजण एका मंडपात प्रविष्ट झाले. द्रुपदाने धर्मराजाकडे वळून म्हटले, "आपण कोण आहात हे मला माहीत नाही. जोपर्यन्त आम्हाला ते कळत नाही, तोपर्यन्त मी आपल्या कन्येचा विवाह शास्त्रोक्त पद्धतीने कसा करावा?"

**द्रौपदी-विवाह**



आता मात्र धर्मराजाने सत्य कथन केले. द्रौपदीला जिंकून घेणारा वीर अर्जुनच आहे, हे कळल्यावर द्रुपदाचे डोळे आनन्दाश्रूंनी भरून आले. तो म्हणाला, ''तुम्ही सर्वजण लाक्षागृहातून वाचलात, हे मी आपलं सद्‌भाग्यच समजतो. मी आता प्रतिज्ञा करतो की, मी तुम्हाला तुमचं राज्य परत मिळवून देईन. थोड्याच दिवसात शुभमुहूर्त पाहून अर्जुनाचा द्रौपदीशी विवाह करून देईन.''

धर्मराज बोलला, ''हे कसे शक्य आहे? मी स्वतः आणि भीम अर्जुनाहून मोठे आहोत.

यावर द्रुपद म्हणाला, ''मग माझ्या कृष्णेचा विवाह तुझ्याशीच होईल.''

''आपली कन्या म्हणजे रत्न आहे. रत्नाचा स्वीकार तर कोणीही करील. पण आमच्या मातेच्या तोंडून बाहेर पडलेल्या शब्दांना आम्ही बांधलेलो आहोत; म्हणून आम्ही पाचही जण आपल्या कन्येशी विवाह करू.'' धर्मराज म्हणाला.

हे ऐकून द्रुपद स्तंभित झाला. तो म्हणाला, ''एक पुरुष अनेक स्त्रियांशी विवाह करु शकतो, पण एक स्त्री पाच पुरुषांशी कसा काय विवाह करू शकेल? तेंव्हा याबाबत मी, तू, कुन्तीमाता अन् धृष्टद्युम्न मिळून अुद्या चर्चा करून काय ते ठरवू.'' असे म्हणून द्रुपदाने तो विषय तितकाच थांबवला.

त्याच वेळी हरिणाचे कातडे धारण केलेला कृष्णद्वैपायन तेथे आला. सर्वांनी त्याचे स्वागत करून पादपूजा केली अन् त्याला अुचित आसनावर बसवले. नंतर सर्वजण आपापल्या आसनांवर बसले.

द्रुपदाने कृष्णद्वैपायन व्यासांना विचारले, ''महात्मन्, धर्मराजाला धर्मसंबंधी सर्व नियम चांगले माहीत असूनही तो म्हणत आहे की, ते पाचही भाऊ माझ्या कन्येशी विवाह करणार आहेत. कधी कोणत्या युगात एका स्त्रीचा अनेक पुरुषांशी विवाह झालेला ऐकिवात आहे काय? धर्मराजाचे म्हणणे धर्मविरुद्ध आहे ना?''

पण धर्मराजच ताबडतोब बोलला, ''माझ्या तोंडून अधर्माची गोष्ट कधीही निघत नसते. आम्ही सर्वजण मिळून आपल्या कन्येशी



विवाह करायला तयार आहोत. तर आपली काय अडचण आहे? आपण निश्चिन्त होअून हा विवाह करून द्यावा. आमच्या मातेची आम्हाला तशी आज्ञा आहे. मातेच्या आज्ञेचे पालन करण्यापेक्षा अुत्तम धर्म अन्य कोठला असू शकेल ? जुनी परिपाटीही पहा हवी तर ! गौतमी वंशात जन्मलेल्या जटिला नावाच्या मुनिकन्येने सात पुरुषांशी विवाह नव्हता केला का? दाक्षायणी नावाची मुनिकन्या प्रचेत नावाच्याच दहा मुनींची धर्मपत्नी झाली होतीच ना? हे सर्व आपण पुराणात वाचून जाणलेलं आहे ना?''

धृष्टद्युम्नाने आता निराळीच अडचण अुपस्थित केली. ''अर्जुनाने स्वतःच्या बळाने द्रौपदीला जिंकले आहे. तेंव्हा आता तिने धर्मराज व अन्य पांडवांशीही विवाह करणे अनुचित नव्हे काय? माझी भगिनी कृष्णा पांचजणांची पत्नी कशी काय बनेल?''

कुन्तीने आग्रह धरला की, ''माझे बोलणे व्यर्थ होअू नये.'' तेंव्हा तिला धीर देत कृष्णद्वैपायन द्रुपदाला म्हणाले, ''राजा, धर्मराजाचे बोलणे अधर्माचे नव्हेच. कुन्तीची इच्छाही असंगत नव्हे. तू या पाचही जणांशी आपल्या कन्येचा विवाह करून दे.''

यानन्तर द्रुपदाला एकान्तात घेअून जाअून व्यासांनी त्याला द्रौपदीचा जन्मवृत्तान्त कथन केला. ते म्हणाले -

''पूर्वी माधल्य नामक एका मुनीची



इन्द्रसेना नावाची पत्नी होती. माधल्यांना कोड अुठल्याने त्यांच्या पत्नीला कोणते ही सुख मिळू शकले नाही. मनाच्या अशांत अवस्थेतच तिला मृत्यु आला. पुढल्या जन्मी ती काशीराजाची कन्या बनून आली. असामान्य लावण्य असूनही तिला योग्य वर मिळेना. त्यामुळे फार चिंतित होअून तिने परमेश्वराच्या दर्शनासाठी घोर तप आरंभले. एके दिवशी परमेश्वराने प्रकट होअून तिची इच्छा विचारली.

मोठ्या आतुरतेने तिने 'पति, पति, पति, पति, पति' असा पाचवेळा अुच्चार केला.

परमेश्वराने तिला वर दिला की, ''पुढल्या जन्मी तुला पाच महापुरुष पति म्हणून प्राप्त



होतील.''

नंतर काशीराजाच्या मुलीने परमेश्वराला विनवले की, ''पुढल्या जन्मी मला पाच पति मिळणार असतील, तर निदान असा तरी वर द्या की, माझ्या हातून त्या पाचही जणांची सारखीच सेवा घडावी, अन् सर्वांना सारख्याच प्रमाणात मी सुखी करू शकेन.''

आता हीच काशीराज-कन्या द्रौपदी बनून जन्मली आहे आणि देवाने दिलेल्या वरानुसार पाच पांडवांची पत्नी होणार आहे.''

कृष्णद्वैपायन व्यासांनी ही खरी हकिकत द्रुपदाला सांगितली आणि आणखी विशद रूपाने समजावून सांगितले की पूर्वीही असे विवाह झालेले आहेत. त्यांनी एक अुदाहरण ही दिले. ते असे - नितंत नामक एका राजर्षीला पाच पुत्र होते. त्यांची नावे होती साल्वेय, शूरसेन, श्रुतसेन, सार व अतिसार.

पाचहीजण प्रेमाने व गुण्यागोविन्दाने रहात असत. या पाचांनी मिळून अुशीतरची कन्या राजकुमारी अजिता हिच्याशी विवाह केला. तिला या पाचही जणांपासून पाच मुले झाली. तेंव्हा ही प्रथा तर पूर्वीही अस्तित्वात होतीच.

जेंव्हा स्वतः कृष्णद्वैपायनांनी स्वतःच आपली संमती देऊन युधिष्ठिराच्या प्रस्तावाचे समर्थन केले, तेंव्हा द्रुपदाच्या मनातील शंका दूर झाली. त्याने पाचही पांडवांशी आपल्या कन्येच्या विवाहाला सहर्ष संमती दिली.

त्याच दिवशी शुभमुहूर्त होता. चन्द्र पुष्य नक्षत्रात होता, म्हणून व्यास म्हणाले की द्रौपदीचा पांडवांशी विवाह त्याच दिवशी झाला तर अुत्तम. द्रुपदानेही ताबडतोब विवाहाची तयारी केली. कांपिल्य नगर केळीचे खुंट व सुपारीच्या गुच्छांनी सुशोभित केले गेले. वडाच्या कोवळ्या पानांच्या तोरणांनी या शोभेत भर घातली. घराघरांसमोर कापूर व मोत्यांनी रांगोळ्या रेखण्यात आल्या. संपूर्ण नगरच सजवले गेले. प्रत्येक ठिकाण गर्दीने भरून गेले. पाहू तेथे फुलांच्या माळा बांधलेल्या होत्या. मंगलवाद्ये वाजत होती. द्रुपदाच्या राजवाड्याच्या पूर्वेकडे विवाहमंडप बनवला होता. मांडवही मनमोहक पद्धतीने सजवला होता. त्याच्या





खांबांना हिरवी वस्त्रे बांधली होती अन् फुले व मोत्यांच्या माळा बांधल्या होत्या. सोन्याने बनवलेल्या विवाहवेदीवर अग्निकुंडाचीही व्यवस्था केलेली होती. सुवर्णकलशातून पुण्यनद्यांचे जल भरून आणून ठेवले होते.

पाचही पांडवांनी मंगलस्नान केले व अुत्तम वस्त्रे धारण केली. सालंकृत द्रौपदीही आपल्या सख्यांसह वेदिकेजवळ आली. धौम्यांनी मन्त्रोच्चारणानन्तर प्रथम द्रौपदी व धर्मराज यांना बसवल्यानन्तर शास्त्रोक्त पद्धतीने युधिष्ठिराने द्रौपदीचे पाणिग्रहण केले. यानंतर याच पद्धतीने अनुक्रमे भीम, अर्जुन, नकुल व सहदेव यांचाही द्रौपदीशी विवाह झाला.

आपल्या पाचही जावयांना द्रुपदाने निरनिराळे कित्येक अलंकार, धन, रथ, अश्व, हत्ती, दासदासी, गायी वगैरे भेटी दिल्या. द्रुपदाला असे वाटले की पाच पांडवांसारखे बलिष्ट जावई असताना या पृथ्वीतलावर आता आपल्याकडे कोणी वाकड्या दृष्टीने पाहूही शकणार नाही.

विवाह सोहळा पार पडल्यावर द्रौपदी अंतःपुरात परतली. कुन्ती साऱ्या स्त्रियांमधे अुच्चासनावर बसलेली होती. द्रौपदीने तेथे पोचल्यावर आपल्या सासूला साष्टांग नमस्कार केला व ती हात जोडून विनयाने समोर अुभी राहिली. आपल्या सुनेला पाहून कुन्ती फारच प्रसन्न झाली व तिने द्रौपदीला मनःपूर्वक अनेक आशिर्वाद दिले.

पांडवांचा द्रौपदीशी विवाह झाल्याचे कळताच श्रीकृष्ण मूल्यवान भेटी घेऊन कांपिल्यनगरात आला. पांडवही कृष्णाबरोबर काही दिवस तेथेच राहून सर्व तऱ्हेच्या सुखोपभोगांचा आस्वाद घेऊ लागले.

द्रौपदी-स्वयंवराच्या दिवशी अर्जुनाने मत्स्ययंत्रभेद केला, शल्याला हरवणारा दुसरा कोणी नव्हे, तर भीमच होता, लाक्षागृहात पांडव जळून गेले नाहीत, तर ते जिवन्त असून कुन्तीसह सुरक्षित आहेत इ. सर्व बातम्या प्रजा व राजांच्या कानी पोचल्या.

दुर्योधनालाही ही बातमी समजली. पांडवांचे भाग्य पाहून त्याला मनात असूया

वाटू लागली. तेंव्हा दु:शासन त्याला म्हणाला, ''ब्राह्मणाचा वेष धारण केला नसता, तर द्रौपदी मिळाली असती का अर्जुनाला? आपल्याही लक्षात आलं असतं की, तो ब्राह्मण नसून खुद्द अर्जुनच आहे, तर आपण त्याला इतक्या सहजपणे सोडलं असतं का? पण आता पश्चात्ताप करून काय अुपयोग ? बाहुबलापेक्षा दैवबलच अधिक श्रेष्ठ असतं हीच गोष्ट खरी. त्याच्या या विजयात दैवबलाचाच भाग अधिक आहे.'' ज्याला त्यांनी पांडवांना लाक्षागृहात मारून टाकायला सांगितले होते, त्या पुरोचनाला आता ते दोघे शिव्या मोजू लागले.

सर्व वार्ता कळल्यावर इकडे विदुराला फारच आनन्द झाला. धृतराष्ट्राजवळ जाअून त्याने पांडव व द्रौपदीच्या विवाहाची सविस्तर हकिकत त्याला सांगितली. नेमके काय घडले कोणास ठाअूक पण धृतराष्ट्राला असे वाटले की द्रौपदीचा विवाह आपला पुत्र दुर्योधन याच्याशीच झाला, अन् तो अतिआनंदित झाला. त्याने विदुराला आज्ञा दिली की, रत्नजडित दागिने व अुंची वस्त्रांनी द्रौपदीला सजवून तिला हस्तिनापुरला आणायची व्यवस्था कर.''

आपल्या सांगण्याकडे धृतराष्ट्राचे बरोबर लक्ष नव्हते, हे जाणून पुन्हा सर्व काही नीट सांगत विदुर पुन्हा म्हणाला, ''द्रौपदीचे स्वयंवर अर्जुनाशी झालं, अन् असं ऐकलं की तिचा विवाह पाचही पांडवांशी झाला आहे.''

यावेळी मात्र धृतराष्ट्राने विदुराचे सांगणे बरोबर ऐकले. पण स्वत:ला सावरून घेत तो म्हणाला, ''मग काय झालं? खरं तर दुर्योधनापेक्षा मला पांडवच अधिक प्रिय वाटतात. ते अत्यन्त पराक्रमी आहेत व वडील माणसांचा ते नेहमीच खूप आदर करतात. त्यांची सेवाही करतात ते. अुचित काय, अनुचित काय हे ते बरोबर ओळखतात. द्रुपदाशी नातं जोडून ते आता चांगलेच बलवान झाले आहेत. ते जिवन्त असल्याचं जाणून मला खूप आनन्द झालाय.''

विदुर एकदम आनन्दाने म्हणाला, ''महाराज, आपली बुद्धी नेहमी अशीच राहो.''



# कोंबड्या

**च**मन नावाचा एक माणूस हातात चिंचेचा फोक घेऊन आपल्या दहा वर्षांच्या मुलाला बडवत होता अन् तोंडाने आरडाओरडा ही करत होता. त्या रस्त्याने जाणाऱ्या धर्मदासने हा प्रकार पाहिला अन् चमनच्या हातातला फोक काढून घेत त्याला विचारले, ''बिचाऱ्या इतक्या लहान मुलाला असं मारत का सुटला आहात?''

''साहेब, तुम्हाला माहीत नाही. लहान दिसला तरी हा मोठा सैतान आहे. तुम्ही दूर व्हा माझ्या वाटेतून. कित्ती वेळा याला 'टोपली खालच्या कोंबड्या सोडू नकोस' असं सांगितलंय. पण हा जाम ऐकत नाही!'' चमन चिडून बोलला.

''पण अजून लहानच आहे ना तो! केला असेल खोडकरपणा! पण सोडल्या कोंबड्या म्हणून काय झालं? एखाद्या गिधाडानं अुचलून तर नेली नाही ना एकादी कोंबडी? कुत्र्यानं तर नाही झडप घातली ना एकादीवर?'' चमनची समजूत काढायचा प्रयत्न करत धर्मदासने विचारले.

''तसं काही नाही झालेलं. पण काय होईल ते तुम्हाला नाही माहीत. ती काठी द्या अगोदर माझ्या हातात.'' असे म्हणत तो मुलाकडे गुरगुरत पाहू लागला.

धर्मदासला चमनचे बोलणे निरर्थक वाटले. तो म्हणाला, ''चमन, शान्त रहा जरा! इकडे तिकडे हिंडून तुझ्या कोंबड्या परत तुझ्याच घरी परत येतील ना? मग इतका का रागावत आहेस?''

''हं: ! सगळ्या थोड्याच येतील परत? त्यातल्या फक्त दोनच तर माझ्या आहेत. बाकी साऱ्या आपापल्या घरांकडेच पळून जातील ना?'' आता खरी गोष्ट धर्मदासला कळून चुकली. तो म्हणाला, ''तरीच अलिकडे लोकांच्या कोंबड्या नाहीशा होत असल्याच्या तक्रारी ऐकू येत होत्या! काही माझ्याही असतीलच त्यात! चल आता पाटलाकडे. पाटीलही पाहील आता की या फोकानं तुला किती वेळा मारलं की तुटेल तो!'' अन् असे बोलत धर्मदास चमनला खेचत पाटलाकडे घेऊन गेला.



चान्दोबा
पुरवणी - ८२

आपल्या देशाची
वृक्षसंपदा

# लीची

**खूप** जुनी गोष्ट आहे. चीनच्या एका कवीला हद्दपारीची शिक्षा दिली गेली. त्याला कांटन येथे पाठवण्यात आले. तेथे त्याला भोजन म्हणून रोज केवळ लीची फळेच देण्यात आली. त्यावेळी तो म्हणाला, ''मला जर रोज अशी फळे मिळणार असतील, तर मी आजन्म अशा हद्दपारीला तयार आहे. मोठ्या आनन्दाने मी शिक्षेचे स्वागत करीन.'' असे म्हणतात की लीची हे फळ बुद्धपूर्व काळात चीनमधून आपल्या देशात आणले गेले. बिहारमधील मुजाफिर, प. बंगालचा हुगली प्रान्त, अुत्तर प्रदेशातील डेहराडून, पंजाबमधील गुरुदासपुर व तमिळनाडुमधील नीलगिरीतील जिल्ह्यां लीची बागा लावलेल्या आहेत. लीची-अुत्पादनात आपल्या देशाचे स्थान तिसरे आहे.



लीचीचे झाड नेहमी हिरवे दिसते. याची अुंची १२ मीटर पर्यन्त वाढते. याच्या फांद्या सरळ असतात. पानांचा वरचा भाग तुकतुकीत असतो. डहाळ्यांच्या बेचक्यात लहान लहान फुलांचे गुच्छ येतात. याची अंडाकृती फळे ही गुंच्छांनीच लागतात. फळांचा रंग लाल असतो. काही फळे हिरवट रंगाचीही असतात. फळावरील साल खरखरीत असते. पिकलेल्या फळाचे साल काढले की आत एक मोठेसे बी आढळते व या बीला वेढून पातळसा मधूर गर असतो. हा गर खूपच गोड असतो. यात बी, सी व डी ही जीवनसत्त्वे अधिक प्रमाणात असतात. अुत्तर भारतात जूनमधे तर दक्षिण भारतात ही फळे एप्रिल-मे मधे मिळतात. याचे केवळ बीच नव्हे, तर मुळे, साल व फुलांचाही औषधासाठी अुपयोग होतो.

## आपल्या देशातील ऋषि-मुनि - ६

# भृगु

**आ**पल्या देशात काही वंश (कुळे) सुप्रसिद्ध ऋषींच्या नावाने प्रसिद्ध आहेत. अशा प्रकारे भार्गव म्हणवले जाणारे लोक भृगुवंशाचे मानले जातात.

भृगु हे प्राचीन काळच्या महान् मुनींपैकी एक होत. त्यांनी पूजेयोग्य देवाची कल्पना केली व अन्य ऋषिमुनींना हा मार्ग दाखवला.

एकदा भगवान विष्णूंच्या दर्शनासाठी ते वैकुंठात गेले. तेंव्हा महाविष्णु योगनिद्रेत होते. भृगु थोडा वेळ त्यांच्या जागे होण्याची वाट पहात तेथेच थांबले, पण विष्णु जागे झाले नाहीत. भृगूंना या गोष्टीचा फार राग आला. इतक्या मोठ्या तपोसंपन्न ऋषीचीही त्यांनी पर्वा केली नाही. मुद्दामच तसे केले, असे समजून भृगूंचा आपल्या मनावरील ताबा सुटला. 'स्थितिकारक भगवान विष्णु असे योगनिद्रेत मग्न राहिले, तर सृष्टीचे काय होईल?' या विचाराने रागावून आवेगाने त्यांनी विष्णूंच्या छातीवर लाथ मारली. तसा तर त्यांचा आपल्या सर्व इंद्रियांवर चांगला ताबा होता व क्षणिक क्रोधाने ते आपली विचक्षणाशक्ति हरवून बसले आणि त्यांनी सामान्य माणसासारखी वर्तणुक केली.

यामुळे निद्रेतून जागे झालेले महाविष्णु जरासुद्धा रागावले नाहीत. उलट दारी आलेल्या अतिथीचे आपण योग्य ते स्वागत न केल्याबद्दल त्यांनी दुःख प्रकट केले. 'ज्या पायाने भृगुंनी लाथ मारली, त्या पायाला कुठे लागले तर नाही ना?' या विचाराने हळुवारपणे तो पाय उचलून ते दाबू लागले. भगवान विष्णुंचा हा शान्त भाव व विनयगुण पाहून भृगु आश्चर्यचकित झाले! स्वतःच्या वर्तणुकीबद्दल त्यांना पश्चात्ताप झाला. त्यांनी नंतर बाकीच्या मुनींना सांगितले की, शान्त व सत्यस्वरूपी भगवान विष्णू हेच पूजेयोग्य आहेत; जन्ममृत्युपासून ते आपल्याला मुक्ति देणारे आहेत.

माणसांचे भूत, भविष्य व वर्तमान सांगणारा 'भृगु संहिता' नावाचा एक ज्योतिषविषयक ग्रन्थ त्यांनी रचला. ते ज्योतिष विषयातले किती प्रकांड पंडित होते, हे या ग्रन्थावरून कळून येते.

च्यवन, शुक्र, जमदग्नि, परशुराम, वाल्मीकि आदि सुप्रसिद्ध मुनि भार्गव वंशीयच होते.



## तुम्हाला माहित आहे काय?

१. सम्राट अशोकाने आपल्या शासनाची घोषणा प्रथम केंव्हा केली?
२. कोणत्या देशाला 'पॅगोडांचा देश' असे म्हटले जाते?
३. आपल्या देशातील कोणत्या प्रान्तात 'एशियन जंगली गाढवे' आढळतात?
४. अमेरिकेतील दोन मुख्य राजकीय पक्ष कोणते?
५. एकही धाव न घेता भारताने चार विकेट्स गमावल्या अशी टेस्टमॅच कोणती?
६. पंखच नाहीत असा पक्षी कोणता?
७. संयुक्त राष्ट्रसंघाच्या पहिल्या भारतीय महिला अध्यक्ष कोण होत्या?
८. फुटबॉलमधे १००० गोल सर्वात अगोदर मिळवणारा खेळाडू कोण?
९. चोल राजांच्या राजधानीचे नाव काय?
१०. आपल्या देशात इंग्रज व फ्रेंच यांच्यात १० वर्षे एक युद्ध झाले. या युद्धाचे नाव काय?
११. महम्मद गझनीने आपल्या देशावर केंव्हा हल्ला केला ?
१२. लोक-सभेवर सर्वात जास्त सदस्य कोणत्या प्रान्तातून निवडले जातात?
१३. ताजमहालाजवळून वहाणारी नदी कोणती ?
१४. आग्र्याजवळील फत्तेपुरशिक्री या नगराची स्थापना कोणी केली?
१५. द्वितीय चन्द्रगुप्त कोणत्या नावाने सुप्रसिद्ध आहे ?
१६. सर्वात अधिक मांस खाणारा प्राणी कोणता?
१७. पोलो क्लबची स्थापना प्रथम कोठे झाली?
१८. आपल्या देशात पहिली तोफ आणणारा आक्रमक कोण?

### उत्तरे

१. ई.स.पू. २१६ मधे.
२. बर्मा (मियानमार).
३. गुजराथच्या कच्छ प्रदेशात.
४. डेमोक्रेटिक व रिपब्लिकन.
५. १९४२ मधील टेस्टमॅच (इंग्लंड).
६. न्यूझीलंडचा किवी पक्षी.
७. विजयालक्ष्मी पंडित.
८. ऑस्ट्रियात जन्मूनही जर्मनीकडून खेळणारा खेळाडू फ्रांज बेंडर.
९. तंजावर.
१०. कर्नाटक युद्ध.
११. ईसवी सन १००० ते १०२६ या मधल्या काळात एकूण सतरा वेळा.
१२. उत्तर प्रदेश.
१३. यमुना.
१४. बादशहा अकबर.
१५. विक्रमादित्य.
१६. ध्रुवप्रदेशीय अस्वल.
१७. आसाममधे १८५७ मधे - कचार क्लब.
१८. बाबर बादशहा.

# योग्य शिक्षा

वेदपुरीतील धनीराम व काशीराम हे महाआळशी होते. कष्ट करून एकादे काम करावे असे त्यांना कधीच आवडले नाही. गावचे सर्वजण या रिकामटेकड्यांना चांगले ओळखून असत, म्हणून दोघेही आसपासच्या गावात जात व जेथे कोठे मंगलकार्य चालू असेल तेथे घुसून मेजवानी झोडून येत.

एक दिवशी दुपारी दोघे असेच एका गावात गेले. तेथे एका घराच्या भिंतीवरून अुष्टी पाने बाहेर फेकली जात होती. दोघांना वाटले-या घरात लग्नाची जेवणावळ चालू असावी. झाले, धनीराम अन् काशीराम त्या घरात घुसले. त्यावेळी केळींची पाने मांडून जेवण वाढायचे काम चालू होते. दोघे ही जाअून पटकन पंगतीतली दोन पाने अडवून बसले.

तेथे एक माणूस पाहुण्यांच्या स्वागतासाठी अन् भोजन व्यवस्था संभाळण्यासाठी अुभा होता. सर्व पदार्थ नीट वाढले जात आहेत की नाही, इकडे तो लक्ष देत होता. या दोघांकडे त्याने काहीशा संशयाने पाहिले आणि मोठ्या नम्रपणे विचारले, ''आपण कोण?''

धनीराम चटकन म्हणाला, ''मी नवऱ्यामुलीच्या सासऱ्याचा मेहुणा आहे.'' काशीराम म्हणाला, ''ओहो ! तुम्हाला माहीत नाही ? मी तर नवऱ्यामुलाच्या काकाचा धाकटा जावई !''

चौकशी करणारा माणूस हे ऐकून एकदम ओरडला, ''अरे, पकडा या दोन चोरांना अन् द्या फेकून रस्त्यावर !'' बास, चार नोकर धावतच तेथे आले अन् दोघांची अुचलबांगडी करून त्यांनी यांनाही अुष्ट्या पानांप्रमाणे भिंतीवरून खाली टाकून दिले !

आपले ठेचकाळलेले अंग कुरवाळत धनीरामने विचारले, ''अरे काशीराम, आपल्या हातून ही चूक कशी काय घडली? आज आपला नेम बरोबर कसा नाही लागला?''

''अरे, त्या माणसानं आपल्याला दिलेल्या शिव्या ऐकल्या नाहीस का तू ? जेवणावळ मालकाच्या बापाच्या श्राद्धाची होती रे !'' वेदनेने कळवळत काशीराम अुत्तरला.





# मातृ-मंत्र

सीतापति आणि सीता हे एक आदर्श जोडपं होतं. त्यांना तीन मुलगे होते. त्यांच्यात एक-एक वर्षाचं अंतर होतं. मोठा मुलगा वीस वर्षांचा झाला, तेव्हा सीतापतीला एका विचित्र रोगाने ग्रासले. रात्रंदिवस तो खाटेवर पडून राहू लागला.

कित्येक वैद्यांनी सीतापतीच्या रोगाचे निदान करण्याचा प्रयत्न केला. पण कुणाला ही रोगाची परीक्षा करता आली नाही. शेवटी हिमालयातील एका योग्याने सीतापतीची लक्षणे पाहून सांगितले - ''तुला कुठला ही रोग झालेला नाही. हे पूर्व-जन्मीच्या पापाचं फळ आहे. माझ्या बरोबर हिमालयात चल. तिथे काही जडी-बुटी खा नि तपश्चर्या कर. तू रोगातून हळू-हळू बरा होशील.''

सीतापतीने विचारले - ''मला हिमालयात किती दिवस रहावं लागेल?''

योगी उत्तरला - ''एका चांगल्या कुटुंबाला तू गोत्यात आणलंस. तुझ्यामुळे ते सुखी कुटुंब दुःख-सागरात बुडून गेलं, त्या पापाने तुझ्या शरीरात प्रवेश केला आहे. तुला पूर्ण वीस वर्षे हिमालयात रहावं लागेल.''

मधेच दखल देत सीता म्हणाली - ''मुनिवर, या जन्मात जाणून-बुजून तर यांनी काही पाप केले नाही. मोठ्या प्रेमाने कुटुंबाचं पालन-पोषण केलं. यथाशक्ति लोकांना यांनी मदतच केली. वीस वर्षं हे आमच्या पासून दूर कसे राहू शकतील?''

''पूर्व-जन्मीचं पाप माणसाला कधी सोडीत नाही. म्हणून प्रत्येक जन्मात माणसाने पुण्य-कर्म केले पाहिजे. या जन्मीचं पुण्य पुढच्या जन्मात फळास येईल. आतापर्यंत तुझा परिवार सुखात राहिला असला, तर त्याचं श्रेय तुझ्या नवऱ्याला खचित नाही. मागच्या जन्मी तू जे पुण्य

प्रभाकर भावे



केलेस त्याचे हे फळ आहे.'' योग्याने सीतेला समजावून सांगितले.

सीतापति रोगामुळे त्रासून गेला होता. असं जिवंत रहाण्यापेक्षा हिमालयात गेलेलं बरं असा त्याने निर्णय घेतला. पण आपल्या बायकोचा विचार मनात आल्यावर त्याला फार वाईट वाटलं. आपल्या अनुपस्थितीत बिचारी सीता मुलांबरोबर सुखाने राहू शकेल का? लग्न झाल्यावर मुले आईला नीट सांभाळतील का? बायको आणि मुलांसाठी आतापर्यंत त्याने काही विशेष संपत्ति जमवली नव्हती.

सीतापतीच्या मनातील संशय व विचार योग्याने सहज जाणले. अमळ विचार करून तो म्हणाला- ''तुझी बायको मोठी भाग्यशाली आहे. मुलांनी तिची योग्य काळजी घ्यावी यासाठी एक उपाय आहे.''

तो उपाय जाणण्याची सीतापतीला उत्कण्ठा होती. इतक्यात बायको व मुलांना बोलावून योगी म्हणाला - ''एका महत्त्वाच्या विषयावर मला तुमच्याशी बोलायचंय. गेली वीस वर्षे सीतापतीने तुमच्या बाबतीतील आपली कर्तव्ये पार पाडली. आता तो माझ्या बरोबर हिमालयात यायला निघालाय. त्याला तुमच्या आईबद्दल फार काळजी वाटत आहे. तिने नवऱ्यासह हिमालयात जाणं निषिद्ध आहे. शिवाय तुम्हाला ही आईची आवश्यकता आहेच.''

नवऱ्याचे हिमालयात जाणे प्रथम सीतेला मान्य नव्हते. पण योग्याने समजून सांगितल्यावर आणि सीतापतीच्या भयंकर रोगाचा विचार करून शेवटी तिने मान्यता दिली. चारी मुलांनी पित्याला वचन दिले - ''आम्ही आईची योग्य ती काळजी घेऊ. आपण निश्चिंतपणे हिमालयात जा आणि रोगमुक्त होऊन परत या.''

तेव्हा योगी मुलांना म्हणाला - ''मी तुम्हा चौघांना मातृ-मंत्र देणार आहे. रोज हा मंत्र म्हणून आईची पूजा करीत जा. एक क्षण भर ही तिला दुःख होईलसे काही करू नका. नेहमी तिच्या आज्ञेचे पालन करीत



जा. भक्ति आणि श्रद्धापूर्वक सतत पाच वर्षे जो असे करील त्याला दहा लाख रुपयांचा ठेवा मिळेल. पण हे काम वाटतं तितकं सोपं नाही. हे करायची ज्याची तयारी असेल, त्याच्या जवळ आई राहील.''



मोठ्या मुलाने ग्वाही दिली - ''आईचं हृदय पवित्र असतं. तिच्या मनात थोडा ही स्वार्थ नसतो. आई जे काही करते ते आपल्या मुलांच्या कल्याणाकरता करते. आपण सांगितल्या प्रमाणे मी आईची पूजा करीन. आई माझ्याच जवळ राहील.''

बाकी तिन्ही मुलांनी याला मान्यता दिली.

क्षण भर विचार करून योगी म्हणाला - ''परंतु सर्वांनी ही पूजा एकच वेळी करायची नाही, हे काम एकेकाने करायचे आहे. म्हणून आई पहिली पाच वर्षे मोठ्या मुलाकडे राहील, नंतरची पाच वर्षे ती दुसऱ्या मुलाकडे राहील. तुम्हाला सर्वांना आहे हे कबूल?''

''आईची इच्छा आम्हाला शिरोधार्य. तिला जे योग्य वाटेल ते तिने करावे.'' चारी मुलांनी मोकळेपणाने सांगितले.

मुलांची प्रशंसा करीत योगी म्हणाला - ''सीता, तू मोठी भाग्यवान् आहेस. तुझी चारी मुलं रत्नासारखी आहेत.''

तरी पण सीता दुःखीच दिसली.ते पाहून योग्याने चारी मुलांना तेथून निघून जायला सांगितलं. मुले गेल्यावर योग्याने सीतेला आपल्या दुःखाचं कारण विचारलं.

सीता म्हणाली - ''योगीवर, मुलं अजून लहान आहेत. आता ते सर्व जण माझ्या आज्ञेत राहतील. मोठी झाली की आपापसात भांडायला लागतील. मग ते एकमेकांचे शत्रू बनतील. याचच मला दुःख आहे. आमच्यापाशी काही जमीन-जुमला नाही हे तुम्हाला माहीतच आहे. मी जर मोठ्या मुलाकडे राहिले तर बाकीच्यांचं काय बरं होईल?''

''सीता, पाच वर्षे तुझा मोठा मुलगा नित्य तुझ्या आज्ञेत राहील. बाकीच्या तिन्ही भावांना तो आपल्या जवळच ठेवील. तो त्यांना

अशा रीतीने तयार करील की ते तिघे ही हळू-हळू आपापल्या पायांवर उभे राहतील. पाच वर्षांनंतर मोठ्या मुलाला दहा लाख रुपये मिळतील. नंतर तुझा दुसरा मुलगा श्रद्धा-भक्तीने तुझे पालन-पोषण करील. त्यावेळी बाकीची दोन मुले त्याच्या जवळ राहतील.'' योग्याने समजावून सांगितले.

आपलं दुःख प्रकट करीत सीता म्हणाली - ''आपलं म्हणणं बरोबरच आहे, योगिराज. माझा मोठा मुलगा जेव्हा पंचवीस वर्षांचा होईल, तेव्हा त्याला दहा लाख रुपये मिळतील. दुसऱ्या मुलाला जेव्हा दहा लाख मिळतील तेव्हा त्याचं वय असेल एकोणतीस. या हिशोबानं चौथ्याला आपल्या सदतीसाव्या वर्षी दहा लाख रुपये मिळतील. हा तर त्याच्या बाबतीत अन्यायच नाही का होणार?''

योगी हसत म्हणाला - ''तू असं म्हणत आहेस, कारण तुझ्या डोक्यात मुलांच्या भविष्याचा विचार आहे. आई बरोबर राहणं हे मुलाचं सर्वात मोठं भाग्य नाही का? ते लाख मोलाचं आहे. दहा लाख रुपये मिळताच मोठा मुलगा तुला सोडून गेला, तर ते इतरांचं भाग्यच आहे. त्याला दुर्भाग्य म्हणू नकोस.''

''योगिराज, माझ्या चारी मुलांचं भाग्य एकाच वेळी फळफळेल असा काही उपाय नाही का?'' सीतेने प्रश्न विचारला.

योग्याने पुन्हा समजावून सांगितलं - ''सीता, भाग्य त्यांच्या हाती आहे. पण माझ्या व्यवस्थेनुसार वीस वर्षांपर्यंत मुले श्रद्धापूर्वक तुला सांभाळतील. तुझ्या दृष्टीने तेच महत्त्वाचे आहे. तुझा नवरा पण हिमालयात सुखाने राहील. वीस वर्षांनंतर पुन्हा तुम्ही दोघे एकत्र रहाल. म्हणून मी ही अशी योजना केलेली आहे.''

योग्याचे हे म्हणणे सीतेला पटले. तिचं दुःख संपुष्टात आलं. नंतर योग्याने चारी मुलांना एकत्र बोलवलं आणि म्हणाला - ''आई, वडील, मुलं सर्वांनी एकत्र रहावं, याहून अधिक मूल्यवान कुठलं ही धन नाही.'' आणि योग्याने मुलांना मातृ-मंत्राचा उपदेश दिला.

तो मंत्र ऐकून सीतेच्या मनाची व्याकुळता पूर्णपणे नष्ट झाली.





# न्यायनगर

**खू**प जुनी गोष्ट. मिथिलानगरीत यशवर्धन नावाचा एक क्षत्रीय तरूण रहात असे. तो मोठा पराक्रमी व साहसी होता. पण त्याबरोबरच तो फार रागीट होता. जे मनात येईल, ते तो करी. त्याला कुणाचीच भीती वाटत नसे. त्याच्या दुष्टपणामुळे लोक त्रासून गेले होते.

परंतु काही कालानन्तर यशवर्धनच्या पापाचा अंतिम घडा भरायची वेळ आली. राजाच्या मेहुण्याशी त्याची एक दिवस काही बाचाबाची झाली. दोघांनीही आपापल्या तलवारी उपसल्या. पण मेहुण्याने वार करण्यापूर्वीच यशवर्धनने आपली तलवार त्याच्या छातीत भोसकली. राजाला ही वार्ता कळल्यावर तो यशवर्धनवर चांगलाच रागावला. त्याला पकडून डोके उडवायची आज्ञा राजाने आपल्या शिपायांना दिली.

आता जीव वाचवायचा असेल तर देश सोडून जाण्याशिवाय यशवर्धनला गत्यंतर नव्हते. घोड्यावर स्वार होऊन तो ताबडतोब तेथून पळू लागला. अनेक कोस पार केल्यावर घोडा थकला व जागच्या जागीच मरून पडला.

देशाची सीमा ओलांडून जायचे असेल तर आता खूप अंतर पार करून पळावे लागेल असे यशवर्धनला वाटले. भीतीमुळे तो तसाच पळत राहिला. तहानेने व भुकेने तडफडत डोंगरदऱ्यातून तसाच पळत राहिला. सकाळ होता होता तो एका पहाडाच्या शिखरावर पोचला. थोडा वेळ तेथे आराम केल्यावर त्याला असे वाटले की, आता काही कोणी आपला पाठलाग करत नाहीय. डोंगरावरून खाली पाहिले, तेंव्हा त्याला पायथ्याशी एक सुन्दर नगर दिसले.

नगर पहाताच यशवर्धनच्या जिवात जीव आला. कारण आपल्या राज्यात इतके सुंदर नगर असल्याचे त्याच्या ऐकिवात नव्हते. त्याला असे वाटले की हे नक्कीच कुठल्या दुसऱ्या देशातील

**पंचवीस वर्षांपूर्वी चान्दोबात प्रकाशित झालेली गोष्ट**



नगर असावे. आपण आता आपल्या देशाच्या सरहद्दीबाहेर आलोच आहोत तर आता आपण याच सुंदर नगरात रहावे, असा विचार करून तो डोंगर अुतरू लागला. वाटेत त्याला एक गुराखी दिसला. त्याला त्याने नगराचे नाव विचारले.

गुराखी अुत्तरला - 'न्यायनगर'.

आता तर यशवर्धनची खात्रीच झाली की हे नक्कीच दुसऱ्या देशातले नगर आहे. त्याला ते नगर नवीनच नव्हे, तर काहीसे विचित्रही वाटले. त्याने नगरात प्रवेश केला व विशाल रस्ते, अुंच अुंच हवेल्या वगैरेंच्या मधून चालत राहिला. वाटेतून कित्येक स्त्री-पुरुष, जाता-येताना त्याला दिसले. काहीजण मधेमधे थांबून एकमेकांशी गप्पाही मारत होते. त्यांच्या पैकी कोणीही आजारी अथवा अशक्त दिसत नव्हते.

यशवर्धनला वाटले की हे तर एक पुण्यनगर आहे, कारण इथे कोणीही दुःखी, असमाधानी दिसत नाहीय. तो एका दुकानापाशी पोचला. तेथे त्याला एक विचित्र दृश्य दिसले. दुकानदार काही ग्राहकांशी बोलत असताना एका तरुणाने एक वस्तु चोरली, अन् तो मुकाट्याने त्या गल्लीतून पुढे जाअू लागला. पण तो चार-पाच पावलेही पुढे गेला नाही, इतक्यात एक जोरदार आवाज होअून त्या तरुणाच्या पायाखालची जमीन दुभंगली, अन् तो आत पडला. त्याला गिळून जमीन ताबडतोब पहिल्यासारखी सम होअून गेली !

आपल्या डोळ्यांदेखत घडणारे हे दृश्य पाहून यशवर्धन स्तंभित झाला. त्याच्या हेही लक्षात आले की, 'हे दृश्य केवळ आपणच नव्हे, तर तेथे आसपास असलेल्या सर्व लोकांनी पाहिले आहे.' पण त्यांच्यापैकी कोणालाही त्याचे आश्चर्य वाटल्याचे दिसले नाही. ते फक्त एक क्षणभर थांबले व जणू काही विशेष न पाहिल्या-सारखे पुन्हा आपापल्या वाटेने जात राहिले, आपले अुद्योग त्यांनी चालू ठेवले. त्यांना बहुधा अशी दृश्ये पहायची सवयच असावी.

यशवर्धनच्या लवकरच लक्षात आले की, या नगरातली माणसे याच प्रकारे मरतात. इतर काही ठिकाणीही त्याने माणसे जमिनीत अशी गडप होताना पाहिली. दुसऱ्यांवर अन्याय करणारांच्या पायाखालची जमीन फाटून ते जमिनीत गाडले जात होते. अशाच प्रकारे अन्यायी, पापी व दुष्ट लोकांचे मरण ओढवत होते. असाच एक माणूस रस्त्याने चालला होता. इतक्यात दुसऱ्या एकजणाने मागून येअून त्याच्या पाठीत खुपसण्यासाठी सुरा अुगारला. अन् काय? सुऱ्याचा पाठीला स्पर्श होण्यापूर्वीच मारणाराच्या पायाखाली जमीन फाटून तो आत गेला ! आणखी एका ठिकाणी, धावत सुटलेल्या एका स्त्रीच्या मागे चार जण तिला पकडायला जात होते. चारीच्या चारी जमिनीत गडप झाले ! जमीन पुन्हा होती तशीच दिसू लागली.

या विचित्र मृत्यूबाबत विचार करत यशवर्धन एका ठिकाणी अुभा राहिला. मनातल्या मनातच तो बडबडू लागला, "भूमी आपल्या पापाला क्षमा करणार नाही, असे माहीत असूनही हे लोक अशी कृत्ये करतातच कशाला ? त्या क्षणी काय ते विसरून जातात का, की आपला मृत्यु आता नक्कीच ओढवणार आहे?"

इतक्यात त्याच्याजवळूनच एक आवाज आला, "पुत्रा ! कोणत्या प्रदेशातला तू?"

दचकून यशवर्धनने त्या दिशेला वळून पाहिले, तो त्याला एक साधू तिथे अुभा असलेला दिसला.

यशवर्धन अुत्तरला, "मी मिथिलानगरचा आहे."

"मग तुमच्या गावच्या लोकांना मृत्यु काय 'मी येतोय' असं सांगून येतो? ते असे अचानकच मरत नाहीत काय? मग मरणाच्या भीतीने ते पापं करायची सोडतात का?" साधूने विचारले.

बस ! एवढयानेच यशवर्धनचे डोळे खाड्कन अुघडले. आपण केलेली सारी पापे त्याला आठवली. तो एकदम साधूच्या पायांवर लोळण घेत म्हणाला, "मुनिवर, मीही एक पापी माणूस आहे. मृत्युभयानेच पळून मी इथे आलोय. आता माझ्या लक्षात आलंय की वाचायचा प्रयत्न करायचा असेल, तर तो मृत्यूपासून नव्हे, तर पापापासून. आपण आता मला पुण्यमार्गाचा अुपदेश द्या."

साधुने नंतर यशवर्धनला, पुण्यमार्ग, धर्म व नीती या गोष्टींचा अुपदेश दिला.






DECEMBER 9, 1995
JANUARY 20, 1996

# PULSE POLIO IMMUNIZATION




9th Dec. 1995 & 20th Jan. 1996

## DID YOU KNOW THAT...

- Polio not only cripples a child for life but can also cause death
- It is possible to eradicate polio
- 146 countries are now polio free
- 2/3 of the world's polio cases still come from India
- Last year, in India, 4,000 children reportedly fell a victim to polio. This number is only a fraction of the actual number of polio cases occurring in India which do not get reported.
- The only way to eradicate polio is to eliminate the disease-causing poliovirus, and the only way to do this is to give polio drops to every child in the country in the age of 0-3 years on a single day and repeat it after 4-6 weeks.
- India will save more than Rs. 50 crore every year if polio is eradicated
- Your parents probably remember smallpox. You don't. You will remember polio.

**Your children should not.**

## WHAT CAN YOU DO?

- Spread the message of Pulse Polio Immunization
- Make sure that all children in your family and neighbourhood in 0-3 years age group, irrespective of whether or not they have been given polio drops earlier, are brought to the nearest vaccination centre for polio doses on 9th December 1995 and 20th January 1996.

विश्व-समाचार

# सतरा वर्षे वयाचा डॉक्टर



अमेरिकेत रहाणाऱ्या भारतीय डॉक्टरांनी, जून ३० रोजी शिकागो येथे एक सभा भरवली. सभेचे अध्यक्षस्थान अमेरिकेचे अध्यक्ष श्री. बिल क्लिंटन यांनी भूषवले होते. भाषण देण्यासाठी जेव्हा ते उठून उभे राहिले, तेंव्हा प्रथम त्यांनी 'डॉक्टर अंबटी' ला बोलावले. सतरा वर्षांचा एक युवक पुढे आलेला पाहून सभेतील सर्वांचे लक्ष त्याच्याकडे वेधले गेले. युवकाचे अभिनन्दन करत बिल क्लिंटन आपला एक हात उचलून म्हणाले, "डॉ. अंबटी यांचा परिचय प्रथम जेंव्हा मला करून देण्यात आला, तेंव्हा माझ्या मनात त्यांच्याबद्दल आदरभाव उत्पन्न झाला. कारण, ते जगातील वयाने सर्वात लहान असणारे डॉक्टर आहेत." यावर सर्व सभासदांनी टाळ्या वाजवल्या. थोडे थांबून क्लिंटन पुढे म्हणाले, "आत्ताच मला असेही कळलंय की, यांचे बंधूही एकोणीस वयाच्या म्हातारपणीच (नाइन्टीन इयर्स ओल्ड) डॉक्टर बनले." तेंव्हा तर सारा हॉलच हर्षध्वनी, टाळ्या व हसण्याच्या आवाजाने दुमदुमून गेला!

अमेरिकेच्या अध्यक्षांच्या अभिनन्दनास पात्र असलेल्या डॉ. अंबटी बालमुरलीकृष्ण यांची बुद्धिमत्ता असामान्य अशीच आहे. चार वर्षांच्या वयातच ते गणिताची अवघड उदाहरणे अगदी सहजपणे सोडवत. सहा वर्षांच्या वयात त्यांना पहिल्या वर्गात दाखल करण्यात आले. पण काही आठवड्यातच (महिन्यात नव्हे!) त्यांना वरच्या वर्गात घालण्यात आले. पुढील तीन वर्षात ते असेच पाचवेळा उन्नति मिळून वरील वर्गात जात राहिले. १९७१ मधे आपल्या वयाच्या तेराव्या वर्षीच त्यांनी जीवशास्त्रात (बायॉलॉजी) बी.ए.ची पदवी मिळवली. न्यूयॉर्क विश्व विद्यालयाचे ते सर्वात लहान वयाचे स्नातक होत. यानन्तर चार वर्षात त्यांनी माउंट सिनाय मेडिकल स्कूल मधून वैद्यक शास्त्रातील पदवी मिळवली.

अंबटी बालमुरलीकृष्ण यांचे वडील अंबटी मोहन राव यांनी औद्योगिक अभियांत्रिकी विषयात डॉक्टरेट मिळवली आहे; आणि त्यांची आई गोमती ही शिक्षणशास्त्रातली डॉक्टर आहे. बन्धु अंबटी जयकृष्ण डोळ्यांचे डॉक्टर आहेत.

बालमुरलीकृष्ण यांच्या अगोदर इस्राइलचा एक युवक ही असाच लहान वयात डॉक्टर बनला होता. त्याने इटलीतील पेरुजिया युनिव्हर्सिटीतून अठराव्या वर्षी वैद्यकशास्त्रात डॉक्टरेट मिळवली होती.

बालमुरलीकृष्ण व त्यांचे बंधु जयकृष्ण या दोघांनी मिळून सहा वर्षांपूर्वी 'एड्स' विषयावर एक पुस्तक प्रकाशित केले होते. निकट भविष्यात त्याची दुसरी आवृत्ति प्रकाशित होईल. पर्यावरण संरक्षणासंबंधीही या दोन भावांनी लिहिलेले पुस्तक प्रकाशनासाठी तयार आहे.

अमेरिकेचे अध्यक्ष बिल क्लिंटन म्हणाले, "तुम्हा दोघांना पाहून केवळ तुमचे आप्त व मित्रमंडळींनाच नव्हे, तर आम्हालाही अभिमान वाटतो आहे."

याशिवाय सांगण्यासारखा आणखीही एक विषय आहे. अंबटी बंधू प्रमाणेच स्वत: बिल क्लिंटननेही आपल्या तरूणपणात बरेच पराक्रम केले. वयाच्या सव्विसाव्या वर्षी ते प्रोफेसर बनले व एकतिसाव्या वर्षी एका राज्याचे गव्हर्नर बनले. आणि सेहेचाळिसाव्या वर्षी ते अमेरिकेचे अध्यक्ष ही झाले.



# राक्षसाचे दुकान

**फा**र प्राचीन काळी राक्षस राज्यात धर्मनन्दन नावाचा एक राक्षस रहात असे. त्याला राक्षसांची वर्तणूक मुळीच आवडत नसे. अुलट त्यांच्यात मोठे मानले जाणारे लोक त्याला म्हणत, "हे बघ, हरीण हे एक गरीब जनावर आहे. गवत खाअून, पाणी पिअून, इतर कुणाला कसलाही त्रास न देता हे प्राणी आपले आयुष्य घालवत असतात. पण वाघ हिंस्र प्राणी आहे. इतर प्राण्यांची शिकार करून, तो त्यांना मारून खातो. म्हणून असं म्हणणं योग्य नव्हे की हरीण चांगला प्राणी आहे अन् वाघ तेवढा वाईट. प्रत्येक जनावर आपापल्या पद्धतीनं जगत असते. त्याचप्रमाणे राक्षसांच्या जगण्याची अन् मनुष्यप्राण्याच्या जगण्याची निरनिराळी रीत आहे. आपण राक्षस पद्धतीने जगतो अन् तसंच जगणं आवश्यक आहे."

तरीही धर्मनन्दनला राक्षसपद्धतीने रहाणे आवडेना. राक्षस गरीब प्राण्यांना फार निर्दयतेने मारत असत अन् त्यात त्यांना आनन्द वाटे. आपल्या अुपकारकर्त्यांवरही ते अपकार करत असत.

धर्मनन्दनला हे सारे सहन न झाल्याने तो आजारी पडला. त्याच्या आई बापांनी आपल्या राक्षस जमातीच्या वैद्याला बोलावून घेतले. धर्मनन्दनला बरेच प्रश्न विचारल्यावर वैद्य त्याला म्हणाला, "चुकूनच तुझा राक्षसकुलात जन्म झाला आहे. तुझा रोग तर मानसिक आहे. तू काही काळ मनुष्य राज्यात जाअून रहावंस हे बरं. पण तिथे राहिलास तरी महिन्यातून कमीत कमी एका माणसाला तरी मारून खात जा. ज्या दिवशी पुन्हा आपल्या राज्यात येअून रहावंसं तुला वाटेल, त्या दिवशी समज, की तुझा आजार दूर झालाय !"

**अर्चना डिके**

वैद्याची ही आज्ञाच समजून धर्मनन्दनने एका नगरात फिरत राहून मानवांच्या बाबत बरेच काही ज्ञान संपादन केले.

धर्मनन्दनला माणसांची ही जीवनपद्धती फारच आवडली आणि त्याने त्याच नगरात राहण्याचे ठरवले. त्यानुसार त्याने एक छानशा तरुणाचे रूप धारण केले. एके दिवशी त्याला एक सुंदर तरुणी दिसली. तिच्याशी आपण लग्न करावे असे त्याला वाटले.

या तरुणीचे नाव होते लता. ती एक फारच चांगली मुलगी होती, पण अत्यन्त गरीब होते तिचे कुटुम्ब. तिचा बाप आजारी असल्याने नेहमी खाटेवर पडून असे. आई दोन-चार घरी भांडी घासून थोडे पैसे मिळवी. भाअू चांगला सुशिक्षित होता, पण बेकार होता. त्याला कुठेच नोकरी मिळत नव्हती. शरीर-कष्टाची कामे करणे त्याला आवडत नसे. काही काम करून संसाराला मदत करावी अशी लताची इच्छा होती, पण वयात आलेल्या मुलीने बाहेर कोठे काम करावे हे कुटुम्बाच्या रिवाजात बसण्यासारखे नव्हते.

एके दिवशी देवळात जात असलेल्या लताला गाठून धर्मनन्दनने निःसंकोचपणे तिच्याजवळ आपले प्रेम व्यक्त केले. तिला हसू आले, पण त्या हसण्यातही विषाद भरलेला होता. ती म्हणाली, "माझं लग्न



माझ्या इच्छे-अनिच्छेवर अवलंबून नाहीय. याच गावात आमचा एक दूरचा नातेवाईक आहे. एक वर्षापूर्वी त्याची बायको मेलीय. त्याची इच्छा आहे की, माझ्याशी दुसरं लग्न करावं. त्याची इच्छा पुरी केली, तर तो माझ्या बाबांना औषधोपचार करणार आहे, भावाला नोकरीही पाहणार आहे. त्याची थोरली मुलगी तर माझ्याच वयाची आहे. माझ्या घरातल्यांना कुणाला हे लग्न पसन्त नाहीय. पण आमचं घरही त्याच्याकडे गहाण पडलेलं आहे. आता एक आठवड्याच्या आत आम्ही आमची संमती कळवली नाही, तर तो आम्हाला घराबाहेर काढील."

"त्याचं कर्ज मी चुकवीन अन् तुझ्याशी



लग्न करीन.'' धर्मनन्दनने लताला आश्वासन देत म्हटले.

''पण मी तर तुम्हाला प्रथमच सांगितलंय की, माझं लग्न ही माझ्या हातातली गोष्ट नव्हे. आमच्याकडच्या मोठ्या माणसांशी तुम्ही याबाबत बोला.'' असे म्हणून लता निघून गेली.

धर्मनन्दनने लताच्या आई-वडलांना भेटून तिला मागणी घातली. त्यांनी त्याची माहिती विचारली. त्याला खोटे तर सांगायचे नव्हते, पण खरी गोष्ट त्याने लपवली. जात, गोत्र इत्यादि माहीत नसणाऱ्या माणसाशी आपल्या मुलीचे लग्न करून देणे त्यांना पसन्त नव्हते.

पुन्हा एकदा धर्मनन्दन देवळात जात असलेल्या लताला भेटला. तो तिला म्हणाला, ''तुला कबूल असेल, तर आपण तुझ्या आई-बाबांच्या संमतीवाचूनच लग्न करू या.''

लता म्हणाली, ''माझ्याच्यानं हे होणार नाही. माझं भाग्य चांगलं असेल तर माझ्या त्या नातेवाईकाला एकादा राक्षसच गिळून टाको.'' तिच्या या उत्तराने धर्मनन्दनला धक्काच बसला ! त्याला या शहरात येऊन एक आठवडा लोटला होता. एक दिवस रात्री त्याने लग्नासाठी लतावर दबाव आणणाऱ्या त्या माणसाला खाऊन टाकले. आपण याप्रकारे एक सत्कृत्यच केलंय याबद्दल त्याला समाधान होते.

लताच्या लग्नाची गोष्ट अशा प्रकारे तात्पुरती पुढे ढकलली गेली. एवढ्यात एक महिना पूर्ण व्हायला आला. कुणालाही खायची त्याला इच्छा होत नव्हती. शेवटी त्याने एक दिवस एका संन्याशाला पकडले. संन्याशाला नाहीतरी आपले असे कोणी नव्हतेच. तेंव्हा यालाच खाल्ले, तर कुणाचे काही बिघणार नाही!

पण संन्यासी राक्षसाला म्हणाला, ''बेटा धर्मनन्दन, तू राक्षस असलास तरी सन्मार्गी आहेस. मी नसेन तर मानवजातीचं नुकसान होईल अन् मला खाल्ल्यानं तुला पाप लागेल.''





संन्याशाने आपले नाव घेतले, म्हणून धर्मनन्दनच्या मनात त्याच्याबद्दल श्रद्धा उत्पन्न झाली. त्याने संन्याशाला आपल्याला चांगला सल्ला देण्याची विनन्ती केली. तेंव्हा संन्याशाने लताच्या एका नातेवाईकाचा उल्लेख करून म्हटले, ''त्याचं नाव आहे निर्वाक. त्याच्या बायकोचं नाव आहे कात्यायिनी. त्यांना कोणी मूलबाळ नसल्यानं मी त्यांना एकाद्या मुलाला दत्तक घेण्याविषयी सुचवलं होतं. पण अजून ते कुठल्या निर्णयावर आलेले नाहीत.''

नातेवाईकाचे पूर्ण वर्णन सांगून संन्यासी धर्मनन्दनला म्हणाला, ''याच नगरात वक्रबुद्धी नावाचा एक करोडपती माणूस आहे. कित्येक लोकांना आजवर फसवलंय त्यानं. पण सामान्य माणसं त्याला तोंड देऊ शकत नाहीत. तू तर शक्तिशाली अन् मायावीही आहेस. गरीबांना स्वस्त दरात वस्तु विकायचं एक दुकान उघड तू. सर्व 'चांगला माणूस' म्हणून तुझी स्तुती करतील. तुझं जेंव्हा चांगलं नाव होईल तेंव्हा मी सांगितलेला तो निर्वाक तुला नक्की दत्तक घेईल. यानन्तर तुला कोणी तुझी जात, कुल, गोत्र वगैरे विचारू शकणार नाही.''

त्यानन्तर एक रिकामी जागा पाहून त्याने तेथे आपले सुन्दरसे दुकान थाटले.

हळूहळू धर्मनन्दनचे दुकान चांगले चालू लागले, ग्राहकांची संख्या वाढू लागली. एक महिना पूर्ण झाला, पण यावेळी खाण्यासारखा कोणी योग्य माणूस त्याला सापडला नाही. आपल्या आहाराबाबतही धर्माने चालणाऱ्या राक्षसाला समजेना की आता काय करावे.

मधल्या काळात धर्मनन्दनच्या दुकानावर वक्रदृष्टीची नजर पडली. दिवसेंदिवस प्रगति करणाऱ्या धर्मनन्दनचा काटा काढायचे त्याने ठरवले. एका मल्लाची त्याने या कामासाठी निवड केली. तो आपोआपच त्याच्या तावडीत सापडला. या महिन्याची आपल्या आहारची अडचण धर्मनन्दनने त्याला खाऊन टाकून सोडवली.



आता धर्मनन्दनला पुढल्या महिन्याच्या माणसाबद्दल चिन्ता सतावू लागली. पण मध्यन्तरी निर्वाक त्याच्याकडे येऊन म्हणू लागला, "तुझ्या बाबतीत बरंच काही कानांवर आलंय माझ्या. तुझ्यासारख्या उदार तरुणाला दत्तक घेतलं तर माझा वंश उद्धरून जाईल बघ. आहे तुझी संमती?"

या बोलण्याने धर्मनन्दला आनन्द वाटला व मोठ्या खुशीने त्याने आपली संमती जाहीर केली.

निर्वाकने त्याला अगदी शास्त्रोक्त पद्धतीने दत्तक घेतले. या घटनेनंतर बरोबर एक आठवड्याने धर्मनन्दन संन्याशाला शोधायला निघाला. तो भेटल्यावर धर्मनन्दन म्हणाला, "महाराज, मला मानवांच्यातच रहायची इच्छा आहे. त्यामुळे मला दर महिन्याला एका माणसाला खाऊन टाकायचा नियम पाळावाच लागेल. इथली दुष्ट माणसांची संख्याही हळूहळू कमी होतेय. तेंव्हा आता पुढे काय करावं अशी पंचाईत पडलीय मला."

संन्यासी हसून म्हणाला, "मग तूही एक माणूस बनून जा ना! म्हणजे तुझी समस्या आपोआप सुटून जाईन. यासाठी एकच मार्ग आहे. तुझं राक्षसरूप स्वीकार करील, अशा एका माणसाची आपल्याला गरज आहे."

धर्मनन्दन आपल्या दुकानाकडे परत फिरला. तो आता याच विचारात चूर झाला की आपलं राक्षसरूप स्वीकारणारा कोण माणूस आढळेल आपल्याला? इतक्यात वक्रबुद्धी तेथे येऊन म्हणू लागला, "दहा हत्तींचं बळ अन् बारा सिंहांचा पराक्रम अंगी असणारा मल्ल मी इथे पाठवला होता. पण आता त्याचा कुठे पत्ताच लागत नाहीय! नगरातल्या सर्वात प्रसिद्ध तान्त्रिकाला विचारलं, तेंव्हा कळलं, की कोणी एक राक्षस लपून-छपून तुला मदत करत असतो. बोल, कुठं आहे हा राक्षस? दाखव बरं! पुढे आला की त्याला ताबडतोब इथे जमिनीतच गाडून टाकीन मी!"

त्याच्या बोलण्यावर जोरजोराने हसत धर्मनन्दन म्हणाला, "अरे वा! अगदी शंभर टक्के वक्रबुद्धीच आहेस तू! राक्षस इथे का राहील? तो तर राक्षस राज्यात राहील ना. थांब मी तुला राक्षस-राज्याची नीट माहिती देतो." अन् त्याने वक्रबुद्धीला राक्षसराज्याचा पत्ता अन् वर्णन सांगितले.

ते ऐकून वक्रबुद्धी खुश होऊन बोलू लागला, "अरे वा! अशा ठिकाणी रहायला मिळणाऱ्याला भाग्यवानच म्हणायला हवं. तू फक्त अगदी एकदाच पाठव ना मला त्या राज्यात!"

"अं ऽऽ, पाठवू शकेन मी! पण तसं करण्यानं मलाही काही लाभ व्हायला हवा न? तू आपली सगळी इस्टेट माझ्या नावे करून द्यायची व्यवस्था कर. मी तुला सर्व शक्तींनी युक्त बनवून राक्षसराज्यात पाठवून देतो." धर्मनन्दन म्हणाला.

वक्रबुद्धी विचार करू लागला, "सगळ्या राक्षसी शक्ती जर आपल्याला मिळत असतील, तर नन्तर आपण याची सगळी इस्टेट पुन्हा मिळवू शकू; मनात आलं तर राजाही बनू शकू." यामुळे लोभात पडून त्याने सर्व मान्य केले.

धर्मनन्दनने आपली अंगठी काढून वक्रबुद्धीच्या बोटात अडकवली. झालं! वक्रबुद्धी एकदम अदृश्यच झाला! नंतर संन्याशाला भेटून धर्मनन्दन म्हणाला, "महाराज, तुम्हाला तर सर्व माहीतच आहे. राक्षसराज्यात प्रवेश करणाऱ्याचा स्वभाव एकदम बदलून जातो. तेंव्हा आता त्याचा तेथून परत येण्याचा प्रश्नच येत नाही. मी आता राक्षस नसून संपूर्ण मानव बनलो आहे. वक्रबुद्धीची सारी इस्टेटही आता माझ्या हाती आहे. दुकान नेहमीप्रमाणे चालवूनही मी आता सामान्य जनतेची सेवा करू शकेन."

संन्याशाने धर्मनन्दनला आशिर्वाद दिला.

निर्वाकचा वारस बनून धर्मनन्दनने लताशी लग्न केले. तिच्या भावाला आपल्या दुकानात नोकरी दिली. लोकही त्या दुकानाला आता 'राक्षसाचे दुकान' म्हणून संबोधू लागले.



# हरामाची कमाई

**शि**वपुरी या एका लहानशा शहरात किरण नावाचा एक तरूण रहात असे. तो स्वतःला मोठा हुशार समजे. कमी मेहनत करून जास्त पैसे मिळवायची स्वप्ने तो नेहमी पहात असे.

एकदा किरणच्या घराच्या कुलुपाची किल्ली हरवली. कुलुपकिल्ल्या दुरुस्त करणाऱ्या कन्हैया नावाच्या एका माणसाला त्याने बोलावून आणले. दोन मिनिटातच त्याने एका किल्लीने ते कुलूप उघडून दिले अन् पाच रुपये मिळवले ! एक तासात या पद्धतीने कित्तीतरी कमाई करता येईल. पैसे मिळवायचा हा तर फारच सोपा मार्ग आहे की ! - मग तो कन्हैयाकडे गेला अन् त्याला ही कला शिकवायची विनंती केली.

कन्हैयाने ते कबूल केले अन् किरणला आपला शिष्य बनवले. दोन महिन्यात सर्व काही शिकवून झाल्यावर कन्हैया त्याला म्हणाला, ''पहा बाबा ! या धंद्यात अनंत अडचणी आहेत. सावधगिरीनं काम कर.''

चार महिन्यांत किरणने या धन्द्यात बरेच पैसे मिळवले. एका रात्री दोन माणसे त्याच्याकडे येऊन म्हणू लागली, ''आमच्या महालाची किल्ली हरवलीय. आमच्या बरोबर येऊन तेवढं उघडून दे. हे घे दहा रुपये आत्ताच.''

किरणने मोठ्या खुशीने त्यांच्या बरोबर जाऊन कुलूप उघडले. तेथून जाणाऱ्या दोन पहारेकऱ्यांनी हा प्रकार पाहिला, तेंव्हा त्यांना संशय आला. ते जवळ पोचले, तेंव्हा त्यांनी ओळखले की तिघांपैकी दोन तर चांगले प्रसिद्ध चोर आहेत. तिघांनाही घेऊन ते कोतवालाकडे गेले. किरणने कोतवालाला सर्व काही सांगितले. कोतवाल रागावूनच त्याला म्हणाला, ''कोण चोर, कोण मालक हे समजायची अक्कल नाही तुला ? मूर्ख आहेस अगदी ! हा धंदा तुझ्या लायकीचा नाही.'' अन् चाबकाचे दहा फटके त्याच्या पाठीवर मारून त्याने किरणला सोडून दिले.

**देवकी अुंबरेकर**






## ३

(ट्रोजन युद्धातल्या विजयानन्तर स्वदेशी परत निघालेला रूपधर वादळात सापडला, अन् एकाक्ष फाललोचन राक्षसाच्या बेटावर पोचला. तेथे आपल्या बारा साथीदारांसह तो एका गुहेतल्या फाललोचन राक्षसाच्या तावडीत सापडला. या राक्षसाने त्याच्या काही साथीदारांना जमिनीवर आपटून मारून टाकले अन् हाडेही शिल्लक न ठेवता खाऊन टाकले. शेवटी रूपधरने आपल्या बुद्धिकौशल्याने राक्षसाला आंधळे बनवले व उरलेल्या साथीदारांसह तो गुहेबाहेर आला. नंतर त्याच्या नौका ते बेट सोडून पुढे निघाल्या.)

**रू**पधरच्या नौका लवकरच नौकाद्वीपावर पोचल्या. हे बेट समुद्रावर तरंगत असते असे म्हणतात. चित्राश्व नावाचा तिथला राजा होता. या द्वीपाच्या दुसऱ्या बाजूला त्याचा एक अभेद्य असा काश्याचा किल्ला होता. दिक्पालक या राजाचा मित्र होता. राजाला तीन पुत्र व तीन कन्या होत्या.

चित्राश्वने रूपधर व त्याच्या साथीदारांचे चांगले स्वागत केले. त्याने या सर्वांना अतिथि म्हणून एक महिनाभर आपल्या किल्ल्यात ठेवून घेतले. ट्रोजन युद्ध व विजयी ग्रीक योद्ध्यांबद्दल खूपशी माहिती त्याने रूपधरला विचारून घेतली. संपूर्ण महिना असाच गप्पा मारणे, खाणे पिणे व विश्रांती घेणे यात व्यतीत झाला.

एक दिवस रूपधर चित्राश्वला म्हणाला, ''आम्ही खूप दिवस तुमचा पाहुणचार घेतलाय. आता आम्हाला निरोप द्यावा. अन्



त्याबरोबरच आमचा पुढचा प्रवास सुखाचा, सफल व्हावा यासाठी जमेल ते सहाय्य करावे; कारण या अगोदर आम्ही या प्रवासात खूप अडचणी सोसल्या आहेत.

चित्राश्वने यासाठी आपली संमती दिली. सप्तवायु चित्राश्वच्या अधीन होते; म्हणून त्यातला एक सोडून बाकीचे सहा वायु त्याने चामडयाच्या एका थैलीत बन्द केले अन् ती रूपधरच्या हाती देत तो म्हणाला, ''मुला, हे वायु तुझ्या नौका सकुशल तुझ्या देशी पोचवतील. वायु थैलीत बन्द असल्याने कसलीही अडचण न येता तुझी यात्रा पूर्ण होईल. पण घरी पोचेपर्यंत थैलीतून वायु बाहेर न येवू देण्यासाठी तुला खूप सावधगिरी बाळगायला हवी. तसं झालं म्हणजे तुझ्यावर कुठलंही संकट येणार नाही.''

रूपधरने राजाजवळ आपली कृतज्ञता प्रकट करून वायूची थैली स्वत:जवळ सुरक्षित ठेवून घेतली आणि आपल्या लोकांसह तो नौकांवर चढून पुढे निघाला. चित्राश्वने सांगितल्याप्रमाणेच घडले: नऊ दिवस व नऊ रात्री कसलेही संकट न येता निर्विघ्न पार पडल्या. दहाव्या दिवशी नौकांवरूनच दूरवर इथाकाचा किनारा दिसू लागला. थंडीपासून आपले संरक्षण करण्यासाठी किनाऱ्यावर लोकांनी पेटवलेल्या शेकोट्याही सर्वांना दिसल्या.

स्वदेश दिसल्यावर रूपधर व त्याच्या सहकाऱ्यांना आनन्द वाटला. आता थोड्याच वेळात आपल्या नौका किनाऱ्यावर पोचणार व आपण आपापल्या घरच्या लोकांना पाहू शकणार या विचाराने त्यांना अचंबळून आले.

नौकाद्वीप सोडल्यापासून इतक्या दिवसात रूपधरने अगदी थोडी डुकलीही घेतली नव्हती. वायूंची थैली हातात धरून मोठ्या जागरूकतेने तो तिचे रक्षण करत राहिला होता. जेंव्हा त्याला अशी खात्री वाटली की आपण आता सुखरूप पोचल्यातच जमा आहोत, तेंव्हा मात्र त्याला झोपेने घेरले. अगदी बेशुद्ध माणसासारखा तो झोपून गेला. पण नौका अजून तटाला लागल्या नव्हत्या.

रूपधरने डोळे बन्द केल्याबरोबर त्याचे



सहकारी आपसात कुजबुजू लागले.

एकजण इतरांना विचारू लागला, ''त्या थैलीत काय रे असेल?'' ''काही अशाच बहुमूल्य भेटवस्तु असतील.''

तिसरा एकजण बोलला, ''रूपधरचे तर अगणित मित्र आहेत. सर्वजण त्यालाच मूल्यवान वस्तु देतात. आपल्याला कोणीच काही देत नाही. त्यांच्या दृष्टीनं आपण म्हणजे बेकार, कुचकामी माणसं!''

चौथा तार छेडू लागला, ''आपण सुद्धा सर्वजण आपापलं घरदार सोडून याच्याबरोबर दहा वर्षं भटकलोच ना? बायकापोरं सोडून आपणही इतकी वर्षं युद्ध केलं. अन् आता पहा कसा आपण लुटलेलं सारं एकटाच घेऊन घरी चाललाय! अन् आपण ? आपण तर रिकाम्या हातांनीच चाललोय घरोघरी ! लुटीच्या मालाबरोबर वाटेत याला खूपशी बक्षिसं मिळाली आहेत. पण आपल्यापैकी कुणालाच काही यानं दिलं नाहीय.''

पाचवा म्हणाला, ''थैली उघडून पाहू या तर खरं, अखेर त्यात एवढं आहे तरी काय ते !''

सर्वांनी 'हो, हो' करत आवाजात आवाज मिळवला. थैलीचे तोंड चांदीच्या तारेने घट्ट बांधून टाकलेले होते. रूपधरचे सहायक मोठ्या सावधगिरीने तारेचा एकेक वेढा सोडवू लागले.

अन् काय ! शेवटचा वेढा सैल होताच ते



कालवायु प्रचंड वेगाने स्फोटक आवाज करत बाहेर पडले. त्या वाऱ्याने नौका डोलायला लागल्या. अन् त्यांवर असलेले लोक कापलेल्या झाडा प्रमाणे खाली कोसळू लागले. आपले चेहरे त्यांनी दोन्ही हातांनी लपवून घेतले.

या प्रलयघोषामुळे रूपधर खडबडून जागा झाला. पण त्याला आपले डोळेही उघडता येईनात. त्या झंझावाताने वेग कमी होता होता पुन्हा सर्व नावा नौकाद्वीपाच्या किनाऱ्यावर आणून सोडल्या. रूपधर व त्याचे साथीदार आता जोरजोराने रडू लागले; कारण थोड्या वेळापूर्वी तर त्यांना आपला देश डोळ्यांसमोर दिसला होता. आता पुन्हा

ते सूप दूर येऊन पडले होते. रूपधरची बिचाऱ्याची निराशा वर्णनातीत होती.

पण आता रडत बसून काय अुपयोग ? चूक व्हायची ती झालीच. रूपधर व त्याच्या सहकाऱ्यांनी स्वयंपाक करून जेवून घेतले. नंतर दोन साथीदार बरोबर घेअून रूपधर चित्राश्वकडे गेला. आश्चर्याने त्याच्याकडे पहात चित्राश्वने विचारले, ''अरे ! आपल्या देशी सुखरूप पोचण्यासाठी मी आवश्यक ती सगळी व्यवस्था करून दिली होती. मग परत कसा काय आलास?''

''राजा, काय अन् कसं सांगू? चुकून क्षणभर डोळा लागला माझा, अन् माझ्या या मूर्ख अनुयायांनी थैली अुघडून वायु मोकळे सोडले. तुम्ही खूप शक्तिशाली आहात. पुन्हा एक वेळ मला मदत करा नं ! पुण्य लागेल पहा.''

''अरे पापी माणसा ! हे काय करून बसलास तू? आत्ताच्या आत्ता हे बेट सोडून चालता हो ! सगळे देव तुझा नाश करायलाच टपले आहेत. मी काय मदत करणार तुला? आता काहीही होणार नाही.'' असे म्हणून चित्राश्वने त्याला निर्दयतेने तेथून घालवून दिले. रूपधरने खूप काकुळती केली, पण काहीही फायदा झाला नाही.

नौका तेथून परत जाअू लागल्या. पण आता कोणालाही मुळीसुद्धा अुत्साह नव्हता. वाऱ्याचीही अजिबात मदत मिळत नसल्याने सर्व नावाड्यांना खूप जोर लावून वल्ही मारावी लागत होती. जराही विश्रान्ति न घेता ते सहा दिवस रात्रंदिवस समुद्रात नौका चालवत राहिले. रूपधरला अखेर एक विचित्रसा किनारा दिसला. तो अुत्तर-ध्रुव प्रान्त होता. तेथे महिनोन् महिने दिवसच दिवस असे. सूर्यास्तानन्तर थोड्याच वेळांत पुन्हा सूर्योदय दिसे. कुठे सूर्यास्त अन् कुठे सूर्योदय होतो हेच कोणाला सांगता येत नसे.

रूपधरच्या नौका ज्या तटाला लागल्या, तेथे जवळच दोन पर्वतशिखरे होती. या दोन्हीच्या मधून फक्त एकच नौका जाअू शकेल इतकेच अंतर होते त्यांच्यामधे. मधून पलिकडे गेले की पुढे मोठी खाडी होती. ते एकादे बंदरच असल्यासारखे दिसत होते. नौका नांगरण्यासाठी ती चांगली जागा होती. इतर साऱ्या नौका पलीकडे पाठवून स्वतःची नौका मात्र रूपधरने किनाऱ्याच्या सुळक्याला बांधून टाकली. नंतर त्या पहाडावर चढून त्याने चहूकडे आपली नजर फिरवली. आसपास थोडीशी हिरवळ वा एकादे झाडही त्याला आढळले नाही. परंतु दूरवर आकाशाकडे जाणारा धूर मात्र त्याला दिसला, आसपास नक्कीच मनुष्यवस्ती असली पाहिजे असे अनुमान त्याने काढले. आपल्या साथीदारांपैकी तिघांना तिकडे जायला सुचवून तो म्हणाला, ''तुम्ही तिघं त्या धुराच्या दिशेला जाअून तिथे कोणत्या प्रकारची माणसे रहातात हे पाहून या.''

ते तिघे थोडे दूर गेल्यावर त्यांना एक छोटासा रस्ता दिसला. त्याच्या दोन्ही बाजूंना घरेही होती. तेथून जरा दूर असलेल्या





तलावावर एक मुलगी पाणी भरत होती. साथीदारांनी तिला विचारले, ''या देशाचा राजा कोण आहे? रहातो कुठे तो? आम्हाला त्याला भेटायचं आहे.'' मुलीने अुत्तरादाखल दूरवरच्या एका घराच्या छताकडे इशारा केला.

तिघांनी त्या घरात पाअूल ठेवले, तेंव्हा त्यांना तिथे राक्षसीसारखी स्त्री बसलेली दिसली. दिसायलाच ती मोठी विकृत दिसत होती. या तिघांना पहाताच तिने आपल्या नवऱ्याला हाक मारली. त्याने तिथे येताच त्यांच्यापैकी एकाला पकडून जमीनीवर आपटून मारून टाकले व आपल्या स्वयंपाकघरात फेकून दिले. ते भयंकर दृश्य पाहून बाकीच्या दोघांनी तेथून पळ काढला अन् धावतच ते नौकांजवळ पोचले.

परंतु इतक्यात राक्षस गह्रीत आला अन् जोरजोराने ओरडू लागला. त्याच्या आरडाओरडा ऐकून हजारो राक्षस तेथे पोचले अन् बंदरासारख्या जागेच्या चारी बाजूंना असलेल्या डोंगरांवर चढले. तेथून ते नौकांवर दगड फेकू लागले. दगड चांगले वजनदार होते.

तेथे असलेल्या साऱ्या नौका या माऱ्यामुळे मोडून गेल्या अन् रूपधरचे साथीदार त्या दगडांखाली दबले गेले. ओरडत आरडत ते राक्षसही आता खाली आले अन् त्यांना आपल्या बर्च्यांनी टोचून आपल्या घरी घेअून गेले.

या एकूण नाजुक परिस्थितीचा अंदाज घेअून तेथे क्षणभरही थांबणे धोक्याचे आहे, असे ठरवून रूपधरने आपल्या नौकेची दोरी झटकन कापून टाकली अन् त्यातल्या आपल्या अुरलेल्या साथीदारांना ओरडून नौका वेगाने तेथून दूर न्यायला सुचवले. चांगला वेग घेतला नाही तर प्राणांची खैर नसल्याचेही त्याने सांगितले.

साथीदारांनी आपली सारी शक्ती एकवटून वल्ही मारत नौका दगडांच्या टप्प्याबाहेर समुद्रात दूर नेली. ही एक नौका सोडली, तर बाकी सर्व नौकांचा नाश होअून त्यावरील सारे ग्रीक साथीदारही मरून गेले.

**क्रमशः**



## चांदोबाच्या बातम्या

### पिरामिड गृह

इजिप्तमधील पिरॅमिड हे जगातील सात आश्चर्यां पैकी एक होत. राजेरजवाड्यांचे मृतदेह सुरक्षित ठेवण्यासाठी यांची निर्मिती करण्यात आली असे मानले जाते. हजारो वर्षांपूर्वी हे बांधले गेले आहेत. यांच्या विलक्षण अशा बांधकाम पद्धतीने आजच्या वास्तुविशारदांना खूपच आकर्षित केलेले आहे. या पिरॅमिडचा पायाकडील भाग चौरसाकृती



असून वर शिखराकडे त्या भिंती त्रिकोणाकृतीत निमुळत्या होत जातात अन् त्यामुळे या इमारती काही निराळ्याच दिसतात.

या पिरॅमिडमधे मानवी देह तर सुरक्षित रहातातच, पण त्यांबरोबर ठेवलेल्या अन्य वस्तूही जराही न बिघडता सुरक्षित रहातात. निपुण वास्तु-विशारदांचे असे म्हणणे आहे की पिरॅमिड आकाराच्या पुठ्ठ्यांच्या पेट्यांमधे फळे, भाज्या वगैरे खराब न होता राहू शकतील. इतकेच नव्हे, तर काहीजण असेही म्हणतात की, पुढे या आकाराची घरे बांधली, तर त्यात रहाणारी माणसे निरोगी रहातील. तेव्हा यापुढे अशी पिरॅमिडगृहे निर्माण झाली, तर त्यात आश्चर्य करण्यासारखे काही नाही.

### अुंच इमारत

जपानमधील गृह-निर्माण विभागाच्या ३७ वास्तुविशारदांनी चीनच्या शांघाय नगरांत एक ४७० मीटर अुंचीची इमारत बांधायचे ठरवले आहे. ही इमारत ७५ मजली असेल. मलेशियात एका ४५२ मीटर अुंचीच्या इमारतीचे काम चालू आहे. अमेरिकेतही अशाच एका इमारतीचे काम चालू आहे. शिकागोमधील या इमारतीची अुंची ४४३ मीटर असेल. परन्तु शांघायमधे बनणारी इमारत वरील दोन्ही इमारती पेक्षाही अधिक अुंच असेल. ८८२ लक्ष डॉलर्स खर्च करून बनणाऱ्या या इमारतीचे बांधकाम येत्या पाच-सहा वर्षात पूर्ण होईल.

### दन्तशिखर

शांघायमधील दन्तवैद्य याकीन व त्यांचे सहा विद्यार्थी हे गेली ३० वर्षे अनेक रोग्यांचे खराब दात अुपटत आले आहेत. आतापर्यन्त त्यांनी जवळ जवळ २८,००० दात अुपटले आहेत. पण त्यांनी ते फेकून न देता, एक विशेष प्रकारचा गोन्द वापरून त्यापासून दोन मीटर अुंचीचे एक शिखर बनवले आहे. गिनीज बुक ऑफ वर्ल्ड रेकॉर्डमधे हे दाखल करण्यासाठी त्या संबंधीचे अधिकारी येअून ते पाहून गेले आहेत.

### रबराचे धरण

मध्य चीनच्या हेरान प्रान्तातील नानयांग शहरात पाचशे मीटर लांबी व साडेतीन मीटर रुंदीच्या एका धरणाची भिन्त रबराच्या साह्याने बांधली जात आहे. विशारदांचे म्हणणे असे आहे की हवा किंवा पाण्याने भरलेल्या रबरी थैल्या दगड किंवा सीमेंटपेक्षा स्वस्त पडतात.

# देशभक्ति

दृढनिश्चयी विक्रमादित्य पुन्हा झाडाजवळ आला. त्याने झाडावरून प्रेत खाली उतरवले आणि ते आपल्या खांद्यावर टाकले. तो शांतपणे स्मशानाची वाट चालू लागला. तेव्हा प्रेतातील वेताळ राजाला म्हणाला - ''या भयंकर स्मशानात मध्य-रात्री तू हे कठोर परिश्रम करीत आहेस. एवढी ढोर मेहनत करून तुला काय मिळालं हे काही माझ्या लक्षात येत नाही. मला वाटतं तुला यात काही ही मिळालं नाही. तुझा कुठला ही उद्देश सफल झाला नाही. आपल्या काही स्वार्थापोटी तू हे सर्व करीत आहेस असं तर मी कधी ही म्हणणार नाही. मला वाटतं कुणाबद्दल तरी तुझ्या मनात विशेष आदर आहे आणि त्या आदर-भावनेच्या आहारी जाऊन त्याच्या स्वार्था-साठी तू हट्टाने ही सर्व मेहनत करीत आहेस. तू एका देशाचा राजा आहेस, शासन-व्यवस्थेचा तुला चांगला अनुभव आहे, तू लोकज्ञानी आहेस, चांगला सत्प्रवृत्त माणूस आहेस यात मला जरा ही

## वेताळ कथा



संशय नाही. कधी कधी महाज्ञानी आणि विवेक-संपन्न माणसे सुद्धा आपल्या क्षणिक दुबळेपणाला बळी पडून घोडचुका करून बसतात. उदाहरणार्थ सुमनस्पति नावाच्या एका राजगुरूची गोष्ट मी तुला सांगतो. माझी गोष्ट ऐकून तुझा थकवाही थोडा दूर होईल. लक्षपूर्वक ऐक.'' एवढे सांगून वेताळाने सुमनस्पतीची गोष्ट सांगायला सुरवात केली.

श्वेतदीप राज्याच्या राजाला फारा वर्षांनी एक मुलगा झाला. राजा आणि राणी मोठ्या प्रेमाने त्याचे लालन-पालन करू लागले. आपल्या सहाव्या वाढदिवशी मुलगा राजोद्यानात खेळायला गेला. आणि तेथून तो नाहीसा झाला. सैनिकांनी खूप शोधाशोध केली, पण मुलगा काही सापडला नाही.

श्वेतद्वीपच्या शेजारी दुसरं राज्य होतं हरितद्वीप. फार दिवसांपासून या दोन राज्यात कट्टर शत्रुत्व चालत आलं होतं. दोन्ही राज्ये समान शक्तिशाली असल्यामुळे आतापर्यंत कोणी कोणावर आक्रमण केलेलं नव्हतं. राजकुमार हरवल्यावर राजाला सर्वप्रथम संशय आला हरितद्वीपच्या राजाबद्दल. दुसऱ्याच दिवशी राजगुरु सुमनस्पतीला श्वेतद्वीपच्या समुद्र किनाऱ्यावर पकडण्यात आले. यामुळे राजाचा संशय अधिकच बळावला.

सुमनस्पति मोठा ज्ञानी आणि विवेकसंपन्न होता. तो अनेक विद्या जाणत होता. इतकेच नव्हे तर तंत्र-विद्येत ही तो निष्णात होता. पशु-पक्ष्यांची भाषा त्याला अवगत होती. हरितद्वीपाच्या राजकुमाराचा राज्याभिषेक सहा महिन्यांनी होणार होता. सुमनस्पति या महोत्सवाच्या निमंत्रण-पत्रिका निरनिराळ्या राज्यांच्या राजांना स्वतः देण्यासाठी आपल्या राजधानीतून निघाला होता. त्यावेळी त्याची नाव वादळाच्या तडाख्यात सापडली नि तो शेवटी श्वेतद्वीपच्या किनाऱ्यावर पोचला होता.

श्वेतदीपच्या राजाने सुमनस्पतीला अनेक प्रश्न विचारले. आपल्या मुलाच्या अपहरणाबद्दल त्याला काही माहीत नाही हे त्याच्या उत्तरांवरून राजाच्या लक्षात आले. तरी पण राजाने त्याला सोडले नाही. सुमनस्पति सकल विद्या-पारंगत होता, म्हणून आपल्या



मुलाचा शोध घेण्याचे व त्याचा ठाव-ठिकाणा हुडकण्याचे काम त्याच्यावर सोपविले.

राजकुमार कोठे असेल व त्याचा पत्ता कसा लावावा हे काही सुमनस्पतीच्या लक्षात येईना. हे काम जर आपण करू शकलो नाही, तर आपणास कायमचे या राज्यात बंदी बनून रहावेलागणार, हे ही तो समजून चुकला. किल्ल्याच्या बुरुजावर हिंडत तो याच विषयाचे चिंतन करीत राहिला. तेव्हा किल्ल्याकडे येत असलेले एक गिधाड त्याला दिसले.

सुमनस्पति लक्षपूर्वक गिधाडाकडे पहात राहिला. त्याने आपली तर्जनी हवेत घुमवली आणि अर्धे मिनिट तो मोठ्याने शिट्टी वाजवीत राहिला. गिधाडाला जणू सुमनस्पतीच्या मनातील चिंता समजली. किल्ल्याच्या चारी बाजूंना चार-पाच वेळा त्याने चकरा मारल्या आणि शेवटी बागेतील वडाच्या एका फांदीवर ते उतरले. दुसऱ्याच क्षणी झाडाच्या फांद्यांवर बसलेले अन्य पक्षी कोलाहल करू लागले.

सुमनस्पतीने संतोषपूर्वक डोके हलवले, जणू काही गिधाडाचा संकेत तो समजला. किल्ल्याच्या बुरुजावरून उतरून तो खाली बागेत आला. क्षणात पक्षांचा कोलाहल संपला. वडाच्या एका फांदीवर मैनेचे घरटे होते. मैना उडून सुमनस्पतीजवळ आली आणि झाडाच्या बुंध्याशी असलेल्या ढोलीच्या जवळ जाऊन बसली व आवाज करू लागली. हे पाहून सुमनस्पति फार खुश झाला. आणि ढोलीजवळ



आला. बाहेरून ढोली छोटी वाटत असली तरी आत खूप खोल होती. एक माणूस रांगत आत जाऊ शकत होता. झाडाच्या बुंध्याजवळील बराच भाग आसपास उगवलेल्या वनस्पतींनी झाकून गेलेला होता.

सुमनस्पति झाडाच्या ढोलीत शिरला आणि काही फुट आत गेला. त्याने ढोलीत खाली वाकून पाहिले तेव्हा त्याला चार-पाच फुट उंचीचा मधाने भरलेला एक हौद दिसला आणि वरच्या बाजूला एक चेंडू तरंगत होता. राजकुमार जेव्हा बागेत खेळत होता, तेव्हा त्याचा हा चेंडू ढोलीत जाऊन पडला. चेंडू शोधून काढण्यासाठी राजकुमार ढोलीत गेला आणि या हौदावरचढला. आपला तोल जाऊन तो हौदात



पडला आणि बुडून गेला.

सुमनस्पतीने राजाला ही दु:खद वार्ता कळवली. राजाने राजकुमाराला बाहेर काढवले. हौदात हवा आणि प्रकाश पोचू शकत नव्हता, त्यामुळे राजकुमाराचे शरीर जसेच्या तसे होते. राजाने त्याला रेशमी वस्त्रे घातली व वडाच्या झाडाजवळील एका झोपडीत सोन्याच्या पलंगावर ठेवले.

नंतर राजा सुमनस्पतीला म्हणाला - "आम्ही जे काम करू शकले नाही, ते आपण सहजपणे करून दाखवले. आपण मोठे शक्तिशाली महापुरुष आहात! राजकुमाराचे प्राण त्याला सोडून गेले आहेत हे आमचे मोठे दुर्भाग्य. आता याच्या शरीरात पुन्हा प्राण-प्रतिष्ठा करण्याची शक्ति केवळ आपल्या पाशीच आहे. आपणच हे कार्य करू शकाल!"

"अशक्य! केवळ अशक्य!!" रागाने राजाकडे पहात सुमनस्पति म्हणाला. नंतर त्याने सांगितले - "जन्म आणि मृत्यु यांच्या तावडीतून कोणी ही सुटलेला नाही. मला ही मरण येणारच. कोणी ही अमर होऊं शकणार नाही. कोणाला जीवन दान देण्याची शक्ति माझ्यात नाही."

"आपण काय करू शकता व काय नाही हे मी जाणत नाही. जोपर्यंत राजकुमाराला आपण जीवन-दान देणार नाही, जोपर्यंत आपण या बागेच्या बाहेर पडू शकणार नाही. चारी बाजूंना सैनिक पहारा देत आहेत. आपण जर पळून जाण्याचा प्रयत्न केला, तरं ज्या झोपडीत मृत राजकुमाराचा देह आहे तेथेच तुम्हाला ही कैदी म्हणून बंदीवासात रहावं लागेल!" असं सांगून राजा निघून गेला.

राजाचे अज्ञान व स्वार्थपरता पाहून सुमनस्पति काळजीत पडला. तिथेच एका दगडावर तो बसला. एवढ्यात दोन माकडं एकमेकांचा पाठलाग करीत बागेत आली. पाहता पाहता ती झाडाच्या फांदीवर चढून बसली. एक-दोन मिनिटात एक माकड किच-किच करीत धडामदिशी जमिनीवर येऊन पडलें. फांदीवरचा काळा साप त्याला चावला होता आणि माकड बेशुद्ध होऊन खाली पडलं होतं.

इतक्यात दुसरं माकड खाली उतरलं नि त्या बेशुद्ध माकडाच्या जवळ येऊन बसलं. त्याने त्याच्या देहाचा वास घेतला. फांदीला लपेटलेल्या काळ्या सापाकडे त्याने रागाने पाहिले. त्याने आपले दोन्ही हात जमिनीवर जोरात पटकले आणि एक लांब उडी मारून ते तेथून अदृश्य झाले.

सुमनस्पति हे सर्व पहात होता. त्याच्या चेहऱ्यावर हास्याची एक रेखा चमकून गेली. तो दगडावरून उठला नि इकडे-तिकडे येरझारा घालू लागला.

पळून गेलेलं माकड एक तासाभरात परत आलं. ते निपचित पडलेल्या माकडाजवळ आलं. त्याच्या हातात पाच-सहा फुट लांबीची एक मुळी होती. ती सापासारखींच दिसत होती. बेशुद्ध माकडाच्या डोक्यावर त्याने ती मुळी ठेवली आणि तिनदा जोरात फुंकर मारली. बस, त्या माकडाने डोळे उघडले नि आपलं अंग खाजवीत ते उठून बसलं. आताच झोपेतून उठलय असं वाटलं.

सुमनस्पति माकडांच्या जवळ आला. एक चुटकी वाजवली आणि हुंकार करीत तो त्यांच्याकडे पहात राहिला. दोन्ही माकडांनी एकमेकांकडे पाहिले. त्यांनी ती मुळी सुमनस्पतीच्या हाती दिली. मधून मधून त्याच्याकडे पहात माकडे तेथून निघून गेली.

सुमनस्पतीने ती मुळी राजकुमाराच्या डोक्यावर ठेवली. तीन वेळा जोराने फुंकर मारली. लगेच राजकुमार जागृत झाला. जसा काही आताच झोपेतून उठला होता. ही शुभ वार्ता राजाला जाऊन सांगायला सुमनस्पतीने पहारेकऱ्यांना सांगितले.

राजकुमाराला जीवन-दान मिळाल्याची





पडला आणि बुडून गेला.

सुमनस्पतीने राजाला ही दु:खद वार्ता कळवली. राजाने राजकुमाराला बाहेर काढवले. हौदात हवा आणि प्रकाश पोचू शकत नव्हता, त्यामुळे राजकुमाराचे शरीर जसेच्या तसे होते. राजाने त्याला रेशमी वस्त्रे घातली व वडाच्या झाडाजवळील एका झोपडीत सोन्याच्या पलंगावर ठेवले.

नंतर राजा सुमनस्पतीला म्हणाला - ''आम्ही जे काम करू शकले नाही, ते आपण सहजपणे करून दाखवले. आपण मोठे शक्तिशाली महापुरुष आहात ! राजकुमाराचे प्राण त्याला सोडून गेले आहेत हे आमचे मोठे दुर्भाग्य. आता याच्या शरीरात पुन्हा प्राण-प्रतिष्ठा करण्याची शक्ति केवळ आपल्या पाशीच आहे. आपणच हे कार्य करू शकाल !''

''अशक्य ! केवळ अशक्य !!'' रागाने राजाकडे पहात सुमनस्पति म्हणाला. नंतर त्याने सांगितले - ''जन्म आणि मृत्यु यांच्या तावडीतून कोणी ही सुटलेला नाही. मला ही मरण येणारच. कोणी ही अमर होऊं शकणार नाही. कोणाला जीवन दान देण्याची शक्ति माझ्यात नाही.''

''आपण काय करू शकता व काय नाही हे मी जाणत नाही. जोपर्यंत राजकुमाराला आपण जीवन-दान देणार नाही, जोपर्यंत आपण या बागेच्या बाहेर पडू शकणार नाही. चारी बाजूंना सैनिक पहारा देत आहेत. आपण जर पळून जाण्याचा प्रयत्न केला, तर ज्या झोपडीत मृत राजकुमाराचा देह आहे तेथेच तुम्हाला ही कैदी म्हणून बंदीवासात रहावं लागेल !'' असं सांगून राजा निघून गेला.

राजाचे अज्ञान व स्वार्थपरता पाहून सुमनस्पति काळजीत पडला. तिथेच एका दगडावर तो बसला. एवढ्यात दोन माकडं एकमेकांचा पाठलाग करीत बागेत आली. पाहता पाहता ती झाडाच्या फांदीवर चढून बसली. एक-दोन मिनिटात एक माकड किच-किच करीत धडामदिशी जमिनीवर येऊन पडलें. फांदीवरचा काळा साप त्याला चावला होता आणि माकड बेशुद्ध होऊन खाली पडलं होतं.

इतक्यात दुसरं माकड खाली उतरलं नि त्या बेशुद्ध माकडाच्या जवळ येऊन बसलं. त्याने

राजाला सांगण्यासाठी राजकुमाराने आपले तोंड उघडले. पण त्याला मंत्र आठवेना. इतकेच काय शिकलेल्या सर्व विद्यांचे ही राजकुमाराला पूर्ण विस्मरण झाले.

एवढी गोष्ट ऐकवून वेताळ राजा विक्रमादित्याला म्हणाला - ''राजगुरु सुमनस्पतीने फार नीच व्यवहार केला असं मला वाटतं. श्वेत-द्वीपच्या राजकुमाराला जीवन-दान देऊन त्याला सर्व विद्या-पारंगत केले सुमनस्पतीने. त्याच सुमनस्पतीने नवा मंत्र शिकण्याच्या मिषाने त्याला धोका दिला. शिकलेल्या सर्व विद्यांचे राजकुमाराला विस्मरण होईल अशी योजना त्याने कशासाठी बरे केली ? तो आपल्याहून अधिक विद्या-संपन्न होईल अशी त्याला भीती का वाटली? अथवा भविष्य काळात तो आपलं नुकसान करील असं भय सुमनस्पतीला वाटलं का? महाज्ञानी सुमनस्पतीने असं नीच कृत्य करून आपलं ज्ञान व विवेक याना कलंकितच नाही का केलं? माझ्या या शंकेचं उत्तर तू माहीत असूनही दिलं नाहीस तर तुझ्या मस्तकाचे शतश: तुकडे होतील हे तू जाणतोसच !''

विक्रमादित्य उत्तर देत म्हणाला - ''हरित द्वीपाचा राजगुरु सुमनस्पति याच्या मनात श्वेतद्वीपाच्या राजकुमाराबद्दल विशेष प्रेम असण्याची आवश्यकताच काय? राजाने जबरदस्ती करून त्याच्याकडून सर्व करविले. आपण बंधनमुक्त व्हावे या एकमात्र उद्देशाने त्याने राजकुमाराला अनेक विद्या शिकविल्या. शत्रु-देशाच्या राजकुमाराला विद्या शिकवणं हा तसं पाहिलं तर देश-द्रोहच होय. पण माझ्या दृष्टिकोणातून हीच खरी देशभक्ति आहे. व्यक्ति, परिवार, समाज, देश यांच्या सीमात अडकून माणसाचं वलय सीमित होऊन जातं. व्यक्ती पेक्षा देश अधिक महान आहे, आपल्या देशाच्या हिताचा विचार करता सुमनस्पतीने जे काही केले ते न्यायसंगतच होय. आपले ज्ञान व विवेक यांना त्याने कलंक लावला असं कोणी म्हणेल तर तो त्याच्या वर अन्याय होईल.''

राजाच्या या उत्तराने संतुष्ट होऊन वेताळ प्रेतासह अदृश्य झाला आणि झाडावर जाऊन बसला.

**आधार : वरलक्ष्मी यांची एक कथा**



# व्यापाऱ्याची शंका

**श्या**मपुरचा मुन्सफ शहरातलं आपलं काम आटपून घोड्यावरून परत यायला निघाला. वाटेत एका तलावाशी थांबून त्यानं घोड्याला पाणी प्यायला सोडलं अन् स्वत: थोडा वेळ विश्रान्तीसाठी एका झाडाखाली बसला. तिथून जेव्हां तो निघाला तेंव्हा धान्यव्यापारी गुप्ताही घोड्यावरून आपल्याकडेच येत असलेला त्याला दिसला.

मुन्सफ स्वत: काहीसा मितभाषी होता, तर गुप्ता अतीच वाचाल होता. त्याच्यांबरोबर पुढे जाणं मुन्सफाला पसंत नव्हतं; पण ती ब्याद कशी टाळावी, हेही त्याला समजेना. तो मुकाट्याने गुप्ताबरोबर जात राहिला अन् स्वभावाप्रमाणे गुप्ताची बडबड सुरू झालीच ! 'आज बाजारात आपल्याला किती फायदा झाला; तेच धान्य आपण निरनिराळ्या भावात कसं विकलं' वगैरे तो सांगत राहिला अन् मुन्सफाला 'हं, हं' करत ऐकून घेत रहावं लागलं. पण वीज चमकल्यासारखी गुप्ताचं तोंड बंद करायची एक युक्ती एकदम त्याच्या डोक्यात आली.

''गुप्ता, माझ्याशी एक पैज लावतोस? आपल्या गावच्या रामाच्या देवळापर्यन्त आपण मनातल्या मनात रामनामाचा जप करत जाऊ या. तू इतर काहीही न बोलता ही पैज जिंकलीस, तर मी तुला माझा हा घोडा बक्षीस देऊन टाकीन.'' मुन्सफ म्हणाला.

''फक्त इतकंच? अगदी या क्षणापासून तोंड शिवून घेतो बघ ! चल.'' असं म्हणत गुप्तानं मौन धारण केलं.

अशाप्रकारे गावच्या हद्दीपर्यन्त तर ते पोचले. पण अचानक गुप्ताच्या मनात एक शंका आली, अन् त्यानं विचारलं, ''काय रे? मला नुसता घोडाच देशील, की वरचं खोगीरही देशील बरोबर?

**देवकी आचरेकर**





# दक्षिणेकडील मजबूत किल्ले - २

**रचना : मीरा भुग्र ◆ चित्रकार : अमिता चव्हाण**

तेराव्या शतकात मार्कोपोलो देश पहाण्यासाठी भारतात आला. त्यावेळी दक्षिण भारतातील काकतीय साम्राज्य चांगले भरभराटीस आलेले होते. त्याची राजधानी होती वारंगळ. किल्ल्याच्या तटाने घेरलेल्या वारंगळ नगराची भरपूर स्तुती करणारे वर्णन त्याने लिहून ठेवले आहे. राणी रुद्रमदेवी हिने नंतर या किल्ल्याला बाहेरून एक भिंत बांधून तो आणखी मजबूत केला.

मांकल शहर उत्तम दर्जाच्या हिऱ्यांसाठी प्रसिद्ध होते. याच शहराजवळ राणी रुद्रमदेवीने आणखी एक किल्ला बांधला. १५१८ मधे कुतुब-उल्-मुल्क-सुल्तान कुली याने मांकल येथे कुतुबशाही वंशाची स्थापना केली. जुन्या किल्ल्याची त्याने डागडुजी करवली, त्यात काही नवीन इमारतीही बांधल्या; आणि त्याला नाव दिले - गोवळकोंडा.

गोवळकोंड्याची अनेक वैशिष्ट्ये आहेत. चारशे फूट उंचीच्या डोंगरावरून पायथ्यापर्यन्त संदेश देण्याची एक अद्भुत सोय इथे केलेली आहे. एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यन्त क्षणभरात आवाज ऐकू येतो. दुरून शत्रु येताना दिसताच डोंगरावरील पहारेकरी टाळी वाजवून पायथ्याकडील द्वारपालांना सूचना देत आणि ते ताबडतोब किल्ल्याचे दरवाजे बन्द करून घेत. आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे मातीच्या पाइपमधून पाणी खेळवले गेले होते. हे पाइप तटाच्या भिंतींना चिकटून गेलेले असत. मुख्य प्रासाद बालाहिसार हा अशा प्रकारे बांधला होता, की तो उन्हाळ्यातही थंड रहात असे.

**गोवळकोंडा किल्ला**
**राजप्रासाद डोंगरावर आहे.**



किल्ल्यामध्ये पाण्याची सोय खूप उत्तम होती. आतच शेतीही केली जात असे. त्यामुळे कशाही प्रकारच्या हल्ल्याला तोंड देण्याची शक्ती या किल्ल्यात होती. १६८७ मध्ये मोगल सैन्याने किल्ल्याला वेढा दिला. एका रात्री मिट्ट अंधारात एका सैनिकाने तटावर चढायचा प्रयत्न केला, पण त्याला पाहून एक कुत्रा भुंकू लागला. आवाज ऐकून पहारेकऱ्यांनी तेथे येऊन तटाला लावलेली शिडी काढून घेतली आणि शत्रुसैनिक खालच्या खाईत कोसळला. योग्य वेळी भुंकणाऱ्या त्या कुत्र्याच्या गळ्यात रत्नखचित सोन्याचा पट्टा घालून त्याला सजवण्यात आले. या घटनेनंतर चार महिन्यांनी किल्ल्यातल्याच एका अधिकाऱ्याच्या कारस्थानामुळे किल्ला शत्रूच्या हाती सापडला.

किल्ल्याच्या उत्तर व पूर्व बाजूंमधल्या तटाची भिंत पुढे मोगलांनी गोलाकारात वाढवली आणि तेथे अद्‌भुत असे तीन संरक्षक बुरूज बांधले. गोवळकोंड्याच्या शासकांना 'निजाम - उल् - मुल्क' या नावाने संबोधले जाई.

सुप्रसिद्ध असा 'कोहिनूर' हिरा गोवळकोंड्या - नजीक खाणीत सापडला होता.

दक्षिण भारतातल्या अतिप्राचीन किल्ल्यांमध्ये मुख्य आहे जिंजीचा किल्ला. त्रिकोणी आकाराच्या पहाडावर हा किल्ला विस्तारलेला आहे. इ.स.पू. तिसऱ्या शतकापासूनच याचा इतिहास सुरू होतो. झरे व तलावांतील पाणी मातीच्या नळांद्वारे या किल्ल्यात भरलेले असे. या दुर्भेद्य किल्ल्याला मोगल आठ वर्षे वेढा घालून बसले, तेव्हा कोठे तो त्यांच्या हाती आला.

**जिंजी किल्ल्याच्या डावीकडे राण्यांसाठी 'कल्याणभवन' ही इमारत आहे.**

विजयनगरच्या राजांनी युरोपियन वास्तुकला विशारदांच्या साहाय्याने वेलूरचा किल्ला बांधला. अद्‌भुत अशा जोड भिंतींना लागून जे खोल व रुंद खंदक होते त्यात मगरी-सुसरी वावरत असत.

१८५७ मध्ये शिपायांनी बंड केले. या सुप्रसिद्ध स्वातंत्र्ययुद्धा पूर्वीच, म्हणजे १८०६ मधेच जुलै महिन्यात वेलूर किल्ल्यात एक बंड झाले. येथील शिपायांनी २८० ब्रिटिश सैनिकांना पकडून एका

कोठडीत बन्द करून ठेवले. दुसऱ्या दिवशी ब्रिटिश सैन्याने येऊन त्यांची सुटका केली.

तीन बाजूंनी वहाणाऱ्या कावेरीच्या तटावरील श्रीरंगपट्टणमला आपण एक 'द्वीप किल्ला' म्हणू शकतो. चौथ्या बाजूला खूप विशाल असे दोन तट आणि काळ्या पत्थरात खोदून



वेल्लूर किल्ला



हैदर अली

बनवलेला खोल असा खन्दक आहे. या खन्दकातील पाण्याची पातळी कमीजास्त करायची सोय केलेली होती.

नवव्या शतकात येथे रंगनाथ-मन्दिर बांधले गेले, अन् म्हणूनच याचे श्रीरंगपट्टण असे नाव पडले. साहसी वीर हैदर व त्याचा पुत्र टिपू सुलतान यांच्यामुळे या स्थानाला ऐतिहासिक प्रसिद्धी प्राप्त झाली. टिपूच्या 'दर्यादौलत' चे केवळ लाकडाने बनवलेले भित्तिचित्र फारच सुन्दर आहे. टिपू उन्हाळ्यात येथे येऊन रहात असे . त्यानेच बनवलेला दुसरा महाल म्हणजे लालमहाल. ४ मे, १७९९ रोजी जे युद्ध झाले, त्यात ब्रिटिशांनी हा महाल पार क्षतविक्षत करून टाकला आणि टिपूलाही याच युद्धात 'वीरगती' प्राप्त झाली. या किल्ल्याचे भग्न खंडावशेष केवळ इतिहासाचे साक्षीदार बनून राहिले आहेत.





# अशुभ गृह

सूर्यास्ताच्या वेळी एका अरण्यातून एक मध्यमवयीन माणूस चालत होता. त्याच्या चेहऱ्यावर उदासभाव पसरलेला होता. मधूनमधून चहूकडे दृष्टी टाकून तो स्वतःशी बडबडत होता.

इतक्यात एक म्हातारा उच्च स्वराने रडत त्याच्या समोर आला.

प्रवाशाने म्हाताऱ्याला थांबवून विचारले, "म्हातार बाबा, रडायला काय झालं तुम्हाला ?" काहीसा चिडून म्हातारा म्हणाला, "माझं दुःख जाणून घ्यायची तुला काय गरज? तू थोडंच ते दूर करून माझे अश्रु पुसणार आहेस?"

"जो हसतमुख असतो न बाबा, त्याच्या हसण्याचं कारण विचारायला कोणी जात नसतं. पण रडणं हे काहीसं अस्वाभाविक आहे न, म्हणून चौकशी केल्यावाचून रहावतं नाही."

या वेळी जास्तच चिडत म्हातारा म्हणाला, "अरे, माझ्या अर्ध्या-इतकंही वय नसेल तुझं. पण बोलतोयस असं, की जणू काही मोठा ज्ञानी माणूस लागून गेला आहेस ! ज्योतिषी महेश पांडे तर मला म्हणाला होता की, मी अजून सहा वर्षं जगेन; पण इथली काही नालायक माणसं म्हणतायत की, मी त्या 'अशुभ गृहा'त पाय ठेवल्यामुळे आता एक महिन्यापेक्षा अधिक जगणार नाही. त्या अशुभ घरात जाऊन मोठे संकटच ओढवून घेतलं की मी स्वतःवर !"

"अशुभ गृह? कुठं आहे ते? अंधार पसरू लागलाय आता, मला कुठे न कुठे आसरा शोधावाच लागणार आहे ना !" प्रवासी उत्सुकतेने बोलला.

"असाच थोडा आणखी पुढे जा. नन्तर डावीकडे वळलास की दिसेल तुला ते अशुभ घर." असे सांगत, जोराने रडत रडत म्हातारा तेथून धावत निघून गेला.

जगदीश जगताप

प्रवासी थोडा पुढे जाअून डावीकडे वळला. तिथे त्याला अुंच अुंच वृक्षांच्या मधे असणारे एक जुने घर दिसले. प्रवाशाने ओळखले की हेच ते 'अशुभ गृह'. पण रात्र तिथेच काढायचे त्याने ठरवले अन् त्या घराच्या बन्द दरवाजावर थाप मारली.

घराच्या प्रवेश द्वाराच्या लाकडाला वाळवी लागलेली होती. त्याच्या दोन्ही कवाडांना फटी पडलेल्या होत्या. त्यामुळे घर विचित्र दिसत होते. थोड्या वेळाने दार अुघडले गेले. ते अुघडणारा होता एक कुबडा.

प्रवाशाने रात्र तिथेच काढण्यासाठी कुबड्याकडे परवानगी विचारली. कुबडा म्हणाला, ''अरे, प्रवाशांसाठीच तर इथे जंगलात इतकं मोठं घर बांधून ठेवलंय ! खुशाल रहा नं इथे !''

प्रवासी घरात शिरला. तिथे त्याने चार कुबडे खिडक्यांमधे अन् कट्ट्यांवर दिवे पाजळून ठेवत असलेले पाहिले. पण त्या दिव्यांमधे तेल नव्हते ! ते तर चमकणारे मोठमोठे हिरे असून त्यांचाच प्रकाश तिथे फाकत होता !

ते दृश्य पाहून आश्चर्यचकित झालेला प्रवासी म्हणाला, ''फारच विचित्र दिसतंय हे !''

''सारं जीवनच विचित्र आहे. याहूनही मोठं असं आणखी एक आश्चर्यही आहे.'' म्हणत एक कुबडा हसला अन् म्हणाला, ''जोवर रहायचं असेल, तोवर इथे आरामात रहा. पण आमच्या जवळ कसल्याही चौकश्या नाही करायच्या अन् पहिल्या मजल्यावर जो सोन्याचा दरवाजा आहे, तो काहीही झालं तरी अुघडायचा नाही; एवढं लक्षात ठेव.''

''नाही अुघडणार. पण या घराचा मालक कोण एवढं तरी सांग !''

''प्रथमच, आम्हाला काही विचारायचं नाही असं सांगितलं ना? चल माझ्या बरोबर.'' कुबडा म्हणाला.

प्रवाशाला स्नान करायचे होते. त्याने इच्छा प्रकट करताच कुबड्याने छान गुलाबाच्या पाकळ्या व अत्तर मिसळलेल्या पाण्याची व्यवस्था केली.

स्नान झाल्याबरोबर प्रवाशाला खूप भूक लागली. आतल्या खोलीत एक खूपच मोठे टेबल असून त्यावर बरीचशी झाकून ठेवलेली भांडी होती. प्रवासी भोजन करायला बसला, अन् कुबडा तो जे जे मागेल ते वाढू लागला. त्याला कुबड्याला बरेच प्रश्न विचारायचे होते. पण त्याने काही विचारायला सुरुवात करताच कुबडा आपल्या तोंडावर बोट ठेवून त्याला चुप रहायचा इशारा करी. तिथल्या कुबड्यांनी त्याचे शंकानिरसन करणे दूरच, पण अगदी साध्या प्रश्नाचे 'होय-नाही' असे अुत्तरही दिले नाही. एका खूप मोठ्याशा खोलीत त्याच्या झोपायची व्यवस्था करण्यात आली. एका कुबड्याने त्या खोलीच्या खिडकीचा रेशमी पडदा दूर करताच फुलांच्या सुगंधाने युक्त थंड हवा आत येअू लागली. बाहेर टिपूर चांदणे पसरलेले दिसत होते.

इन्द्राच्या महालासारख्या या सुन्दर घराला त्या रडणाऱ्या म्हाताऱ्याने 'अशुभ गृह' असे का







म्हटले, हेच त्याला समजेना.

सकाळ झाल्यावर स्नान व भोजनादीची व्यवस्था अुत्तम होती. 'गप्पा मारायला इथे कोणी नाही' या एकाच गोष्टीचे फक्त प्रवाशाला वाईट वाटत होते. त्या दिवशी संध्याकाळपर्यन्त तो त्या घराच्या सोळा खोल्यांतून नुसताच फिरत राहिला.

प्रवासी शेवटी कंटाळला आणि घराच्या पहिल्या मजल्यावर गेला. तिथे फक्त एकच खोली होती. सोन्याने बनवलेला त्या खोलीचा दरवाजा चमचमत होता. अगदी अद्वितीय दिसत होता तो. प्रवाशाला वाटले की, दरवाजाच इतका सुंदर आहे, तर आतली खोली याहूनही अद्भुत असेल ! पण तो दरवाजा अुघडायला मनाई असल्याचे कुबड्याने अगदी पहिल्यानेच सांगितले होते. प्रवाशाची अुत्सुकता इतकी वाढली की आता तो दरवाजा अुघडून पाहिल्यावाचून आपल्याला झोपच येणार नाही, रात्रभर तळमळत रहावे लागेल असे त्याला वाटू लागले.

'काय व्हायचे असेल ते होईल; पाहू पुढे !' असे ठरवून त्याने तो दरवाजा हळूच ढकलला. एकदम त्याचे डोळे दिपले ! खोलीची फरशी संगमरवरी दगडांची होती आणि भिंती सोन्याच्या विटांनी बनवलेल्या होत्या. भिंतीला मधेमधे हिरेमोती जडवलेले होते. त्या खोलीतून खाली जाण्यासाठी एक जिना होता. गुळगुळीत पायऱ्यांवरून पाय घसरू नये म्हणून प्रवासी अगदी सावधगिरीने हळुहळू जिना अुतरला.

झालं, कुठूनसा एक कावळा अुडत आला अन् त्याने प्रवाशाच्या मस्तकाला चोच मारून त्याला घायाळ केले; 'म्याव म्याव' आवाज करत कुठूनसा एक बोका येअून त्याच्या छातीवरच आपटला ! तो इतक्या जोराने ओरडला की 'आपले कानच आता फाटतील' या विचाराने त्याने आपले कान दोन्ही हातांनी झाकून घेतले. एवढ्यात एक वटवाघूळ त्याच्या डोक्यावरून तीनदा अुडाले. भयाने तो थरथर कापू लागला. परत येण्यासाठी तो फिरणार इतक्यात वीज चमकल्या सारखा आवाज आला, "मूर्खा, बरोबर वीस वर्षांनी याच तिथीला तुला मृत्यु येईल. अगदी नक्की !"



हे ऐकल्यावर प्रवाशाला फारच आनन्द झाला अन् तो आपल्या खोलीत परत आला. तिथे पाचही कुबडे एकमेकांच्या खांद्यांवर हात ठेवून आपसात कुजबुजत होते.

प्रवाशाने अुत्साहभरल्या आवाजात विचारले, "सर्वजण इथे का जमला आहात?"

त्याच्याकडे आश्चर्याने पहात एकजण बोलला, "आपण केंव्हा मरणार आहोत हे माहीत होअूनही रडण्याऐवजी तू हसतो आहेस हे मोठं विचित्र वाटतंय आम्हाला !"

"पण मी का रडावं ? आपल्या मरणाचा दिवस कळल्यामुळे तर उलट मला आनन्दच झालाय." प्रवासी म्हणाला.

"बऱ्याच कालावधीनन्तर तुझ्यासारखा अजब माणूस भेटला आम्हाला. ही गोष्ट आता तावडतोब आम्हाला आमच्या प्रमुखाला सांगायला हवी. आता इथून पुढं या 'अशुभ गृह' त आमचं काही काम नाही, असं वाटायला लागलंय." असे म्हणत कुबडे तेथून नाहीसे झाले.

दुसऱ्याच क्षणी ते 'अशुभ गृह' ही डोळ्यांपुढून नाहीसे झाले ! आता प्रवासी झाडांच्या मधल्या रिकाम्या जागी अुभा होता. तो खूप आनन्दाने स्वत:शीच बडबडू लागला, "खरंच आहे; एकाद्या माणसाला आपल्या मृत्यूची वेळ कळते, तेंव्हा तो बेचैन होतो. निश्चिन्त राहू शकत नाही तो ! लाखात माझ्यासारखा एकादाच या वार्तेनं खुश होत असेल."

हा प्रवासी एक खेडुत माणूस होता. त्याला हृदयरोग होता. ज्या ज्या वैद्यांनी त्याला तपासले, त्या सर्वांनी सांगितले होते की, "तू सहा महिन्यांपेक्षा जास्त जगणार नाहीस." यामुळे सर्व बंधने सोडून तो निरनिराळ्या गावांतून अन् जंगलांतून भटकत होता. 'आपण आता आणखी वीस वर्षे जगणार आहोत', असे त्याला जेंव्हा समजले, तेंव्हा तो फारच खुश झाला. त्यामुळे त्याचे आत्मबल व आत्मविश्वास जास्तच वाढले.

मनातल्या मनात त्या कुबड्यांबद्दल कृतज्ञता व्यक्त करत आणि आपल्या इष्ट देवाची प्रार्थना करत प्रवाशाने आता स्वत:च्या गावाकडे मोर्चा वळवला.





# गरजवन्त

**मा**रुती एक अुत्तम आचारी होता, पण स्वभावाने लहरी. त्यामुळे सहसा त्याला कोणी कामाला बोलवत नसे. त्याचा बाप भीम काही विशेष चांगला स्वयंपाक करत नसे, पण तरीही लोक त्यालाच बोलवत. बापाची कमाई चांगली असल्याने मारुतीचे दिवसही मजेत जात.

त्याच गावात धर्मराज नावाचा एक सधन शेतकरी होता. त्याच्या मुलाला दरबारात नोकरी मिळाल्यामुळे त्याचे नातेवाईक 'आपल्याला मेजवानी हवी' असा आग्रह धरून बसले. धर्मराजने खुशीने मेजवानीचा बेत ठरवला. पण ऐन वेळी भीम आजारी पडला अन् धर्मराजला मारुतीला बोलावणे भाग पडले.

मारुतीने स्वयंपाक-घरात पाअूल ठेवताच तक्रारी करायला सुरुवात केली की – 'आणलेलं सारं वाणसामान अपुरं अन् खालच्या दर्जाचं आहे' ...इ.इ. धर्मराजला मारुतीचा स्वभाव माहीत असल्याने त्याने मुकाट्याने सगळे ऐकून घेतले.

धर्मराज चांगलाच अभिमानी होता. तो दुसऱ्यांना कधी नावे ठेवत नसे, पण त्याबरोबरच अुगीच कुणाचे 'फट्' म्हणणेही ऐकून घेत नसे. परंतु आत्ता त्याला मारुतीची बडबड ऐकून घ्यावी लागली.

स्वयंपाक करता करता मारुती धर्मराजला 'कंजूष' म्हणाला. तेंव्हां धर्मराज त्याची समजूत काढत म्हणाला, ''अरे मारुती, तुझ्या बाबांनी दिलेल्या यादीप्रमाणेच सारं सामान आणलंय मी ! अन् तरीही तुला आणखी जे काही हवं असेल ते सांग. लगेच माणूस पाठवून मागवून घेतो मी.''

''पण स्वयंपाक करायला माझ्या बाबांना बोलावण्यातच तुमचा कंजूषपणा दिसतोय ना ! ते पक्वान्नं बनवतात खरी, पण मी ते बनवले की तुटून पडतात माणसं त्यावर. अन् त्यासाठी लागतं दुप्पट साहित्य !'' मारुती आवेशाने बोलतच राहिला. तेंव्हा मधेच एकदा धर्मराज म्हणाला, ''अरे बाबा, तू म्हणशील ते आणवून देतो नं मी ! मग अुगाच मधे मधे ओरडतोस कशाला?''

''माझी सवयच आहे तशी ! तुम्हाला आवडत नसेल तर सांगा. आपला गाशा गुंडाळून जातो मी घरी परत !'' मारुती धमकी देत बोलला.

धर्मराजने कसेतरी 'बाबा, पुता' करून आपले काम त्याच्याकडून करून घेतले. रुचकर मेजवानीची पाहुण्यांनी खूप प्रशंसा केली. धर्मराजनेही कबुलीपेक्षा मारुतीला जास्तच रक्कम देअून पाठवले.

परंतु नंतर मारुतीच्या गैरवागणुकीबद्दल सर्वांना समजलेच. पदार्थ छान झालेही असतील, पण आता लोक धर्मराजच्या सहिष्णुतेचीच चर्चा करू लागले.



काही दिवसांनी म्हातारा भीम मरून गेला अन् मारुतीला दिवस कंठणे कठीण जाअू लागले. स्वयंपाक करून पैसे कमावणेही त्याला अवघड जाअू लागले; कारण त्याचा स्वभाव माहीत असल्याने लोक त्याला कामाला बोलावणेच टाळू लागले.

अशा परिस्थितीला गांजून मारुती एकदा धर्मराजकडे जाअून म्हणाला, ''तुमच्या घरात स्वयंपाक्याची गरज आहे असं कळलं मला महाराज. मला घ्या ना ठेवून.''

जरा विचार करून धर्मराज म्हणाला, ''माझी बायको हल्ली मधून मधून आजारी असते, तेंव्हा काही दिवस स्वयंपाक्याची गरज आहे खरी मला. पण मी जास्त पगार नाही देअू शकणार. तू जर जमीनदाराकडे ही नोकरी पत्करलीस, तर जास्त पैसे मिळतील तुला. तेंव्हा तिकडेच गेलास तर बरं होईल बघ !''

मारुती सांगू लागला, ''होय, मला सुद्धा कळलंय तसं. पण जमीनदाराकडे हातून काही चूक झाली, तर फार कडक शिक्षा मिळते असंही ऐकलंय.''

''चूक झाली की, शिक्षा तर मिळणारच ना? तेंव्हा चूक करूच नकोस म्हणजे झालं !'' धर्मराजाने सल्ला दिला.

''पण.... मी जरा फाटक्या तोंडाचा आहे नं ! जमीनदाराकडे असं काही चालायचं नाही.'' मारुतीने चाचरत आपला अुणेपणा कबूल केला.

शैलेश सरवटे

क्षणभर थांबून धर्मराज म्हणाला, ''पण जमीनदार चांगला माणूस आहे. तो अनावश्यक कधी कोणाला शिवी देत नाही. तुला तर माहीतच आहे की मी मोठा स्पष्टवक्ता माणूस आहे; रागावलो की तोंडाला येईल ते बोलतो तो. सहन करशील तू?''

त्याच्या या बोलण्यावर आश्चर्य प्रकट करत मारुती म्हणाला, ''अं? तुम्ही अन् स्पष्टवक्ते? माझा विश्वास नाही बसत ! तुम्ही मेजवानी दिलीत, त्या दिवशी माझं सगळं बोलणं ऐकून घेतलंत तुम्ही ! माझी प्रत्येक मागणी पुरी केलीत. खूप शांत वाटलात, खूप सहनशील वाटलात मला ! मेजवानीला आलेल्या सर्वांनी तुमच्या सहिष्णुतेबद्दल तुमची तारीफ केलेलीही कानावर आली माझ्या ! मी ते सारं कसं विसरेन बरं ?''

''हं ऽ ! त्यावेळी माझ्या गरजेनं तुझा लहरीपणा चालवून घेतला. गरजवंताला अक्कल नसते म्हणतात ना ! पण आत्ता तर मला तशी काही गरज नाहीये. आता यावेळी माझ्या शिव्या खायची गरज तुला असेल, तर ये माझ्याकडे नोकरीला. नाहीतर शोध दुसरी कडे कुठे काम. आताच्या परिस्थितीत तुझा लहरीपणा मी नाही सहन करणार ! अुलट काम नीट न झालं किंवा काही समर्थन करायचा प्रयत्न केलास तर खूप शिव्या घालीन मी तुला.'' धर्मराजने आपल्या फटकळपणाची चुणूक दाखवत म्हटले.

आपल्या दु:खावर कसे तरी पांघरूण घालत, हात जोडून मारुती म्हणाला, ''महाराज, आजपर्यन्त मी इतरांपाशी फार वाकडा वागलो. इतरांचे सद्गुण, त्यांची न्यायबुद्धी, यांची मी नेहमी अवहेलनाच केली. तुम्हाला खूप त्रास दिला; तरीही न त्रासता तुम्ही माझ्याशी सद्व्यवहारच केलात, अन् चांगला धडा शिकवलात मला. माझं डोकं चांगलं ठिकाणावर आणलंत तुम्ही ! आता मला तुम्ही तुमच्याकडे नोकरी द्या, वा नका देअू; पण मी तुमचा कृतज्ञच राहीन. तुमचा अुदार स्वभाव जन्मभर आठवणीत ठेवीन मी.''

मारुतीच्या वर्तनातला बदल पाहून धर्मराजला खूप आनन्द वाटला. त्याने त्याला आपल्या घरीच नोकरीला ठेवला. आता मारुती बरोबर वागू लागला. त्याने चांगले नाव मिळवले अन् तो आरामात राहू लागला.





# महाभारत

विदुर गेल्याबरोबर आपल्या पित्याजवळ जाअून दुर्योधन म्हणाला, ''बाबा, हे विदुरकाका कायम तुमच्या जवळच राहू लागले आहेत. आपल्या मनातली गोष्ट तुमच्याजवळ बोलणंही मला शक्य होत नाही.''

धृतराष्ट्र दुर्योधनाला म्हणाला, ''पुत्रा, याबाबत तुझे अन् माझे विचार एकच आहेत. त्यात फरक थोडाच होणार ? विदुर नेहमीच पांडवांची स्तुती करत रहातो आणि मला ती ऐकून घ्यावी लागते. त्याच्या विरोधी मी काही बोलूही शकत नाही. तू एक काम कर. तू अन् कर्ण मिळून नीट विचार करून ठरवा.''

''द्रुपदाचे जावई झाल्यापासून पांडव जास्तच बलवान झाले आहेत. या दोघांच्यात फूट पाडण्यासाठी काही अुपाय करावा लागेल. तान्त्रिकांच्या साह्याने द्रुपद आणि धृष्टद्युम्न पांडवांचे कट्टर शत्रू बनतील.'' दुर्योधनाचे विचार चालू झाले.

नंतर दुर्योधनाला याहूनही मोठे असे एक कारस्थान सुचले. द्रौपदीला पाच पती आहेत. तिच्यात अन् त्यांच्यात द्वेष अन् घृणेचं बी पेरायला हवं.

कर्णही तेथे येअून दुर्योधनाच्या या सर्व योजना ऐकत राहिला. तेंव्हा दुर्योधनाने कर्ण व धृतराष्ट्र यांना आणखी एक कुटिल योजना ऐकवली. तो म्हणाला, ''पांडवांच्यात भीमच खरा पराक्रमी आहे. त्याला आपण गुप्तपणे मारून टाकू. भीम आणि अर्जुन हे



आग आणि वाऱ्यासारखे आहेत. ते बरोबर असले की नक्की समजावं - आता प्रलय होणार ! पण आपल्या योजनेप्रमाणे भीम मरून गेला, तर एकटा अर्जुन काहीच करू शकणार नाही, अर्जुन तर आपल्या कर्णाच्या बरोबरीचाही नाहीय. मी तर आव्हान देअून सांगू शकतो की भीम अुरला नाही, तर बाकी सगळे पांडव आपले दास होअून राहतील.''

यावर कर्ण म्हणाला, या अुपायांनी आपण आपलं ध्येय गाठू शकणार नाही. लोभाला बळी पडून द्रुपद काय आपल्या सुप्रसिद्ध बलिष्ठ जावयांना सोडून देईल ? त्यांच्याशी वैर मांडील ? आपल्याच कन्येशी द्रोह करील? द्रौपदीनं त्या पाचजणांशी विवाह केला, तेंव्हा ते हीन स्थितीत होते. ते आज एकदम अुत्तम स्थितीत आहेत. ते द्रौपदीवर प्रेम करत आहेत. तेंव्हा, ती का म्हणून त्यांना सोडून देईल? तुझं असलं काही कारस्थान मुळीच सफल होणार नाही. तुझा दुसरा विचार आहे भीमाला गुप्तपणे मारायचा ! यासाठी आपण आतापर्यंत कमी प्रयत्न केले का ? असल्या अुपायांनी आपण त्यांचं काहीही वाकडं करू शकणार नाही. वर्तमान स्थितीत आता आपल्यापुढे एकच मार्ग आहे, अन् तो आहे - युद्ध ! त्यात कसला अधर्म नाही अन् कुणावर अन्यायही होत नाही.''

कर्णाच्या या बोलण्याचे समर्थन करत धृतराष्ट्र म्हणाला, ''याचं बोलणं योग्य असंच आहे. याबद्दल भीष्म, द्रोण आणि विदुर यांनाही त्यांची मतं विचारून घेअू.''

भीष्माने आपला अभिप्राय व्यक्त केला, ''पांडव अन् कौरव मला सारखेच आहेत. वाडवडिलांपासून सुस्थिरपणे चालत आलेल्या या राज्याचा अर्धा भाग पांडवांना मिळायला हवा. तसं न करण्यानं आपलीच अप्रतिष्ठा होईल, अपकीर्ती होईल. राजे लोकांच्या दृष्टीने अपकीर्ती पेक्षा मृत्यु श्रेयस्कर वाटतो. दुर्योधना, आतापर्यन्त पांडवांशी तू खूप अन्यायाने वागून चुकला आहेस. पण तरीही तू त्यांच्या केसालाही धक्का लावू शकला





नाहीस. लाक्षागृहात मेला असेल, तर तो तू पाठवलेला पुरोचनच ! कुन्ती अन् पांडवांच्या लाक्षागृहात जळून मरण्याची बातमी ऐकली, तेंव्हा कोणाचं तोंड पहाण्याचीही मला घृणा वाटू लागली. ते जिवन्त राहिले म्हणूनच केवळ तू अनादरातून वाचलास. अजूनही वेळ गेली नाहीय. स्वतःला सुधार.''

यानन्तर द्रोण बोलले, ''भीष्मांचं मत तेच माझंही मत आहे याबाबत. पांडवांना बोलावून घेअून त्यांना अर्ध राज्य देणंच आवश्यक अन् श्रेयस्कर वाटतंय मला. द्रुपद, त्याचे पुत्र, कुन्तीदेवी, पांडव आणि द्रौपदी या सर्वांना वस्त्राभूषणे भेटीदाखल पाठवा. त्या भेटी घेअून दुःशासन किंवा विकर्णाने कांपिल्य नगरीला जावं. जे कोणी जाईल, त्याने पांडवांशी प्रेमाने वागावे अन् त्यांना हस्तिनापुरी येण्याचे निमन्त्रण द्यावे. त्यांना आपल्या बरोबर घेअून यावे. यासाठी द्रुपदालाही प्रार्थना करणं आवश्यक आहे.''

बोलणे मधेच अडवत कर्ण दुर्योधनाला म्हणाला, ''मित्रा, हे दोघे वृद्ध नेहमी शत्रूचीच प्रशंसा करत सुटतात, अन् तुझ्या प्रगतीचा मार्ग अडवतात. यांच्या बोलण्याकडे मुळीच लक्ष देअू नकोस.''

कर्णाचे हे कडवट बोलणे ऐकून द्रोण क्रोधाने म्हणाले, ''अरे, तुझा पांडवांवर राग आहे, मनात सूडभावना आहे, म्हणूनच आमचं बोलणं मान्य करायला तुझी तयारी नाहीय; ते काहीही असो. आमच्या सल्ल्याप्रमाणे वागू शकणार नसलास, तर कौरवांचंच नुकसान होईल, हे नीट लक्षात ठेव.''

विदुर धृतराष्ट्राला म्हणाला, ''महाराज, आम्ही आपलं भलं इच्छितो. केवळ तुम्हाला दोन बऱ्या गोष्टी सांगू शकतो, पण त्या करवून घेण्याचा अधिकार गाजवू शकत नाही. द्रोणाचार्य जे बोलले, ते सारं कौरवांच्या हिताचंच बोलले. यात पक्षपाताची बुद्धीही नाहीय. आपलं स्वतःच्या पुत्रांवर फार प्रेम आहे, त्यामुळे तुम्हाला संतुष्ट करण्यासाठी गोड गोड बोलणारी माणसंही असतील. असल्या



लोकांच्या बोलण्यावर विश्वास ठेवण्यात, आपल्याच पुत्रांचं अहित होण्याची शक्यता आहे. पांडवांना जिंकणं सोपं नव्हे. त्यांना कृष्णाचा आधार आहे. भीम अन् अर्जुन हे अभूतपूर्व साहसी व शक्तिवान् आहेत. भलेपणानं जे साध्य होऊ शकेल ते शस्त्रांनी जमणार नाही. हस्तिनापुरची प्रजा पांडवांचं दर्शन घ्यायला उत्सुक आहे. म्हणूनच म्हणतोय, की त्यांना बोलावून घ्या आणि सर्वांना प्रसन्न करा."

धृतराष्ट्र यावर थोडा वेळ विचार करत राहिला अन् नंतर त्याने आपला निर्णय सांगितला, "भीष्म, द्रोण ! आपण सांगितलेत त्यात सत्य आणि वास्तविकता आहे. त्यातच कौरवांचं हित आहे. माझ्या दृष्टीने पांडव हे कौरवांहून कोणी निराळे नाहीत. दोघेही समान आहेत. विदुर, तू स्वतःच पांचालदेशी जा. पांडव, कुन्ती अन् त्यांची पत्नी कृष्णा यांना इथे घेऊन ये. मोठ्या सौभाग्यानेच ते लाक्षागृहात जळण्यापासून वाचले आहेत. द्रुपदपुत्री कृष्णा त्यांची पत्नी बनली आहे हे त्यांचं सद्भाग्यच आहे. मी आता निश्चिन्त झालोय."

अगणित रत्ने, आभूषणे, रेशमी वस्त्रे व अनेक भेटवस्तु बरोबर घेऊन विदुर कांपिल्य नगरात पोचला व द्रुपद, धृष्टद्युम्न, कृष्ण व पांडवांना भेटला. त्यांचे क्षेमकुशल विचारल्यानन्तर त्याने हस्तिनापुरातील साऱ्या घटनाही सांगितल्या. ज्यांना ज्यांना भेटी द्यायच्या होत्या, त्याही देऊन टाकल्या.

भरल्या सभेत विदुर द्रुपदाला म्हणाला, "महाराज, धृतराष्ट्र व भीष्म आपला संबंध जुळून आल्यामुळे आनंदित झाले आहेत. आपले कुशल जाणून घेण्यासाठी त्यांनी मला इथे पाठवले आहे. आपले मित्र द्रोण यांनी त्यांच्या वतीने आपणाला प्रेमालिंगन देण्याची मला विनंती केली आहे. आपली कन्या पांडवांची पत्नी झाली, याचा त्यांना राज्यप्राप्तीपेक्षा ही जास्त आनन्द वाटतोय. पांडवांनी हस्तिनापुर सोडल्याला आता खूप काळ लोटलाय. कौरव त्यांना भेटायला आतुर आहेत. धृतराष्ट्राने मला आज्ञा दिलीय की मी कुन्ती अन् द्रौपदीसहित पांडवांना हस्तिनापुरी घेऊन यावे. आपण मला यासाठी आपली अनुमती द्यावी."

द्रुपद विदुराला म्हणाला, "आम्ही कौरवांचे आप्त बनलो आहोत, याचा मलाही अपार हर्ष वाटत आहे. धृतराष्ट्राची आज्ञा आम्हाला शिरोधार्य आहे. शिवाय आपणासारखे सूक्ष्मग्राही स्वतः यांना घेऊन जायला आलेले आहात, तेंव्हा मी 'नाही' कसं म्हणू शकेन? तशी शक्यताच नाही नं? पण कृष्ण, बलराम यांचं ही मत विचारायला हवं. ते तर पांडवांचं नेहमी हितचिंतनच करत असतात. याशिवाय प्राज्ञ, धर्मपरायण अन् शक्तिशाली पांडवांची स्वतःची काय इच्छा आहे, हे जाणणं अत्यन्त आवश्यक अन् उचित होईल."

द्रुपदाला मधेच थांबवत धर्मराज म्हणाला, "महाराज, इथे तर आम्ही तुमच्या अधीन आहोत. आपण पूर्ण विचारान्ती जे ठरवाल ते प्रत्यक्षात आणणं हा आमचा धर्म असेल."

आता कृष्ण सर्वांना उद्देशून म्हणाला, "विदुरकाकांच्या इच्छेनुसार पांडवांना हस्तिनापुरला पाठवणं हेच मी उचित समजतो. पण मी सुद्धा जाणू इच्छितो की पांडवांचं सर्व प्रकारे कल्याण इच्छिणाऱ्या द्रुपद महाराजांचे मत काय आहे?"

द्रुपद म्हणाला, "आत्ता आत्ताच पांडव



माझे निकटचे नातेवाईक झाले आहेत. पण तुमचे तर ते लहानपणापासूनचे आप्त आहेत. दूर असतानाही तुम्ही नेहमी त्यांचं भलंच इच्छित असता. तेंव्हा तुमचं मत, ते माझंही मत असेल."

अशा प्रकारे द्रुपदाची परवानगी मिळाली. द्रुपद स्वतःच कुन्ती व पांडवांसह विदुराबरोबर हस्तिनापुरला जायला निघाला. कृष्णबलरामही त्यांच्याबरोबर गेले. विदुराने अगोदरच पाठवलेल्या दूतांनी येऊन धृतराष्ट्राला त्यांच्या आगमनाची वार्ता दिली. संतुष्ट झालेल्या धृतराष्ट्राने विकर्ण, चित्रसेन, द्रोण व कृपाचार्य यांना त्यांच्या स्वागतासाठी पाठवले.

त्यांच्याबरोबर पांडव हस्तिनापुरी पोचले, तेंव्हा सारे नगर सजवलेले होते. जनता त्यांना पाहून फारच आनन्दित झाली. त्यांचे आशिर्वाद घेऊन पांडव राजभवनात पोचले. त्यांनी धृतराष्ट्र व भीष्म यांना पदस्पर्श करून त्यांचे आशिर्वाद घेतले.

काही दिवसांनी धृतराष्ट्राने पांडव व श्रीकृष्ण यांना बोलावून घेऊन म्हटले, ''मुलांनो, तुमच्यात अन् कौरवांच्यात वैरभाव वाढावा असे मला वाटत नाही. तेंव्हा अगदी आत्ताच अर्धं राज्य मी तुमच्या हाती सोपवत आहे. आजपासून तुम्ही खांडवप्रस्थात स्थिर होऊन सुखाने आपलं राज्य चालवा.''

धर्मराजाने 'होय' म्हणून अुपस्थित सर्वांना विनयाने नमस्कार केला. तो आपली माता कुन्ती, पत्नी, भाअू आणि कृष्ण बलरामांसह खांडवप्रस्थाला पोचला. खांडवप्रस्थ हे एक खूप विशाल व भयानक असे अरण्य होते. ते ओळखून कृष्णाने इन्द्राचे स्मरण केले. त्याचा अुद्देश जाणून इन्द्राने विश्वकर्म्याला तेथे पाठवले.

विश्वकर्म्याने एक विशिष्ट जागा पसंत केली आणि तिथे एक भव्य व सुंदर नगर निर्माण केले. चारही बाजूंना अुंच अुंच तट, प्राकाराबाहेरील खोल खंदक, आत चमकती शुभ्र भवने, गरुडाकार सिंहद्वार, विशाल रस्ते, राजांसाठी रहाण्याची ठिकाणे, देवालये व कुठे कुठे सुंदर अुद्याने यांनी युक्त असे ते नगर अत्यन्त सुंदर व अलौकिक असेच दिसत होते. नगराचे 'इन्द्रप्रस्थ' असे नामकरण करण्यात आले.

नगराच्या बरोबर मध्यावर खुद्द पांडवांसाठी निवासगृहे बनवण्यात आली. चतुर्वर्णाचे लोक, शिल्पकलेत निष्णात असे शिल्पकार इत्यादि लोक या नगरात येअून राहू लागले.

धर्मराज आपले भाअू व पत्नी यांच्यासह सुखाने कालक्रमणा करत व अुत्तम तऱ्हेने राज्यशासन संभाळत तेथे राहू लागला. ते सुस्थिर झाल्यावर श्रीकृष्ण पांडवांचा निरोप घेअून द्वारकेला परत गेला.



# बोलणारा पोपट

हेलापुरी राजधानीतल्या एका गल्लीत एक म्हातारा पिंजऱ्यांत ठेवलेले पोपट जाणाऱ्या येणाऱ्या लोकांना दाखवत त्यांचे लक्ष आपल्याकडे आकर्षित करत होता. तोंडाने तो ओरडत होता, ''अरे लोकांनो, हे सारे बोलणारे पोपट आहेत बोलणारे ! तुम्ही बोलाल ते हे ही बोलून दाखवतील ! किंमत फक्त पाच-पाच अशर्फ्या ! घ्या, लवकर घ्या, संपून जातील !'' घेणाऱ्या गिऱ्हाइकाला त्याच आवाजात ओरडून तो असेही सांगत होता की, ''विकलेला पक्षी परत घ्यायची आमच्या जमातीत पद्धत नाही. ज्याच्या-त्याच्या नशिबाचा भाग आहे !''

बरेच लोक पोपट विकत घेऊन जात होते. दुर्गादासने हे पाहिले, अन् स्वतःही एक पोपट विकत घेऊन तो घरी गेला. नंतर त्याने पोपटाला बोलायला लावायचे बरेच प्रयत्न केले, पण दुर्गादासच्या तोंडून निघालेल्या एकाही शब्दाचे पोपटाने अनुकरण केले नाही. दुर्गादासला वाटले की नव्या जागी आल्यामुळे पोपट बिचकत असेल. दोन दिवस त्याने अुत्तमोत्तम फळे आणि भिजवलेले चणे, दाणे वगैरे त्याला खायला घातले. तरीही काहीच फायदा झाला नाही.

त्रासून गेलेला दुर्गादास शेवटी पोपटाला घेऊन त्या म्हाताऱ्याकडे गेला अन् तक्रार करू लागला, ''म्हातारबाबा, चांगलं फसवलंत की मला ! नागरिकांना फसवून त्यांच्याकडून पैसे काढायची तुमची युक्ती छान समजलीय मला. सारे सांगत होतात की मालकानं बोललेला प्रत्येक शब्द पोपट बोलून दाखवतात. हा पोपट तर एक शब्दही बोलत नाहीय.''

म्हाताऱ्याने पोपट आपल्या हाती घेतला अन् त्याच्याकडे नीट निरखून पाहिले. मग तो त्याच्याशी एक दोन शब्द बोलला, पण पोपटा कडून काहीच प्रतिसाद मिळाला नाही. तेंव्हा तो परत दुर्गादासच्या हाती देत म्हातारा म्हणाला, ''मी तर प्रथमच सांगितलं होतं, की विकलेला पक्षी परत घेणार नाही. आपलं आपलं भाग्य ! मला तर वाटतंय की हा बहिरा आहे. जरा चांगल्याश्या वैद्याकडे जा घेऊन याला.''







# पांगारा

खूप पूर्वी शाळेत अुपयोगात येणाया धूळपाट्या पांगाऱ्याच्या लाकडानेच बनवल्या जात असत. वृक्षशास्त्रात याला अलस्टोनिया स्कोलारिस असे म्हणतात. इंग्रजीत याला डेव्हिल्स ट्री (भुतांचे झाड) असे म्हणतात. हिन्दीत याला 'चाटिन', असामीत 'छैटीन', अुरियामधे 'चाटिनन', बंगालीत 'चाटिम', मल्याळी व तमिळमधे 'पाला', कानडीत 'मुद्दले' आणि तेलगूत 'पलाशी' असे म्हणतात. संस्कृत मधे याला 'सप्तपर्ण' या नावाने संबोधले जाते. पाचसहा सें.मी. लांबीची याची पाने जाड असतात.

नेहमी हिरवेच दिसणारे हे झाड पंचवीस मीटर पर्यन्त अुंच वाढते. याचे साल चांगले कडक असून ते खाकी रंगाचे व खडबडीत असते.



याच्या फुलांचे गुच्छ हिरवट रंगाचे असून फुले काहीशी सुगंधी असतात. याच्या शेंगाही गुच्छांनीच येतात व त्यांची लांबी ३०-४० सें.मी. इतकी असते.

साधारण जेथे वर्षभर पाअुस पडतो तेथे, म्हणजे मुख्यत्वे पश्चिमघाटात ही झाडे जास्त प्रमाणात आढळतात. याच्या सालात औषधी गुण असतो. लाकूड मात्र नरम असल्याने त्याचा अुपयोग शिसपेन्सिली, काडेपेटीच्या काड्या बनवण्यासाठी केला जातो.

काही प्रान्तात अशी समजूत आहे की या झाडांवर भुतेप्रेते रहातात. पश्चिम घाटातील काही प्रान्तातले पहाडी लोक या झाडाखाली बसायलाही भितात.